


नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.



# नवभारत

मे - जून - जुलै - ऑगस्ट २००६

## ‘उत्तर-नव’ भारत

### विकासाची विविध प्रतिमाने

आंतरशास्त्रीय
(Inter-disciplinary)
कृति चर्चाप्रवर्तनासाठी
(सकस लेख सकस समीक्षणासह आल्यास ते आधी *‘नवभारत’* मध्ये प्रसिद्ध केले जातील आणि त्यावर चर्चाप्रवर्तनासाठी रचना करता येईल.)

- प्रयास : विकास प्रतिमानांचे
- निसर्गशेती
- शिक्षणाची समान संधी
- सामाजिक न्याय
- आदिवासी विकास
- अर्थनीती

सुसंवाद हवा वितंडवाद नको

अनुक्रमणिका

# नानाजी देशमुख : चित्रकूट प्रयोग-प्रकल्प

प्रिय युवा मित्रों,
सस्नेह शुभाशीष।

गुलामी के पूर्व हमारी न्याय व्यवस्था अत्यन्त सरल, अविलम्ब निर्णायक एवं संतोषप्रद थी। वह 'पंचमुखी परमेश्वर' के नाम से जानी जाती थी। फलस्वरूप, ग्रामीण जीवन सद्भावनापूर्ण, परस्पर सहयोगात्मक और सुरक्षित था।

मुस्लिम हुकुमत के काल में शासकों ने शहरों एवं कस्बों में न्याय-व्यवस्था में कुछ परिवर्तन अवश्य किए थे। किन्तु ग्रामीण न्याय-व्यवस्था पूर्ववत् चलती रही।

सन् १७६५ के बक्सर युद्ध में प्राप्त विजय के बाद अंग्रेजों ने अपनी शासनप्रणाली लागू करना प्रारंभ किया। राजस्व वसूली तथा न्याय-व्यवस्था पर अपना शिकंजा जमाना शुरू किया। बंगाल, बिहार और उड़ीसा को मिलाकर विशाल भू-भाग को जिलों की इकाईयों में बांटा। हर जिले के लिए अंग्रेज कलेक्टर नियुक्त किए गए। वे राजस्व वसूली के साथ जिला मजिस्ट्रेट का भी काम करने लगे। आगे चलकर दीवानी और फौजदारी अदालतों की जिला स्तर पर भी स्थापना की। सभी कचहरियों में अंग्रेजी भाषा प्रचलित की गई। अतः वकीलों की आवश्यकता अनुभव होने लगी। १८२८ से लार्ड विलियम बेंटिंग के जमाने से वकीलों का व्यवसाय नियमित रूप से चल पड़ा। वही सिलसिला अबाधित गति से आज भी चल रहा है और अंग्रेजी भाषा का प्रभुत्व बना हुआ है।

सुदैव से मेरा जन्म छोटे से ग्राम में हुआ और मेरा जीवन-कार्य भी ग्रामीण अंचल ही बना हुआ है। फलस्वरूप, मेरा अनेकों बार जिला कचहरियों में जाना हुआ है।

जिला कचहरियों में ९५ प्रतिशत से भी अधिक भीड़ ग्रामवासियों की ही रहती है। वे अपना-अपना मुकादमा लेकर वकीलों को घेरे रहते हैं।

वकील वर्ग सुशिक्षित, कानूनों का जानकार, वादविवाद में पटु तथा नेतृत्व में अग्रणी है। महात्मा गांधी, मोतीलाल नेहरू, डॉ. राजेन्द्र प्रसाद आदि अनेक वकीलों ने स्वातंत्र्य संग्राम का नेतृत्व किया था। आजादी पाने के बाद भी यह वर्ग राजनीति में प्रमुखता प्राप्त किए हुए है।

ग्रामवासी आपस में मुकदमेबाजी के द्वारा स्वयं को बर्बाद कर रहे हैं, यह देखते हुए भी वकील वर्ग उन्हें समझाता नहीं कि वे इस मुकदमेबाजी की बर्बादी से स्वयं को बचा लें। अपितु उनकी मुकदमेबाजी में ही वह अधिक रूचि लेता है। ग्रामीणों की दयनीय दशा जानते हुए भी वह उनसे अधिक मेहनताना वसूलने में संकोच नहीं करता। ग्रामवासी कर्जदार होते हुए भी हजारों वकीलों के सुखमय जीवन का बोझ ढोते आ रहे हैं। यह वकील वर्ग १८२८ से गरीब ग्रामीण आबादी का शोषण करता आ रहा है। इस गंभीर समस्या की ओर हमारे नेतृत्व ने अपनी आँखे मूंद रखी हैं। यदि यह स्थिती ऐसी ही बनी रही तो सरकारों द्वारा बनाई गई ग्रामविकास की योजनाएं क्या कभी देश की सत्तर प्रतिशत से अधिक ग्रामीण आबादी को खुशहाल बना पाएंगी?

देश की लगभग तीन-चौथाई आबादी की परवाह न करने वाली राजनीति में बने रहना मुझे असह्य हुआ और मैंने ग्रामोदय की दिशा में कदम बढ़ाया। किन्तु ग्रामविकास के काम की मुझे जानकारी नहीं थी। उस दिशा में मैंने कभी काम किया ही नहीं था। अतः ग्रामवासियों के बीच रहकर उनकी समस्याएं अनुभव करना तथा आवश्यकताओं को समझना जरूरी था। इसलिए मैंने अपनी गतिविधियों का केन्द्र ग्राम को ही बनाया।

गांव-गांव घूमकर मैं ग्रामवासियों से विचार-विनिमय करने लगा। गांव में कृषि ही प्रमुख व्यवसाय है। ग्रामवासी दिन में अपने अपने खेतों में काम करने जाते हैं। उनसे विचार-विनिमय करने का समय रात में ही मिलता है। अतः मुझे बार-बार चक्कर लगाते हुए देखकर एक दिन एक वृद्ध ग्रामीण ने मुझसे कहा, "आप बेमतलब परेशान हो रहे हैं। आप समझ नहीं पाते कि जिन्हें भगवान ने ही कंगाल बनाया है, उन्हें खुशहाल कौन बना सकता है? अतः आप इस काम में मत पड़िए।" ग्रामवासियों को अपने भाग्य को कौसते हुए निराशाग्रस्त होकर बैठे देख मैं बहुत दुःखी हुआ किन्तु हताश नहीं। मैं ग्रामोदय के मार्ग की खोज में पूर्ववत् लगा रहा।

मई का महीना था। चारों ओर सुखे का माहौल फैला हुआ था। गोण्डा से लगभग १७ कि.मी. पर मुझे एक हरी-भरी बगिया नजर आई। मैं उसमें पहुंचा। वह एक माली का बाग था। वह माली अपनी एक एकड़ जमीन से सालभर में विभिन्न प्रकार की सब्जियों की अनेक फसलें उगाता था। अपनी ताजी सब्जियां गोण्डा की सब्जी मंडी में रोज बेचता था तथा अपनी कमाई में से उसने गोण्डा सब्जी मंडी में एक छोटा-सा मकान बनाकर किराए पर चढ़ा दिया था। वह खुशहाली की जिंदगी बिता रहा था। उसकी जीवन-गाथा ने मुझे बहुत उत्साहित किया।

दूसरे दिन मैं उस गांव पहुंचा, जहां के वृद्ध ने मुझे बेमतलब परेशानी से बचने के लिए कहा था। मैंने उस वृद्ध से कहा, "बाबा!

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ५९ । अंक ८-९-१०-११ । मे-जून-जुलै-ऑगस्ट २००६
वैशाख-ज्येष्ठ-आषाढ-श्रावण शके १९२८
वार्षिक वर्गणी २०० रुपये.
या अंकाची विशेष किंमत रु. ८०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोनानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्य-निष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

* नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै० शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.







संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).





अनुक्रमणिका



# अनुक्रमणिका

# अतिथी संपादकीय

## देवदत्त दाभोलकर

भारताच्या संदर्भात विकासाची विविध प्रतिमाने हा विषय अनेक दिवस मनात घोळत होता, परंतु आकार घेत नव्हता. अजूनही त्याचा नीट आकार माझ्या मनात स्पष्ट होत नाही. परंतु त्या दिशेने वाटचाल करण्याचा प्रयत्न आहे व यापुढेही राहील. परंतु त्यासाठी सर्व समकक्ष लोकांच्या सहकार्याची अपेक्षा आहे. आर्थिक नव्हे तर सकस परस्पर संवादाची. व्यक्तिगत व गटातही प्रत्यक्ष भेटीतून त्याचप्रमाणे सध्या सहज उपलब्ध असणाऱ्या अनेकविध संपर्क-साधनांतूनही. 'नवभारत'चीही स्थापनाकालापासून हीच भूमिका राहिलेली आहे व त्या भूमिकेचा पुनरुच्चार प्रत्येक अंकातून होत असतो.

उत्तर-नव भारताच्या जडणघडणीत यामुळेच 'नव-भारत'ला रस आहे. त्या दिशेच्या प्रयत्नातील हे एक पाऊल आहे.

या अंकाचीही एक पार्श्वभूमी आहे. हा विषय महत्त्वाचा आहे. त्याचा अनेक अंगांनी आंतरशास्त्रीय स्वरूपात सखोल अभ्यास व विचार व्हावयास हवा असे प्रकटन व्यक्तिगतरित्या मी 'साधना' साप्ताहिकात (२ सप्टेंबर २००५ च्या अंकात) केले होते. 'प्रयास'च्या काही प्रयत्नांचा त्यात आवर्जून निर्देश होता. त्यापैकी काही भाग 'प्रयास'च्या सौजन्याने या अंकात प्रसिद्ध केला आहे.

त्या स्वरूपाचे काही लेखन एप्रिल २००६ पर्यंत हाती आल्यास त्यांच्या आधारे एक चर्चासत्र सातारा येथे २०, २१, २२ ऑगस्ट पैकी दोन दिवस घेतले जाईल असेही 'साधना'तील प्रकटनात सांगण्यात आले होते. त्याप्रमाणे दि. २० व २१ ऑगस्ट व आवश्यक तर २२ ऑगस्ट रोजी 'श्रीपाद दाभोलकर प्रयोग परिवार : वाटचाल : सर्वांगीण विकासासाठी एक प्रतिमान' या विषयावर कृषि-चर्चासत्र सातारा येथे होईल. त्या विषयीचे प्रकटन या अंकात आहे.

या अंकातील इतर विषयांवर कोणाला अधिक चर्चा करावयाची असल्यास त्यांचे आयोजन सातारा येथे दि. १ व २ ऑक्टोबर रोजी करण्यात येईल. त्यासाठी माझ्याशी प्रत्यक्ष संपर्क साधावा. (१५ ऑगस्टपूर्वी).

आपल्याकडे चर्चासत्रे होतात व ती तशीच हवेत विरून जातात असा एक सार्वत्रिक अनुभव आहे. एकाच विषयावर अनेकांनी आंतरशास्त्रीय (inter-disciplinary) सकस विचार मांडले आहेत व त्यावर कृतिकार्यक्रमाकडे नेणारी सकस चर्चा झालेली आहे असेही क्वचितच आढळते. आंतरशास्त्रीय टिपणी कशा स्वरूपाची असावी याचे एक अपवादात्मक निदर्शन म्हणून डॉ. दामले आणि डॉ. रमणम्मा यांचे डॉ. वसंत पेठे यांच्या प्रतिमानावरील एक सविस्तर टिपण या अंकात देण्यात आले आहे. मूळ प्रतिमानाविषयी उत्सुकता असणाऱ्यांनी मला लिहावे.

कोणालाही आपल्याला नवीन काही सांगावयाचे आहे असे वाटत असेल त्याने महाराष्ट्रातील त्या क्षेत्रातील अन्य जाणकाराशी संपर्क साधून आंतरशास्त्रीय स्वरूपाचे सविस्तर लेखन पाठविल्यास ते प्रसृत करून त्याच्यावर यथोचित संपर्क चर्चा घडवून आणाव्यात हा नवभारतच्या हीरक वर्षात (ऑक्टोबर २००६ ते सप्टेंबर २००७) प्रयत्न-प्रयोग राहील. सर्वांचे स्वागत आहे. विषय सामान्यपणे 'माझ्या क्षेत्रात महाराष्ट्रात अशा स्वरूपाचे कार्य व्हावे असे मला वाटते' अशा स्वरूपाचा असावा. महाराष्ट्रात त्या विषयात ज्यांना आस्था आहे असे लेखकाला वाटेल त्यांची नावे, पोस्टाचा पत्ता, दूरध्वनी क्रमांक कळवावेत. त्यांच्याशी संपर्क/चर्चा आयोजित करता येईल.

अंकात प्रसिद्ध होणाऱ्या मजकुराची जबाबदारी त्या त्या लेखकाची असते ही 'नवभारत'ची प्रथमपासूनची भूमिका आहे. या 'अतिथी संपादकीया'लाही तीच लागू आहे.

❋ ❋ ❋

# चर्चासत्रांविषयी

उत्तर-नव भारत
विकासाची विविध प्रतिमाने

**संयोजक :**

नवभारत मासिक, प्राज्ञपाठशाळा, वाई
अलदा निकेतन, सातारा (अलदा : अच्युत लक्ष्मण दाभोलकर, १८९३-१९५५)
(या खेरीज अन्य कोणा व्यक्तीचे, संघटनेचे उत्स्फूर्त सहकार्य आल्यास त्याचाही साभार स्वीकार करण्यात येईल.)

**सर्वसामान्य रचना :**

१. येण्याजाण्याचा खर्च प्रत्येकाने आपापला करावयाचा आहे.
२. निवास-भोजनाची साधी परंतु नीटस व्यवस्था असेल. आदल्या दिवशी रात्री मुक्कामास येणाऱ्यांनी तसे कळविल्यास निवासाची व्यवस्था असेल. त्या दिवशीच्या रात्रीच्या भोजनाची व्यवस्था प्रत्येकाने आपापली करायवयाची आहे. चर्चासत्र संपल्यानंतर त्या दिवशीची रात्रीची व्यवस्थाही याचप्रमाणे असेल.
३. चर्चासत्र दिवसासाठी निवास भोजन सहभाग प्रतिदिन १२५ रुपये असेल. स्थानिक निरीक्षकांसाठी रुपये ५०.
४. प्रारंभीच्या Xerox आदि खर्चासाठी शंभर रुपयांची मनिऑर्डर करावी. अन्य रक्कम आल्यानंतर दिली तरी चालेल.
५. सातारा येथील चर्चासत्रासाठी प्रा. देवदत्त दाभोलकर यांच्याशी व वाई येथील चर्चासत्रासाठी प्रा. यशवंत कळमकर यांच्याशी संपर्क साधावा.
६. हॉटेलमध्ये व्यवस्था हवी असल्यास तो खर्च आपला आपण करावयाचा आहे.

**खालील चर्चासत्रांचे आयोजन आतापर्यंत निश्चित करण्यात आले आहे :**

१. गांधीजी - विनोबा विचारधारा
   २८, २९ सप्टेंबर २००६, वाई
२. श्रीपाद दाभोलकर प्रयोग परिवार : विकासाचे सर्वांगीण प्रतिमान : वाटचाल
   २०, २१ ऑगस्ट, सातारा
३. दलित - शोषित न्यायासाठी
   १ व २ ऑक्टोबर २००६, सातारा
४. श्रद्धा - अंधश्रद्धा आणि समाज
   २८ डिसेंबर २००६

**प्रा. देवदत्त दाभोलकर**
**निवास :** शांतिनिकेतन
४३, गुरुकृपा हौ. सो.
शाहूनगर, सातारा ४१५००१
दूरध्वनी : (०२१६२) २२०३७८
E-mail : ndabholkar@rediffmail.com

**प्रा. यशवंत कळमकर**
**निवास :** २४१०-क, सोनगीरवाडी,
दूरध्वनी कॉलनी रस्ता, वाई ४१२८०३
दूरध्वनी : (०२१६७) २२२७०४
**कार्यालय :** सचिव, प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई
दूरध्वनी : (०२१६७) २२०००६

# विकासाचे पर्यायी प्रतिमान

डॉ. सुबोध वागळे
संचालक, 'प्रयास'

## भाग १ : प्रास्ताविक

### सद्य:स्थितीचा संदर्भ

स्वातंत्र्य मिळाल्यानंतर सत्तावन्न वर्षांनी देशाची तसेच महाराष्ट्राची आजची स्थिती आपण अभिमान बाळगावा अशी नाही हे निश्चित. मानवी जीवनासाठी आवश्यक त्या किमान सुविधा देशातील अर्ध्यापेक्षा जास्त जनतेपर्यंत आजदेखील पोहोचलेल्या नाहीत. आरोग्य, शिक्षण, अन्नाची उपलब्धता याबाबतचे विकासाचे विविध निकष लावले तर देशातील दु:स्थितीचे भयावह दर्शन आपणास घडते. पुढारलेले समजले गेलेल्या महाराष्ट्र राज्याची परिस्थितीदेखील लाजिरवाणी म्हणावी अशीच आहे. राज्य सरकार व संयुक्त राष्ट्र विकास कार्यक्रमातर्फे २००२ साली प्रसिद्ध करण्यात आलेल्या राज्याच्या मानव विकास अहवालातील विविध प्रकारची आकडेवारी यासंदर्भात उदाहरण म्हणून पाहता येईल. या अहवालानुसार आजही महाराष्ट्रात ५४% शहरी जनतेला व ५७% ग्रामीण जनतेला पुरेशा कॅलरीज् (उष्मांक) मिळतील एवढादेखील आहार वर्षभर मिळत नाही.

आकड्यांच्या पलीकडे जाऊन विविध क्षेत्रातील देशाच्या व राज्याच्या स्थितीचा धांडोळा घेतला तर आज चित्र काय दिसते? आर्थिक बाबतीत बोलायचे तर, विविध प्रकारच्या अभावांनी ग्रस्त असणाऱ्या वंचितांच्या वाढत्या महासागरात बीभत्स वाटाव्या अशा समृद्धीची बेटे उभी राहत आहेत. सामाजिक बाबतीत स्त्रिया, दलितांवरील अत्या-चारांच्या संख्येत कोणतीही घट होताना दिसत नाही. विकास प्रकल्पांच्या नावाखाली आदिवासींची ससेहोलपट अजूनही चालू आहेच. देशभरच्या मध्यमवर्गातील उच्च नव्हे तर मध्यम जातीदेखील हिंदुत्वाच्या अजेंड्यामागे जाताना दिसत आहेत. गुजरातमधील मुस्लिमविरोधी अत्याचारात सवर्णांबरोबर काही आदिवासी गट सामील होताना दिसत आहेत. या अनेक वाईट गोष्टींबरोबर काही चांगल्या गोष्टी घडताना दिसत आहेत. उदाहरणार्थ, दलित व ओबीसींच्या अस्मिता उमलून येत आहेत. अनेक राजकीय पक्षात दलित ओबीसींना अधिकारपदे मिळत आहेत. मात्र सर्वसाधारण आर्थिक-सामाजिक चित्र पहायचे तर एका बाजूने समाजाच्या चिरफाळ्या होण्याची प्रक्रिया तर दुसऱ्या बाजूने वंचित वर्गांचे आणखीनच खच्चीकरण होण्याची प्रक्रिया वेग घेत आहेत असे म्हणावे लागेल.

सांस्कृतिक क्षेत्रात पहायचे तर, उपभोग्य वस्तू विकणाऱ्या परदेशी व देशी कंपन्या आज सर्वच प्रकारच्या प्रसार माध्यमांवर पकड जमवून बसल्या आहेत. एका बाजूने अशा पद्धतीने सांस्कृतिक बाजारीकरण व सांस्कृतिक एकारलेपण घडवले जात असताना दुसऱ्या बाजूने सांस्कृतिक, धार्मिक असहिष्णुतेचा आविष्कार जागोजागी व वेळोवेळी होताना दिसत आहे. 'दिशाहीन सांस्कृतिक गोंधळलेपण' ही जणू आजच्या भारतीय समाजाची खूण बनली आहे. राजकारणाच्या क्षेत्रात तर धर्मकेंद्री राजकारणाचा प्रभाव आजही मोठा आहे. जात, पैसा, भावनात्मक मुद्दे आणि बांधीव मतपेढ्या यांच्या आधारे निवडणुका जिंकताना राजकारणातला जनतेचा खराखुरा सहभाग व प्रभाव कमी कमी करण्याचा प्रयत्न बहुतेक राजकीय पक्ष करीत आहेत. असे राजकीय पक्ष हे राजकारण करणाऱ्या 'संघटना' न राहता निवडणुका लढवणाऱ्या व निवडणुकांनंतर सत्तेचे वाटे मागणाऱ्या व घालणाऱ्या 'यंत्रणा' बनल्या आहेत.

### उजाखा धोरणे : विविधांगी परिणाम

राजकीय, आर्थिक, सामाजिक, सांस्कृतिक अशा सर्वच बाबतीतल्या ह्या निराशाजनक स्थितीमध्ये एक आणखी विपरित घटक म्हणजे उदारीकरण, जागतिकीकरण, खाजगीकरणाच्या (उजाखा) धोरणांचा, ह्या विषयावर सर्वच माध्यमांतून सविस्तर चर्चा झाली असल्याने त्यावर येथे विस्ताराने चर्चा केलेली नाही. मात्र ह्या दस्तावेजातील मांडणीला संदर्भ मिळावा म्हणून उजाखा धोरणांच्या विविधांगी आक्रमणाचा केवळ उल्लेख येथे करत आहे.

* बहुराष्ट्रीय कंपन्या व देशी बड्या कंपन्यांच्या आर्थिक व सांस्कृतिक आक्रमणाची तीव्रता, व्यापकता व खोली या




सर्वांमध्ये उजाखामुळे मोठ्या प्रमाणात वाढ झाली आहे.

* समाजातील सर्वच थरांमधील विचारचर्चांमध्ये व मानसिक धोरणांमध्ये बाजारकेंद्री अर्थशास्त्राचा प्रभाव व स्वीकार वाढला आहे.

* केवळ उच्चवर्णीय मध्यमवर्गीयांनाच नव्हे तर वंचित समाजघटकांमधील शिक्षित मंडळींनाही माहिती तंत्रज्ञानातील नव्या रोजगार संधींचे भले मोठे गाजर दिसते आहे. त्यामुळे भलेभलेही भुललेले व हुरळलेले दिसतात.

* उजाखा धोरणांमुळे वंचित वर्गांना जाणवणाऱ्या वेगवेगळ्या प्रकारच्या अभावांची तीव्रता वाढते आहे. आणि त्याचवेळी काही थोडक्यांच्या हाती होणारे संपत्तीचे केंद्रीकरणदेखील वाढते आहे.

* उजाखा धोरणामुळे मोठी शक्ती मिळून सुसाट सुटलेला सांस्कृतिक बाजारीकरणाचा व्हायरस समाजामध्ये वेगाने पसरतो आहे.

* सर्वच राजकीय पक्षांकडून उजाखाचा वाढता स्वीकार होतो आहे. उजाखामुळे राज्यसंस्थेचे खच्चीकरण होते आहे व त्यामुळे वंचितांचे राजकीय व आर्थिक खच्चीकरण वेगाने होत आहे.

* देशाच्या आर्थिक व्यवहाराचा ताबा घेणारे वित्तीय भांडवल नामक फारसे उलगडा न झालेले नवीन हत्यार आता उजाखावाद्यांच्या हाती आले आहे.

सर्वसाधारण जनतेवर व विशेषतः वंचितांवर होणाऱ्या उजाखा धोरणांच्या विविधांगी आक्रमणाच्या काही अंगांची ही झलक. परिवर्तनाची व विकासाची चर्चा करताना या साऱ्याची शक्य तेवढी ओळख करून घेऊन त्याचा संदर्भ ठेवणे हे खरेतर आवश्यक आहे.

थोडक्यात सांगायचे तर, स्वातंत्र्यानंतरचे सहावे दशक संपण्याची वेळ आली तरी एका बाजूने देशाच्या अर्ध्यापेक्षा जास्त जनतेला सुरक्षित व सन्मानपूर्ण जीवन देणे सोडाच पण चिंतामुक्त व मानवी जीवनासाठीच्या त्यांच्या किमान आर्थिक गरजादेखील आपण भागवू शकलेलो नाही. तर दुसऱ्या बाजूने सामाजिक समता, राजकीय स्वातंत्र्य, सांस्कृतिक सहनशीलता असणारा आधुनिक सुसंस्कृत समाज निर्माण करण्यातही आपण अयशस्वी ठरलो आहोत. याच्या मुळाशी देशामधील व देशाबाहेरील अनेक राजकीय, सामाजिक, सांस्कृतिक, आर्थिक कारणे आहेत. यापैकी अनेक कारणांची विस्ताराने चर्चा विविध माध्यमातून व विविध व्यासपीठ मंचांवरून होत असते. या साऱ्या चर्चेमध्ये बऱ्याचदा दुर्लक्षित राहणारा मुद्दा म्हणजे विकासाच्या प्रतिमानाचा किंवा मॉडलचा. आर्थिक समस्यांबाबत बोलताना धोरणे, कार्यक्रम, योजना व अनेकदा आर्थिक संस्थांची चर्चा होत असताना विकासाचे सर्वसाधारण प्रतिमान ही एक अपरिवर्तनीय, पर्याय नसणारी किंवा आहे तशी स्वीकारण्याची गोष्ट आहे असेच गृहीतक बहुतांशी वेळी मानले जाते. विकासाच्या मूळ प्रतिमानासमोर प्रश्नचिन्ह लावणे व सध्याच्या प्रतिमानाला पर्याय शोधणे असा प्रयत्न काही अपवाद वगळता केला जात नाही असे म्हणावे लागेल. साठ वर्षांनंतरची आजची स्थिती पाहता सध्याच्या व्यवस्थेतील धोरणे, कार्यक्रम, योजना, संस्था यासारख्या तुलनेने वरवरच्या व लक्षणात्मक गोष्टींच्या मुळाशी कोणता रोग आहे ह्याचा शोध घेणे व त्याचा बंदोबस्त करणे महत्वाचे नव्हे अनिवार्य आहे असे म्हणावे लागेल. त्यादृष्टीने या लेखामध्ये सध्याचे विकास प्रतिमान व त्याचे पर्याय यांची चर्चा केली जात आहे.

### भाग २ : विकासाचे रूढ प्रतिमान व त्याची समीक्षा

विकासाच्या रूढ प्रतिमानाची चर्चा सुरू करण्याआधी मुळात विकासाचे प्रतिमान म्हणजे काय ते आपण समजून घेऊ या. विकासाच्या प्रतिमानामध्ये पुढील चार मुख्य घटक येतात. (अ) प्रतिमानाचा संकल्पनात्मक गाभा, (ब) या संकल्पनात्मक गाभ्याच्या सभोवती राहणारी प्रतिमानाची सैद्धांतिक बैठक, (क) या दोन घटकांवर आधारित विकासाची व्यूहनीती (अथवा कर्जयोजना), (ड) ही व्यूहनीती प्रत्यक्षात आणणारे कार्यक्रम, योजना व प्रकल्प हे ते चार घटक होत. या लेखनामध्ये आपण फक्त प्रतिमानाचा संकल्पनात्मक गाभा व व्यूहनीती या दोन घटकांचाच विचार करणार आहोत.

रूढ प्रतिमानानुसार, 'विकास म्हणजे आर्थिक विकास' असे समीकरण स्वीकारले जाते. काही वेळा सामाजिक बाबींचा अंतर्भाव विकासाच्या व्याखेत केला जातो. परंतु हा प्रयत्न मर्यादित स्वरूपाचा राहिलेला दिसतो. विकासाचे रूढ प्रतिमान प्रामुख्याने दोन तत्त्वांवर आधारित आहे. प्रथम म्हणजे बृहत् आर्थिक वाढ (Macro-economic Growth) आणि दुसरे म्हणजे झिरपा सिद्धांत. बृहत् आर्थिक वाढ म्हणजे वस्तू आणि सेवा यांच्या राष्ट्रीय स्तरावरील उत्पादनामधील वाढ. या वाढीतून नफा आणि वेतन यांचा उगम होतो. ही वाढ देशाच्या पातळीवर मोजली जाते. वैयक्तिक पातळीवर आर्थिक वाढीचा फायदा

उद्योगधंद्यातून मिळणारा नफा आणि नोकरीतून मिळणारे वेतन या मार्गाने होतो.

या आर्थिक वाढीचे दोन मुख्य मार्ग मानले जातात. एक मार्ग म्हणजे आधुनिक कारखानदारीचा विस्तार आणि दुसरा आधुनिक शेतीचा विस्तार. अत्याधुनिक तंत्रज्ञान वापरून मोठी उत्पादकता वाढ मिळवणारे भांडवलसघन आणि आकाराने मोठे असणारे कारखाने यांचा समावेश आधुनिक कारखानदारीमध्ये होतो. अशा कारखान्यांमुळे वस्तू व सेवांचे उत्पादन प्रचंड प्रमाणात वाढून त्यामधून आर्थिक वाढ होईल असे मानले जाते. आधुनिक शेती म्हणजे रासायनिक खते, कीटकनाशके, सिंचनाचे पाणी, जास्त पीक देणारी सुधारित अथवा संकरित बियाणे यांचा मोठ्या प्रमाणावर वापर करणारी आणि स्वयंचलित यंत्रे वापरून केली जाणारी शेती होय. ही शेती भांडवलसघन असून केवळ निर्वाहाचे साधन म्हणून नव्हे तर व्यवसाय म्हणून केली जाते. अशा शेतीमुळे जमिनीच्या उत्पादकतेत वाढ होऊन एकूण शेती उत्पादनात मोठ्या प्रमाणावर वाढ होईल असे मानले जाते. अशा तऱ्हेने आधुनिक कारखानदारी व शेती याद्वारे आर्थिक वाढ होऊन देशाचा आर्थिक विकास होईल असे रूढ प्रतिमान मानते.

ही आर्थिक वाढ सर्वत्र न होता काही मर्यादित ठिकाणी होईल आणि नंतर ती समाजाच्या कानाकोपऱ्यात पसरेल असेही मानले जाते. या प्रक्रियेला झिरपा किंवा Trickel Down असे म्हणतात. आर्थिक वाढीचा झिरपा होण्याचे पुढील दोन प्रमुख मार्ग गृहीत धरले जातात. १) आर्थिक उपक्रमांची साखळी प्रक्रिया आणि २) सरकारी हस्तक्षेपाद्वारे संपत्तीचे फेरवाटप. पहिल्या मार्गानुसार मोठे उद्योगधंदे व आधुनिक शेती यामुळे त्यांना पूरक असणाऱ्या विविध प्रकारच्या मध्य व लहान आर्थिक उपक्रमांची मालिका निर्माण होईल असे मानले जाते. उदा. एखाद्या ठिकाणी कारखाना सुरू झाला की त्या कारखान्याला लागणारा कच्चा माल पुरवण्याचा व्यवसाय, कच्चा माल वाहून नेण्यासाठी ट्रक, टेम्पो इ. चा व्यवसाय, ट्रक-टेम्पो यांना इंधन पुरवठा, त्यांची दुरुस्ती, त्यांच्या वाहकांसाठी तसेच कारखान्यातील कर्मचारी वर्गासाठी हॉटेल्स, या हॉटेल्सला लागणारे दूध, मांस इ. चा पुरवठा करण्यासाठी दुग्ध व्यवसाय, कुक्कुटपालन असे अनेक दुसऱ्या तिसऱ्या पातळीवरील आर्थिक उपक्रम कारखान्याच्या उभारणीमुळे सुरू होतील. यामुळे जास्तीत जास्त लोक आर्थिक व्यवस्थेत सामावले जातील आणि याद्वारे नफा व उत्पन्न, तसेच त्यातून निर्माण होणारी खरेदी-क्षमता (किंवा क्रयशक्ती) यांचा झिरपा समाजाच्या तळागाळापर्यंत कानाकोपऱ्यापर्यंत पसरेल असे रूढ प्रतिमान मानते.

झिरपा प्रक्रियेचा दुसरा मार्ग म्हणजे समाजातील दुर्बल घटकांपर्यंत आर्थिक वाढीचा फायदा पोचावा म्हणून सरकारतर्फे केले जाणारे प्रयत्न होत. यामध्ये उत्पन्न जास्त असणाऱ्या व्यक्तीकडून कररूपाने निधी गोळा करून त्यामधून दुर्बल घटकांपर्यंत विविध फायदे पोचावेत असा प्रयत्न सरकार करते. यामध्ये दुर्बल समाजगट व व्यक्तींना सहाय्य पुरवणे (उदा. निराधार योजना) या घटकांच्या क्षमता वाढविण्यासाठी प्रयत्न करून त्यातून त्यांना विकास-प्रक्रियेत भाग घेण्यास सक्षम बनवणे. उदा. (आश्रमशाळा, आर्थिकदृष्ट्या मागास वर्गातील मुलांना शिष्यवृत्ती इ.) आणि या घटकांना विविध सोयी-सुविधा पुरवणे. (उदा. तोटा सोसून एस. टी. ची सोय करणे, दूर दुर्गम भागात प्राथमिक आरोग्य केंद्र उभारणे इ.) यांचा समावेश होतो. थोडक्यात, विकासाच्या रूढ प्रतिमानाचा संकल्पनात्मक गाभा म्हणजे विकास = आर्थिक वाढ + झिरपा हे समीकरण. तर रूढ विकास प्रतिमानातील व्यूहनीतीची चार सूत्रे म्हणजे आधुनिक उद्योगातून आर्थिक वाढ, आधुनिक शेतीतून आर्थिक वाढ, आर्थिक उपक्रमाच्या साखळीतून झिरपा, आणि सरकारी हस्तक्षेपाद्वारे झिरपा. रूढ विकास प्रतिमानाचे हे थोडक्यात चित्र आहे.

या रूढ विकास प्रतिमानाचा वापर करून गेल्या सहा दशकात विकासाच्या उद्देशाने जे काही व्यापक व मोठ्या प्रमाणावर प्रयत्न झाले त्यांची गोळाबेरीज जर मांडायची तर स्वातंत्र्याच्या वेळी देशाची जी आर्थिक व औद्योगिक व्यवस्था होती त्यामध्ये प्रचंड म्हणावी अशी संख्यात्मक व लक्षणीय म्हणावी अशी गुणात्मक वाढ झाली. तीच गोष्ट शेतीक्षेत्राच्या बाबतीत देखील म्हणता येईल. शेतीक्षेत्रात झालेली विशेषत: संख्यात्मक वाढ ही अनेक अर्थाने महत्त्वाची होती. स्वातंत्र्यानंतर औद्योगिक व शेतीच्या विकासाच्या मार्गाने झालेल्या राष्ट्रीय उत्पन्नातील ह्या वाढीचा फायदा मोठ्या जनसंख्येला प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष रीतीने झाला हे खरे आहे. या शेती, औद्योगिक, शिक्षण, आरोग्य यासारख्या सामाजिक सुविधांचा प्रसार मोठ्या प्रमाणात झाला. अनेक दबलेले पिचलेले समाजगट शतकानुशतकाच्या दडपशाहीतून बाहेर पडू लागले. आपल्या सामाजिक व राजकीय अधिकारांची मागणी करू लागले.

**रूढ विकासाचे दुष्परिणाम**

या साऱ्या कामगिरीबद्दल अनेक भारतीयांना सार्थ

अनुक्रमणिका

अभिमान वाटतो. मात्र हे सारे घडत असतानाच या साऱ्या आर्थिक, राजकीय, सामाजिक वाढीचा व सुधारणांचा फायदा फार मोठ्या संख्येने असणाऱ्या वंचित समाजघटकांना झालाच नाही. लेखाच्या सुरुवातीला दिलेले महाराष्ट्राच्या मानवी विकास अहवालातील उदाहरण याचा ढळढळीत पुरावाच आहे.

हे असे का घडते? हे समजून घ्यायला हवे. मुळात विकसित देशांच्या मानाने भारतासारख्या विकसनशील देशामध्ये देशाच्या स्तरावर घडणारी आर्थिक वाढ खूपच कमी प्रमाणात असते. ह्याचे कारण समजून घेऊया. रूढ विकास प्रतिमानानुसार औद्योगिकरण व आधुनिक शेती याद्वारे आर्थिक वाढ केली जाते. हे दोन्ही मार्ग, अत्याधुनिक तंत्रशास्त्राचा वापर करणारे व खूप भांडवल लागणारे या अर्थाने भांडवलसघन असतात. विकसित देशात ह्या दोनही गोष्टींची (तंत्रज्ञान व भांडवल) टंचाई असल्याने त्यांचा सर्वदूर वापर होऊन देशात उत्पादनवाढ व म्हणून आर्थिकवाढ घडण्याच्या प्रक्रियेवर मर्यादा येतात. दुसरा मुद्दा झिरप्याचा. त्यातील पहिल्या मार्गाने म्हणजे आर्थिक उपक्रमांच्या साखळी प्रक्रियेमुळे नफा व वेतनासारखे उत्पन्नाचे स्रोत निर्माण होतात व त्याद्वारे आर्थिक वाढीचा झिरपा होतो असे मानले जाते. परंतु ह्या साखळी प्रक्रियेतील दुसऱ्या तिसऱ्या टप्प्यातील उद्योग व व्यवसायामध्ये देखील मोठे उद्योग उतरतात, ते व्यवसाय आपल्या ताब्यात घेतात व त्यांचे यांत्रिकीकरण करतात. (उदा. हिंदुस्थान लिव्हर कडून टोमॅटो सॉस/केचप विकत घेतला जाणे किंवा हैद्राबादच्या मोठ्या भांडवल सघन कुक्कुटपालन कंपन्यांकडून कोकणातील एन्रॉनलगतच्या भागात कोंबड्यांचा पुरवठा केला जाणे.) या मोठ्या उद्योगांचे यांत्रिकीकरण झाल्याने या उद्योगातून मालकांना मिळणारा नफा तसेच भांडवली वस्तूंवर होणारा खर्च यांच्या तुलनेत कामगारांना मिळणाऱ्या एकूण वेतनाचे प्रमाण कमी असते. अर्थव्यवस्थेतील ह्या वास्तवांमुळे साखळी प्रक्रियेतून संपत्ती व उत्पन्नाचा झिरपा वंचित गटांपर्यंत फारसा होत नाही. झिरप्याचा दुसरा मार्ग म्हणजे सरकारच्या हस्तक्षेपामुळे होणाऱ्या संपत्तीच्या फेरवाटपाचा. या मार्गाने झिरपा होण्यात अनेक अडचणी असतात. यासाठी आवश्यक असणारा निधी कराच्या रूपाने जमा केला जातो. करचुकवेगिरी व इतर अनेक कारणांमुळे कराचे उत्पन्न तुलनेने खूपच कमी असते. मात्र त्यामध्ये भ्रष्टाचार, उधळपट्टी, वशिलेबाजी, नासाडी, योजनांचे चुकीचे आरेखन (डिझाईन) या दोषांमुळे उपलब्ध निधीतून सरकारी योजनांद्वारे जो खर्च होतो त्यातून वंचित वर्गाला प्रत्यक्षात पोचणाऱ्या फायद्यांचे प्रमाण फारच मर्यादित असते. अशाप्रकारे रूढ विकासाच्या मार्गाने आधुनिक उद्योग व आधुनिक शेती, त्यासाठीचे शहरीकरण ह्या प्रक्रिया चालू राहतात. त्यातून विकास होत आहे असे चित्र उभे राहते. मात्र त्याचा फायदा थोड्या समाजघटकांना होतो. ह्या साऱ्या विकासापासून वंचित समाजघटक पिढ्यान्‌पिढ्या दूर राहतात. त्यांच्यासाठी ह्या मार्गांचा वापर स्वतःच्या उन्नतीसाठी करणे अशक्य असते.

पण रूढ विकासातून निर्माण होणाऱ्या समस्या एवढ्यापर्यंत थांबत नाहीत. ज्याचा फायदा केवळ ठरावीक समाजघटकांना होतो अशा या रूढ विकासातील आर्थिक वाढीचा मोठा फटका थेट तसेच अप्रत्यक्षपणे आधीच वंचित असणाऱ्या घटकांना बसतो. आर्थिक वाढीसाठी आवश्यक असणाऱ्या आधुनिक कारखाने व आधुनिक शेती (ज्यात मुख्यतः रासायनिक खते व कीटकनाशके वापरली जातात अशी) यामुळे मोठ्या प्रमाणावर जल, वायू व जमिनीचे प्रदूषण होते. यामुळे जंगले, नद्या, खाड्या, शेती ह्यांच्यावर विपरीत परिणाम होतात. परिणामी संसाधनांवर उपजीविकेसाठी अवलंबून असणाऱ्या वंचित घटकांच्या जगण्यावर त्यांचे गंभीर परिणाम होतात. याशिवाय आधुनिक कारखाने, आधुनिक शेती, शहरीकरण यामुळे वंचित कुटुंबांचे विविध प्रकारे प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष, पूर्णतः वा अंशतः विस्थापन होत असते व ह्याचाही तीव्र परिणाम वंचित घटकांच्या उपजीविकांवर होत असतो. या अशा विविधांगी विस्थापनाची अनेक उदाहरणे देता येतील. आर्थिक वाढीसाठी आवश्यक ती वीज व पाणी शहरे व उद्योगांना पुरवण्यासाठी बांधण्यात येणाऱ्या मोठ्या धरणांमुळे आदिवासी व इतर वंचितांचे होणारे थेट व पूर्णतः विस्थापन हे विस्थापनाचे केवळ एक रूप आहे. मुंबई शहराला पाणी पुरवठ्यासाठी ठाणे जिल्ह्यातील काही तालुक्यातले पाणी तलावात अडवून नळावाटे शहरात नेले जाते. हे पाणी मुंबईला गेल्यामुळे स्थानिकांना त्यांच्या भागात शेती व उद्योग करण्यासाठी पाणी मिळणे अशक्य ठरते. स्थानिक संसाधनांवर असणाऱ्या त्यांच्या उपजी-विकेच्या उपक्रमांना त्याचा फटका बसतो. परिणामी, मुंबईच्या उपनगरामधल्या झोपडपट्ट्यात राहून मिळेल ते काम करण्याशिवाय त्यांना गत्यंतर उरत नाही. दुसरे उदाहरण द्यावयाचे ते स्थानिक विकासासाठी निधी उपलब्ध नसल्याने होणाऱ्या विस्थापनाचे. मुंबई पुण्यासारखी शहरे उभारण्यासाठी; तेथल्या उद्योगधंद्यासाठी, त्यांच्या गरजा पुरवण्यासाठी; जो सरकारी निधी गुंतवला गेला त्यामुळे महाराष्ट्राच्या फार मोठ्या भागात ठाण मांडून बसलेल्या

अनुक्रमणिका






दुष्काळाला हटवण्यासाठी, तेथल्या शेतकऱ्यांना किमान एका खाद्यपिकासाठी पाणी मिळावे यासाठी आवश्यक ते उपाय करण्यासाठी निधी उरला नाही. परिणामी, ह्या भागातल्या पिढ्यान्‌पिढ्या दुष्काळात होरपळणाऱ्या शेतकऱ्यांना आपल्या जमिनी विकून/टाकून देऊन मुंबई-पुण्यात स्थलांतरित होण्याशिवाय गत्यंतर उरले नाही.

सारांशाने सांगायचे तर, रूढ विकास प्रतिमानानुसार आर्थिक वाढीसाठीच्या उपाययोजनांचा थेट अथवा अप्रत्यक्ष फायदा वंचितांना मिळत नाही. किंवा रूढ विकास प्रतिमानानुसारच्या झिरप्याच्या दोन्ही मार्गानेही विकास अथवा विकासाचे फायदे त्यांच्यापर्यंत पोचत नाहीत. याउलट आर्थिक वाढीसाठीच्या उपाययोजनांचा थेट अथवा अप्रत्यक्षपणे मोठा फटका विविध वंचित सूमहांना बसतो हे आता स्पष्ट झाले आहे.

## भाग ३ : पर्यायी विकासाची मूल्ये, उद्दिष्टे व टप्पे

या साऱ्या पार्श्वभूमीवर विकासाच्या पर्यायी प्रतिमानाकडे पाहायला हवे. रूढ विकास प्रतिमानाच्या आजवरच्या अनुभवातून शिकून पर्यायी प्रतिमानाची पद्धतशीरपणे व टप्प्याटप्प्याने उभारणी करायला हवी. त्यासाठी मूल्यात्मक पाया, संकल्पनात्मक गाभा, व्यूहनीती व त्या व्यूहनीतीवर आधारित योजना, कार्यक्रम, संस्थात्मक रचना असे टप्पे आखता येतील. या साऱ्या टप्प्यांची सविस्तर व तपशीलवार चर्चा या लेखाच्या मर्यादेमध्ये करता येणे शक्य नसले तरी त्या टप्प्यांचा उल्लेख व थोडे स्पष्टीकरण देण्याचा प्रयत्न या लेखाच्या पुढच्या भागात केला आहे.

### मूल्यात्मक पाया

विकासाच्या पर्यायी प्रतिमानाचा मुख्यात्मक पाया ठरवणे हे मोठे आव्हानात्मक काम आहे. याचे मुख्य कारण म्हणजे विकासाच्या पर्यायांचा शोध घेणाऱ्या मंडळींच्या विचारसरणीमध्ये मोठे वैविध्य आहे. ह्या विविध विचारसरणीतील मूल्यचर्चेमध्ये अनेक लहान-मोठे भेद आहेत. वेगवेगळ्या अर्थछटा, वेगवेगळे संदर्भ आहेत. या साऱ्या पार्श्वभूमीवर ह्या लेखातील पर्यायी विकासाच्या ह्या लेखातील मांडणीसाठी "जात, वर्ग, लिंगभाव, निसर्ग या सर्व माध्यमातून होणाऱ्या शोषणाचा अंत" ही किमान मूल्यधारणा घेऊन पुढील विवेचन केले आहे.

### पर्यायी विकासातील टप्पे

विकासाच्या पर्यायांची उभारणी करण्याचे आव्हान खूप मोठे आहे. याचे मुख्य कारण म्हणजे आपल्याला जे घडावेसे वाटते त्याबद्दलचे आदर्श चित्र व सध्याची परिस्थिती यामध्ये असलेला मोठा फरक. त्यामुळे आपण आपल्या आदर्शांबद्दल बोलू लागलो की इतरांना व आपल्यालाही ते सारे खूप हवेतले आहे असे वाटू लागते. परिणामी, बऱ्याचवेळा विकासाच्या पर्यायांबद्दलच्या चर्चा ह्या टप्प्यावर येऊन थांबतात. तसे घडू नये म्हणून पर्यायी विकासाच्या मार्गावरचा प्रवास अनेक टप्प्यांचा असावा असा विचार आम्ही केला. त्यातील अंतिम टप्पा म्हणजे युटोपिआ किंवा आदर्श स्थिती. आधी म्हटल्याप्रमाणे आदर्श समाजव्यवस्था कशी असावी? याबाबतचे आपल्या मनात असणारे स्वप्न म्हणजे युटोपिआ.

युटोपिआ किंवा आदर्श स्थितीची अप्राप्यता अथवा अव्यवहार्यता लक्षात घेऊन पर्यायी विकासाच्या त्या अंतिम टप्प्यावर पोहोचण्याआधीच्या वाटचालीत अनेक टप्पे आपण विचारात घ्यायला हवेत. सध्याचा विकासाचा रूढ मार्ग सोडून पर्यायी मार्गावर वाटचाल सुरू केल्यावर गाठावयाच्या पहिल्या टप्प्याला संक्रमणाचा टप्पा (ट्रान्झिशन स्टेज) असे म्हणता येईल. पर्यायी विकासाच्या दिशेने जाताना अगदी सहज नव्हे पण जोरदार प्रयत्न केल्यावर आपण जेथे पोहोचू शकू असा पहिला टप्पा किंवा स्थिती म्हणजे संक्रमणाची स्थिती/टप्पा. हा असा टप्पा असेल की जो गाठणे आजच्या स्थितीच्या संदर्भात पाहिल्यास कठीण वाटेल पण अशक्य किंवा अव्यवहार्य वाटणार नाही. मात्र ह्या टप्प्यावर गेल्यावर युटोपिआ किंवा आदर्शाची स्थिती गाठणे हे जास्त संभव होईल. सध्याच्या परिस्थितीतून निघून ह्या संक्रमणाच्या स्थितीत पोचण्यापर्यंतच्या काळाला संक्रमणाचा काळ असे म्हणता येईल.

### पर्यायी विकासाची उद्दिष्टे

वरील मूल्यधारणेच्या आधारे विकासाच्या पर्यायी प्रतिमानाची उद्दिष्टे काय असावीत याकडे आपण वळूया. आज भारतातील परिस्थिती पाहता, "सर्वांचा सर्वांगीण व आदर्श असा विकास घडावा" हे व्यापक व महत्त्वाकांक्षी उद्दिष्ट समोर ठेवणे हे पहिल्या संक्रमण टप्प्यावर जाताना अनेक कारणांनी योग्य ठरणार नाही. एकतर, ते उद्दिष्ट खूपच परिणामी, ज्यांचा विकास व्हायला पाहिजे त्यांचा विनाश व ज्यांचा आधीच भरपूर विकास झाला आहे त्यांच्याकडे अधिकाधिक समृद्धी हे आज विकासाच्या नावाखाली जे घडताना दिसत आहे तेच घडत राहील.

ह्या साऱ्या विकृतींचे मूळ रूढ विकास प्रतिमानाच्या प्रत्यक्षातील एकमेव ठरणाऱ्या उद्दिष्टामध्ये आहे. "आर्थिक वृद्धी किंवा वाढ" (म्हणजेच वस्तू व सेवांची विपुलता) ह्या एकमेव व एका अर्थाने अमूर्त (ॲबस्ट्रॅक्ट) उद्दिष्टाच्या मागे लागल्याने रूढ विकासातून गरीबी, वंचितता, पर्यावरणीय विध्वंस, सामाजिक विषमता, राजकीय दमन, सांस्कृतिक स्खलन यासारखे प्रश्न उभे राहिले आहेत. त्यामुळे पर्यायी विकासाच्या उद्दिष्टांमध्येही नेमकेपणा आणणे व त्यात प्राधान्यक्रम ठरवणे आवश्यक आहे. ह्या निष्कर्षानुसार पर्यायी विकासाच्या उद्दिष्टांची पुढील मांडणी केली आहे.

"सर्व वंचितांना उपजीविकेची सुरक्षितता किंवा खात्री देणे" हे पर्यायी विकासाचे प्रथम प्राधान्याचे (म्हणजे सर्वात आधी साधावयाचे) उद्दिष्ट मानले जाणे गरजेचे आहे. विकासाच्या ह्या प्राधान्याच्या उद्दिष्टाभोवती उभ्या राहिलेल्या विकासाच्या पर्यायी प्रतिमानाला वंचिताभिमुख विकासाचे प्रतिमान असे म्हणता येईल. येथे काही स्पष्टीकरणे द्यायला हवीत. प्रथम म्हणजे येथे "उपजीविका मिळवणे म्हणजे किमान गरजा भागवून जगणे" अशी व्याख्या गृहीत धरलेली नाही हे स्पष्ट करायला हवे. त्याऐवजी; उपजीविका म्हणजे "सुरक्षित, समाधानी व सन्मानपूर्ण" जीवन अशी व्याख्या येथे मान्य केली आहे. अशा सुरक्षित, समाधानी, सन्मानपूर्ण जीवनाचे चित्र कसे असेल? त्यात पुरेसे व पौष्टिक अन्न, वस्त्र, पिण्याचे शुद्ध स्वच्छ पाणी, सर्व ऋतूंमध्ये पूर्ण संरक्षण / निवारा देईल असे घर, योग्य, पुरेशी व वेळेवर मिळणारी वैद्यकीय मदत, आणि घरातील सर्व मुलांना पुरेसे शिक्षण यांचा समावेश व्हायला हवा. ह्या साऱ्या गरजा पूर्ण होणे म्हणजे उपजीविकेची पूर्ती होणे असे म्हणता येईल.

यातील दुसरी महत्त्वाची बाब म्हणजे उपजीविकेची 'सुरक्षितता.' ही बाब अनेक परिवर्तनवादी अभ्यासक व कार्यकर्तेही लक्षात घेत नाहीत असे दिसते. अनेक अभ्यासातून असे स्पष्ट झाले आहे की उपजीविकेची खात्री किंवा सुरक्षितता ही वंचितांची सर्वात मोठी काळजी अथवा गरज असते. आधीच अभावग्रस्त असणाऱ्या वंचित कुटुंबाच्या उपजीविकेवर सततच्या अस्मानी, सुलतानी व शारिरीक संकटांमुळे सहजी भरून न येणारे असे आघात सतत होत असतात. आजारपण, अपघात, मृत्यू अशा कौटुंबिक; अवर्षण, पूर यासारख्या नैसर्गिक; व दंगलीसारख्या सामाजिक आघातांचा यामध्ये समावेश करता येईल. या आघातांच्या काळामध्ये त्यांच्या उपजीविका भागत नाहीत. त्यासाठी अनेकदा त्यांना त्यांच्या उत्पन्नाची साधने विकावी लागतात. (उदा. गाय-शेळ्या) व अशाप्रकारे ही कुटुंबे गरिबी व मिंधेपणाच्या दुष्टचक्रात परत परत ढकलली जातात. अशा अस्मानी, सुलतानी वा शारिरीक संकटांच्या काळात कुटुंबाची उपजीविका भागवण्यासाठी पुरेसे प्रयत्न करणे कुटुंबातील व्यक्तींना शक्य नसते किंवा त्यांनी प्रयत्न केले तरी उपजीविकेसाठी आवश्यक गोष्टी मिळवणे त्यांना शक्य नसते. अशा काळातदेखील वंचित कुटुंबाची उपजीविका सुरळीत सुरू राहिली पाहिजे. असे घडल्यास त्या कुटुंबाची उपजीविका सुरक्षित चालण्यासाठी त्या काळात मोडून किंवा विकून वापरता येईल अशा वस्तू किंवा उपजीविकेसाठी लागणाऱ्या वस्तूंचे राखीव साठे त्या कुटुंबाकडे असायला हवा. वेगळ्या शब्दात सांगायचे तर, उपजीविका सुरक्षित होण्यासाठी संकटकालात विकण्यासारखी (स्थावर किंवा जंगम अशी) मालमत्ता (ॲसेट) अथवा वापरण्यासाठी बेगमी (स्टॉक) त्या वंचित कुटुंबाकडे असली पाहिजे. ही मालमत्ता व बेगमी तयार होण्यासाठी त्यांच्या उपजीविकेच्या संकट नसतानाच्या काळातील कामातून त्यांना एवढे उत्पन्न मिळायला हवे की त्यातून त्यांना त्यांच्या नेहमीच्या गरजा भागवून उरलेल्या वाढाव्यातून (सरप्लस) संकटकाळात वापरण्या साठी मालमत्ता व बेगमी तयार करता येईल.

'वंचितांच्या उपजीविका सुरक्षितते' च्या उद्दिष्टाचे महत्त्व नीटपणे लक्षात घ्यायला हवे. अशा प्रकारची सुरक्षितता मिळाल्यास गरिबी व मिंधेपणाच्या दुष्टचक्रातून सुटका करून घेणे वंचित कुटुंबांना शक्य होईल. त्या दुष्टचक्रात परत अडकू नये यासाठी आवश्यक तो संघर्ष करण्याइतके मानसिक व इतर बळ तसेच त्यासाठी आवश्यक ते स्वातंत्र्य त्यांना त्यांची उपजीविका सुरक्षित झाली तरच मिळू शकेल. म्हणजे उपजीविका सुरक्षितता मिळाली की त्यांना आर्थिक स्वायत्तता, मानसिक बळ व विचार करण्यासाठी उसंत व सवड मिळू लागेल. असे झाले की कुटुंबांची आर्थिक व इतर बाबतीत प्रगती करण्याची आकांक्षा जागी होईल. त्या आकांक्षांच्या पूर्तीसाठी म्हणजेच भविष्यातील लाभांसाठी प्रयत्न करण्यासाठी वर्तमानात मानसिक, शारीरिक, आर्थिक गुंतवणूक करण्याची प्रेरणा व त्यासाठीचा आत्मविश्वास त्यातून जागा होईल. अशाप्रकारे 'उपजीविका सुरक्षितता' ही वंचित कुटुंबांच्या प्रगतीचे दरवाजे उघडण्याची गुरुकिल्ली ठरेल असे वाटते.

या उद्दिष्टाच्या आधारे विचार करू लागल्यावर आपण विकासाचे सध्याचे प्रतिमान वंचितांच्या संदर्भात तरी स्पष्टपणे

नाकारतो. झिरपाआधारित विकासाचे हे रूढ प्रतिमान नाकारल्यावर 'शहरी औद्योगिक व्यवस्थेची वाढ (किंवा आर्थिक वाढ) म्हणजे विकास' हे जुने समीकरण स्पष्ट व नेमकेपणाने तोडले जाते. म्हणजेच, आर्थिक वाढ व विकास ह्या दोन वेगवेगळ्या गोष्टी आहेत हे स्पष्ट होईल. हे द्वैत (भिन्नता) प्रस्थापित केल्यावर विकासाच्या नावावर आर्थिक वाढ अथवा शहरी औद्योगिक वाढ करीत राहणे व त्याद्वारे विकासाच्या नावावरच वंचिताचा विकास आणखीनच दुष्कर करणे याला शह देणारी मांडणी विकसित करणे शक्य होईल. (मात्र हे द्वैत दाखवणे म्हणजे 'आर्थिक वाढी'ची गरज पूर्णपणे नाकारणे असा अर्थ होत नाही.)

आपल्या भोवतालचे वास्तव पाहिल्यावर विकासाच्या केवळ आर्थिक अंगाचे पर्यायी उद्दिष्ट पुरेसे ठरणार नाही. समाजातील विषमता, राजकीय एकाधिकार-शाही, पर्यावरणीय विध्वंस, आणि सांस्कृतिक असहिष्णुता यांची दखल आपल्याला घ्यावीच लागेल. त्यासाठी आधी उल्लेखिलेल्या पर्यायी आर्थिक उद्दिष्टाच्या बरोबरीने एकसाथ गाठण्याची इतर पर्यायी उद्दिष्टे निश्चित करावी लागतील.

सामाजिक विषमतेचा मुद्दा घेतल्यास विकासाचा विचार करताना सामाजिकदृष्ट्या वंचित (म्हणजे दलित, आदिवासी, स्त्रिया इ.) अशा समाजगटांना विकासदृष्ट्या वंचितांच्या यादीत प्राधान्याने स्थान मिळणे व त्यांच्या उपजीविकेच्या सुरक्षिततेची प्राधान्याने काळजी घेणे हे ओघाने येते. पण सामाजिक विषमतेविरुद्ध लढण्यासाठी अशा गटांना परिणामकारक असे कायद्याचे संरक्षण देणे आणि ह्या कायद्याच्या अंमलबजावणीसाठी सरकारच नव्हे तर समाजातील सर्व संस्थांनी सक्रिय व आग्रही राहणे हे देखील विकासाचे एक प्राधान्याचे उद्दिष्ट ठरवावे लागेल.

याचप्रमाणे राजकीय विषमता व एकाधिकारशाही मोडून काढण्यासाठी केवळ मताधिकार पुरेसा नाही. तर सर्वसामान्य जनतेचे आणि वंचित समाजघटकांचे शासनाच्या कारभारावर व विशेषतः विकासाच्या प्रक्रियेवर नियंत्रण आणणे हे विकासाचे प्राधान्याचे उद्दिष्ट असले पाहिजे. त्यासाठी ७३ वी घटनादुरूस्ती, पंचायत राज्य कायदे, आदिवासी स्वशासन कायदा यासारख्या प्रावधानांची परिणामकारक अंमलबजावणी करणे आवश्यक ठरेल. पर्यावरणाच्या बाबतीत केवळ त्याचा विध्वंस थांबवणे हे आत्ताच्या परिस्थितीत पुरेसे ठरणार नाही. तर विकासा-साठीच्या प्रयत्नांनंतरही माणूस व निसर्ग याचे नाते दोघांनाही अन्नदक जीवनदायी ठरेल अशा रितीने विकासाचे पर्यायी प्रतिमान घडवणे ही काळाची गरज आहे. या अर्थाने निसर्गस्नेही अथवा पर्यावरणस्नेही विकास हे देखील उद्दिष्ट मनी बाळगावे लागेल.

त्याचप्रमाणे वाढत्या सांस्कृतिक असहिष्णुतेच्या आजच्या वातावरणामध्ये वैयक्तिक व सामूहिक पातळीवर सांस्कृतिक व सामूहिक पातळीवर सांस्कृतिक अस्मिता/ ओळख जपण्याचे स्वातंत्र्य सर्वांना विशेषतः अल्प-संख्यांकांना असणे हे देखील विकासाचे एक प्राधान्याचे उद्दिष्ट असेल. तेव्हा ही सामाजिक, राजकीय, सांस्कृतिक विकासाची उद्दिष्टे आधी मांडलेल्या सुरक्षित उपजीविकेच्या आर्थिक उद्दिष्टांच्या बरोबरीने प्राधान्याची म्हणून स्वीकारावी लागतील.

ही सारी उद्दिष्टे एकसाथ गाठावयाची अशी प्राधान्याची उद्दिष्टे म्हणून मान्य केल्यावर मग विकासाचे अंतिम उद्दिष्ट कोणते ? हा प्रश्न उभा राहतो. त्याचे उत्तर आत्ताच व एका गटाने देण्यापेक्षा खरेतर ते उत्तर उपजीविका सुरक्षिततेचा पहिला टप्पा गाठल्यावर सर्वांनी मिळून शोधणे योग्य ठरेल. त्या टप्प्यावर सबलीकरण झालेल्या, समाधानी व स्वतंत्र अशा पूर्ववंचित घटकांच्या पुढाकाराने त्या त्या ठिकाणच्या समाजसमूहांनी विकासाचे अंतिम उद्दिष्ट ठरवणे अधिक योग्य ठरेल. मात्र तरीही केवळ दिशादर्शनासाठी अंतिम उद्दिष्टांची मांडणी करावयाची झाल्यास असे म्हणता येईल की "सर्वांना सर्वार्थांनी स्वतंत्र, समृद्ध व सन्मानपूर्ण जीवन जगता येणे " हे विकासाचे अंतिम उद्दिष्ट असावे. वेगळ्या शब्दात सांगायचे तर जात, लिंगभाव, वर्ग, निसर्ग ह्या साऱ्या माध्यमातून होणाऱ्या शोषण व दमनाचा अंत करण्याचे उद्दिष्ट धरून समतावादी व पर्यावरणस्नेही विकास मार्गावरची वाटचाल व्हायला हवी.

### पर्यायी आर्थिक व्यवस्था : उद्दिष्ट व मुख्य सूत्रे

पर्यायी विकासाच्या उद्देशानुसार संक्रमण काळातील पर्यायी आर्थिक व्यवस्था कशी असावी याची चर्चा संक्षेपाने येथे केली आहे. प्रथम अशा पर्यायी आर्थिक रचनेचे उद्देश व महत्त्वाची सूत्रे कोणती असतील याची थोडक्यात मांडणी केली आहे.

आर्थिक व्यवस्थेची रचना आणि त्यावरील विविध बंधने व मर्यादा ह्यांची आखणी करताना त्यामागील आपले उद्देश काय आहेत याचीसुद्धा स्पष्टता असायला हवी. अशी स्पष्टता असल्यावर आपल्याला नेहमी पडणाऱ्या अनेक प्रश्नांची उत्तरे

त्यातून देता येतील. उदा. व्यापारी शेती हवी का नको? माहिती तंत्रज्ञान हवे का नको? अवजड उद्योगाचे नेमके स्थान काय? यासारख्या प्रश्नांची उत्तरे आर्थिक व्यवस्थेची रचना करताना आपल्याला द्यावी लागतील. संक्रमणकाळात गाठावयाच्या पहिल्या प्राधान्याच्या उद्दिष्टातून आपल्याला आर्थिक व्यवस्थेच्या उभारण्याचे उद्देश व मुख्य सुत्रे कोणती असावीत याचे स्पष्टीकरण मिळेल. "वंचित घटकांना उपजीविकेची सुरक्षितता देणे" हा पर्यायी विकासाच्या उद्दिष्टाची पुढील पायरी म्हणून पर्यायी आर्थिक व्यवस्थेचा मुख्य उद्देश किंवा कार्यहेतू पुढीलप्रमाणे मांडता येईल. 'समाजाच्या विशेषतः वंचित घटकांच्या भौतिक गरजा पूर्ण करणे तसेच त्यांच्या इतर गरजांसाठी आवश्यक त्या भौतिक वस्तू व सेवा निर्माण करणे व पुरवणे ह्या आर्थिक व्यवस्थेच्या जबाबदाऱ्या आहेत' असे या संदर्भात म्हणता येईल. वेगळ्या शब्दात सांगायचे तर, आर्थिक व्यवस्था ही सर्व माणसांच्या सर्वांगीण प्रगतीसाठी असली पाहिजे केवळ नफ्यासाठी नव्हे. ज्या अनेक अभ्यासक व कार्यकर्त्यांच्या आम्ही सविस्तर मुलाखती घेतल्या त्यातून या उद्देशांना पूरक अशी पर्यायी आर्थिक व्यवस्थेतील काही मुख्य सूत्रे पुढे आली. त्यातील काही सूत्रे येथे मांडली आहेत. अर्थात ही सूत्रांची संपूर्ण यादी आहे असा अजिबात दावा नाही. परंतु पर्यायी आर्थिक रचनेबाबत स्पष्टता येण्यास त्यांची मदत होईल असे वाटते.

* सध्याच्या वंचित वर्गांना पर्यायी आर्थिक व्यवस्थेमध्ये प्राधान्याचे केंद्रीय स्थान मिळाले पाहिजे.

* भांडवलशाहीकडून विकासाच्या पुढील टप्प्यावर जाण्यासाठी नुसतेच उत्पादनसंबंध बदलून चालणार नाही तर त्याबरोबरच उत्पादन-साधनांमध्येही बदल करावे लागतील.

* पर्यायी आर्थिक व्यवस्थेमध्ये पुरेसा वाढावा (सरप्लस) निर्माण झाला पाहिजे. हा वाढावा नफ्याच्या रूपाने बाहेर काढला न जाता त्याची वंचितांना उपयुक्त ठरेल अशा रीतीने अर्थव्यवस्थेत पुनर्गुंतवणूक व्हायला पाहिजे.

* विकासाच्या रूढ प्रतिमानात सांगितलेला झिरपा सिद्धांत प्रत्यक्षात काम करीत नाही. तेव्हा समाजाच्या तळात व कानाकोपऱ्यामध्ये सर्वदूर पसरलेल्या सर्व वंचितांचा विकास घडवून आणण्यासाठी थेट व प्राधान्याने प्रयत्न करणे आणि त्याद्वारे संपूर्ण समाजाच्या विकासाकडे जाणे ही पर्यायी विकासाची दिशा असली पाहिजे.

* वंचितांच्या आजच्या स्थितीपासून सुरुवात करून, त्यांच्या विकासासाठी त्यांना मुळापासून उखडण्याचा आग्रह न धरता (कारण त्या मुळांतूनच त्यांना जगण्याची, झगडण्याची शक्ती प्राप्त होत असते) त्यांचा विकास घडवणे हे वंचिताभिमुख विकासाचे महत्त्वाचे सूत्र असले पाहिजे.

* पर्यायी आर्थिक व्यवस्थेची रचना करताना वंचित गटांच्या परस्पर आर्थिक व्यवहारांतून क्रयशक्ती त्यांच्यातच फिरती राहून ती वृद्धिंगत होत राहील याची दक्षता घेतली पाहिजे.

* स्वयंपूर्ण गावाचा आग्रह धरू नये. त्याऐवजी विविध ग्रामीण लोकसमूहांमध्ये परस्परांशी मोठ्या प्रमाणात आर्थिक व्यवहार व्हावेत व त्यातून परस्परावलंबन वाढावे.

* ग्रामीण व वंचित लोकसमूहांच्या आर्थिक संस्था व शहरी औद्योगिक संस्था यामध्येही परस्पर आर्थिक संबंध असावेत. मात्र त्यामध्ये वंचितांच्या संस्थांवर अन्याय होणार नाही याची काळजी शासनव्यवस्थेने घ्यावी.

* पर्यायी विकासाच्या सर्व निर्णयप्रक्रियांमध्ये (मग त्या कोणत्याही प्रकारच्या / स्तरावरच्या संस्थांत झालेल्या असोत) पारदर्शकता, जाबदायित्व (अकौंटेबिलिटी) व लोकांचा (विशेषतः निर्णयांशी संबंधित असणाऱ्या वंचित घटकांचा) खराखुरा सहभाग असायला हवा. याद्वारे विकासाच्या प्रक्रियेवर व कारभारावर वंचितांचे संपूर्ण नियंत्रण बसवता येईल.

* बहुसंख्य विकासवंचित समाजघटक त्यांच्या उपजीविकेच्या गरजा भागविण्यासाठी अजूनही स्थानिक नैसर्गिक संसाधनांवर अवलंबून आहेत. या नैसर्गिक संसाधनांचे म्हणजे जमीन, जंगल, पाणी ह्यांचे संरक्षणच नव्हे तर संवर्धन करण्याचे काम पर्यायी विकास प्रयत्नांचा अविभाज्य भाग म्हणून करावे लागेल.

### भाग ४ : पर्यायी विकासाची व्यूहनीती

या भागातील विकासाच्या पर्यायी प्रतिमानातील व्यूहनीतीची चर्चा संक्रमणाच्या पहिल्या टप्प्यापुरतीच मर्यादित ठेवली आहे. या लेखात व्यूहनीतीची मांडणी काही सूत्रांच्या आधारे केली आहे. अर्थात या सूत्रांचे स्वरूप मार्गदर्शक सूत्रांच्या स्वरूपात आहे. त्या सूत्रांची फार विस्ताराने चर्चा न करता त्यांची स्पष्टता सोप्या रीतीने करण्यासाठी सध्याची व्यवस्था व या सूत्रांच्या आधारे उभी करावयाची पर्यायी अर्थव्यवस्था यांची तुलना एका तक्त्याद्वारे शेवटी केली आहे.

व्यूहनीतीच्या या मार्गदर्शक सूत्रांकडे व त्या आधारे करावयाच्या तुलनेकडे वळण्याआधी व्यूहनीतीसंबंधातील काही

अनुक्रमणिका

महत्त्वाच्या मुद्यांची ओझरती का होईना चर्चा करणे गरजेचे आहे. वंचिताभिमुख पर्यायी विकासाचा भारताच्या संदर्भात विचार करताना जातीव्यवस्थेचा व त्यातही दलित जातींचा विचार वेगळा करणे आवश्यक आहे. शेती आधारित पारंपरिक अर्थव्यवस्था व त्याआधारे रचली गेलेली ग्रामव्यवस्था मोडकळीस आल्यावर त्या व्यवस्थेमध्ये विविध कामे करणाऱ्या जातींमधल्या लोकांच्या उपजीविकांवर गदा आली. भारताच्या औद्योगिकरणामुळे ही प्रक्रिया विस्तारत गेली. ही प्रक्रिया आता उजाखा धोरणामुळे नव्याने जोर धरीत आहे. आधी चर्चा केल्याप्रमाणे या वंचित घटकांना आता अत्याधुनिक औद्योगिक - महानगरी व्यवस्थेमध्ये स्थान मिळणे अशक्य कोटीतील गोष्ट आहे. दुर्दैवाने ह्यापैकी बहुतेकांकडे जमिनीची अथवा इतर स्थानिक नैसर्गिक संसाधनांची मालकी नाही. त्यामुळे त्यांना पर्यायी व्यवस्थेत सामावून घ्यायचे तर स्थानिक नैसर्गिक संसाधनांची व त्याबरोबरीने त्या नैसर्गिक संसाधनांतून मिळणाऱ्या विविध जैवउत्पादनांवर मालकी किंवा इतर प्रकारचे हक्क मिळणे महत्त्वाचे ठरेल. हेच सूत्र आदिवासी समाजालाही लावायला हवे. एकेकाळी जंगलाचे राजे असणारे आदिवासी ब्रिटिश आल्यावर सर्वस्व हरवून बसले. स्वातंत्र्य मिळाल्यावर देखील त्यांना त्यांचे अधिकार परत मिळाले नाहीत. आज अनेकांच्या मते शहरी औद्योगिक व्यवस्थेत सामील होणे एवढाच मार्ग आदिवासींना उरला आहे. खरेतर इतर वंचित घटकाप्रमाणे आदिवासींनाही उजाखाच्या युगात शहरी औद्योगिक व्यवस्थेत प्रवेश मिळणे अशक्य आहे. अशा परिस्थितीमध्ये त्यांच्या रहिवासाच्या ठिकाणच्या वनांवर, वनोपजांवर व इतर नैसर्गिक संसाधनांवर त्यांना विविध प्रकारचे हक्क मिळणे व त्याआधारे त्यांच्या उपजीविका उभ्या करणे हा मार्ग जास्त योग्य वाटतो.

पर्यायी विकासाची चर्चा करताना केवळ वंचित घटकातीलच नव्हे तर सर्वच ग्रामीण व अर्धशहरी भागातील स्त्रियांचा वेगळा विचार करणेही अगत्याचे ठरते. आपआपल्या कुटुंबाच्या उपजीविकेचा भार बव्हंशी या स्त्रियाच वाहात असतात. कुटुंबाच्या उपजीविकेसाठी त्या करीत असलेल्या कामांचा त्यांच्यावर पडणारा भार कमी करणे हा पर्यायी विकासाचा एक प्रमुख उद्देश असला पाहिजे. वेगळ्या शब्दात सांगायचे तर, पर्यायी विकास हा उपजीविका केंद्री असला पाहिजे म्हणजे तो आपोआपच स्त्रीकेंद्री होईल. पर्यायी विकासाच्या संदर्भातला चौथा महत्त्वाचा मुद्दा म्हणजे पर्यावरणाचा. रूढ विकास प्रतिमानानुसार आधुनिक उद्योग व आधुनिक शेतीच्या मार्गाने आर्थिक वाढ साधताना पर्यावरणावर भीषण दुष्परिणाम होत असतात. पर्यायी विकासात स्थानिक नैसर्गिक संसाधनाचे, संरक्षण, संवर्धन व शाश्वतरीतीने त्यांचा उपभोग हे महत्त्वाचे सूत्र असायला हवे.

**व्यूहनीतीची मार्गदर्शक सूत्रे**

**१) ग्रामीण - नैसर्गिक व्यवस्थेला केंद्रीय स्थान**

'उजाखा' धोरणांमुळे रूढ शहरी-औद्योगिक व्यवस्थेमध्ये शिरकाव करून घेणे बहुसंख्य वंचितांना शक्य होणार नाही व त्या व्यवस्थेतून त्यांना सुरक्षित, सन्मानपूर्ण उपजीविका मिळवता येणे कठीण आहे हे आपण पाहिले. अशा परिस्थितीत, सुरक्षित, समृद्ध, सन्मानपूर्ण उपजीविकेचे उद्दिष्ट प्राप्त करण्यासाठी वंचितांना वेगळा मार्ग अवलंबावा लागेल. ग्रामीण-नैसर्गिक संसाधनांच्या व्यवस्थेमध्ये बहुसंख्य वंचित गट आज वसलेले आहेत. ग्रामीण नैसर्गिक व्यवस्थेतून पिढ्यान्‌पिढ्या ते आपली उपजीविका मिळवत आले आहेत, त्या व्यवस्थेबद्दलचे त्यांचे ज्ञान सखोल आहे. त्या व्यवस्थेमध्ये काही प्रमाणात तरी त्यांना आज अधिकार आहेत किंवा पूर्वी होते. ग्रामीण-नैसर्गिक व्यवस्थेत राहून आपले स्थान मजबूत केल्यास वंचितांना उपजीविकेची सुरक्षितता मिळण्याची शक्यता जास्त आहे. कारण, त्या व्यवस्थेमध्ये राहिल्यास ते आपले अधिकार वाढवण्यासाठी संघर्ष करू शकतात. आपले ज्ञान वाढवून आपल्या उपजीविकेच्या उपक्रमांची कार्यक्षमता वाढवू शकतात. अशाप्रकारे, या व्यवस्थेत राहून आपली प्रगती व विकास साधण्याचा निश्चय वंचितांनी व त्यांच्या नेतेमंडळींनी सजगपणे करायला हवा. शहरी-औद्योगिक व्यवस्थेच्या मृगजळामागे धावत राहण्यात फारसा अर्थ उरला नाही हे त्यांनी लक्षात घ्यायला हवे. आज बहुसंख्य वंचितांना उपजीविका पुरवणाऱ्या व त्यांच्या भविष्याची आशा असणाऱ्या "ग्रामीण-नैसर्गिक' व्यवस्थेचा खरा आधार जमीन-पाणी-जंगल ही स्थानिक नैसर्गिक संसाधने आहेत. या नैसर्गिक संसाधनांचे संवर्धन व त्यांच्या उत्पादकतेत वाढ हा वंचिताभिमुख विकासाच्या पायाचा दगड असेल.

**२) जैवमाल हा अर्थव्यवस्थेचा मूळ व मुख्य भौतिक आधार**

रूढ शहरी व औद्योगिक व्यवस्थेमध्ये सारा भर खनिजांपासून मिळणाऱ्या (त्यातही मुख्यतः खनिजतेलापासून मिळणाऱ्या) व इतर मानवनिर्मित पदार्थांवर आहे. हे पदार्थ रूढ








अर्थव्यवस्थेचे मुख्य भौतिक आधार (मटेरियल बेस) आहेत. या पदार्थांपैकी बहुसंख्य पदार्थ हे निसर्गाला हानी पोहोचवणारे आहेत व बरेचसे पदार्थ हे वंचितांच्या दृष्टीने किंमतीने महागही आहेत. शिवाय या पदार्थांचे उत्पादन, वितरण यावरच नव्हे तर ते पदार्थ ज्यापासून मिळवले जातात त्या खनिजांच्या (जगात निवडक ठिकाणी असणाऱ्या) स्रोतांवरदेखील आपला घट्ट ताबा ठेवण्याचा प्रयत्न जगातील बलवान राष्ट्रे व बहुराष्ट्रीय कंपन्या सतत करत असतात. तेव्हा वंचितांना उपजीविकेची सुरक्षितता प्राप्त करून देण्यासाठी या पदार्थांवर मुख्य भौतिक आधार म्हणून अवलंबून राहणे चुकीचे ठरेल.

याउलट स्थानिक पातळीवर, स्थानिक पर्यावरणातून निर्माण होणारा जैवमाल वंचिताभिमुख विकासाच्या दृष्टीने विविध कारणांनी अतिशय उपयुक्त आहे. एकतर, तो वंचितांना स्थानिक स्तरावर उपलब्ध होऊ शकतो. दुसरे म्हणजे, स्थानिक जैवमाल ज्यातून निर्माण होतो त्या स्थानिक नैसर्गिक संसाधनांवर (म्हणजे जमीन, पाणी, जंगल) वंचित गटांना पूर्वी अधिकार होते व आजही अनेक ठिकाणी मर्यादित का होईना अधिकार आहेत. त्यामुळे विकास प्रयत्नांची सुरुवात लहान प्रमाणावर का होईना स्वतंत्रपणे सुरू करणे शक्य होईल. तिसरे म्हणजे अनेक पिढ्यांपासून वंचित घटक उपजीविकेच्या गरजा भागविण्यासाठी आवश्यक ते तांत्रिक ज्ञान स्थानिक वंचितगटांकडे आजही उपलब्ध आहे. सर्वात महत्त्वाचे म्हणजे स्थानिक नैसर्गिक व्यवस्था हा जैवमाल पुन्हा पुन्हा निर्माण करू शकते. जैवमालाच्या या पुनर्निर्मितीच्या क्षमतेमुळे, त्यावर अवलंबून असणाऱ्या वंचिताच्या उपजीविकादेखील 'शाश्वत' व 'टिकाऊ' स्वरूपाच्या होतील. जैवमालाच्या बाजूचे हे सारे मुद्दे लक्षात घेऊन पर्यायी अर्थव्यवस्थेची उभारणी करताना त्यामध्ये जैवमाल हा साऱ्या पदार्थांचा व वस्तूंचा मूळ व मुख्य भौतिक आधार (ओरिजनल मटेरीयल बेस) म्हणून स्वीकारणे योग्य ठरेल.

एक स्पष्टीकरण द्यायला हवे की याचा अर्थ असा नव्हे की जैवमालाव्यतिरिक्त (म्हणजे खनिजजन्य व मानवनिर्मित) पदार्थांचा वापर ताबडतोब व संपूर्णतः थांबवायचा. संक्रमण-काळामध्ये एका बाजूने जैवमालाचा वापर मोठ्या प्रमाणात वाढवताना त्यामुळे निर्माण होणाऱ्या अडचणी व त्रुटींवर मात करण्यासाठी आवश्यक तेथे, तारतम्याने व नेमक्या प्रमाणात या इतर प्रकारच्या पदार्थांचा वापर करत रहावे लागेल.

या विवेचनाचा मुख्य परिणाम म्हणजे शेतीची रूढ व्याख्या बदलावी लागेल. पर्यायी विकासात शेतीची व्याख्या 'विविध प्रकारच्या जैवमालाचे उत्पादन' अशी व्यापक करावी लागेल.

**३) जैवमाल आधारित उद्योगांची मोठ्या प्रमाणात वाढ**

जैवमाल आधारित अर्थव्यवस्था उभी करताना जैवमालाच्या उत्पादनात, दर्जात व वैविध्यात फार मोठ्या प्रमाणावर वाढ करावी लागेल. अशा प्रकारच्या जैवमालाचे उत्पादन करण्यासाठी रासायनिक खते अथवा कीटकनाशके यांचा वापर अगदी कमीत कमी, सेंद्रिय खते औषधे यांचा वापर मोठ्या प्रमाणावर करावा लागेल. या सेंद्रिय खते, औषधे, स्थानिक बियाणे यांचे मोठ्या प्रमाणावर उत्पादन करणे हा फार मोठा शेतीउद्योग किंवा जैवमालउद्योग असेल. त्याचबरोबरीने जैवमालाचे सार्वत्रिकरित्या व मोठ्या प्रमाणावर उत्पादन करण्यासाठी आवश्यक त्या पाण्याच्या स्थानिक स्रोतांचे व साठवणुकीचे व्यवस्थापन व पुरवठा हा देखील एक महत्त्वाचा 'जैवमालउद्योग' होऊ शकेल.

सर्वात महत्त्वाचे म्हणजे जैवमालाचा रोजच्या जीवनामध्ये व पायाभूत संरचनेमध्ये वापर करता यावा म्हणून त्या जैवमालावर विविध प्रकारच्या प्रक्रिया करणारे उद्योग मोठ्या प्रमाणात उभारावे लागतील. त्या प्रक्रिया केलेल्या जैवमालापासून पायाभूत संरचनेसाठीच्या इमारती व इतर बांधकामासाठी लागणारे विविध घटक व वस्तू बनवणे हा देखील फार मोठा उद्योग असेल. छोट्या आकाराच्या लाकडांचा टिकाऊपणा वाढवण्यासाठी प्रक्रिया करणारे उद्योग तसेच प्रक्रियाकृत लाकडापासून पायाभूत संरचनांच्या बांधकामासाठी लागणाऱ्या विविध वस्तू म्हणजे तयार खांब, तयार तुळ्या व फळ्यांपासून छोट्या धरणांच्या दरवाजापर्यंतच्या विविध वस्तू बनवणारे उद्योग ही याची उदाहरणे होत.

**४) रोजगारनिर्मितीला प्राधान्य**

पर्यायी आर्थिक व्यवस्थेची उभारणी करताना आपल्या देशात मुबलक असलेल्या श्रमाचा किंवा श्रमिकांचा जास्तीत जास्त वापर तर टंचाई असलेल्या भांडवलाचा कमीत कमी वापर करण्याचे सूत्र मनी बाळगावे लागेल.

या सूत्राचा वापर केवळ जैवमालआधारित उद्योगातच नव्हे तर इंजिनीअरिंग उद्योगातही करावा लागेल. भांडवल जास्त लागणाऱ्या संगणकीय, स्वयंप्रेरित (ऑटोमॅटिक) यंत्रांपेक्षा कामगारचलित यंत्रे वापरण्यावर भर द्यावा लागेल. वेगळ्या








शब्दात सांगायचे तर रूढ व्यवस्थेतील 'भांडवलसघन' उद्योगांऐवजी 'श्रमसघन' उद्योगांची वाट आपल्याला धरावी लागेल. रोजगार निर्मितीच्या प्रश्नाचे उत्तर केवळ संघटित किंवा रूढ इंजिनीअरिंग उद्योगात शोधून चालणार नाही, तर त्यासाठी जैवमाल निर्मिती व संबंधित क्षेत्रांमध्ये आपणास रोजगार निर्मितीसाठी मोठी गुंतवणूक करायला लागेल.

रोजगाराला प्राधान्य देताना त्यात वंचित गटांतील लोकांना प्राधान्य मिळावे हे सूत्र लक्षात ठेवावे लागेल. ह्या सूत्राची अंमलबजावणी करताना अनेक अडचणी येतील. त्यामध्ये वंचित गटातील लोकांमध्ये आवश्यक क्षमतांचा अभाव ही प्रमुख अडचण असेल. तेव्हा केवळ रोजगार निर्मितीच्या कार्यक्रमात नव्हे तर पर्यायी अर्थव्यवस्थेच्या उभारणीच्या कार्यक्रमात वंचित समाजघटकातील तरुण-तरुणी व विशेषतः स्त्रियांच्या क्षमतावर्धनासाठी व्यवसाय कौशल्याचे, उद्योजकतेचे, मानसिक व इतर क्षमतांचे प्रशिक्षण हा मुख्य घटक असेल.

### ५) नैसर्गिक संसाधनांवर वंचितांना हक्क व त्यांचे संवर्धन

जैवमालआधारित अशा अर्थव्यवस्थेमध्ये जैवमालाचे उत्पादन करणाऱ्या स्थानिक नैसर्गिक संसाधनांचे महत्त्व केंद्रीय असेल. तेव्हा स्थानिक नैसर्गिक संसाधनांचा वापर हा स्थानिक वंचिताना उपजीविका सुरक्षितता देण्यासाठी प्राधान्याने व्हायला हवा. दुर्दैवाने, ग्रामीण भागातील वंचित घटकांच्या (विशेषतः आदिवासींसारख्या) उपयोगातल्या नैसर्गिक संसाधनांचा मोठ्या प्रमाणावर वापर आज शहरी-औद्योगिक व्यवस्थेकडून होत असतो. हा वापर बऱ्याचवेळा निष्काळजी, नासाडी करणारा, बेपर्वा रीतीने व अनावश्यक कामासाठी होत असतो. (उदा. गोल्फ रिझॉर्टसाठी आदिवासींची जमीन जंगले ताब्यात घेणे.) अशा गैर वापराला आळा घालणे, स्थानिक नैसर्गिक संसाधनांवरील स्थानिक वंचितांच्या सर्व प्रकारच्या म्हणजे कायदेशीर, पारंपारिक व सामूहिक वापराच्या हक्कांचे संरक्षण करणे ह्या जबाबदाऱ्या सर्वांनाच घ्याव्या लागतील. तरच त्या संसाधनांचा वापर प्राधान्याने स्थानिक वंचितांना उपजीविकेची सुरक्षितता देण्यासाठी करता येईल.

संवर्धनाच्या प्रयत्नांमध्ये हक्कांबरोबर स्थानिक नैसर्गिक संसाधनांची उत्पादकता वाढवणे हा देखील एक महत्वाचा घटक आहे. ही उत्पादनक्षमता वाढवण्यासाठी स्थानिक नैसर्गिक संसाधनांची (म्हणजे विशेषतः माती, झाड-झाडोरा, पाण्याचे स्रोत ह्यांची) धारणक्षमता व दर्जा वाढवणे महत्त्वाचे ठरते. दीर्घ पल्ल्याचा दृष्टिकोन ठेवून विविध उपायांनी ही प्राथमिक उत्पादकता वाढवणे पर्यायी विकासाच्या प्रयत्नांमध्ये एक महत्त्वाचे उद्दिष्ट असावे लागेल.

अर्थात याचा अर्थ जैवमालाची निर्मिती करण्यासाठी बाहेरचे कोणतेच पदार्थ अथवा आदाने (इनपुटस्) वापरायची नाहीत असा नव्हे. मात्र बाहेरील आदाने वापरताना त्यांचा वापर तारतम्याने, नेमका व आवश्यक तेथेच केला जाईल, त्यांच्यावर दीर्घपल्ल्याचे अवलंबित्व निर्माण होणार नाही व इतरांवर अन्याय करून त्यांची आयात केली जाणार नाही अशा सर्व पथ्यांचे पालन करावे लागेल.

### ६) पुनर्निर्मितीक्षम ऊर्जासाधनांना प्राधान्य

विकासाच्या पर्यायांबाबत विचार करताना ऊर्जासाधनांचा मुद्दा महत्त्वाचा ठरतो. रूढ विकास प्रतिमान हे ऊर्जेचा अवाजवी व अपव्ययी वापर करण्यास प्रोत्साहन देते. रूढ अर्थव्यवस्थेमध्ये ऊर्जेच्या रूढ स्रोतांचा (म्हणजे कोळसा, खनिजतेल, अणुऊर्जा, मोठी धरणे इ.) वापर जास्त होतो. ह्या गोष्टींचे दोन मोठे दुष्परिणाम होतात. पहिला दुष्परिणाम म्हणजे ह्या रूढ ऊर्जा साधनांच्या वापरामुळे स्थानिक ते वैश्विक अशा विविध स्तरावर पर्यावरणाची तीव्र म्हणावी अशी हानी होते. दुसरे म्हणजे, ही सर्व महत्त्वाची रूढ ऊर्जासाधने पृथ्वीवरील काही विशिष्ट ठिकाणी उपलब्ध आहेत. परिणामी, त्यांच्यावर प्रत्यक्ष ताबा मिळवणे अथवा मक्तेदारी निर्माण करणे सहज शक्य होते. अशा मक्तेदारीमुळे ही ऊर्जासाधने गरीब देश व त्यातही वंचित समाजघटकांना परवडतील अशा किंमतीत व पुरेशा प्रमाणात उपलब्ध होणे कठीण असते. तेव्हा वंचितांच्या विकासासाठी ह्या ऊर्जासाधनांवर अवलंबून राहणे घातक ठरेल.

भारतासारख्या देशात सौर ऊर्जा, पवन ऊर्जा, जैवमालापासून मिळणारी ऊर्जा, प्राणीज ऊर्जा अशा अनेक प्रकारच्या ऊर्जांचे पुनर्निर्मितीक्षम (रिन्युएबल) स्रोत स्थानिक स्तरावर उपलब्ध आहेत. आज ह्या स्रोतांचा विविध कारणांमुळे पुरेसा वापर होत नाही. एक महत्त्वाचे कारण म्हणजे पुनर्निर्मितीक्षम ऊर्जास्रोतांचा वापर करण्याच्या तंत्रज्ञानाच्या विकासाकडे पुरेसे लक्ष दिले जात नाही. त्यामुळे, स्थानिकरित्या उपलब्ध असणाऱ्या पुनर्निर्मितीक्षम स्रोतांपासून मिळणाऱ्या ऊर्जेची किंमत शक्य असूनही कमी होऊ शकलेली नाही.

### ७) समान पाणीवाटपाचे सूत्र

जैवमालवृद्धीसाठी भारतासारख्या हवामानामध्ये पाणी हा ऊर्जेपेक्षाही महत्त्वाचा घटक आहे. विशेषत: दक्षिण भारतामध्ये पाण्याची टंचाई हा जैवमालाच्या उपलब्धतेच्या दृष्टीने एक मोठा अडसर ठरतो. महाराष्ट्रासारख्या राज्यात तर आधीच पाणी कमी आहे. त्यात उपलब्ध पाण्याचे अत्यंत असमान वाटप व अतार्किक वापर यामुळे पाणीसमस्या ही राज्याची प्रथम क्रमांकाची समस्या बनली आहे. या पार्श्वभूमीवर 'पाण्याचे समतेच्या तत्त्वावर सर्वांना वाटप' ही महाराष्ट्रातील पर्यायवादी चळवळीची महत्त्वाची मागणी राहिली आहे. समान पाणी वाटपाच्या तत्त्वामध्ये प्रत्येक कुटुंबाला त्यांच्या उपजीविका सुरक्षिततेला आवश्यक तेवढे उत्पादन करण्यासाठी जेवढे पाणी लागेल तेवढ्या पाण्याची हमी देण्याची कल्पना आहे. या समान पाणीवाटपाच्या तत्त्वात सर्वांना समान पाणी मिळेल व त्यामध्ये गावातील सर्व कुटुंबे अगदी भूमिहीनदेखील सामील असतील अशी कल्पना आहे. भूमिहीनांना पाण्याचा हक्क देणे हे आजच्या परिस्थितीत विशेषत: जमिनीच्या पुनर्वाटपावर मर्यादा आल्या असताना खूप महत्त्वाचे ठरू शकते असे काही अभ्यासक व कार्यकर्त्यांचे आग्रहाचे सांगणे आहे. पाण्याचा अधिकार मिळाला, पाण्यामुळे होणाऱ्या उत्पादकता वाढीचे परिणाम दिसू लागले, त्यातून थोडे आर्थिक स्वातंत्र्य मिळाले की वंचित घटक जास्त जोराने जमिनीच्या हक्कांसाठी भांडू शकतात. समान पाणी वाटपाचे सूत्र अशा तऱ्हेने अनेक क्रांतिकारक प्रक्रियांना जन्म देऊ शकते.

### ८) स्थानिक अर्थव्यवस्थांना प्राधान्य व मजबुती

अनेकदा ग्रामीण भागातील स्थानिक उत्पादने थेट शहरात निर्यात करून अथवा एखादा मोठा कारखाना ग्रामीण भागात आणून त्या भागाचा विकास घडवण्याचे प्रयत्न केले जातात. असे बाहेरून येणारे आधुनिक मोठे कारखाने फारच थोड्या स्थानिक व्यक्तींना प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष (अॅन्सिलरी किंवा पूरक उद्योगातील) रोजगार उपलब्ध करून देतात. त्यामुळे स्थानिक स्तरावर फारसे उत्पन्न वाढत नाही व क्रयशक्ती निर्माण होत नाही. स्थानिक क्रयशक्तीच्या अभावी त्या भागातल्या इतर स्थानिक उद्योग व सेवांना चालना मिळत नाही. अशाप्रकारे या मोठ्या व आधुनिक कारखान्यांचे स्थानिक अर्थव्यवस्थेला योगदान फारसे नसते. याउलट, स्थानिक जमीन, पाणी व हवेचे प्रदूषण करून, स्थानिक नैसर्गिक संसाधनांचा अवाजवी वापर करून, अथवा कधीकधी स्थानिक उद्योगांना धोका पोचवून हे कारखाने स्थानिक कुटुंबांच्या उपजीविकांचा मोठ्या प्रमाणावर विध्वंस करतात. अशाप्रकारे, त्यांचे स्थानिक अर्थव्यवस्थेला होणारे योगदान बऱ्याचवेळा ऋणात्मक असते.

त्याऐवजी स्थानिक जैवमाल आधारित उत्पादनांचा मोठ्या प्रमाणावर वापर करणारे प्राथमिक उद्योग, त्या प्राथमिक उत्पादनांचा उपयोग करून स्थानिक स्तरावर नवनवीन उत्पादने करणारे उद्योग, या साऱ्या उत्पादनांची स्थानिक स्तरावर विक्री व पुरवठा करणारे व्यवसाय, त्या उद्योगांना इतर आदाने (इनपुटस्) अथवा कच्चा माल / सेवा पुरवणारे व्यवसाय या साखळीतून स्थानिक अर्थव्यवस्थेची उभारणी करता येईल.

अशा स्थानिक उद्योगांची स्थापना झाल्यास त्यामुळे स्थानिक स्तरावरील व्यवहार अनेक पटींनी वाढतील व स्थानिक अर्थव्यवस्था मजबूत होईल व त्यातून अनेक स्थानिक कुटुंबांना उपजीविका सुरक्षितता लाभेल. स्थानिक अर्थव्यवस्थेला मजबुती देण्यासाठी स्थानिक उद्योगा-बरोबरीनेच स्थानिक शेती व जैवमाल उत्पादनाच्या उपक्रमांनाही गती द्यावी लागेल. त्यासाठी विविध प्रयत्न करावे लागतील. येथे स्थानिक अर्थव्यवस्था ह्या संज्ञेचा अर्थ बदलता घ्यावा लागेल. त्यात वाड्यांची / पाड्यांची, अनेक पाड्यांची एकत्रित, गावांची, मग पंचक्रोशीची, तालुक्याची व जिल्ह्यांची अर्थव्यवस्था अशी उतरंडीची रचनाही करता येईल.

### ९) स्थानिक पायाभूत संरचनेला प्राधान्य

स्वातंत्र्य मिळाल्यानंतर अर्थव्यवस्थेसाठीच्या पायाभूत सुविधा किंवा इन्फ्रास्ट्रक्चर निर्माण करण्यावर बराच भर देण्यात आला. आर्थिक सुधारणांची (उजाखा धोरणांची) सुरुवात झाल्यानंतर तर ह्या पायाभूत सुविधांवर अक्षरश: हजारो कोटी रूपये ओतले जात आहेत. त्यातून अर्थव्यवस्थेला जोर येऊन रोजगार वाढतील असेही सांगितले गेले. मात्र अशाप्रकारे बांधलेल्या या 'इन्फ्रास्ट्रक्चर'चा फायदा श्रीमंतांना जास्त, गरिबांना कमी होतो. अनेकदा त्याचा फटका मात्र अप्रत्यक्षपणे गरिबांना बसतो.

या सर्व प्रकारात ग्रामीण भागातील शेती, उद्योग, शेतीमालावरील प्रक्रिया यासाठी आवश्यक असणाऱ्या स्थानिक पायाभूत सुविधांकडे मात्र पूर्णपणे दुर्लक्ष होते. स्थानिक स्तरावर मजबूत स्थानिक अर्थव्यवस्थेची उभारणी करण्यासाठी स्थानिक पायाभूत संरचना (लोकल इन्फ्रास्ट्रक्चर) देखील पुरेशी सक्षम असावी लागेल. या स्थानिक पायाभूत संरचनेमध्ये स्थानिक

पाणीस्रोत व पाणीपुरवठ्याची साधने, ऊर्जास्रोत व ऊर्जापुरवठा व्यवस्था, विविध उपयोगासाठीच्या विविध प्रकारच्या इमारती (उदा. प्रक्रिया उद्योग, साठवण यासाठी इमारती, विक्रीसाठी मंडया), वाहतुकीसाठी रस्ते या साऱ्या संरचनांचा (स्ट्रक्चर्स) अंतर्भाव करावा लागेल. या प्रकारची पायाभूत संरचना निर्माण करताना स्थानिक जैवमालाचा, कारागिरांचा व मजुरांचा प्राधान्याने वापर करण्याची दक्षता घ्यावी लागेल. त्यासाठी बाहेरून आयात केलेल्या वस्तू, यांत्रिक उपकरणे यांचा वापर कमी प्रमाणात, मोक्याच्या जागी व तारतम्याने करावा लागेल.

**१०) वंचितांच्या नव्या आर्थिक संस्था व नवे आर्थिक परस्पर संबंध**

या साऱ्या स्थानिक अर्थव्यवहारात समर्थपणे सामील होता यावे यासाठी समान आर्थिक हितसंबंध असणाऱ्या वंचितांच्या नव्या आर्थिक संस्था उभ्या कराव्या लागतील. सहकारी संस्था, स्वयंसेवी संस्था, पतपेढ्या, कंपन्या किंवा इतर नाविन्यपूर्ण अंतर्रचना असणाऱ्या संस्थांच्या रूपाने त्या संस्थांची बांधणी करावी लागेल. या संबंधातील काही मुख्य सूत्रे सांगता येतील. उदाहरणार्थ, त्या संस्थेत उत्पादन करणाऱ्या, वितरण करणाऱ्या, सेवा देणाऱ्या लोकांना त्या संस्थेच्या निर्णयप्रक्रियेत व एकंदर कारभारामध्ये महत्त्वाचे स्थान असावे. तसेच त्यांच्या कामातून निर्माण होणाऱ्या वाढाव्यामध्ये (सरप्लसमध्ये) महत्त्वाचा वाटा असावा.

या नव्या संस्थांमध्ये भूमिहीनांच्या (स्वतःच्या हक्काचे पाणी वापरून व इतरांच्या मालकीच्या जमिनी भाड्याने घेऊन) जैवमालनिर्मिती करणाऱ्या सहकारी संस्था, वंचित वर्गातील स्त्रियांचे भाजीपाला उत्पादक गट, सरपण निर्मिती करणाऱ्या स्त्रियांच्या सोसायट्या, बरड जमीन 'पालकां'ची वृक्षलागवड कंपनी अशासारख्या जैवमाल उत्पादनामध्ये भाग घेणाऱ्या संस्था असतील. त्याचप्रमाणे भूमिहीनांना व स्थानिक कारागिरांना योग्य प्रशिक्षण देणे व त्यांच्या लाकूडप्रक्रिया सोसायटी, जैविक खत निर्मिती संघ यासारख्या आर्थिक संस्था उभ्या करणेदेखील हितावह ठरेल. वंचित घटक अशा आर्थिक संस्थांच्या माध्यमातून स्थानिक गरजा पुरविण्यासाठी व स्थानिक पायाभूत संरचनेसाठी लागणारी उत्पादने बनविण्यामध्ये समर्थपणे भाग घेऊ शकतील.

वंचितांच्या ह्या आर्थिक संस्थांची बांधणी केल्यावर या आर्थिक संस्था, स्थानिक स्तरावरचे इतर बलवान गट व विविध प्रकारच्या सरकारी मालकीच्या संस्था यांच्यामध्ये नव्या नव्या प्रकारचे आर्थिक परस्परसंबंध निर्माण करावे लागतील. या नव्या संबंधातून बलवान गटांना काही लाभ मिळाले तरी त्यांच्याकडून वंचितांवर अन्याय होणार नाही व वंचितांच्या संस्थांनाही पुरेसे लाभ मिळतील याची दक्षता घ्यावी लागेल. यासाठी सरकारी संस्थांच्या कायदेशीर अधिकारांचा तसेच आर्थिक व वित्तीय ताकदींचा खुबीने उपयोग करून घेता येईल. उदा. वंचितांची लाकूडप्रक्रिया सोसायटी, गावातील जमीनमालकांची वृक्षलागवड सोसायटी व सरकारी वित्तीय संस्था यांच्यामध्ये त्रिपक्षी करार करता येईल. त्यानुसार जमीनमालकांना वनलागवडीसाठी वित्तीय मदत व कर्ज पुरवले जाताना त्यांचे लाकूड उत्पादन काही विशिष्ट (स्थिर) किंमतीला वंचितांच्या लाकूडप्रक्रिया सोसायटीला देणे त्यांच्यावर बंधनकारक असेल. अशा नाविन्यपूर्ण आर्थिक परस्परसंबंधाचे दुसरे उदाहरण म्हणजे गावाला नवीन कालव्याने पाणीपुरवठा करताना गावातील उपजाऊ जमिनीपैकी काही टक्के जमीन दीर्घकाळाच्या करारानुसार वंचित स्त्रियांच्या भाजीपाला उत्पादन गटांना देण्याचे बंधन घालण्यात येईल.

अशा नव्या आर्थिक परस्परसंबंधांना बळ देण्यासाठी, वंचितांच्या आर्थिक संस्थांना उपक्रम सुरू करण्यासाठी, सवलतीच्या पण परवडणाऱ्या दराने वित्तपुरवठा करण्यासाठी खास वित्तीय व्यवस्थाही उभी करावी लागेल.

| सध्याची आर्थिक व्यवस्था | पर्यायी आर्थिक व्यवस्था |
|---|---|
| **भौतिक आधार - मटेरियल बेस** | |
| - रासायनिक मानवनिर्मित पदार्थ<br>- मुख्यतः खनिजतेलजन्य, तसेच (खनिजजन्य) धातूजन्य | - जैवमाल (बायोमास) आधारित<br>- फायदे : अ) पुनर्निर्मितीक्षम<br>ब) स्थानिक पातळीवर उपलब्ध<br>क) अधिकार व ज्ञान<br>स्पष्टीकरण : बाकीचे स्रोत वापरणे बंद करणे नव्हे तर त्यांचा मर्यादित व नेमका वापर करणे. |

अनुक्रमणिका

| | |
|---|---|
| **ऊर्जा**<br>- मुख्यतः खनिज/अणु/धरणे<br>- समस्याः<br>१) पर्यावरणीय विध्वंस (स्थानिक व वैश्विक)<br>२) ताबा/मक्तेदारी थोड्यांकडे उपलब्धता<br>३) महाग किंमतीने | - सौर/पवन/जैवमाल/प्राणीज<br>- फायदे : १) पुनर्निर्मितीक्षम<br>२) कमी/शून्य प्रदूषण<br>३) सर्वांकडे ताबा / उपलब्धता<br>४) किंमत कमी<br>- समस्या -<br>१) चुकीच्या सबसिडी<br>२) पुरेसे संशोधन नाही<br>स्पष्टीकरण : रूढ + नव्या स्रोतांचा संयुक्त वापर |
| **शेती**<br>- रासायनिक/यांत्रिक<br>- निर्यातीसाठी पिके<br>- मोठ्या आकारांच्या जमिनींची गरज<br>- भांडवल सघन व व्यापारी शेती | - छोट्या आकाराचे जमीन तुकडे चालतात.<br>- श्रमसघन<br>- जैवमाल - उत्पादन व्यवस्था<br>अ) वैविध्य व उत्पादकता वाढ + दर्जा<br>ब) शाश्वत रीतीने |
| **उद्योग**<br>- केंद्रित/मोठे<br>- खनिज आधारित<br>- भांडवल सघन<br>- अत्याधुनिक-महानगरी अशा प्रकारच्या पायाभूत संरचनांची गरज | -विकेंद्रीत (विखुरलेले - स्थान, मालकी, कच्चामाल स्रोत, पक्का माल उपभोग विक्री या सर्व बाबतीत)<br>- जैवमाल आधारित (जैविक खते)<br>- श्रमसघन<br>- स्थानिक पायाभूत संरचना निर्माण करणारे<br>- प्राथमिक-उद्योग-प्रक्रियाकृत जैवमाल आधारित<br>- तिसऱ्या स्तरावरील उद्योगसेवा व्यवसाय (वरील दोन्हींसाठी + निर्मितीसाठी) |

| | |
|---|---|
| **पाणी**<br>- मोठी धरणे<br>- सिंचनाची मर्यादित क्षेत्रात उपलब्धता उद्दिष्ट<br>- नगदी पिकांसाठी वापर समान<br>- ज्याची जमीन जास्त त्याला पाणी जास्त<br>- विषमतेत भर | - स्थानिक व बाहेरील स्रोतांचा संयुक्त वापर<br>- सार्वत्रिक किमान पाणी सेवेचे<br>- उपजीविका सुरक्षिततेसाठी पाणी<br>- जैवमाल-निर्मितीसाठी पाणी प्राधान्याने<br>- सर्वांना समान पाणी (दरडोई आधारे) |
| **श्रम**<br>- भांडवलसघन अर्थव्यवस्था<br>- श्रम कमी करण्यावर भर त्यासाठी आधुनिक तंत्रज्ञानाचा वापर शहराकडे ओढ | - श्रमसघन अर्थव्यवस्था<br>- श्रमप्राधान्य तंत्रज्ञान<br>- जैवमाल-निर्मितीमध्ये व ग्रामीण भागात उद्योगधंद्यां-मध्ये मोठ्या प्रमाणात श्रमांचा वापर<br>- उर्वरित श्रमसघन शहरी उद्योगात |
| **अर्थव्यवस्थेचा आवाका**<br>- मोठा/शहरी अत्याधुनिक - औद्योगिक-महानगरी<br>- ग्रामीण विकासासाठी रूढ प्रकारांचे मोठे उद्योग<br><br>समस्या : ग्रामीण भागातील क्रयशक्तीचे हरण, ग्रामीण संसाधनांचे हरण | - स्थानिक/ग्रामीण, नैसर्गिक संसाधन केंद्री<br>- स्थानिक स्तरावर, ग्रामीण भागात क्रयशक्ती निर्मिती व पुनर्वहन<br>स्पष्टीकरण : स्थानिकचा अर्थ व्यापक व बदलता |
| **पायाभूत संरचना**<br>- औद्योगिक-महानगरी गरजांसाठी<br>- स्टील/सिमेंट व अवजड उद्योग यावर आधारित<br>- श्रम वापर अतिमर्यादित | - जैवमाल निर्मिती व जैवमाल आधारित उद्योग तसेच पुनर्निर्मितीक्षम ऊर्जा यांना आवश्यक ती संरचना<br>- जैवमालाचा मोठ्या प्रमाणात वापर<br>- श्रमसघन, विकेंद्रीत उद्योगातून |

| | |
|---|---|
| **तंत्रज्ञान** | |
| - उत्पादकता, विश्वासार्हता व दर्जा यावर एकांगी भर | - लोक/ग्राहक/कामगार/निसर्ग यांच्यावर परिणाम होऊ न देता, तरी उत्पादकता इ. मध्ये तडजोड न करता |
| - उच्च तंत्रज्ञान sophistication हे मूल्य<br>- भांडवल-सघनता<br>- निसर्ग/ग्राहक/कामगार यांवरचे परिणाम दुर्लक्षित | स्पष्टीकरण : स्वस्ताई, सुलभता व स्वावलंबन यांना महत्त्व पण एकांगी भर नाही |
| **संस्था-संबंध** | |
| केंद्रीभूत सरकारी संस्था - खाजगी कंपन्या (मोठ्या) | विविध पर्याय<br>१) समान आर्थिक हितसंबंध असणाऱ्या वंचितांच्या संस्था<br>२) सहकारी, कंपनी, असोसिएशन इ. प्रकारच्या रचना<br>- तत्त्वे :<br>१) निर्णयप्रक्रिया व कारभारावर काम करणाऱ्यांचे नियंत्रण<br>२) जुन्या परंपरागत संस्थांचा काळजीपूर्वक वापर<br>३) त्रिपक्षी आर्थिक संबंध (सरकार, खाजगी/बलिष्ठ घटक, वंचित/दुर्बल घटक यांच्यामध्ये) |

### ११) अनुरूप तंत्रज्ञानाचा विकास

स्थानिक जैवमाल वापरणारी अर्थव्यवस्था उभी करण्यासाठी लागणारे उद्योग उभारण्यासाठीचे तंत्रज्ञान हा एक कळीचा मुद्दा आहे. समतावादी, पर्यावरणस्नेही असे "अनुरूप विज्ञान व तंत्रज्ञान" निर्माण करायला हवे. मात्र संक्रमणाच्या काळात आधुनिक तंत्रविज्ञानाचा तारतम्याने वापर करीत "अनुरूप तंत्रज्ञानाकडे" (ॲप्रोप्रिएट टेक्नोलॉजी) वाटचाल सुरू करावी लागेल. हे सारे घडवून आणण्यासाठी समाजविघातक विज्ञान-तंत्रज्ञानाचा मात्र ठामपणे विरोध करायला हवा. आधुनिक तंत्रज्ञानाचे आर्थिक फायदे नाकारताना हे नाकारल्याने होणारे सामाजिक, सांस्कृतिक, पर्यावरणीय फायदे मांडावे लागतील.

तंत्रज्ञान 'अनुरूप' करताना त्यामध्ये सुलभता, स्वस्ताई, स्वावलंबन आणण्याच्या प्रयत्नात तंत्रज्ञानाच्या कार्यक्षमतेसारख्या इतर आवश्यक गुणांकडे दुर्लक्ष झाल्यास त्यांचा लोकांकडून स्वीकार व समाजामध्ये प्रसार होण्यात अडचणी येतात. त्यामुळे कार्यक्षमता, उत्पादनक्षमता, उत्पादनांची विश्वासार्हता याबाबत तडजोड न करता स्थानिक जैवमाल, स्थानिक ऊर्जासाधने व स्थानिक मजूर, कारागीर यांचा वापर करणारे अनुरूप तंत्रज्ञान निर्माण करावे लागेल. हे एक मोठे आव्हान आहे. जागतिकीकरण व खाजगीकरणाच्या आजच्या युगात शहरी-औद्योगिक व्यवस्थेतून असे वंचितांच्या गरजांना व पर्यायी विकासाला अनुरूप तंत्रज्ञान निर्माण करणारे नाही हे लक्षात घेतल्यास असे तंत्रज्ञान निर्माण करण्यासाठी खास धोरणात्मक उपाय करावे लागतील हे स्पष्ट होते.

### रचना व कृतीकार्यक्रम पर्यायी आर्थिक व्यवस्थेची रचना

वरील सूत्रांच्या आधारे पर्यायी आर्थिक व्यवस्थेची चना करताना त्या रचनेची वेगवेगळी आरेखने (डिझाईन) असू ाकतील. त्या सूत्रांतील साऱ्या मुद्यांची स्पष्टता व्हावी म्हणून तक्ता क्र. १ मध्ये सध्याच्या व पर्यायी आर्थिक व्यवस्थेची थोडक्यात तुलना केली आहे.

त्याचप्रमाणे पर्यायी आर्थिक व्यवस्थेची उभारणी करताना वरील मार्गदर्शक सूत्रांची एकत्रित मांडणी कशी करावी लागेल याची थोडीफार कल्पना आकृती क्र. १ मध्ये येऊ शकेल. ती आकृती पाहण्यास आपण उजव्या बाजूने सुरुवात केली तर असे दिसेल की, वैविध्यपूर्ण जैवमालाची मोठ्या प्रमाणात निर्मिती करणे हा ह्या उभारणीतला पहिला टप्पा राहील. समान पाणीवाटप, स्थानिक नैसर्गिक संसाधनांवर वंचितांना हक्क, नैसर्गिक संसाधनांच्या प्राथमिक उत्पादकतेमध्ये वाढ, पुनर्निर्मितीक्षम स्थानिक ऊर्जास्रोतांचा विकास व श्रमसघन व अनुरूप तंत्रज्ञानाची निर्मिती या साऱ्या सूत्रांच्या अवलंबनातूनच हे पहिल्या टप्प्याचे उद्दिष्ट साध्य होईल.

पर्यायी विकासाच्या उभारणीतल्या या पहिल्या टप्प्याच्या उद्दिष्टाच्या पूर्तीनंतर "जैवमालआधारित स्थानिक उद्योगांची मोठ्या प्रमाणात वाढ" ह्या दुसऱ्या टप्प्याच्या उद्दिष्टांकडे जाता येईल. त्यासाठी श्रमसघन व अनुरूप तंत्रज्ञानाबरोबरीने वंचितांच्या नव्या आर्थिक संस्था, नवे आर्थिक परस्परसंबंध, वंचितांसाठीच्या नव्या वित्तीय रचना यांचीही गरज भासेल.

जैवमाल निर्मिती उद्योग व जैवमाल आधारित स्थानिक उद्योग या दोन घटकांमुळे उभारणीच्या तिसऱ्या टप्प्यात स्थानिक पायाभूत संरचनाची निर्मिती होईल व त्यातून स्थानिक







अर्थव्यवस्थेला प्राधान्य व मजबुती मिळेल व त्यातून समतावादी व पर्यावरण स्नेही अशा पर्यायी विकासाकडे वाटचाल सुरू होईल.

**पर्यायी विकासासाठीचा कृती कार्यक्रम**

वंचितांच्या संस्था व वंचिताभिमुख पर्यायी विकासाच्या उद्दिष्टांप्रती सहानुभूती असणाऱ्या संस्था, संघटना व व्यक्तींना सध्याच्या परिस्थितीतून संक्रमणाच्या पहिल्या टप्प्यातील उद्दिष्टपूर्तीकडे कसे जाता येईल हा महत्त्वाचा प्रश्न आहे. यासाठी पुढील व्यापक व चक्रीय अशी कृतीकार्यक्रमाची कल्पना मांडली आहे. मुळात सद्यःस्थितीतून संक्रमणाच्या पहिल्या टप्प्याकडचा प्रवास हा देखील एका उडीत होणार नाही. त्यातही छोट्याछोट्या पायऱ्यांनी हा प्रवास करावा लागेल. आकृती २ मध्ये एका पायरीवरून त्यापेक्षा सुधारलेल्या स्थितीच्या पर्यायी विकासाच्या प्रतिमानाचा संकल्पनात्मक गाभा व व्यूहनीती कशी असावी याची (लेखाच्या मर्यादेमध्ये शक्य त्या विस्ताराने) चर्चा करण्याचा प्रयत्न केला आहे. ही सारी चर्चा मुख्यतः आर्थिक (त्यातही उत्पादनाच्या) भागावर केंद्रीत आहे. पर्यायी विकासाची संस्थात्मक, राजकीय, सामाजिक, सांस्कृतिक अशी विविध अंगे आहेत. त्यांची चर्चा या लेखामध्ये जागेअभावी केलेली नाही.

पर्यायी विकासावरील ही काहीशी विस्तृत मांडणी वाचकांना उपयुक्त वाटेल अशी आशा आहे. विचारवेध संमेलन २००४ (बार्शी) च्या निमित्ताने प्रयासतर्फे प्रकाशित केल्या गेलेल्या विशेष पुस्तिकेत ह्या विषयाची खोलवर व तपशीलवार मांडणी उपलब्ध आहे. जिज्ञासूंनी प्रयासशी संपर्क साधल्यास त्यांना ही पुस्तिका पाठवता येईल.

विचारवेध संमेलनात या विषयावर झालेल्या मांडणीतून पर्यायी विकासाची चर्चा महाराष्ट्रात ठिकठिकाणी सुरू व्हावी अशी अपेक्षा आहे. पर्यायी विकासाचा आधार असल्याशिवाय सामाजिक वा राजकीय परिवर्तनाची कोणतीही प्रक्रिया जोर धरू शकणार नाही. त्यादृष्टीने पाहता सर्वच परिवर्तनवादी कार्यकर्त्यांना ह्या विषयाकडे लक्ष देण्याची विनंती करावी असे वाटते.

(विचारवेधच्या सौजन्याने.)

❖ ❖ ❖

**आकृती क्र. १**






'प्रयास' (संशोधने व उपजीविका गट) प्रस्तुत

# पर्यायी विकासाचे राजकारण व कृति-कार्यक्रम

व्यूहनीतीच्या आधारे पर्यायी विकासाचे प्रकल्प, योजना, कार्यक्रम तयार करता येतील. पर्यायी विकास प्रतिमान या प्रकल्प व योजनांच्या माध्यमातून प्रत्यक्षात येईल. मात्र पर्यायी विकास प्रत्यक्ष व्यवहारात आणताना सर्वात महत्त्वाचा संदर्भ असेल राजकारणाचा. या महत्त्वाच्या संदर्भाचा विचार आपण अत्यंत थोडक्यात करणार आहोत.

ह्या प्रकरणाच्या पहिल्या भागात पर्यायी विकासाच्या राजकारणात महत्त्वाचे स्थान असणाऱ्या राज्यसंस्थेच्या (द स्टेट) भूमिकेची चर्चा केली आहे. दुसऱ्या भागात विकासाला अभिप्रेत असणारे परिवर्तन घडवण्याची प्रक्रिया कोणती असेल? त्यात आघाडीची किंवा प्रवर्तकाची भूमिका कोणता समाजघटक निभावू शकेल? ह्याबद्दल थोडक्यात विवेचन केले आहे.

ह्या परिवर्तनामध्ये विविध परिवर्तनवादी चळवळी व जनसंघटना ह्यांचा वाटा मोठा असणार आहे. पर्यायी विकासामध्ये अभिप्रेत असणारे परिवर्तन घडवून आणण्यासाठी त्यांच्या कामाची दिशा कोणती असावी ह्याचे विवेचन तिसऱ्या भागात केले आहे. प्रकरणाच्या शेवटच्या भागात परिवर्तनवादी चळवळीतील कार्यकर्त्यांनी व संघटनांनी प्रत्यक्षात कोणते उपक्रम करावेत, यासाठीच्या कृतिकार्यक्रमाच्या (ॲक्शन प्लॅन) पायऱ्या कोणत्या असाव्यात, याची मांडणी केली आहे. ह्या प्रकरणातील विवेचनालादेखील कार्यकर्ते व अभ्यासकांच्या मुलाखतींचा मुख्य आधार आहे.

### भाग १ : राज्यसंस्थेची बदलती भूमिका

पर्यायी विकासाच्या व्यूहनीतीबाबत विचार करताना राज्यसंस्थेची भूमिका महत्त्वाची ठरेल. काही अभ्यासक आणि कार्यकर्त्यांच्या मते त्यासाठी राज्यसंस्थेचे वर्गीय स्वरूप समजावून घेण्याची गरज आहे. राज्यसंस्थेचे स्वरूप एकजिनसी नसते. त्यात अनेक अंतर्विरोध असतात. पर्यायी विकासाच्या यशस्वितेसाठी ते अंतर्विरोध समजून घेऊन त्यामधील अवकाश शोधण्याची गरज आहे.

राज्यसंस्थेची कल्याणकारी भूमिका कमी कमी होत जाते आहे. ह्या कल्याणकारी भूमिकेमुळे वंचित वर्गाला मोठा दिलासा मिळत असे. (उदा. दुर्बल घटकांसाठी विविध प्रकारच्या सवलती देणे. आरोग्य, शिक्षण यामध्ये सवलत, स्वस्त धान्य योजना, इ.) आता त्याला मोठा धक्का बसून 'ज्याला जे परवडते त्याने ते विकत घ्यावे' अशी भूमिका राज्यसंस्थेला घ्यावी लागेल अशी मांडणी व व्यवहार केला जात आहे. 'सर्वांना सर्व सुविधा पुरविणे' ही आपली जबाबदारी नसल्याचे सूचित करायला सरकारने सुरुवात केली आहे. असे म्हटले जाते की, राज्यसंस्था जेव्हा आपला तथाकथित कल्याणकारी कार्यक्रम राबवित होती, तेव्हाही त्यातील अनेक विसंगती आणि त्यात शिरलेल्या विकृती यामुळे दुर्बल घटकांना त्याचा खऱ्या अर्थाने लाभ होतच नव्हता. पण निदान राज्यसंस्थेची अधिकृत भूमिका तरी कल्याणकारी असल्याने चळवळी, जनसंघटना आणि पर्यायाने लोक यांच्या हाती राज्यसंस्थेला जाब विचारण्यासाठी, मागण्या करण्यासाठी एक साधन होते. आता राज्यसंस्थेने आपला कल्याणकारी मुखवटा उतरवून ठेवला आणि दुर्बल समाजघटकांप्रती असणारी बांधिलकी उघडपणे नाकारली तर हे साधनही चळवळींच्या हाती राहणार नाही. अशा परिस्थितीत राज्यसंस्थेची दमनकारी भूमिका नाकारायची मात्र कल्याणकारी क्षेत्रात राज्यसंस्थेच्या हस्तक्षेपाची भूमिका पुढे रेटण्यासाठी प्रयत्न करायचा अशी भूमिका चळवळींना घ्यावी लागेल.

कल्याणकारी क्षेत्रातील राज्यसंस्थेच्या भूमिकेपेक्षाही कारभाराच्या क्षेत्रातील (governance) तिच्या भूमिकेत पडत असलेला फरक अधिक चिंताग्रस्त करणारा आहे असे म्हणता येईल. या भूमिकेच्या माध्यमातून राज्यसंस्था देशातील सर्वसाधारण आर्थिक व विशेषतः शेती, उद्योग, व्यापार ह्या महत्त्वाच्या क्षेत्रांवर नियंत्रण ठेवत असे किंवा त्याचे नियमन करत असे. राज्यसंस्थेच्या या क्षेत्रावर दबाव टाकणे अनेकदा शक्य होत असे. उजाखा धोरणे राबवण्यास सुरुवात झाल्यानंतर विश्व बँक, आंतरराष्ट्रीय नाणेनिधी या संस्थांच्या

अनुक्रमणिका






दबावामुळे देशाच्या कारभारप्रक्रियेत बाह्य हस्तक्षेप होण्यास सुरुवात झाली आहे. त्याचप्रमाणे राज्यसंस्थेच्या कारभार-विषयक भूमिकेवर गदा येण्यास सुरुवात झाली आहे. त्यासाठी कारभारातील (विशेषतः आर्थिक क्षेत्रातील) राज्यसंस्थेच्या आजवरच्या अपयशाचा दाखला दिला जातो. विविध क्षेत्रांमध्ये नियमन करणाऱ्या वेगळ्या, स्वायत्त संस्था स्थापल्या जाणे हा या प्रक्रियेचा एक भाग मानता येईल.

राज्यसंस्था व तिच्या मालकीच्या आर्थिक संस्थांच्या अपयशावर सुचविण्यात येणाऱ्या दोन उपायांचे विवेचन याआधी केले आहे. त्यानुसार राज्यसंस्थेच्या कारभाराच्या प्रक्रियेत एका बाजूने माहिती-संवाद-तंत्रज्ञान याचा वापर आणि दुसऱ्या बाजूने पारदर्शकता-उत्तरदायित्व आणि लोकसहभाग यांचा वापर केला तर राज्यसंस्था कार्यक्षम बनण्याबरोबरच हितसंबंधी गटांच्या त्यावरील प्रभावाला आव्हान देणे शक्य होईल अशीही मांडणी केली जाते.

### भाग २ : परिवर्तनाची प्रक्रिया आणि प्रवर्तक

पर्यायी विकासाच्या आर्थिक, सामाजिक-सांस्कृतिक मांडणीचे मोठ्या प्रमाणावर राजकीयीकरण झाल्याशिवाय या दिशेने बदलाची प्रक्रिया सुरू होणार नाही. कोणत्याही प्रकारच्या बदलासाठी प्रस्थापित सत्ता संबंधात बदल घडवणे आवश्यक असते. लोकशाही समाजव्यवस्थेत अशा प्रकारच्या हस्तक्षेपासाठी लोकांची ताकद त्या बदलामागे उभे राहणे गरजेचे असते. या दृष्टीने पर्यायी विकास घडविण्यासाठीच्या राजकारणाचा विचार करताना त्या बदलाची प्रक्रिया कशी असेल? त्यामध्ये प्रमुख भूमिका बजावू शकतील असे समाजघटक कोणते? जनसंघटना, विविध राजकीय पक्ष यांची भूमिका कोणती? या सर्व प्रश्नांचा विचार करणे आवश्यक ठरते. जागतिकीकरणामुळे तर या सर्वच प्रश्नांचे स्वरूप पूर्वीपेक्षा जास्त गुंतागुंतीचे झाले आहे.

### परिवर्तनाची प्रक्रिया

या सर्व पार्श्वभूमीवर ह्या परिवर्तनाची प्रक्रिया नेमकी कशी असेल किंवा असावी याविषयी अनेकदा मांडणी केली जाते. कार्यकर्ते आणि अभ्यासक यांच्या मते, केवळ वंचितांमध्ये नव्हे तर सर्वसामान्य लोकांमध्येही आज अपेक्षाभंगाची भावना मोठ्या प्रमाणावर दिसून येते. त्यामुळे त्यांच्यामध्ये विविध प्रश्नांवर सक्रीय होण्याची इच्छा दिसून येत नाही. 'आहे ते बदलता येणार नाही' ही वंचितांमधील पराभूत मनोवृत्ती बदलून त्याऐवजी 'या व्यवस्थेत आम्हाला सुख मिळण्याची शक्यता नाही, त्याकरता नवीन समाजच हवा' ही जाणीव निर्माण करण्याची आज गरज आहे. मात्र गरिबी व अवलंबित्वाच्या दुष्ट चक्रामधून वंचितांची सुटका करावयाची असेल तर विकासपर्यायाकडे वळावे लागेल. पर्यायी विकासाची आर्थिक मांडणी वंचितापर्यंत पोचवायची असेल तर त्याचे रूपांतर वंचितांना आपल्या वाटतील अशा ठोस मागण्यांत करता आले तर या दृष्टीने पाऊल पुढे पडेल. यासाठी संघटना, आंदोलन, संघर्ष, प्रबोधन अशा विविध मार्गांनी या प्रश्नाला भिडणे आवश्यक आहे.

या प्रक्रियेची सुरुवात करण्यासाठी विकासाच्या पर्यायावर देशभरात मोठ्या प्रमाणावर संवाद सुरू होणे आवश्यक आहे. लोक, कार्यकर्ते, अभ्यासक या सर्वांना त्यात सामील करून घेऊन चर्चा, विश्लेषण याद्वारे या विषयावर सखोल विचार-विनिमयाची प्रक्रिया घडवण्याची गरज आहे.

### परिवर्तनाचे प्रवर्तक कोण?

बदलाच्या या प्रक्रियेत जे समाजघटक (उदा. औद्योगिक कामगार व त्यांच्या संघटना) आघाडीवर असतील असे पूर्वी गृहीत धरले जात असे ते घटक ती क्षमता आता हरवून बसले आहेत. बदलत्या परिस्थितीमुळे वंचित समाजातील अर्धशिक्षित बेकारांचा वर्ग हा आज समाजातील सर्वात मोठा वर्ग बनला आहे. असे म्हटले जाते की दलित, ओबीसी, आदिवासी संघटनांचे नेतृत्व त्या त्या समाजातील नोकरदार अभिजन वर्गाकडे गेले असून त्यांना खऱ्याखुऱ्या आर्थिक व सामाजिक परिवर्तनात फारसा रस नाही. मात्र उरलेल्या वंचित जनतेत प्रचंड अस्वस्थता असून तेथे मूलभूत बदल घडवू इच्छिणाऱ्या समतावादी राजकीय हस्तक्षेपाची गरज आहे. बदलाच्या या प्रक्रियेत स्त्रिया, दलित, आदिवासी, तरुण यांनी एकत्र येऊन त्यांच्या हाती त्या प्रक्रियेला पुढाकार येण्याची गरज आहे असेही मत काही कार्यकर्ते मांडतात.

परिवर्तनाचा विचार करताना सर्वच राजकीय पक्षांबाबत आज निराशाजनक परिस्थिती आहे. यामध्ये पुरोगामी पक्षांचाही अपवाद करण्यासारखी परिस्थिती नाही असे मतही मांडले जाते. प्रस्थापित चौकटीतील कोणतेही पक्ष पर्यायी विकासाचे राजकारण करण्यात भाग घेणार नाहीत. पुरोगामी पक्षांचेदेखील प्रस्थापित व्यवस्थेत हितसंबंध तयार

झाले असून राजकीय सत्तेत वाटा मिळवणे ही सर्वच राजकीय पक्षांची प्राथमिकता बनली आहे असे अनेक कार्यकर्ते व अभ्यासकांना वाटते.

जोपर्यंत लोकांची मोठी चळवळ विकासाच्या पर्यायी मांडणीमागे उभी राहत नाही तोपर्यंत हे प्रस्थापित राजकीय पक्ष त्याकडे लक्ष देणार नाहीत. त्यामुळे आज राजकारणाची पुनर्घडण करणे आवश्यक बनले असून त्यासाठी नवीन प्रकारच्या राजकीय पक्षांची बांधणी गरजेची आहे असा विचार काही जणांकडून मांडला जातो.

**भाग ३ : जनसंघटना व चळवळी : पुढील दिशा**

ज्या जनसंघटना व चळवळी आज लोकांचे विविध प्रश्न घेऊन लढत आहेत त्यांचे संघर्ष अधिक परिणामकारक होण्यासाठी त्यांनी आपली उद्दिष्टे, कार्यक्रम यांचा आढावा घेऊन नवीन परिस्थितीनुसार व्यूहनीतीत बदल घडविणे आवश्यक आहे असा विचार अनेक अभ्यासक-कार्यकर्ते यांनी मांडला. या चळवळी व जनसंघटनेबाबतचे त्यांनी उपस्थित केलेले काही पेच/अडचणी/प्रश्न/सूचना पुढीलप्रमाणे मांडता येतील.

- अनेकदा जनसंघटनांच्या बाबतीत लोकांचे रोजच्या जगण्याचे प्रश्न हे व्यापक राजकीय विचार पुढे नेण्याचे साधन न बनता तं सुटं सुटं प्रश्न सोडवणे हेच त्यांचे अंतिम उद्दिष्ट बनते. त्यामुळे त्या प्रश्नांचे, मुद्द्यांचे राजकीयीकरण होत नाही. सत्तेची विविध पातळ्यांवरील गुंतागुंत जनसंघटनांच्या समोर फारशा स्पष्टपणे येत नाही. परिणामी, सत्तेची गुंतागुंत पुढे लोकांपर्यंत पोहचवणे देखील अवघड बनते.

- विकासाचे प्रश्न हे प्रस्थापित राजकीय पक्षांनी गाभ्याचे मुद्दे बनवावेत याकरता जनसंघटनांनी केलेल्या प्रयत्नांना अपयश आले आहे असे म्हटले जाते. त्याच्या कारणांचा शोध घेता असे दिसते की, सध्याच्या काळात प्रश्नांचा वेग, तीव्रता, आवेग प्रचंड मोठा आहे. प्रश्न समजावून घेऊन, त्यांचे विश्लेषण करून रणनीती आखणे हे काम अवघड बनले आहे. जनसंघटनांमध्ये माणसे कमी आणि प्रश्नांची गुंतागुंत खूप अशी परिस्थिती आहे.

- सामाजिक समता, आर्थिक शोषण, स्त्री-पुरुष समानता, वैज्ञानिक दृष्टिकोन हे सर्व प्रश्न चळवळी एकसंधपणे पाहतात. मात्र समाजासाठी या प्रश्नांचे स्वरूप तसे नसते. समाज एकेक प्रश्न स्वतंत्र पाहून त्यावर वेगवेगळी भूमिका घेतो. हा पेच कसा सोडवायचा हा चळवळीपुढील महत्त्वाचा प्रश्न आहे. तसेच लोकांच्या तात्कालिक व दीर्घ पल्ल्याच्या जाणीवांमध्येही परस्परविरोध असतो. त्यावरही चळवळींनी काम करण्याची गरज आहे.

- चळवळींची अंतिम उद्दिष्टे स्पष्ट असावीत. चळवळीच्या ताबडतोबीच्या मागण्यांमध्येसुद्धा स्वप्नाशी जोडलेला धागा असावा. म्हणजेच आज चळवळी जे आंशिक बदल मागतात त्यांचा अंतिम व्यवस्थेच्या मांडणीशी संबंध असावा.

- परिवर्तनवादी चळवळींनी व्यवस्थेला केवळ नकार न देता लगेच उपलब्ध असणारा, पटेल असा पर्याय सांगितला पाहिजे. जीवनमान उंचावण्यासाठी जे पर्याय उपलब्ध असतील ते लोकांपर्यंत पोचले पाहिजेत.

- प्रस्थापित पक्षांच्या बाहेर ज्या संघटना वा संस्था 'प्रयोग' करतात त्यांनी उपस्थित केलेले प्रश्न व त्यांच्या प्रयोगाचा भूगोल यांचे नाते व्यस्त असते. ते नैसर्गिक संसाधनांवरील अधिकार व त्यांचे पुनर्वाटप यासारखे व्यापक प्रश्न उपस्थित करतात. पण त्यांच्या प्रयोगाचे क्षेत्र व प्रभावक्षेत्र मात्र फारच मर्यादित असते. मात्र, हे प्रश्न सध्याच्या चौकटीत सुटणार नाही यासाठी व्यवस्थेत बदल घडवून आणला पाहिजे, अशी स्पष्ट भूमिका या संघटनांकडून घेतली जात नाही त्यामुळे अशा प्रयोगांची बेटे तयार होतात. केवळ या बेटांचे राजकीयीकरण करण्याने प्रश्न फारसे सुटत नाहीत. याउलट, व्यवस्थाबदलाची भूमिका घेऊन काही गट जेव्हा असे प्रयोग करतात (उदा. काही अतिडावेगट) तेव्हा व्यवस्था त्यांना चिरडून टाकते. थोडक्यात, संपूर्ण व्यवस्था बदलण्याची भूमिका घेतली तर व्यवस्था चिरडून टाकते. व्यवस्थेत राहून प्रयोग केले तर त्यांची बेटे बनतात. हा पेच कसा सोडवायचा हा मोठा प्रश्न आहे.

- पर्यायी समाजाची अंशतः झलक दाखवणारे प्रयोग होणे आवश्यक आहे. प्रयोग आणि चळवळ यांचा अन्योन्य संबंध असायला हवा. याकरता अभ्यास आणि विश्लेषणाचे पाठबळ चळवळींना असायला हवे. प्रयोगातून पुढे येणाऱ्या निष्कर्षांचे हत्यार बनवून त्यामागे जनमत संघटित करून व्यापक बदलाच्या मागणीसाठी चळवळ करणे आवश्यक आहे. या चळवळीतून व्यवस्थेच्या पोटात परिवर्तनासाठी अवकाश निर्माण करणे; या अवकाशाचा आधार घेऊन काही बदल घडवणे, त्या बदलाच्या आधारे पुढच्या टप्प्याची चळवळ सुरू

करणे, असे चक्र सुरू करण्याची गरज आज आहे. चळवळीतून बदल घडतानाच पुढील पातळीवरील अभ्यास व प्रयोग सुरू करायला हवेत अशी मांडणी अनेक कार्यकर्ते करतात.

- परिवर्तनवादी चळवळींनी एकमेकांशी नाते जोडून घेऊन, एकमेकांच्या कामाला बळकटी आणण्याची गरज आहे. एकत्र येण्यासाठी 'आपल्या स्वतंत्र चळवळीला धक्का लागता कामा नये' ही काही चळवळींमधील 'मालकीहक्का' ची भावना संपविण्याची गरज आहे.

- परिवर्तनवादी चळवळींनी आपली स्वायत्तता राखून समग्रतेकडे जाणे आवश्यक आहे. चळवळींनी प्रस्थापित पक्षाचा भाग न बनता स्वायत्त-चळवळ म्हणून उभे असणे आवश्यक आहे.

- चळवळींनी मध्यमवर्गाला बाजूला ठेवून राजकारण करू नये. कारण लोकांच्या जाणींवा घडवण्यात या वर्गाची मोठी भूमिका असते. मध्यमवर्गाशी संवाद करून त्यांना भूमिका घ्यायला चळवळींनी भाग पाडायला हवे.

थोडक्यात सांगायचे तर, विकासाचे पर्याय उभे करण्यासाठी जे राजकीय बळ लागेल त्यासाठी मुख्यतः दोन पर्याय सुचवले जातात. एकतर, रूढ विकासाचे किंवा रूढ व्यवस्थेला पर्याय अंमलात आणण्याचा क्रांतीकारक कार्यक्रम घेणारे राजकीय पक्ष तयार करणे. दुसरा मार्ग म्हणजे विविध प्रश्नांवर लढणाऱ्या जनसंघटना व चळवळींचे नवजागरण करून त्यांना जोमदार बनवणे. त्यासाठी पर्यायी विकासाचा व व्यापक व्यवस्था-बदलाचा नवा समायिक कार्यक्रम बनवणे व सर्वांनी त्याच्याशी बांधिलकी मानून एकत्रितपणे प्रयत्न करणे.

### भाग ४ : कृतिकार्यक्रमाच्या पायऱ्या

विकास पर्यायासंबंधित ह्या राजकारणाच्या पार्श्वभूमीवर पुढचा प्रश्न असा उभा राहतो की, परिवर्तनवादी चळवळींनी सद्य परिस्थितीमध्ये नेमके काय करावे? या प्रश्नावर चळवळीशी जोडलेल्या अभ्यासक व कार्यकर्त्यांशी आम्ही मुलाखतीद्वारे विचारविनिमय केला होता. चळवळींनी विकासपर्यायाच्या दिशेने वाटचाल करण्यासाठी नेमका कोणत्या प्रकारचा कृतिकार्यक्रम (ॲक्शन प्लॅन) घ्यावा याबद्दल अनेक अभ्यासक व कार्यकर्त्यांमध्ये बऱ्यापैकी सहमती आढळली. ह्या सहमतीच्या सर्वसाधारण कृतीकार्यक्रमाचा आराखडा पुढीलप्रमाणे दिसतो.

- पर्यायातील विविध प्रकारच्या प्रयोगांमधून पर्यायांचे प्रत्यक्षदर्शन (डेमॉन्स्ट्रेशन) घडवावे लागेल व त्यात वंचित घटकांचा मोठा सहभाग असेल यासाठी खास प्रयत्न करावे लागतील.

- त्या प्रयोगांच्या निष्कर्षाच्या आधारावर चळवळी उभ्या कराव्या लागतील. त्यांचे उद्दिष्ट प्रयोगातील निष्कर्षानुसार व्यवस्थेमध्ये बदल करणे हे असेल. त्यासाठी प्रयोगातून आलेल्या निष्कर्षानुसार सरकारी विकास योजना व विकास कार्यक्रमात बदल घडवण्याच्या मागण्या हाती घेता येतील.

- या प्रयोगांना व चळवळींना समतावादी तज्ज्ञ व अभ्यासकांकडून बौद्धिक व माहिती विश्लेषणाचे पाठबळ मिळावे.

- हे प्रयोग व चळवळी विविध पातळ्यांवरील विविध प्रकारच्या पर्यायांच्या बाबतीत केल्या जाव्यात. यात आर्थिक, सामाजिक, तांत्रिक, राजकीय, संस्थात्मक, सांस्कृतिक पर्यायांचा विचार करावा.

- या चळवळींच्या यशस्वीतेनंतर त्या सर्व अनुभवांतून शिकून पुढच्या टप्प्याच्या प्रयोगांना सुरवात केली जावी.

- प्रयोग-अभ्यास-चळवळी यांच्या अशा अनेक आवर्तनांतून प्रयोग व चळवळ यांचा आवाका, व्यापकता, तसेच त्यांची खोली/उंचीही वाढवता येईल.

- या अशा अनेक आवर्तनांतून पर्यायी व्यवस्थेसाठीच्या व्यापक व मोठ्या चळवळीसाठी जनसंघटनांची व लोकांची वैचारिक, आर्थिक व राजकीय तयारी होईल व पर्यायी व्यवस्थेचे उद्दिष्ट आणखी जवळ येईल.

अशा कृतिकार्यक्रमाबाबत इतरही काही महत्त्वाच्या सूचना आल्या होत्या. प्रथम म्हणजे पहिल्या टप्प्यात जे प्रयोग व संघर्ष करायचे ते ठोस व नेमक्या मुद्द्यावर असावेत, अमूर्त मुद्द्यावर असू नयेत. मात्र, त्याचवेळी त्यांचा जैव व घट्ट संबंध ह्या पर्यायी विकासाच्या उद्दिष्टांशी असावा. दुसरे म्हणजे सुरुवातीचे प्रयोग व संघर्ष असे असावेत की, त्यातून नजीकच्या भविष्यात काही यश मिळवता येईल. अशा झटपट यशातून कृतिकार्यक्रमाला वंचित घटकांकडून व्यापक व भरीव पाठिंबा मिळू शकेल.

कार्यकर्ते व अभ्यासक यांच्या मांडणीतून असे प्रयोग व चळवळी कराव्यात याबाबत अनेक सूचना पुढे आल्या. त्यातील काही महत्त्वाच्या सूचना येथे दिल्या आहेत.

१. स्थानिक स्वस्त धान्य दुकानांमध्ये स्थानिक







अनुक्रमणिका

परिसरातील धान्य ठेवले जावे यासाठी चळवळ. त्याला पाठबळ मिळण्यासाठी सामूहिक धान्यबँकेचे प्रयोग.

२. तालुका स्तरावर पायाभूत सुविधा निर्माण करण्यासाठी चळवळ उभी करणे.

३. असंघटित कामगारांच्या चळवळींचा रोख मालकाविरुद्ध न ठेवता शासनाच्या कामगारविरोधी धोरणाविरुद्ध तीव्र करणे.

४. समान पाणी वाटपाची चळवळ सर्वत्र उभारण्याची गरज.

या यादीमध्ये अर्थातच परिस्थितीनुसार बदल करावे लागतील. येथे ह्या सूचनांचा उल्लेख फक्त झलक दाखवण्यापुरताच केला आहे.

### वाचकांशी संवाद

ह्या दस्तावेजाच्या सुरुवातीला 'भूमिके'मध्ये म्हटल्या-प्रमाणे परिवर्तनवादी चळवळींशी संबंधित कार्यकर्ते व अभ्यासकांना पर्यायी विकासावरील चर्चेचा परिचय घडवणे हा या दस्तावेजाचा मुख्य उद्देश आहे. त्यायोगे परिवर्तनवादी अभ्यासक व कार्यकर्ते पर्यायी विकासाच्या चर्चेकडे सजगपणे व गंभीरपणे पाहू लागतील, त्या चर्चेत प्रत्यक्ष भाग घेऊ लागतील. त्यातूनच या समाजातील, या मातीतील पर्यायी विकासाचे चर्चाविश्व आकाराला येईल अशी अपेक्षा आहे. ह्या चर्चाविश्वातून परिवर्तनाचा एक व्यापक व सामायिक कार्यक्रम विकसित करून त्यासाठी सर्वजण एकदिलाने काम करू लागतील अशी त्यामागची कल्पना आहे.

अर्थात हा दस्तावेज म्हणजे या विषयाचा अंतिम शब्द अशी भावना अजिबात नाही. उलट ह्या विषयावरील व्यापक चर्चा सुरू करण्यासाठी हा दस्तावेज एक प्राथमिक मसुदा म्हणून वापरला जावा अशीच भूमिका यामागे आहे. अशा चर्चेसाठी आवश्यक ते जास्तीतजास्त मुद्दे या दस्तावेजात मांडण्याचा प्रयत्न केला आहे. अर्थात ह्या मांडणी व विवेचनातून अनेक नवे प्रश्न व मुद्दे उभे राहतील आणि ही चर्चा आणखीनच सखोल होईल अशी अपेक्षा आहे. तेच ह्या दस्तावेजाचे खरे यश ठरेल. ह्या दस्तावेजाचा वापर परिवर्तनवादी कार्यकर्ते व अभ्यासक ह्यांना वेगवेगळ्या प्रकारे करता येईल असे वाटते.

- ह्या दस्तावेजामध्ये मांडलेल्या विविध मुद्द्यांवरील आपापल्या भूमिका अधिकाधिक स्पष्ट करत नेता येतील.

- त्या मुद्द्यांबाबत आपण ज्या वंचित गटाबरोबर काम करतो त्यांच्याशी चर्चा करून त्यांच्या दृष्टिकोनातून विविध मुद्द्यांची पुनर्मांडणी करता येईल.

- या दस्तावेजातील व्यूहनीतीचा व राजकारणाचा आपापल्या संदर्भात विचार करून त्यानुसार त्यांची पुनर्मांडणी करता येईल.

- व्यूहनीती व राजकारणाबाबतच्या पुनर्मांडणीतून आपल्या संदर्भात कोणता कृतिकार्यक्रम हाती घेता येईल त्याचे नियोजन व अंमलबजावणी करता येईल.

परिवर्तनाच्या दिशेने करावयाच्या वाटचालीमध्ये या दस्तावेजामध्ये नेमके योगदान काय असेल? या प्रश्नांचे उत्तर द्यायचे तर परिवर्तनाच्या मार्गाविषयी आपली कल्पना स्पष्ट करावी लागेल. पर्यायी आर्थिक व्यवस्थेच्या विविध अंगांबाबत प्रयोग करणे; त्या प्रयोगातील निष्कर्षांच्या आधारे प्रस्थापित व्यवस्थेत बदल करण्यासाठी चळवळी करणे; त्यासाठी आवश्यक ते लोकप्रबोधन व लोकसंवाद करणे; त्यातून पर्यायी व्यवस्थेसंबंधीची पुढच्या टप्प्यावरील स्पष्टता मिळवणे; ह्या स्पष्टतेनुसार पुढील टप्प्यावरील प्रयोग, त्यातून पुढील टप्प्यावरील चळवळी ही आवर्तने हा सद्यःपरिस्थितीतला परिवर्तनाचा मार्ग असावा असे म्हणता येईल. ह्या मार्गावरील वाटचालीमध्ये पर्यायी विकासावरील आर्थिक अंगाच्या चर्चेला आशयात्मक आधार देण्यासाठी या दस्तावेजाचे थोडेफार योगदान होईल अशी आशा वाटते.

ह्या दस्तावेजातील विवेचनावर चर्चा करून त्यात आणखी सुधारणा करण्याचा आमचा प्रयत्न आम्ही चालू ठेवणार आहोत. त्या दृष्टीने या विवेचनावरील आपल्या प्रतिक्रिया, सूचना, आपले प्रश्न आमच्याकडे आपण लिहून पाठवल्यास आम्ही आपले ऋणी राहू. याबाबतीत आपल्या संस्था-संघटनेमध्ये अथवा बाहेर चर्चा, परिसंवाद ह्यासारखे कार्यक्रम आपण केले तर त्याचा वृत्तांत जरूर पाठवावा. असे कार्यक्रम ठरवताना वा ठरवल्यानंतर शक्य असल्यास आम्हाला जरूर कळवावे. त्या कार्यक्रमात सहभागी होऊन आपली सर्वांची मते समजून घेण्याचा आम्ही जरूर प्रयत्न करू अशाप्रकारे आपण सर्वांनी मिळून ही चर्चा पुढे नेण्याचा प्रयत्न करूया असे आमचे आपणा सर्वांना आवाहन आहे.

❖ ❖ ❖

अनुक्रमणिका

## 'प्रयास' (संशोधने व उपजीविका गट) प्रस्तुत

# वंचिताभिमुख विकासविचार, व्यूहनीती व कृतिकार्यक्रम या विषयावरील चर्चासत्राचा अहवाल

दिनांक २० जुलै व १० ऑगस्ट २००३

**प्रास्ताविक**

प्रथम प्रयासतर्फे सुबोध वागळे यांनी प्रयासच्या वेगवेगळ्या प्रकारची कामे करणाऱ्या चार गटांविषयी माहिती दिली. त्यापैकी 'संसाधने व उपजिविका' या गटाचे काम कसे सुरू झाले, हा गट कोणत्या परिप्रेक्ष्यातून काम करतो आणि या गटाने आत्तापर्यंत काय काम केले याची माहिती प्रयासतर्फे देण्यात आली. त्यांच्या निवेदनाचा सारांश पुढीलप्रमाणे होता.

'१९९७-९८ मधे मी आणि मिलिंद बोकील यांनी रायगड-रत्नागिरी जिल्ह्यांमध्ये जो अभ्यास केला तेथून कामाला सुरुवात झाली. नैसर्गिक संसाधने आणि उपजिविकेवर शहरीकरण आणि औद्योगिकरण यांचा होणारा परिणाम' या विषयाचा अभ्यास आम्ही विविध संस्था, संघटनांच्या मदतीने केला. सुरुवातीपासून आम्ही तळागाळात काम करणाऱ्या संस्था-संघटनांच्या मदतीने आणि त्यांच्या अपेक्षा/निकड लक्षात घेऊन काम उभे करण्याचा प्रयत्न केला आहे.

विकासाच्या प्रश्नांच्या अभ्यासातून असे लक्षात आले की, विकासाच्या प्रतिमानाचे (model) चार मुख्य स्तर आहेत. १. सैद्धांतिक बैठक (theory), २. सैद्धांतिक बैठकीचा संकल्पनात्मक गाभा (conceptual core), ३. व्यूहनीती (strategy), ४. कार्यक्रम/योजना (action plan). आपल्याला जर विकास आणि पर्यावरणावर काम करायचे असेल तर या चारी स्तरांचे भान ठेवायला हवे असे आमच्या लक्षात आले. या चारी स्तरांवर फार मोठे काम करायची आमची ताकद नाही. पण प्रयासच्या 'ऊर्जागटा'च्या कामातून असे दिसून आले की, एखाद्या क्षेत्रात जरी खूप तज्ज्ञ काम करीत असले आणि आपली ताकद मर्यादित असली, तरी आपण योग्य वेळ, स्थळ, काळ निवडला आणि आपल्या क्षमतांचा नेटाने वापर केला, तर आपले काम अन्य संस्था/संघटनांना पूरक ठरू शकते. प्रयासचे काम हे पूरक पाठबळ देण्याचे काम आहे. प्रत्यक्ष लोकांबरोबर ज्या संस्था-व्यक्ती काम करीत आहेत त्यांच्या कामाची परिणामकारकता / धार वाढवण्यासाठी आमच्या क्षमता, ज्ञान, कौशल्ये उपयोगी पडली पाहिजेत असे जाणीवपूर्वक ठरवूनच आम्ही काम सुरू केले.

विकास प्रतिमानाच्या 'संकल्पनात्मक गाभ्या'वर काम करताना ब्रिटिश सरकारच्या DFID (Department for International Development) च्या कामाशी प्रथम ओळख झाली. त्या संस्थेतर्फे करण्यात येणाऱ्या शाश्वत उपजिविकेच्या सूत्राभोवतीच्या विचारव्यूहाच्या बांधणी व अंमलबजावणीत तळागाळातील मंडळींना कोणतेच स्थान नाही, हा आम्हाला मिळालेला पहिला धक्का होता. त्यावर विचार करताना असे वाटले की, संकल्पनात्मक पातळीवर काम करताना ते काम केवळ संकल्पनात्मक पातळीवर राहता कामा नये. लोकांच्या प्रश्नांच्या संदर्भात लोकांबरोबर राहून काम करणाऱ्या संस्था/संघटनांबरोबर हा विषय पुढे नेला पाहिजे. या भूमिकेचा पाया तयार करण्यासाठी आम्ही काही अभ्यास व उपक्रम केले.

दुसरा मुद्दा म्हणजे आजच्या विकासाच्या किंवा दारिद्र्यनिर्मूलनाच्या ज्या योजना आहेत त्यातील त्रुटी आणि फोलपणा आपणा सर्वांना माहीत आहे. पण त्याला पर्याय म्हणून असणाऱ्या योजना/कार्यक्रम कसे असतील? या पर्यायी योजना परिणामकारकपणे मांडायच्या असतील तर त्यांचे आरेखन सुस्पष्ट असणे आवश्यक आहे. पर्यायी योजनांचे आरेखन करणे ही आमच्या कामाची सुरुवातीची पायरी असू शकते असे आम्हाला वाटले. आम्ही आरेखनापासून सुरुवात केली कारण आमच्या असे लक्षात आले की, यावर फारसे काम झालेले नाही आणि आमच्यासारख्या शहरातल्या, पाठबळ देऊ इच्छिणाऱ्या संस्था हे काम चांगल्या प्रकारे करू शकतील जे तळागाळात काम करणाऱ्या संस्था/संघटनांना पूरक होऊ


अनुक्रमणिका

शकेल. या संघटनांशी सतत संपर्क ठेवून त्यांच्याशी चर्चा करूनच या सर्व गोष्टी ठरविण्यात आल्या. इथे उपस्थित असलेल्यांपैकी काहींनी आम्हाला यात मदत केली आहे. पर्यायी योजनांच्या आरेखनाचे दोन भाग आहेत :

(१) वित्तीय / व्यवस्थापकीय / प्रशासकीय अंगाचे आरेखन आणि (२) तांत्रिक-आर्थिक अंगांचे आरेखन. आम्ही सध्या यावर काम करीत आहोत.

अशा प्रकारे संसाधने व उपजिविका गट सध्या तीन गोष्टींवर काम करत आहे. (१) विकास विचारव्यूहाचा (डिसकोर्स) संकल्पनात्मक भाग, (२) पर्यायी योजनांच्या वित्तीय / व्यवस्थापकीय / प्रशासकीय अंगांचे आरेखन आणि, (३) पर्यायी योजनांच्या तांत्रिक अंगांचे आरेखन.'

*यानंतर विकास विचारव्यूहाच्या संकल्पनात्मक गाभ्यावरच्या कामाविषयी कल्पना दीक्षित यांनी, पर्यायी योजनांच्या वित्तीय / व्यवस्थापकीय / प्रशासकीय आरेखनाच्या कामाविषयी रामचंद्र कौलगी यांनी आणि तांत्रिक आरेखनाच्या कामाविषयी सचिन वारघडे यांनी थोडक्यात माहिती दिली.*

### सत्र पहिले
### वंचिताभिमुख विकासविचार : संकल्पनात्मक गाभा

*सुरुवातीला प्रयासतर्फे कल्पना दीक्षित यांनी 'पर्यायी व्यूहनीतीचा संकल्पनात्मक गाभा' (चर्चासत्रासाठी तयार केलेल्या टिपणातील भाग १) यावर मंडणी केली. या सत्रातील चर्चेतून जे मुद्दे पुढे आले त्यांचा थोडक्यात गोषवारा पुढे दिला आहे.*

*हा गोषवारा लिहिताना सहभागी मंडळींनी मांडलेले मुद्दे, सूचना आक्षेप, प्रतिक्रिया या ('बुलेट' फॉर्मचा वापर करून) थोडक्यात मांडल्या आहेत. ज्या ठिकाणी या मुद्द्यांना प्रतिसाद दिला गेला तेथे प्रतिसादातील मुद्दे वेगळ्या परिच्छेदात मांडले आहेत.*

#### चर्चा

- उपजिवीका सुरक्षिततेच्या संकल्पनेची मांडणी रॉबर्ट चेंबर्सची म्हणून तुम्ही केली आहे. पण ही प्रचलित मांडणी आहे. संघराष्ट्राच्या पूर्ण कल्पनेत, तसेच आर्थिक वाढीच्या सिद्धांतामध्ये सुद्धा ही मांडणी केली आहे. मग ती रॉबर्ट चेंबर्सची म्हणून का मांडली?
- साठ आणि सत्तरीच्या दशकांमधेही हे मांडले गेले की विकासाची रूढ संकल्पना बरोबर नाही.

**प्रतिसाद :**

'उपजिविका सुरक्षितता' ही संज्ञा रॉबर्ट चेंबर्स ने प्रथम वापरली. म्हणून तो संदर्भ देणे आवश्यक वाटले. रॉबर्ट चेंबर्सनेही मान्य केले आहे की त्याच्याआधीही अनेक लोकांनी ही संकल्पना मांडली आहे.

१९५० च्या दशकात अर्थशास्त्रीय दृष्टीने विकासाची कल्पना मांडली गेली. साठीच्या दशकात त्यातील सामाजिक विकासाकडे झालेले दुरलक्ष दाखवून द लिं गेले. सत्तरीच्या दशकानंतर त्यातील पर्यावरणीय बाबींकडे झालेले दुर्लक्ष लक्षात आले. त्यातून शाश्वत विकास ही संकल्पना मंडली गेली. पण त्यात प्रचंड सुधारणावाद आला. स्त्रीवाद, पर्यावरणवाद यांनी विकासाची विविध अंगाने समीक्षा केली. शाश्वत विकासाच्या संकल्पनेत सामाजिक, राजकीय गोष्टींकडे झालेले दुर्लक्ष इ. गोष्टी शाश्वत उपजिविकेच्या (Sustainable Livelihoods) माध्यमातून मांडण्याचा प्रयत्न काहीजण करीत होते. त्यातील एक रॉबर्ट चेंबर्स होता. ही सगळी मांडणी भाषा आणि आशय या दोनही दृष्टींनी पर्यावरणवाद्यांना जवळची होती. ती डीएफआयडीने अलगद उचलली, त्यावर प्रचंड काम केले आणि आता जागतिकीकरणाच्या समर्थनासाठी वापरली जात आहे.

- शाश्वत उपजिविका ही कल्पना जागतिकीकरणा-बरोबर डीएफआयडीने कशी जोडली हे स्पष्ट करावे नाहीतर संभ्रम निर्माण होईल.
- डीएफआयडी जागतिकीकरणाच्या समर्थनासाठी पर्यायवाद्यांची भाषा कशी वापरते हे आणखी स्पष्ट होणे आवश्यक आहे.

**प्रतिसाद :**

शाश्वत उपजिविका आणि जागतिकीकरण या संकल्पना एकमेकांशी जोडून घेणे खरेच अवघड आहे. त्या जोडण्याचा डीएफआयडीने केलेला प्रयत्न अतिशय ढिसाळ आहे. डीएफआयडी एका बाजूने संभ्रम निर्माण करीत आहे तर

दुसऱ्या बाजूने पर्यायवाद्यांच्या मांडणीतील (सैद्धांतिक पायापासून ऱ्हेटोरिकपर्यंतः) जोर काढून घेण्यासाठी फक्त त्यांच्या संज्ञा वापरत आहे. शाश्वत उपजीविका आणि जागतिकीकरण यात सांधाजोड शक्यच नाही. ते शेळीने वाघाचे कातडे पांघरण्यासारखे आहे. ओरिसा, आंध्रप्रदेश या राज्यांमध्ये डीएफआयडीने मोठमोठे लावलीहूड प्रोजेक्टस् (४०० आणि ६०० कोटी रु. चे) सुरू केले आहेत. तेथील स्वयंसेवी व सरकारी संस्थांना त्यांनी विश्लेषणासाठी व अंमलबजावणीसाठी एक अतिशय उत्तम अशी सैद्धांतिक व संदर्भ चौकट (frame work) दिली आहे. पण ही चौकट अभ्यसली तर असे आढळते की ही घेऊन वंचितांपर्यंत जाताच येणार नाही.

'मिलेनियम-गोल' मधील उद्दिष्ट म्हणजे २०१५ पर्यंत जगातील गरिबी अर्ध्यापर्यंत खाली करणे. हे उद्दिष्ट डीएफआयडीला मान्य आहे. प्रत्येकाला १ डॉलर इतके उत्पन्न मिळायला हवे असे त्यांचे म्हणणे आहे. तेव्हा एका बाजूने डीएफआयडी दारिद्र्याच्या रूढ संकल्पनेला पर्याय ठरू शकेल असे 'लावलीहूड फ्रेमवर्क' वापरते आणि दुसऱ्या बाजूने रूढ 'उत्पादनकेंद्री' गरिबीची संकल्पनाही वापरते.

- सर्व पर्यावरण एकच आहे. म्हणून उपजिविका-सुरक्षिततेसाठी पर्यावरणीय सुरक्षिततेची गरज आहे हे व्यक्त होणे आवश्यक आहे. विकास ही एक राजकीय प्रक्रिया आहे हे लक्षात घेणे आवश्यक आहे. वंचितांच्या विकासाचा/उपजिविकेचा विचार करताना चार घटक लक्षात घेणे गरेचे आहे. १. तंत्रज्ञान, २. बाजारव्यवस्था, ३. जातीयव्यवस्था, आणि ४. लिंग-भेद (कुटुंबातील विषमता). दलित, आदिवासींच्या उपजिविकेसाठी भाकरीइतकाच (आर्थिक बाजूइत-काच) आत्मसन्मानही महत्त्वाचा आहे. उपजिविका मिळाली म्हणून त्यामागोमाग आत्मसन्मान येणार नाही.
- जातीयव्यवस्था आणि लिंगभेद हे मुद्दे उपजिविकेच्या संकल्पनेत विचारात घ्यावेच लागतील. नैसर्गिक आपत्तीपेक्षाही मुरवत ठेवलेला सामाजिक प्रश्न जास्त अवघड असतो. ग्रामीण भागात उपजिविकेची जबाबदारी स्त्रियांवरच जास्त प्रमाणात असते. तसेच शहरी - ग्रामीण असा स्पष्ट भेद आहे का? तालुक्याच्या ठिकाणी लोकांचे आचार, विचार, आकांक्षा, वस्तूंचा वापर हा शहरी लोकांपेक्षा वेगळा नसतो. अगदी एखादे आदिवासी गाव घेतले तरी त्यातील किती जणांना जंगल/जमीन/पाणी या नैसर्गिक साधनांवर आधारित आपली उपजिविका असावी असे वाटेल, किंवा तसे शक्य आहे?
- गावात/जंगलात राहणाऱ्या माणसाला तेथे राहायचे आहे का हा प्रश्न महत्त्वाचा आहे. त्यांच्यातील नवी पिढी प्रश्न विचारते आहे की, आमचेच पाणी नेऊन तुम्ही शहराला देणार आणि आमच्या पाणीवापरावर मर्यादा घालणार. ते असाही प्रश्न विचारतात की, आमचे जगणे तुम्हाला भाकरीपुरतेच वाटते का? आमची संसाधने जे खेचून नेतात त्यांना मात्र पार माहिती तंत्रज्ञानापर्यंत सर्व उपलब्ध आहे.
- ग्रामीण भागातील नैसर्गिक संसाधने कमीकमी होत चालल्यामुळे माणसे शहराकडे स्थलांतरित होत आहेत. शहरात उपजिविका-सुरक्षितता असते अशी समजूत होती. पण पुण्यामुंबईसारख्या शहरात स्थलांतरित मोठ्या प्रमाणावर झोपडपट्ट्यांमध्ये राहतात. त्यांना कोणतीही उपजिविका सुरक्षितता नसते. पर्यावरणाच्या असंतुलनामुळे त्यांचे जीवन जास्त असुरक्षित होत आहे.
- ग्रामीण शेतीवर आधारित उपजिविका म्हणजे शारीरिक श्रम आले. शारीरिक श्रम न करणे म्हणजे प्रतिष्ठेचे अशी समजूत आपल्या मनांमधे रुजली आहे. तसेच शहरी, ग्रामीण किंवा आदिवासी भागात रोजगार उपलब्ध होऊ शकतो का? भंगीकामासारखी कामे किंवा नांगर चालविणे ही कामे उच्चजातीय करतील का? जर यांत्रिकीकरणाला आपला विरोध असेल तर शरीर श्रमाला प्रतिष्ठा हवी. म्हणजेच शरीर श्रमाला जास्त पैसा मिळायला हवा.
- ग्रामीण उपजिविकेत 'जंगलप्रधान' उपजिविका हाही प्रकार असतो.
- उपजिविका सुरक्षिततेसाठी गाव हे एकक (Unit) धरता येईल का?
- उपजिविकेवरील संकटांमध्ये प्रकल्पामुळे होणारे

विस्थापन, प्रकल्पांमुळे उपजिविकेच्या साधनांशी संपर्क तुटणे (धरणांमागील लोक) यांचा विचार करायला हवा.

- आपले राजकीय परिप्रेक्ष्य कोणते हे स्पष्ट करणेही महत्त्वाचे आहे.
- आज महाराष्ट्रात विविध परिप्रेक्ष्यातून काम करणारे गट आहेत. मुख्य प्रवाहाचे अस्तित्वच न मानणारे, मुख्य प्रवाहाचे स्वरूप समजावून घेऊन त्याच्यावर मात करू इच्छिणारे इ. आपली मांडणी त्यात कोठे बसते?
- आपली उपजिविका कशी असावी हे ठरविण्याचा हक्क वंचितांना हवा. हा राजकीय मुद्दा मांडणीत येण्याची गरज आहे. उदाहरणार्थ, विस्थापितांचे काय करायचे हे ठरविण्याचा हक्क त्यांनाच हवा. तसेच 'वंचित' म्हणजे काय? फक्त आर्थिकदृष्ट्या वंचित की ज्ञानापासूनही वंचित? त्यांचे ज्ञान कमी दर्जाचे हा वसाहतवादी दृष्टिकोन टाकून देणे महत्त्वाचे आहे. आपण त्यांना 'inputs' देणे अशा दृष्टीने विचार करतो आहोत, त्याऐवजी 'ते स्वतःच ठरवतील' असा विचार हवा.
- पर्यायी विकासाच्या संकल्पनात्मक गाभ्याच्या मांडणीमध्ये पुन्हापुन्हा वंचित करण्यामागचे जे राजकारण आहे, ते यायला हवे. म्हणजे रूढ विकासाच्या पोटात दडलेले विषम विनिमयाचे तर्कशास्त्र उघड करायला हवे. मग ते ग्रामीण, शहरी, शेतीतील, औद्योगिक किंवा आंतरराष्ट्रीय अशा कोणत्याही पातळीवर असो.
- शेती हा आपल्या मांडणीत वंचितांच्या उपजीविकेचा मुख्य मार्ग गृहीत धरला आहे. शेतीमालाच्या भावावर नेहमी नियंत्रण ठेवले जाते, पण अन्य वस्तूंच्या नाही; हे राजकारण समजावून घेणे महत्त्वाचे आहे.
- जर ग्रामीण अर्थव्यवस्था वर न्यायची, तर शहरी भांडवली अर्थव्यवस्था खच्ची करावीच लागले.
- ग्रामीण भागात अतोनात संसाधने आहेत. पण ती संसाधनेच नाहीत किंवा आहेत ती संसाधने मातीमोल आहेत असे बिंबवणे हे राजकरण आहे. आम्ही एका शाश्वत शेतीच्या प्रयोगातून, पैशाच्या स्वरूपात किती बचत करता येते हे शेतकऱ्यांना दाखवून दिले. गावातली संसाधने आणि त्याची किंमत याबाबत सातत्याने प्रशिक्षण देणे आवश्यक आहे.
- संकल्पनात्मक पातळीवर उपजीविका प्रक्रियेचा विचार करताना शोषणव्यवस्थेचा उल्लेख करायलाच हवा. शोषणव्यवस्थेविरुद्धचा झगडा हा प्राथमिक उद्दिष्टांमध्येच असायला हवा.
- उपजीविका प्रक्रियेचा विचार करताना आपण आकस्मिक धक्के आणि दीर्घकालीन ताणतणावांचा विचार करतो. त्यापेक्षाही समाजातील शोषणव्यवस्था जास्त महत्त्वाची आहे. त्यामुळे उपजीविकेवरील संकटांच्या मांडणीत समाजातील शोषणव्यवस्था सुद्धा मांडली पाहिजे. तसेच उपजीविका-सुरक्षिततेमध्ये 'शोषणव्यवस्थेविरुद्ध झगडण्याची ताकद' हा प्राथमिक उद्दिष्टांचा भाग असायला हवा.
- आपण फक्त वंचितांच्या उपजीविका-सुरक्षिततेबद्दल बोलत आहोत. एकूण विकासप्रक्रियेबद्दल नाही.
- या मांडणीत एक धोका दिसतो. 'तुमचे अधिकार सोडा, आम्ही तुम्हाला उपजीविका देतो' असा तर उपजीविकेचा अर्थ होणार नाही ना? उदा. संयुक्त जंगल व्यवस्थापनाचे असे झाले आहे.
- वंचितांच्या विकासाचा वेगळा विचार करणे योग्य होईल का? ही चर्चा उपजीविकेपुरतीच मर्यादित का ठेवली?

**प्रतिसाद**

वंचितांच्या विकासाचा विचार इतर समाजाच्या विकासापासून तोडून करता येणार नाही हे बरोबर आहे. तसेच उपजीविका सुरक्षिततेच्या प्राथमिक उद्दिष्टांच्या पुढे जाऊन सन्मानपूर्वक जीविकेचा विचार महत्त्वाचा ठरतो. परंतु उपजीविका-सुरक्षिततेचे उद्दिष्ट हे आमच्या मांडणीचे एक बलस्थान आहे असे आम्हाला वाटते. उपजीविका-सुरक्षिततेचे उद्दिष्ट किमान असल्याने नाकारण्याला काहीही नैतिक/ राजकीय अधिष्ठान असणार नाही. त्यामुळे ते नाकारणे राजकीयदृष्ट्या जड जाईल. उपजीविका सुरक्षिततेला हानिकारक किंवा धोकादायक असे व्यवस्थेत आज जे जे घडत आहे ते थांबविण्यासाठी याचा उपयोग होईल. वंचितांना

उपजीविका सुरक्षिततेचा हक्क मिळाला की, वंचितता आणि परावलंबित्व यांचे दुष्टचक्र भेदणे, म्हणजेच त्या शोषण-व्यवस्थेतून बाहेर पडणे हा पहिला टप्पा असेल. कारण आम्हाला त्याचा त्रास होत नसला तरी आमच्या पुढच्या पिढ्यांना त्याचा त्रास होणार आहे. यासाठी सर्वांना सन्मानपूर्ण जीविका मिळाली पाहिजे. असे टप्प्याटप्प्याने जाणे हा आमच्या व्यूहनीतीचा विचार आहे. या ठिकाणी प्रामुख्याने सुरक्षित उपजीविका या पहिल्या टप्प्यातील उद्दिष्टाची आर्थिक बाजू मांडण्याचा एक प्रयत्न केला आहे. याचबरोबर जी सामाजिक आणि राजकीय बाजू आहे ती तिथेतिथे जोडून घेण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

- सामाजिक विश्लेषण त्यात्या ठिकाणी जोडत गेले तर त्याला अधिक बळकटी येईल.
- या मांडणीतील राजकीय भाग अधोरेखित करावाच लागेल. कारण आपण ज्या मांडण्यांना विरोध करतो आहोत, त्या मांडण्यांमध्ये नेमका राजकीय भागच नेहमी वगळला जातो.
- वंचित घटकांच्या दृष्टीने आर्थिक बाबींबरोबरच अन्य मुद्देही खूप महत्त्वाचे आहेत. राजकीय आणि सामाजिक सबलीकरणाशिवाय आर्थिक सबलीकरण टिकणारच नाही.
- आजच्या वास्तवात मुख्य उद्योग शेती आहे. गावातील जमिनीचे वाटप हा मूलभूत प्रश्न आहे. जमिनीच्या वाटपाचा प्रश्न जोपर्यंत आपण निश्चित करत नाही, तोपर्यंत सगळे प्रश्न तसेच राहतील. संसाधनांच्या वितरणाविषयी आधी निश्चिती केली पाहिजे.
- उपजीविकेच्या साधनांचे जे नियंत्रण आहे, त्याच्या सातत्याची हमी काय? जमिनीचा इतिहास बघितला तर ब्रिटिश काळापूर्वी कसणाऱ्याच्याच मालकीची जमीन होती. त्यानंतर जमिनीच्या मालकीची शाश्वती कधीही शासकीय यंत्रणेने दिली नाही. 'नैसर्गिक संसाधनांच्या हमी'चा उल्लेख कोठेतरी हवा. त्यातून एक प्रकारची सुरक्षितता आणि उपजीविकेचं सातत्य येईल.
- मानवाने कसे जगावे याबद्दलच्या त्यांच्या इच्छाआकांक्षांना आकार देणे हासुद्धा विकासप्रक्रियेचा भाग आहे. रूढ विकासप्रक्रियेत हा आकार देण्यातही मोठी विकृती शिरलेली आहे. हा मुद्दा आपल्या मांडणीत येण्याची गरज आहे. उदा. कातकरी माणसाकडे जेव्हा पैसा येतो, तेव्हा तो टेपरेकॉर्डर खरेदी करतो, मुलासाठी दूध नाही. रूढ विकास कल्पनेतून विकास घडला नाही, एवढेच तिचे अपयश नाही, तर देशातील बहुसंख्य जनतेला या विकासाने वंचित बनविले. जे वंचित नव्हते त्यांनाही वंचित केले. रूढ विकासनीतीचे अपयश केवळ आर्थिक नसून त्यातून निर्माण झालेल्या मानवी प्रवृत्ती हेही आहे. मोठी भांडवली गुंतवणूक बंद झाल्याशिवाय उपजीविका-सुरक्षिततेवर गुंतवणूक होणे शक्यच नाही. कारण या दोन गोष्टी परस्परविरोधी आहेत. उपजीविका-सुरक्षिततेला लुबाडूनच ही गुंतवणूक शक्य आहे.
- रूढ विकासनीती मांडताना एक गोष्ट लक्षात घ्यायला हवी. दारिद्र्यरेषेचा पुनर्विचार करण्यासाठी नेमण्यात आलेल्या लकडावाला समितीने मांडले होते की, फक्त किमान आर्थिक साधनांची उपलब्धता होणे म्हणजे दारिद्र्यनिर्मूलन नव्हे. आर्थिक साधनांबरोबरच अन्य गरजांचाही उदा. वैद्यकीय, सामाजिक - विचार झाला पाहिजे. दहाव्या पंचवार्षिक योजनेत जंगलावरचा, जमिनीवरचा अधिकार या सर्वांचा अंतर्भाव अन्नसुरक्षेचा विचार मांडताना केला पाहिजे अशी मांडणी आहे. म्हणजे निदान मांडणीच्या पातळीवर तरी रूढ विकासनीतीत काही बदल झाले आहेत याची दखल आपण घ्यायला हवी. हे सर्व प्रत्यक्षात किती येते हा मुद्दा वेगळा.
- विकासप्रक्रियेत निवडीचा प्रश्न महत्त्वाचा आहे. रूढ विकासात एका वर्गाचे हितसंबंध जपण्याच्या दृष्टीनेच निवड केली गेली आणि ते हितसंबंध अन्य लोकांना वंचित करूनच जपणे शक्य होते. उदा. जर आपल्या देशातील बहुसंख्य जनता शेतीवर अवलंबून होती, तर विकासनीती शेतीला गौण स्थान देऊन शहरी उद्योगधंद्यांना जास्त महत्त्व का दिले? पुन्हा शहरी औद्योगिकरणातही निवड आहेच. विकास हा श्रमशक्तीला डावलून आणि भंडवलशक्तीवर भर

देऊनच झाला. औद्योगिक उत्पादनातही निवड आहे. मूठभर लोकांसाठी चैनीच्या वस्तू निर्मण करण्यावर भर आहे, बहुसंख्य जनतेच्या गरजेच्या वस्तू उत्पादित करण्यावर नाही. खेड्यात टी.व्ही., टेपरेकॉर्डर येतो आणि तेथील दूध आणि फळे बाहेर जातात. शहरी मध्यमवर्गीयांसारखे जीवन म्हणजे विकास असे वंचिताला वाटते कारण तीच जीवनपद्धती उपलब्ध आहे. जी जीवनपद्धती उपलब्धच नाही ती त्याने स्वीकारावी असे आपण कसे म्हणू शकतो? आपल्या देशाला श्रमधिष्ठित तंत्रज्ञान आवश्यक आहे, भांडवलधिष्ठित नाही, असे आपण म्हणतो पण आपल्यापासून सुरुवात करायची आपली तयारी आहे का? पोस्ट आणि ई-मेल यात पोस्ट हे श्रमधिष्ठित आहे. मग आपण संस्था-संघटना तरी ते निवडायला तयार आहोत का?

- हे वाद अनेक वर्षे चालू आहेत. जशी उत्पादने वाढत गेली तसे हेच वाद पुन्हापुन्हा होत राहिले. आज आपली लढण्याची ताकद वाढविणे हा मुख्य प्रश्न आहे. त्यासाठी जी आवश्यक ती साधने वापरायलाच हवीत.
- लढाईचे तंत्र आणि एकूणच चंगळवाद यात फरक केला पाहिजे. ज्यंच्याकडे लढाईची प्रगत साधने आहेत, त्यांच्यापुढे बाकीचे टिकूच शकत नाहीत हा इतिहास आहे.
- आपल्या मांडणीत एक धोका जाणवतो आहे. रूढ विकासनीतीतील रोजगाराबाबतचे गृहीतक आपण काढून टाकू पाहतोय का? रोजगाराचे साधन मिळाल्यावर गरिबी दूर होईल अशी रूढ विकासनीतीची मांडणी होती. आपण जेव्हा 'फक्त रोजगाराची उपलब्धता' पुरेशी नाही असे म्हणतो, तेव्हा आणखी एक पायरीने खाली येतो आहे का?

**प्रतिसाद**

रोजगाराचा अधिकार आणि उपजीविका सुरक्षिततेचा अधिकार यातील फरक महत्त्वाचा आहे. दांडेकर आणि रथ यांच्या पिढीतील अर्थतज्ज्ञांची रोजगाराच्या अधिकाराच्या पूर्ततेची कल्पना म्हणजे लँड आर्मी तयार करणे होय. ते मत अजूनही ग्राह्य धरले जाते. म्हणजे ज्यांना रोजगार हवा, त्यांनी मजूर म्हणून भरती व्हायचे आणि जिथे काम असेल तिथे त्यांना पाठवले जाईल. अशा तऱ्हेने त्या माणसाला पगारी विस्थापित करायचे. या लँड आर्मीच्या कल्पनेला आपले उपजीविका-सुरक्षितता हे उत्तर आहे. उपजीविका-सुरक्षिततेमध्ये संसाधनांवरील हक्क येतो. यामधे रोजगाराचा हक्कही येऊ शकेल. परंतु हा रोजगार वंचित व्यक्तींचे ॲसेट्स् विकसित करण्यासाठी असेल. उदा. बड्या शेतकऱ्यांच्या फळबागा लावण्यासाठी रोजगारहमी योजना वापरण्यात येते. मग जर वंचित लोक कष्ट करून स्वतःच्या जमिनीची प्रत सुधारणार असतील तर त्यासाठी रोजगार हमीतून त्यांना पैसे मिळायला हवेत. रोजगाराचा हक्क हा उपजीविका-सुरक्षिततेचा हक्क मजबूत करण्यासाठी वापरावा.

- हीच भाषा सर्व दारिद्र्यनिर्मूलनाच्या योजनांमध्येही वापरली आहे. त्यात ज्या रोजगार हमी योजना आहेत त्यात 'रोजगार हा संसाधन निर्मितीसाठी असेल, लोकांच्या भविष्याची तरतूद करेल' असे म्हटलेले असते. आपले म्हणणे स्पष्ट करण्यासाठी 'कायम स्वरूपाच्या संसाधनांची निर्मिती होईल अशाच प्रकारच्या रोजगाराला प्राधान्याने हाती घेतले जाईल' असे म्हणावे.

**प्रतिसाद :**

आपण म्हणतो की संसाधनांवरील हक्क व वंचितांच्या मालकीच्या संसाधनांची उत्पादकता वाढवण्यासाठी सरकारने पैसे दिले पाहिजेत. रोजगार हमी योजना म्हणते की संसाधने आणि पायाभूत सोयी या समाजाच्या मालकीच्या आहेत आणि त्या झिरपा पद्धतीने वंचितांकडे येतील. हे चुकीचे आहे.

- संसाधनांवरच्या वाढीव उत्पादकतेवरच्या हक्काची गोष्ट जेव्हा केली जाते तेव्हा वंचित तो हक्क मिळवू शकतील का याचा विचार करायला हवा. उदा. पाणलोटविकासाच्या कार्यक्रमात चराईबंदीमुळे शेळ्या असणाऱ्यांचे नुकसान होते. पाणी वाढले तर ते कोणाला मिळते? अशा वेळी राजकीय स्वरूपाचे प्रश्न निर्माण होतात.

**प्रतिसादः**

नैसर्गिक संसाधनांच्या हक्कांच्या लढाईची कल्पना पुढीलप्रमाणे करता येईल. सुरुवात जमिनीसाठीच्या संघर्षापासून होईल. सुरुवातीलाच जर आपण संघर्षातून मिळालेल्या जमिनीची उत्पादकता वाढविण्याची क्षमता वंचित घटकांच्यात आणली तर त्यातून उपजीविकेला आवश्यक असे लाभ त्यांना मिळतील. हे लाभ मिळाले की त्यांच्यात भांडण्याची ताकद येईल आणि त्यांना दिसेल की जर आपल्याला त्याच्यापलीकडे उत्पादकता वाढवायची असेल तर गावातील पाण्यावरच्या अधिकारासाठी झगडावे लागेल. जर आपल्याला सर्वांना पाणी हवे असेल तर ऊर्जा लागेल. म्हणजे पाणी मिळवण्यासाठी ऊर्जेच्या मागणी व त्यासाठी संघर्ष करावा लागेल. अशा तऱ्हेने हा लढा पुढे जाईल. या लढ्याला सर्वांचा पाठींबा अर्थातच मिळणार नाही. वंचित लोक जेव्हा जमीन/पाण्याची मागणी करायला लागतील, तेव्हा विरोध होणारच. त्यासाठी संघटनांना जमीन, पाणी, ऊर्जा यावरील हक्कांची लढाई लढायला लागणार आहे.

- ज्याला (चराईबंदीमुळे) शेळ्या सोडून द्याव्या लागणार आहेत, त्याला तुला पाण्याचा लाभ होणार आहे अशी हमी द्यावी लागेल. तुला काहीतरी मिळणार आहे आणि त्यासाठी सर्वांनी मिळून काहीतरी करायचे आहे असा विश्वास त्याला मिळाल्याशिवाय तो कार्यक्रमात सहभागी होणार नाही.
- 'बाजारव्यवस्थेवरील नियंत्रणा'चा मुद्दा आपल्या टिपणातील प्राथमिक आणि अंतिम उद्दिष्टांमध्येही असायला हवा.
- पूर्वीच्या बलुतेदारीत जे परस्परावलंबित्व होते, त्या प्रकारे स्थानिक बाजारव्यवस्था विकसित करता येईल का? उदा. गावातले शेतकरी आणि शेतमजूर जर परस्परावलंबी झाले, तर शेतमजुराला गावाबाहेर जाण्याची गरज उरणार नाही.
- स्थानिक बाजारात काय येते आणि स्थानिक पातळीवरचे काय बाहेर जाते याच्या अभ्यासावरून असे दिसते की आजच्या नफाकेंद्री व्यवस्थेत, शहरी भांडवलदारवर्ग बेमालूमपणे उपजीविकेच्या साधनांचे शोषण करतो आहे. त्यामध्ये सामान्य शेतकरी हतबल होतो. उपजीविकेच्या साधनांचे प्रतिमान काय असेल? त्याचे भान कसे निर्माण करता येईल? याचा तपशीलवार विचार करायला हवा. प्रत्येक भागातील संसाधने वेगळी आहेत. उदा. मराठवाड्यात उपजीविकेची साधनेच नाहीत.

**प्रतिसाद :**

संसाधनांच्या उत्पादकतेतून जे आर्थिक मूल्य निर्माण होते त्यावर वंचितांचा ताबा राहणे महत्त्वाचे आहे. हे कसे करायचे यावर तयार उत्तरे नाहीत. पण काही शक्यता असू शकतील. वंचित घटकांची जी अंतर्गत अर्थरचना आहे (स्थानिक अर्थव्यवस्थेच्या आतील) त्यातच हे विनिमय मूल्य रिचवता येईल का? आपण आतल्याआत विनिमयाच्या रचना (exchange/barter mechanisms) विकसित करू शकलो तर हे शक्य होईल का? उदा. आठवडी बाजारात बाहेरून येणाऱ्या टोमॅटोच्या तुलनेत स्थानिक पातळीवर उत्पादित होणाऱ्या टोमॅटोला भाव मिळत नाही. पण त्याच टोमॅटोचा उपयोग वंचित घटकांपैकी जे संध्याकाळी उपाशी राहणार आहेत, त्यांच्यासाठी करता येईल का? अशा तऱ्हेच्या अंतर्गत विनिमयाच्या रचना विकसित करता येतील का? आपल्या स्थानिक अर्थव्यवस्थेच्या बाहेर जे वंचित घटक आहेत त्यांच्याशी या exchange mechanisms द्वारे आपण जोडून घेऊ शकू का? उदा. शहरातील मोलकरणी आणि कोकणातील वंचित घटकांतील स्त्रिया यांच्या संघटना आपण बनवू शकतो का? अशा प्रकारची मॉडेल्स आपल्या बनवावी लागतील.

- 'उपजीविकेच्या निवडीची क्षमता' हा मुद्दा उपजीविका प्रक्रियेच्या मांडणीत घालायला हवा.
- निवडीच्या स्वातंत्र्याचा सुटा विचार करता येत नाही. सर्व पर्यायांची माहिती आणि सर्व पर्यायांची उपलब्धता (access) या दोन गोष्टींच्या पायावरच निवडीचे स्वातंत्र्य उभे राहू शकते. पर्यायांची माहिती आणि उपलब्धता नसेल तर निवडीच्या स्वातंत्र्याला काही अर्थ राहत नाही.
- श्रीमंतांची मुले घरातील पोषक जेवण टाकून फास्ट फूडची निवड करतात, तेव्हा त्यांचेही प्रबोधन









करायला हवे. हा मुद्दा फक्त वंचितांनाच लागू आहे असे नाही. सगळे पर्याय उपलब्ध असताना त्यातून निवड करणे हा फक्त आर्थिक भाग नाही, त्यात सामाजिक भागही आहे.

- यासाठी पर्यायवादी गटांच्या व्यूहनीतीमधील प्रवृत्तींच्या भागावरही भाष्य करावे लागेल. उदा. सार्वजनिक आणि खासगी दळणवळण व्यवस्था यापैकी आपण काय निवडणार? लोकांना जेव्हा आपण हे करा, ते करा असे म्हणतो, तेव्हा लोक आपण काय करतो ते बघणारच ना?
- इथे मुद्दा तो नाही. निवडीचा मुद्दा बघताना पर्यायांची माहिती आणि उपलब्धता या दोन्ही गोष्टी आहेत, त्यांना दुसऱ्यांनी कोणती निवड करावी हे सांगण्याची गरजच नाही. ज्यांच्याजवळ त्या नाहीत, त्यांच्यापर्यंत त्या घेऊन जाण्याची गरज आहे. पर्यायांची माहिती आणि उपलब्धता नसण्याचे बळी आज फक्त वंचितच आहेत असे नाही, मध्यमवर्गीयही आहेत.
- सजगपणे पर्याय वापरण्याची क्षमता असायला हवी.
- ही क्षमता वाढवणे हा जाणीवजागृतीचा भाग असायला हवा.
- माणसाला कोणत्या वस्तू महत्त्वाच्या आणि विकत घ्याव्याशा वाटतात आणि का ते तपासणे महत्त्वाचे आहे.
- उपजीविकेमध्ये क्षमतावर्धनाचा मुद्दाही महत्त्वाचा आहे. उदा. शिक्षण. जर क्षमताच मिळाली नाही, तर उपजीविका मिळणार नाही याची व्यवस्था आपोआप होत राहते.
- क्षमताविकासात वृत्ती आणि दृष्टीच्या क्षमता वाढवणे हेही असावे.

**प्रतिसाद :**

आर्थिक बाजूच्या मांडणीवरही तुमच्या सूचना हव्या आहेत. उदा. 'उपजीविकेची पूर्ती' म्हणजे कुटुंबातील सगळ्यांच्या किमान गरजा भागायला हव्यात अशी मांडणी केली तर किमान गरजा म्हणजे काय हे ठरवायला लागेल. 'किमान उपजीविके'ची नेहमीच आर्थिक व्याख्या करण्याचा प्रयत्न केला गेला आहे. उदा. दांडेकरांच्या मते प्रत्येक माणसाला २२०० कॅलरीज मिळायला हव्यात. त्यानंतर सामाजिक वास्तव खूप बदलले आहे. पण पर्यायी मांडणीतही किमान उपजीविकेची चर्चा केली गेलेली नाही. हे सगळे आपण आपल्या मांडणीत आणायला हवे. अमर्त्य सेन एका टप्प्यापर्यंत पोचले आहेत. ते म्हणतात की नुसते अन्न, पाणी, निवारा या किमान गरजा नाहीत. त्यात आरोग्य आणि शिक्षणही यायला हवे. आपण 'किमान उपजीविके'ची व्याख्या कशी करायची याचा विचार करायला हवा.

- किमान उपजीविकेच्या व्याख्येचा अट्टाहास नको. निवडीचे स्वातंत्र्य हा खरा महत्त्वाचा मुद्दा आहे.
- शास्त्राने ज्या मूलभूत गरजा सांगितल्या आहेत, त्याशिवाय सध्याच्या काळातील शक्यतांच्या चौकटीत माझ्या व्यक्तिमत्त्व विकासासाठी जे काही मला आवश्यक वाटते, शक्य आहे ते सर्व आणि सन्मानपूर्ण जीवन जगण्यासाठी आवश्यक ते सर्व असे यात समाविष्ट असावे.
- आर्थिक समृद्धी म्हणजे काय हाही मुद्दा इथे महत्त्वाचा आहे.
- सामाजिक सुरक्षिततेचा विचार कुटुंबाच्या आणि शासनाच्याही पातळीवर केला जात नाही. शासनाच्या योजना एकमेकाला छेद देणाऱ्याही असतात आणि त्यात असणारा सामाजिक सुरक्षिततेचा विचार विस्कळीत आहे. वृद्धत्वाकडे गेलेली पिढी किंवा कुटुंब यांचे पुढे काय होणार हा भयानक प्रश्न आहे. याबाबतीत युरोपिअन देशामध्ये ज्या प्रकारच्या सामाजिक सुरक्षिततेच्या योजना आहेत, त्यांचा आपण विचार करू शकतो का?
- स्वयंसेवी संस्थांचे हेतू काय आहेत हे तपासणेही महत्त्वाचे आहे. उदा. लातूरमधल्या संस्थांचा कार्यक्रम फंडींग एजन्सीच्या अग्रक्रमानुसार बदलतो असे नसावे. निरंतर बांधिलकी असावी. आता मराठवाड्यात DFID जमिनीच्या प्रश्नावर काम सुरू करते आहे. तेथे ट्रॅक्टर मिळाला की झाले, अशी भावना आहे. लातूर जिल्ह्यात गावांची संख्या ८५०, तर काम करणाऱ्या संस्थांची संख्या १७०० अशी परिस्थिती आहे.

अनुक्रमणिका

- समाजासाठी योगदान देणाऱ्या माणसाचे उत्तरदायित्व समाजाने स्वीकारावे. त्यासाठी फंडींग एजन्सीवर अवलंबित्व नसावे.
- पर्यायी विचारसरणी असणारे कार्यकर्ते जर एकत्र आले, तर एक ताकद निर्माण होईल.

**सत्र दुसरे**

**पहिल्या टप्प्यातील उपजीविका-केंद्री व्यूहनीती**

*प्रयासतर्फे सुबोध वागळे यांनी 'पहिल्या टप्प्यातील उपजीविकाकेंद्री व्यूहनीती' ची (चर्चासत्रासाठी तयार केलेल्या टिपणातील भाग २) मांडणी केली. यात प्रामुख्याने रूढ विकासनीतीच्या अपयशाची कारणे, पर्यायी विकास-नीतीचे तीन प्रवाह आणि उपजीविकाकेंद्री व्यूहनीतीची मूलसूत्रे व वैशिष्ट्ये या मुद्द्यांचा समावेश होता.*

**चर्चा**

- रूढ विकासनीतीच्या अपयशांबरोबर यशही पाहिले पाहिजे. ज्या काळात रूढ विकासनीती विकसित झाली त्या काळाचा संदर्भ महत्त्वाचा आहे. रोजगार, उपासमार, सरंजामी संबंध हे प्रचंड प्रश्न स्वातंत्र्य मिळाल्यावर होते. त्यावेळी पायाभूत रचना निर्माण करण्यासाठी आधुनिक शेती आणि उद्योगधंदे उभे करणे ही क्रांतीच होती. नवीन उद्योगधंद्यांमुळे जे लोक बलुतं सोडून शहरात आले त्यांना शिकायला मिळाले. दलितांबद्दलची सरकारी धोरणे, सहकारी चळवळ यातूनही बरेच काही साध्य झाले. लोकसंख्यावाढीचा प्रश्नही आपण लक्षात घ्यायला हवा.
- प्रयासच्या टिपणातील उपजीविकाकेंद्री व्यूह- नीतीच्या वैशिष्ट्यांमध्ये 'स्थानिक संसाधनांवर भर' हा मुद्दा आला आहे. त्याबरोबर 'स्थानिक गरजांची पूर्तता करण्यावर भर' हा मुद्दासुद्धा असायला हवा. नाहीतर पर्यायी विकासनीतीमधील दोष तसाच राहील. तो दोष म्हणजे शाश्वत पद्धतीची शेती स्वीकारायची, पण उत्पादन बाहेर विकायचे/निर्यात करायची. त्यामधून पुन्हा आपण त्याच चक्रात अडकू. वनौषधींची माहिती गोळा करायची, तर हेतू असा हवा की स्थानिक लोकांचे डॉक्टरवरचे अवलंबित्व कमी व्हावे.
- नैसर्गिक संसाधनांचा हक्क, त्याचे आरक्षण, त्यांच्या उपभोगाची खात्री आणि त्यावरचे नियंत्रण या गोष्टींना उपजीविकाकेंद्री व्यूहनीतीमध्ये प्राधान्य हवे आणि त्याचे लाभ प्रथम वंचितांनाच मिळतील अशा प्रकारचेच कार्यक्रम घ्यायला हवेत. उदा. आदिवासी क्षेत्रातून हमरस्ता जातो, त्याचे लाभ आदिवासींना जाताजाता झाले तर झाले, असा दृष्टिकोन नसावा.
- तसेच 'हक्कांमध्ये भरीव वाढ' असे शब्द टाळावेत. येथे कोणी कोणाला काहीतरी देते आहे अशी भावना नको. अशी परिस्थिती उपभोगता येईल अशी व्यवस्था निर्माण करण्याचा आपण प्रयत्न करतो आहोत अशी भावना हवी.
- 'व्यूहनीतीची मूलसूत्रे' यात मूल्यांची चर्चा सुद्धा हवी.
- उपजीविका परावलंबी नको. पण स्वावलंबी उपजीविका म्हणजे तरी काय? मानवी जीवन हे खरे तर परावलंबी असते. एकाची उपजीविका धोक्यात आली, तर दुसऱ्यावरही त्याचा ताण पडला पाहिजे अशी व्यवस्था आपल्याला निर्माण करता येईल का हे बघितले पाहिजे.
- उपजीविका या संकल्पनेचे आपण जास्त काटोकोरपणे मोजमाप करू शकू का?
- आपली व्यूहनीती वंचितांना केंद्रस्थानी ठेवते. पण त्यांना मदत करू शकतील किंवा तटस्थ राहतील असे गावात कोणते समूह आहेत याचाही व्यूहनीतीत विचार हवा. असे समूह असू शकतात की जे केव्हाही वंचित गटात ढकलले जाऊ शकतात.
- संसाधनांच्या विकासाला (regeneration) कोणाचाच विरोध असण्याचे कारण नाही. पण संसाधनांचा विकास झाल्याने उपजीविकेचा प्रश्न सुटत नाही. यासाठी स्थानिक संसाधनांचा जगण्यासाठी मर्यादित वापर करणारा वंचित वर्ग आणि चंगळवादी, भोगवादी संस्कृतीसाठी त्यांचा वापर करणारा वर्ग यात फरक करायला हवा. आपल्याकडे याबाबत करण्यासाठी काहीच नसेल तर आपण जुन्याच मार्गाने जात राहू.
- आपली पर्यायवादी मांडणी स्वयंसेवी संस्थांप्रमाणे आहे. पण अन्य प्रकारचेही पर्याय आहेत. उदा.

छत्तीसगड मुक्ती मोर्चा. यात संघर्षाचाही भाग आहे आणि हॉस्पिटल्स, शिक्षण हेही आहेत.

- प्रयासच्या मांडणीत 'स्थानिक नैसर्गिक संसाधनांची कमी किंवा घटती उत्पादकता' हे रूढ विकासनीतीच्या अपयशाचे एक कारण म्हणून पर्यायवाद्यांनी मांडले असे म्हटले आहे. पण या कारणाचा पुरेसा शोध घेतलेला नाही असे वाटते. 'स्थानिक सहभागाने संसाधनांच्या विकासासाठी प्रयत्न' हा त्यावरचा उपाय म्हणून सुचवला आहे. पण या पर्यायवादी मांडणीत कारणांचा खोलवर शोध न घेताच उपाय सुचवलेले दिसतात, आणि रूढ विकासनीतीच्या चौकटीतून काम करण्याची इच्छा दिसते.
- संसाधनांच्या/जमिनीच्या हक्कासाठी लढे लढले जात आहेत. दुसरीकडे आंदोलनात मिळणारी जमीन नापीक, निकस असते. त्यावर उपजीविका चालत नाही हेही माहीत आहे. तरीही हे लढे लढले जातातच. त्यामुळे जमिनीसाठी आंदोलने लढणे या गोष्टीचे इतर सामाजिक पैलू लक्षात घेणे गरजेचे आहे.
- संघर्षात्मक किंवा रचनात्मक कार्य करणाऱ्या कार्यकर्त्यांच्या विकासाच्या कल्पनेत तीन गोष्टींना महत्त्व असते. १. लोकशाही - यात समता आणि निर्णयप्रक्रियेतला सहभाग येतो. २. शाश्वतता आणि ३. वाढ (growth). या तिन्ही गोष्टींना ते सारखेच महत्त्व देतात. शाश्वतता आणि लोकशाही नसेल तर नुसती वाढ म्हणजे विकास नाही, हे म्हणण्याची हिंमत पर्यायवाद्यांनी दाखवली. रूढ विकासनीतीत मात्र वाढ या मुद्द्यापुढे लोकशाही आणि शाश्वतता हे मुद्दे गौण ठरतात.
- आजपर्यंत समतेच्या संदर्भात वाटप या दृष्टीने खूप मांडणी झाली. पण रूढ विकास नीतीतील तंत्रज्ञान आणि उत्पादनपद्धती यातच कोठेतरी चुकत आहे अशी मांडणी प्रथम पर्यायवाद्यांनीच केली.
- 'उपभोगावर नियंत्रण' हे सामाजिकदृष्ट्या आवश्यक आहे हेही पर्यायी मांडणीत प्रथम मांडले गेले.
- असे दिसते की एकच पर्यायवादी संघटना एकापेक्षा जास्त दृष्टिकोनातूनही काम करते. तरी प्रश्न सुटतात असे दिसत नाही. त्यामुळे त्यातील त्रुटी शोधायला हव्यात.
- आपण पर्यायवादी मानसिक पातळीवर जरी रूढ विकासनीतीच्या प्रभावाखालून बाहेर पडलो असलो, तर व्यावहारिक पातळीवर शिक्षणात सर्वोत्तम गुणवत्तेचा पगडा किंवा कॉम्प्युटर, इंटरनेट यांच्या मोहातून बाहेर पडणे आपल्याला शक्य झाले आहे का? आपण आत्मपरीक्षण केले पाहिजे नाहीतर लोकांना आपल्या बोलण्यात आणि वागण्यात फरक आहे असे वाटेल.
- चळवळीच्या दृष्टीने तंत्रज्ञानाला डावलून चालणार नाही.
- पर्यायाची मांडणी करताना विज्ञान तंत्रज्ञानाचा सुयोग्य वापर करण्याबाबत आपण उदासीन आहोत का? उदा. एका तालुक्यात जवळजवळ साडेतीनशे वनौषधींची माहिती आम्ही जमा केली. आता या माहितीचे नेमके काय करायचे हा प्रश्न आमच्यासमोर आहे. त्याचे प्रमाणीकरण (Standardization) करण्याचे तंत्रज्ञान आमच्याजवळ नाही. किंवा कोकणात शेकड्याने विकला जाणारा आंबा शहरात डझनाने विकला जातो. त्याचे प्रोसेसिंग आणि मार्केटिंग करण्याचे तंत्रज्ञान हे आता अपरिहार्य आहे हे आपल्या मांडणीत यायला हवे आहे.
- परंतु वनौषधी लोक वापरत आहेत, म्हणूनच त्यांची माहिती मिळाली ना? त्याचे व्यापारीकरण आम्ही करू शकलो नाही, असेच म्हणायचे आहे का? तंत्रज्ञान वापरून काय मिळवायचे आहे? आंब्याच्या प्रोसेसिंगचे तंत्रज्ञान मिळाले की तो निर्यात होणार आणि पोराबाळांना मिळणार नाही.
- वनौषधींच्या बाबतीत गेली १०-१५ वर्षे व्यापारीकरण टाळूनसुद्धा ते उपजिविकेचे साधन कसे बनवायचे याविषयी काम चालले आहे. हे काम पर्यायी विकासाच्या प्रवाहात असणाऱ्यांनी केले आहे. एकदा व्यापारीकरण झाले की त्या वनौषधींची स्थानिक उपलब्धता आणि उपयोग लगेच कमी होतो. काही लोक सरळ जंगलातून वनौषधी गोळा करून एकत्र जमवतात व बहुराष्ट्रीय कंपन्यांना विकतात.

ह्याबाबत काय करता येईल? गेली १५-२० वर्षे यावर काम सुरू आहे पण ते एका टप्प्यावर येऊन थांबले आहे.

- हल्ली बहुराष्ट्रीय कंपन्या वनौषधींची माहिती गोळा करून त्यांचा आपल्या औषधात उपयोग करतात. पण घरगुती औषधांचा वापर आता कमी झाला आहे. आता लोक आजारी पडले की डॉक्टरकडेच जातात.
- कारण त्यामागे विज्ञान-तंत्रज्ञानाचे वलय आहे.

**प्रतिसाद :**

तंत्रज्ञान कसे वापरले जाते ते महत्त्वाचे आहे. तंत्रज्ञानाचा विकास आणि उपयोग यावर वंचित घटकांचे नियंत्रण असायला हवं. यासाठी तंत्रज्ञान कसे विकसित केले जाते ते महत्त्वाचे आहे. नाहीतर त्याच तंत्रज्ञानाचा वंचितांची परिस्थिती आणखी वाईट करण्यासाठी उपयोग होऊ शकतो. उदा. मातीची उत्पादकता वाढविण्यासाठी काही लोकांनी चांगल्या हेतूने काम केले. पण ते संस्था/संघटनांशी फटकून राहिले. त्यामुळे या कामाचा वंचितांना उपयोग झाला नाही. ऊर्जेचे उदाहरण घ्यायचे तर ६०-७० च्या दशकात पवनचक्क्यांपासून ऊर्जानिर्मिती करण्यावर खूप काम झाले. त्यावेळी लोकांना असे वाटत होते की त्यातून ऊर्जेचे सगळे प्रश्न सुटतील. पण समाजाच्या इतर गरजांना अनुकूल असे ते काम नसल्यामुळे ते समाजाने स्वीकारले नाही. पण ते तंत्रज्ञान आता महाराष्ट्रातल्या मोठ्या उद्योगांनी स्वीकारले आहे आणि त्यांनी जो दर लावला आहे तो इतका जास्त आहे की त्यासाठी अनुदान द्यावे लागते. त्यामुळे वंचितांना जे अनुदान जायचे ते या लोकांना जाते.

- व्यूहनीतीमधे 'सरकार' (state) हा संदर्भही हवा. त्याबाबत आपल्याला एक स्पष्ट भूमिका घ्यावी लागेल. आपण सरकारविरुद्ध आंदोलनेही करतो, पण ती आंदोलने सरकार जास्त लोकाभिमुख व्हावे यासाठी असतात.
- सरकारची धोरणे जेव्हा ठरतात तेव्हाच आपले प्रतिनिधी तिथे कसे असतील याचा व्यूहनीतीत विचार हवा. अंमलबजावणीसाठी सरकारी यंत्रणेचा कसा वापर करून घेता येईल याचाही विचार हवा.
- कोणत्याही पातळीवरची राज्यव्यवस्था असो- देश, राज्य किंवा पंचायत पातळीवरची - कल्याणकारी राज्याचे प्रतिमान आपण गृहीत धरतो.
- हक्कांची भाषा आता शासन आणि निधी पुरविणाऱ्या संस्था दोघेही बोलू लागले आहेत. कधीकधी तर आपण त्या भाषेत बोलावे अशी निधी पुरविणाऱ्या संस्थांची अपेक्षाच असते. मग आपली गोंधळल्यासारखी अवस्था होते.
- परकीय देणगीचे प्रमाण हे भारताच्या अर्थव्यवस्थेचा एक टक्का सुद्धा नाही. तेव्हा त्याचा बाऊ करण्याचे कारण नाही. त्यापेक्षा सरकारच्या योजनाच जास्त चांगल्या प्रकारे कशा राबवता येतील याचा विचार व्हावा.
- शासनाच्या गुंतवणुकीच्या पद्धतीमध्ये आपण कसा हस्तक्षेप करू शकू याचा विचार करावा. उदा. आदिवासींसाठी शासनाची जी वित्तीय तरतूद आहे, त्यापैकी ९०% रक्कम शिक्षणावर खर्च होते. इतर कोणत्याही गोष्टीवर काही खर्च होत नाही.
- रूढ विकासनीतीत असणारे कायदे, धोरणे, योजना या फसव्या, अपुऱ्या आहेत हं सातत्याने जाणवत आले आहे. उदा. ग्रामसभेच्या अधिकारांबद्दल बोलले जाते. पण जमीन, जंगल, पाणी यावर ग्रामसभेला खऱ्या अर्थाने काहीच अधिकार नाहीत. उलट त्या अधिकाराचे अजून केंद्रीकरणच झाले आहे. दुसरे उदाहरण म्हणजे महाराष्ट्र सरकारने अलीकडे सेंद्रिय शेतीचे धोरण अवलंबायला सुरुवात केली आहे. रासायनिक खतांचे कारखाने ज्यांनी काढले ते आता आपले कारखाने बंद करून सेंद्रिय खतांचे कारखाने काढतील. सामान्य शेतकऱ्यांचा त्यात काही फायदा होणार नाही.
- रूढ विकासनीतीतले कायदे फार फसवे असतात. उदा. पाणीविषयक कायदा. त्यावरून असे वाटते की सगळे लोकांच्याच हाती आहे. पण प्रत्यक्षात तसे नसते. तसेच स्थानिक आणि जागतिक याचा संदर्भ आपल्या मांडणीत जास्त स्पष्टपणे यायला हवा. म्हणजे इंग्लंडच्या अर्थव्यवस्थेला आवश्यक अशा पद्धतीने भारतीय अर्थव्यवस्था, शेती इ. कसे घडवले





जातात हे स्पष्ट होणे महत्त्वाचे आहे. कल्याणकारी अर्थव्यवस्थेच्या काळात राष्ट्रीय स्वावलंबनाचा विचार झाला, पण स्थानिक स्वावलंबन बघितले गेले का? हे प्रश्न व्यूहनीतीमध्ये उपस्थित करणे महत्त्वाचे आहे.

- स्थानिक पातळी म्हणजे काय हे स्पष्ट व्हायला हवे. गाव हे एक एकक असे आपण म्हणतो तेव्हा बाजार-गाव आणि संस्कृती, विनिमय माहिती या मार्गांनी त्याच्याशी जोडली गेलेली इतर गावे असा अर्थ आपण गृहीत धरतो का? कार्यकर्ते जेव्हा प्रत्यक्ष बांधणी करायला लागतील तेव्हा या सगळ्या परिमाणांचा विचार त्यांनी आधीपासूनच करायला हवा. आपण गाव हे जर विकासाचे एकक असे गृहीत धरले, तर गावात ग्रामपंचायत, पतसंस्था या ज्या संस्थांशी पदोपदी संबंध येतो, त्यांचा आणि वस्तू-वस्तू विनिमयाच्या पद्धतीचा विचार बाजारव्यवस्थेच्या संदर्भात करायला हवा.
- बाजारव्यवस्था ही सर्व शेतकऱ्यांची, अगदी लहानात लहान शेतकऱ्यांचीही गरज असते. महाराष्ट्रातील ५०% शेतकरी आपला माल अडचणीच्या वेळीच विकतो, कारण त्याला आपल्या अन्य गरजा भागवायच्या असतात. उपजीविकेच्या दृष्टीतून बाजार ही गरज आहे. त्यामुळे आपल्या मांडणीत बाजाराची व्याप्ती कशी असावी, त्यावर नियंत्रण कोणाचे असावे हे मुद्दे यावेत. शहरात ज्याला मागणी असते असे उत्पादन शेतीतून न काढता गावपातळीवर ज्याची गरज आहे असे उत्पादन काढायला हवे.
- आपल्याला बाजारव्यवस्थेची पुरेशी माहिती नसते. उदा. भाव कसे ठरतात, इ. म्हणून या सर्वांची माहिती करून घेणे आवश्यक आहे. तसेच अनुदाने कशाला दिली जातात हेही पहायला हवे. सेंद्रिय खत महाग आणि रासायनिक स्वस्त असते. शेतकरी शेणखत, लेंडीखत विकून त्यातून आलेले अर्धे पैसे रासायनिक खत विकत घेण्यासाठी आणि उरलेले अर्धे भाजी, डाळ घेण्यासाठी वापरतात.
- आज असे बचत गट आहेत की जे दोन-तीन वर्षे काम करत आहेत. पण बाजारव्यवस्थेत उभे राहण्याइतकी ताकद नसल्यामुळे पुढे काय करायचे हा त्यांच्यापुढे प्रश्न आहे.
- जमीन, पाणी, ऊर्जा या संसाधनांविषयी बोलताना समन्यायी वाटपाचा मुद्दा जास्त ठाशीवपणे व्यक्त व्हायला हवा.
- मानवनिर्मित साधनांच्या बाबतीतही समन्यायी वाटपाचा विचार करायला हवा. उदा. धरणाचे पाणी धरणाजवळच्या आणि दूरच्या लोकांना वेगवेगळ्या प्रमाणात उचलता येते.
- क्षमतावर्धनाच्या मांडणीत क्षमतावर्धन हे आत्मसन्मान राखून झाले पाहिजे हा मुद्दा हवा.
- नैसर्गिक संसाधनांवर आधारित असणाऱ्या उपजीविकेला प्रतिष्ठा/पैसा कसे मिळवून देता येईल याचा विचार करायला हवा. उपजीविका सुरक्षिततेचा विचार करताना बियाणाच्या सुरक्षिततेचाही विचार करावा. पूर्वी शेतकरी बियाणासाठी ५-६ कणसं बाजूला काढून ठेवायचे. हल्ली शेतकऱ्याकडे बी नसते, त्याला विकतच घ्यावे लागते.
- माहिती प्रभावीपणे लोकांपर्यंत पोचवण्याची नवी, प्रभावी तंत्रे शोधून काढायला हवीत कारण जुने मार्ग आता प्रभावी ठरत नाहीत.
- आजच्या परिस्थितीत साधेपणा म्हणजे दीनपणा असा अर्थ झाला आहे. स्वतःवर उपभोगाच्या बाबतीत बंधने घालून घेऊन त्याला प्रतिष्ठा कशी मिळेल याचा विचार करायला हवा.
- सेंद्रिय शेती लोकांनी स्वीकारावी असे वाटत असेल तर 'परवडणारी शेती' अशा शब्दात म्हणजे आर्थिक व्यवहाराच्या भाषेत सांगितले तरच लोकांना पटेल आणि ते स्वीकारतील.
- बचतगटाच्या गेल्या १३ वर्षांच्या अनुभवानंतर आता हक्कांच्या दिशेने त्यांची वाटचाल व्हावी असे वाटते. पण हे शिवधनुष्य आपल्याला पेलणार का, असा प्रश्न आहे.
- गावापर्यंत चांगल्या गुणवत्तेच्या शिक्षण, आरोग्य या सुविधा पोचल्या पाहिजेत. मनोरंजन, माहिती, तंत्रज्ञान हेही गेले पाहिजे.
- पश्चिम महाराष्ट्रात साखर कारखाना या प्रतिमानाचा

अनुक्रमणिका

प्रभाव आहे. पर्यायी मांडणी लोकांनी स्वीकारावी यासाठी काय करावे लागेल याचा विचार व्हावा.

**सत्र तिसरे**
**उपजीविका-केंद्री व्यूहनीतीच्या अंमलबजावणी साठी कृतीकार्यक्रम**

*सुरुवातीला प्रयासतर्फे रामचंद्र कौलगी यांनी कृतीकार्यक्रमाची (चर्चासत्रासाठी तयार केलेल्या टिपणीतील भाग ३) मांडणी केली. यामधे कृतीकार्यक्रमाची गरज व उद्देश, कार्यक्रमाच्या यशस्वितेसाठी आवश्यक घटक आणि कार्यक्रमातील उपक्रम हे मुद्दे होते.*

प्रयास : पर्याय जर उभे राहायचे असतील तर पुढील गोष्टींची एकाच वेळी आवश्यकता आहे. १) पर्यायी तंत्रज्ञान, २) नवीन आर्थिक संबंध, ३) वित्तीय रचना, ४) राजकीय बळ, ५) नवीन संस्थात्मक रचना. ६०-७० च्या दशकात अनुरूप तंत्रज्ञानाची (appropriate tech-nology) चळवळ झाली. त्यात असे गृहीत धरले होते की तंत्रज्ञान सोपे, स्वस्त, लोकांच्या आवाक्यातील केले की प्रगती होईल. पण ते तंत्रज्ञान रुजलेच नाही. कारण त्यासाठी आवश्यक ते आर्थिक संबंधच अस्तित्वात नव्हते, राजकीय बळही नव्हते. या पाचही गोष्टी एका वेळेला एकत्र येतील तरच पर्याय उभा राहू शकेल. संस्था-संघटनांनी एकत्र येऊन काम केले तर या पाच गोष्टी एका वेळी घडण्याची शक्यता निर्माण होईल. या पाचापैकी गाभ्याचा मुद्दा म्हणजे त्यामागचे राजकारण. म्हणून आपल्या सगळ्या कामाची सुरुवात हक्कांसाठी लढणाऱ्या संस्था-संघटनांपासून होणे गरजेचे आहे.

- विकासाच्या कल्पना बदलत आल्या यामागचे राजकारण स्पष्ट व्हायला हवे. तसेच स्थानिक-व्यापक (Micro-Macro) स्तरांमधील संबंध लक्षात घेण्याची गरज आहे.
- स्थानिक पातळीवर विकासाचे काम करताना त्याचा व्यापक पातळीवर काय परिणाम होतो याचे भान हवे. म्हणून Micro-Policy चा विचार आपल्या मांडणीतून अंतर्भूत करायला हवा. स्थानिक पातळीपासून जागतिक पातळीपर्यंत जो संबंध आहे, तिची समीक्षा झाली पाहिजे. ती समीक्षा तज्ज्ञांनी लोकांसमोर ठेवणे याचा फारसा उपयोग नाही. ती कार्यकर्ते आणि लोक यांच्या संवादातून घडवली गेली पाहिजे.
- लोकसहभाग याचा अर्थ लोकांनी श्रमदान करणे असा होऊ शकतो. त्याऐवजी 'लोकांनी निर्णय घेणं' असा शब्दप्रयोग हवा.
- या सगळ्या मांडणीत कोणीतरी कोणालातरी देत आहे अशी भावना दिसते. 'माझ्यामधल्या कर्तेपणामधून मी नवीन जीवनपद्धती निर्माण करतो आहे' अशी भावना हवी.
- कार्यक्रमाची उद्दिष्टे कल्पनेच्या पातळीवर न राहता त्याच्या घटकांचा तपशील ठरवणे आवश्यक आहे.
- संशोधन/विश्लेषण/माहिती संकलन याआधीची पायरी अशी असायला हवी - संघटनेच्या पातळीवर, जनसमूहांच्या पातळीवर जो वैचारिक पाया असेल त्यातून माहिती संकलन/विश्लेषण यायला हवे.
- प्रयासच्या मांडणीत संकल्पनात्मक पातळीवरची व्यापक भूमिका कृतीकार्यक्रमाच्या पातळीवर आली नाही.
- आपल्याकडे काय काय गोष्टी आहेत (कोणत्या संघटना, कशा प्रकारच्या) हे लिखित स्वरूपात असावे.
- आपल्या भूमिकांमध्ये मूलभूत फरक आहे. सरकार तुमच्या नियंत्रणाला मान्यता देणार म्हणजे काय? असे होऊ शकत नाही हे अनेकदा दिसले आहे. म्हणून सरकारला योजना स्वीकारायला लावणे हे उद्दिष्ट असू शकत नाही. आपले उद्दिष्ट लोकांची ताकद वाढवत नेऊन खऱ्या अर्थाने सत्ता लोकांच्या हातात येणे हेच असले पाहिजे. आणि सत्ता म्हणजे फक्त निर्णयप्रक्रियेची, पदांची सत्ता नव्हे. निवडणुकीत कोणाला तरी निवडून आणणे नव्हे.
- आपण पर्यायी विकासाची आखणी करायची गोष्ट करतो आहोत. म्हणून शासनाकडून काहीतरी मिळवायचे इतका त्याचा संकुचित उद्देश असू शकत नाही. आज सामान्य माणूस उपाशी असेल, तर सरकारची वाट पाहत नाही. स्वतःच हातपाय

अनुक्रमणिका

हलवतो.

- आपल्या रणनीतीमध्ये, सरकारी पातळीवर काय करायचे हा एक भाग असू शकतो. पण ते अंतिम उद्दिष्ट होऊ शकत नाही. कार्यक्रमच सरकारी व्हावा हे आमचे उद्दिष्ट नाही.
- सरकारचा कार्यक्रम चांगला असेल, तर स्वीकारायला काय हरकत आहे?
- आपली अपेक्षा मर्यादीत आहे. सरकार अनेक योजना स्वीकारते, त्यामध्ये त्यांनी आपली योजना स्वीकारावी, इतकेच आपले उद्दिष्ट आहे. सरकारकडून आर्थिक मदतीशिवाय आणखी काय अपेक्षा करणार?
- सरकारशी पूर्ण फटकून का राहायचे? जर सरकारकडून काही फायद्याचे कार्यक्रम राबविता आले, तर का राबवू नयेत?
- सरकार हे काही वेगळे आहे, असे गृहीतक नको. आपली मांडणी राजकीयच आहे. सरकार किंवा राजकीय बदल हा आपल्या कामाचा भाग म्हणून स्वीकारावा.
- लोकशाही म्हणजे लोकांची सत्ता नसून लोकप्रतिनिधींची आहे सत्ता असते. समूह (Unit) जितका लहान उदा. ग्रामसभा/पाडा तितके लोकांना जास्त प्रतिनिधित्व मिळेल. पण ग्रामसभेला/ ग्रामपंचायतीला काही अधिकारच नाहीत. सरकार म्हणजे गावाबाहेर आहे, असे नसून सरकार गावातच आहे असे वातावरण निर्माण व्हायला हवे.
- पर्यायी योजनांबाबत सरकारी अधिकाऱ्यांचा सहभाग तर घ्यायलाच हवा. पण त्यांच्याबरोबरचा आपला संवाद आणि लोकांबरोबरचा संवाद हा आपण जाणीवपूर्वक करणे आवश्यक आहे. कारण सरकार आणि आपण यातल्या सीमारेषा लोकांच्या मनात धूसर असतात. म्हणून याबाबत जाणीवपूर्वक प्रशिक्षण करावे लागेल. रूढ विकासनीतीला छेद देईल असे काहीतरी आपल्या कार्यक्रमातच कसे असेल ते बघावे.
- निर्णयप्रक्रिया जास्तीतजास्त खालच्या पातळीवर नेणे गरजेचे आहे. लोकांना फक्त शिफारसीचे अधिकार नकोत, निर्णयाचे अधिकार हवेत. उदा. आज ग्रामपंचायतीला फक्त शिफारसीचे अधिकार आहेत.
- पारदर्शकतेसाठी वर्गीय प्रतिनिधित्व पाहिजे. उदा. ग्रामपंचायतीत शेजमजूरांचा प्रतिनिधी, मध्यम शेतकऱ्यांचा प्रतिनिधी हवा.

**प्रतिसाद :**

निर्णयप्रक्रियेत तीन गोष्टींचा समावेश होतो. (१) निर्णय घेणे, (२) अंमलबजावणी आणि (३) (अंमलबजावणी होत असताना) तपासणी. आता लोकांचे नियंत्रण कसे असावे? त्याची प्रशासकीय/व्यवस्थापकीय अंगे कोणती असतील. एखाद्या गोष्टीवर लोकांचे नियंत्रण आहे असे आपण केव्हा म्हणू? लोकांचे नियंत्रण म्हणजे काय? नियंत्रणात, १. सहभाग, २. पारदर्शकता आणि ३. उत्तरदायित्व या गोष्टींचा समावेश होतो. हे प्रश्न वेगवेगळ्या क्षेत्रात - उदा. वीज, पाणी, विमा, शिक्षण आपल्यापुढे फार लौकरच येणार आहेत.

- ग्रामदानाची मूलभूत संकल्पना आणि ग्रामदानाचा कायदा याचा आपल्याला पर्यायी योजनांसाठी वापर करता येईल का?
- जर प्रस्थापित चौकट तशीच असेल, तर कायदा कसा फोल ठरतो हे रायगड जिल्ह्यात ग्रामदान कायद्याबाबत दिसून आले आहे.
- पर्यायवादी दृष्टिकोनातून काम करणारे पुष्कळदा अलग-अलग काम करत असतात. उदा. पाण्यावर काम करणारे, स्त्रियांसाठी काम करणारे इ. लोकशाहीत लोक किती संख्येने मागणी करतात हे सरकारवर प्रभाव टाकण्यासाठी महत्त्वाचे असते. म्हणून अशी काही यंत्रणा उभी करता येईल का, की भिन्नभिन्न क्षेत्रात काम करणारे पर्यायवादी एकमेकांना मदत करतील.
- वेगवेगळ्या बाबींवर काम करणाऱ्या पर्यायवाद्यांनी विचारांची देवघेव करायला हवी. उदा. एखादा धर्मनिरपेक्षतेवर काम करीत नसेल, तरी त्याची भूमिका धर्मनिरपेक्ष असणे महत्त्वाचे आहे.
- समग्र/एकात्मिक दृष्टिकोन वैचारिक पातळीवर आपल्याला माहीत आहे. पण तो गावपातळीवर

अनुक्रमणिका

प्रत्यक्ष उपक्रमात आणण्याचे महत्त्व आंता कार्यकर्त्यांना पटले आहे. उदा. शिक्षण, पाणी, स्त्रिया या सर्वांवरचे कार्यक्रम जोडून घेणे. असे केल्याने रचनात्मक, संघर्षात्मक, जागृतीची कामे ही जी कृत्रिम विभागणी आहे, ती दूर व्हायला मदत होते.

- अनेक विषयांवर एका वेळी काम करता येत नाही अशी समजूत आहे, अनेक स्वयंसेवी संस्थांनी 'प्रकल्पाधिष्ठित कामा'चे प्रतिमान प्रश्न न विचारता स्वीकारलेले आहे. उदा. शिक्षणाचे, आरोग्याचे, शेतीचे काम. पण शिक्षणाचे काम करतानाही त्यापलीकडे त्या लोकांचे जीवन काय आहे याचा विचार करावाच लागतो. मग त्यात शेती, आरोग्य अशा इतरही गोष्टी येतात. 'प्रकल्पाधिष्ठित काम' याऐवजी जीवनाच्या सगळ्या अंगांना भिडत काम हा मूलभूत बदल स्वयंसेवी संस्थांमध्ये यायला हवा.
- वंचितांसाठी काम करताना माझे त्यात स्थान काय, याचा विचार करावा लागेल.
- कार्यकर्त्यांनी उपभोगाबाबत लक्ष्मणरेषा आखणे आवश्यक आहे आणि कार्यकर्त्यांची बांधिलकी असणेही गरजेचे आहे.
- उपभोगाबाबत एक लक्ष्मणरेखा आखून घेणे महत्त्वाचे आहे. सामाजिक जीवनशैलीचा विचार करायला हवा. हक्कांबरोबर कर्तव्यही हवे.
- विज्ञान कसे मूल्यनिरपेक्ष आहे आणि तटस्थ नाही याबद्दल जाणीव निर्माण करण्याची गरज आहे.
- लोकांची बांधणी, विचारांचे मोहोळ उठविण्याची प्रक्रिया खालच्या पातळीपासूनच सुरू व्हायला हवी. नाहीतर वरच्या पातळीवर केलेल्या धोरणवकिलीचा किंवा कायद्यामध्ये बदल करण्याच्या प्रयत्नांचा काही उपयोग होणार नाही.

**२० जुलै आणि १० ऑगस्टच्या चर्चासत्रातून पुढे आलेल्या इतर कार्यक्रमात्मक सूचना**

- चर्चासत्रासाठी तयार करण्यात आलेले टिपण सोप्या भाषेत करणे महत्त्वाचे आहे.
- आपले टिपण फक्त वंचितांबद्दलच नव्हे तर एकूण जीवनशैलीबद्दल हवे.
- पर्यायी विकासावरील विचारविमर्षाच्या या प्रक्रियेत सातत्य टिकून राहावे. ती काही काळानंतर बंद पडू नये. समान प्रश्नांवर सर्वांनी एकत्र येऊन लढावे.
- पर्यायी विकासाच्या कार्यक्रमाच्या वेगवेगळ्या भागांच्या मांडणीची जबाबदारी वेगवेगळ्या लोकांनी घ्यावी.
- कार्यकर्त्यांमध्ये संपर्क व संवाद घडून त्यांच्या चर्चेतून पुढे येणाऱ्या सूचनांचे संकलन प्रयासकडे करावे.
- या विषयावर कार्यकर्त्यांच्या विभागीय पातळीवर व स्थानिक पातळीवर बैठका, चर्चा व्हाव्यात.
- उपस्थित नसणाऱ्या कार्यकर्त्यांबरोबर स्थानिक पातळीवर चर्चा व विचारविनिमय करावा.
- पर्यायी विकासाच्या संदर्भात होणाऱ्या विविध प्रयोगांचे प्रत्यक्षदर्शन करावे.
- शाश्वत विकासाबाबत उपलब्ध असणाऱ्या पर्यायांचा अभ्यास करावा.
- महाराष्ट्रात उपलब्ध असणाऱ्या पर्यायी व शाश्वत विकास विषयक साहित्याचे प्रयासने संकलन करावे. ज्यांच्याकडे अशा प्रकारचे साहित्य उपलब्ध असेल त्यांनी ते प्रयासकडे पाठवावे.
- आम्ही चार संघटना एकत्रित काम करतो व गावात अनौपचारिक अभ्यासगट चालवतो. तेथे आम्ही चर्चा घडवून आणून त्यांची प्रतिक्रिया काय ते पाहू शकतो.
- आंबेडकर अकादमीत यावर चर्चा घडवून आणता येईल. कार्यकर्त्यांच्या कार्याचे/कामाचे मूल्यमापन व्हावे.
- कार्यकर्त्यांचे क्षमतावर्धन आवश्यक आहे.
- झालेल्या चर्चेवरील टिपण तयार करून ते सर्वांना पाठवावे.

✠ ✠ ✠

To reduce even by one iota human folly or unnecessary pain is good enough for me.

- Sidney Webb







अनुक्रमणिका

# भारतातील विरोधी पक्षांचे राजकारण

विनायकराव कुलकर्णी
(स्मृतिगत ज्येष्ठ समाजवादी विचारवंत)

भारताची लोकसभा व घटक राज्यांच्या विधानसभा यांच्या आतापर्यंत झालेल्या निवडणुकांचे (निवडणूक आयोगाचे) अहवाल प्रसिद्ध झालेले आहेत. त्यावरून या देशात आतापर्यंत निरनिराळ्या वेळी काही विशिष्ट ठिकाणी निवडणुकी लढविणाऱ्या ८५ ते १०० पक्षांची नावे समजतात. बहुमत ज्याला मिळते तो राज्यकर्ता पक्ष व बाकीचे विरोधी पक्ष असे ओळखले जाते. निकाला अगोदरही जे पक्ष बहुसंख्य जागाही लढवीत नाहीत ते प्रथमपासूनच 'विरोधी' म्हणून समजले जातात. आपल्या देशातील लोकप्रतिनिधी म्हणून कोणाला मानायचे यासंबंधीची जी पद्धत आहे ती मुळातच वाह्यात व अन्यायकारक आहे. शिवाय निवडणुकीला संघटित पक्ष उभे असतात आणि अशा संघटित पक्षांच्या मार्फत कारभार चालायचा असतो, यांचे भान अगर महत्त्व अजिबात जाणले गेलेले नाही अशी ही पद्धत आहे. प्रत्येक मतदाराच्या मताची किंमत सारखी मानलेलीच नाही. म्हणून तर एकाच सभागृहात बसणारा एक प्रतिनिधी त्याच सभागृहातल्या प्रतिनिधित्वाची निवडणूक लढविणाऱ्या पराभूत उमेदवारापेक्षा कमी मते मिळालेलासुद्धा असू शकतो. एवढेच नव्हे तर विजयी उमेदवाराची अनामत रक्कमही जप्त होऊ शकते असे घडले आहे. झालेल्या मतदानाची टक्केवारी आणि सभागृहातील पक्षाच्या सभासदांची टक्केवारी यांचा काही संबंध असावा असेही गृहीत धरलेले नाही. म्हणून ४०-४२ टक्के मतदान तर जागा ६०-७० टक्के असे विपरीत दृश्य निर्माण होते. ही सर्व 'अनागोंदी' एवढ्यासाठी खपवून घ्यायची की, सरकार स्थिर असावे, व मते व जागा यांच्यातील गणिती संबंधांमुळे कोणालाच बहुमत नाही असा पेच निर्माण होऊ नये, असा युक्तिवाद केला जातो. पण ही अडचण इतकी दुर्लंघ्य नाही. मते व जागा यांचा न्याय्य संबंध ठेवून ही अडचण दूर करता येणे अगदी शक्य आहे. पण त्या योजनेचे स्पष्टीकरण करणे या त्रोटक लेखाचा हेतू नाही. मग या अडचणींचा मी उल्लेख तरी का करीत आहे? त्याचे कारण हे आहे की, लोकमताचा पाठिंबा असूनही जागा न मिळाल्यामुळे येथल्या राजकीय विरोधी पक्षांना निराशेचा व तत्त्वच्युतीचा फटका फार जोरात बसलेला आहे. अर्थात हा फटका बसला नसता (वरील पद्धतीमुळे) तर सर्व काही ठीकठाक झाले असते असे म्हणण्याचा उद्देश नाही. याशिवाय पक्षांची राजकीय समज व त्यांची सार्वजनिक चारित्र्य यासंबंधीची कमतरता हीही कारणे महत्त्वाची आहेतच.

भारत भाग्यविधाता पंडित नेहरूंच्या हयातीतील काँग्रेस संघटनेने खरे म्हणजे लोकशाहीला अभिप्रेत असलेल्या सत्ताधारी - विरोधी राजकीय संघटनांची जरुरी मनापासून कधी मान्यच केलेली नव्हती. म्हणून त्याची मांडणी व करणी अशी की, 'काँग्रेस एक शानदार जमान है; अक अबु हवा है, एक मुव्हमेंट है, कारवाँ चल रहा है, लोग आते है, जाते है। यह कोई सियासी पार्टी नही है।' तेव्हा ज्यांना या यात्रेत यायचे असेल त्यांनी यावे अगर येऊ नये. आज 'काँग्रेस कल्चर' या शब्द प्रयोगाने हीच वृत्ती प्रगट केली जात आहे. १९५३ साली जयप्रकाश नारायण यांच्याशी नेहरूंनी बोलणी केली त्यावेळी दोन पक्षांतील बोलणी व्हावी असे स्वरूप जेव्हा त्या बोलण्याचे आढळले त्यावेळी नेहरूंनी हात झटकले. 'काही व्यक्तींनी (जयप्रकाश , नरेंद्र देव वगैरे) सहकार्य करावे, होईल ते पहावे व जमेल ते करावे, त्यासाठी समयबद्ध कार्यक्रम व त्याची चर्चा जरूरीच काय?' अशी नेहरूंची भूमिका होती. काँग्रेस पक्षाचा पराभव करून प्र. स. पक्षाच्या तिकीटावर निवडून आलेल्या टी. प्रकाशम्‌ना असेंब्लीत काँग्रेस पक्षाचे सभासदत्व व मुख्यमंत्री पदे देण्यात नेहरूंना राजकीय पक्ष, लोकशाही परंपरा व त्या संदर्भातील व्यवहार यांची काहीही चाड वाटली नाही. अर्थात टी. प्रकाशम्‌ना तर नाहीच नाही. काँग्रेस आणि इतर राजकीय पक्ष यांच्या सार्वजनिक चारित्र्यासंबंधीच्या अशा आणखी कलंकित घटना देता येतील. पण इत्यर्थ एवढाच की, अलग राजकीय पक्ष, त्यांच्या भूमिका व त्या पार पाडण्यासाठी संघटन, शिक्षण व नेतृत्वाची दुर्दम्य इच्छाशक्ती यांच्या अभावामुळे आज सर्व 'राडा' झाला आहे. केवळ काही व्यक्तींची स्वार्थलोलुपता आणि मान्य भूमिकेविरोधी संधिसाधूपणा यामुळे नुकसान होते असे नाही. परिवर्तनाच्या व

नव्या मांडणीच्या संदर्भातील गैरसमज हेही आजच्या विरोधकांच्या व राज्यकर्त्यांच्याही वाताहतीला कारणीभूत आहेत. काही काही वेळेला तर असे वाटते की, निरनिराळ्या राजकीय पक्षांचे वर्तन हे जातिव्यवस्थेला आधारभूत असलेल्या वैचारिक बैठकीचा अजाणतेपणाने का होईना पण स्वीकार केल्यासारखे घडत आहे काय? संयुक्तप्रांत किंवा मध्यप्रदेशातील विरोधकांनी जसे वागावे असे इंदिरा काँग्रेसला वाटते त्याप्रमाणे इंदिरा काँग्रेस जेथे विरोधक आहेत त्या बंगालमध्ये तसे का वागत नाही? कारण असेच आहे की, राज्यकर्ते झाल्यावर राज्यकर्त्यांसारखे वागायचे व जिथे विरोधक असू तिथे विरोधकांचा 'जाति'धर्म पाळायचा असे हे अलिखित मान्यताप्राप्त नीतिशास्त्र आहे. 'देशाचे शत्रू म्हणून विरोधकांना निवडून देऊ नका' असे सांगणारे आजचे पंतप्रधान त्याच देशद्रोह्यांशी राष्ट्रीय प्रश्नाबाबत सहकार्याची मागणी करतात; व ते दिले पाहिजे असे सांगणारे तपोनिधीही लोकशाहीच्या नावानेच आवाहन करतात हे काय आहे?

मार्क्सवादी कम्युनिस्ट पक्ष हे या देशातील राज्यकर्त्यांसंबंधीची विरोधी पक्षांच्या संबंधीची भूमिका घेताना एक प्राणभूत निकष असा लावतात की, अमेरिका व सोव्हिएत युनियन यांच्यातील संबंधांविषयी इतर राजकीय पक्षांचे काय म्हणणे आहे, ते तपासून त्यासंबंधीची भूमिका त्यांच्या भूमिकेशी मिळतीजुळती असेल तर मग बाकीचे सर्व प्रश्न विचारात घ्यायचे. (लोकशाही, संयुक्त आघाडी वगैरे.)

घटना घडत असताना त्यासंबंधी त्याचवेळी मत व्यक्त करता आले पाहिजे; आपल्या विचारांचा प्रचार करता आला पाहिजे. त्या आधारावर संघटन करता आले पाहिजे व लोकमान्यता मिळवून बदल घडविता येण्याची शक्यता असली पाहिजे. नाहीतर स्टॅलिननंतर क्रुश्चेव्ह, ब्रेझनेव्ह नंतर अँड्रोपॉव्ह, व चेर्नेन्को नंतर गॉर्बेझॉव्ह यांनी मानले तरच 'दुरुस्त्या' व्हाव्यात ही रीत किंवा पद्धत काय म्हणून? विरोधी म्हणणे मांडण्याचा अधिकार असला पाहिजे व तो निर्भयपणे अमलात आणता आला पाहिजे. या म्हणण्यात केवळ व्यक्तिस्वातंत्र्याची पूर्तता किंवा लोकशाहीचा एक शोभिवंत आविष्कार अशी कल्पना नाही; तर संघटित पक्ष म्हणून चर्चेनंतरही ज्या भूमिका मांडल्या जातात त्यात काही उणिवा व चुका असण्याची शक्यता आहे व त्या दाखविण्याची व दुरुस्त करण्याची सोय असली पाहिजे हा विचार आहे. हे काम केवळ पक्षांतर्गत चर्चेवरच सोपवून कसे चालेल? भारतातल्या सार्वभौम राजकीय सत्तेचा वापर हा दुनियेतील दुसऱ्या कोणत्याही सार्वभौम सत्तेच्या तालावर होता कामा नये. याचा अर्थ असा नव्हे की, कधीही कोणत्याही बाह्यशासनकर्त्यांच्या बरोबर सूर जमताच कामा नये. पण आमच्या पुरोगामित्वाची किंवा परिवर्तनवादी निष्ठेची ती अट होता कामा नये.

ज्या बहुसंख्यांकांच्या संदर्भात या सत्तेचा बदलासाठी वापर करायचा आहे तो एकसुरी पद्धतीने होणार नाही. दिशा समान हवी पण योजना व वेग याबाबतीत बहुविधता राहणारच. एका परीने रूस, चीन, पूर्व युरोप व एकंदरीने पाश्चिमात्य इतिहास यांच्या अनुभवाचा म्हटला तर मर्यादित का होईना पण इच्छाशक्ती जबर असेल तर उपयोग होऊ शकतो. धनोत्पादनाच्या साधनांच्या मालकीबरोबर नव्या मानवाच्या मनोसाधनांचाही विचार केला नाही तर सोव्हिएट युनियनचे माजी अध्यक्ष व पक्षचिटणीस कॉ. चेर्नेको यांनी जून १९८३ मध्ये क. पक्षाच्या मध्यवर्ती समितीला सादर केलेल्या अहवालात व्यक्त केलेली चिंता फुकटच म्हणावी लागेल. कॉ. चेर्नेन्को म्हणतात, 'All the efforts to educe and from a new man are not able to eradicate drunkenness, hooliganism, sponging, speculation and theft of socialist property, bribetaking and money-grabbing.' जगातल्या अत्यंत सामर्थ्यशाली मार्क्सवादी राष्ट्राच्या प्रमुखाला चिंता वाटावी इतपत हे दोष मोठ्या प्रमाणावर का आढळावेत याची शास्त्रीय चिकित्सा लोकशाही समाजवादी व समतावाद्यांनी केलीच पाहिजे. तेव्हा क्रांतिकारक समाजवादी युवकांनी भारतातल्या परिवर्तनाचा विचार लोकशाहीच्या संदर्भात करताना निर्धाराबरोबर सावधगिरी बाळगली पाहिजे. संदर्भरहित तत्त्वशुद्धतेचा आधार घेऊन एकांडे शिलेदारीने फार तर आत्मतुष्टीचे समाधान मिळेल. पण त्याचबरोबर 'व्यवहारा'च्या नावावर 'दोन घडीचा' शिराळशेटी परिणाम पदरात पडेल. या दोन्हीही विकृती आहेत. विरोधकांची ससेहोलपट या दोन टोकात हेलकावे खात आहे. प्रबोधन आणि संघर्ष, सत्ता आणि सेवा, सक्ती आणि नैतिकता, उत्स्फूर्तता आणि नियोजितकार्य यांत द्वैत नाही. असेलच तर द्वंद्व आहे. यांच्या परस्पर संबंधातील गतिमानता लक्षात घेतल्याशिवाय कोणतीही संघटनात्मक वाटचाल कठीण आहे.

राजसत्तेच्या संदर्भातील ही वाटचाल तर अधिकच कठीण. म्हणून निर्धार, चिकाटी व दुरुस्तीची तयारी या गुणांची फार जरुरी आहे.

✠ ✠ ✠








# लोकसंख्या व गरिबी यासंबंधी पेठे-प्रतिमान समाजशास्त्रीय दृष्टिकोनातून मूल्यमापन

य० भा० दामले, ए० रमणम्मा

[समाजशास्त्र विभाग, पुणे विद्यापीठ (निवृत्त)]

'लोकसंख्या, गरिबी आणि मानवी गुणवत्तेचे इष्टतमीकरण : नव्या युगासाठी नवीन प्रतिमान' हा वसंत प्रभाकर पेठे यांचा लेख अर्थसंवादमध्ये दोन भागात प्रसिद्ध झाला आहे. (एप्रिल व जून २००२) या लेखाचे मूल्यमापन तीन स्तरावर करण्याचे योजिले आहे. ते असे :

१. संपूर्ण प्रतिमानाचा साकल्याने विचार करून त्याचे सैद्धांतिक दृष्टीने मूल्यमापन,

२. काही निवडक प्रश्नांसंबंधी मीमांसा,

३. पेठे यंचे प्रतिमान अधिक समृद्ध व्हावे यासाठी काही रचनात्मक (constructive) सूचना.

शेवटी उपसंहार केला आहे.

### विभाग १ : सैद्धांतिक मूल्यमापन

पेठे यांनी त्यांच्या लेखात, लोकसंख्या व गरिबी या मूलभूत व गुंतागुंतीच्या समस्येवर 'तात्विक संशोधन आणि विचारमंथन व्हावे' असे सामाजिक शास्त्रज्ञांना आवाहन केले आहे. (एप्रिल ०२, पृ.३८), ते सर्वार्थाने योग्य आहे. पेठे यांचे प्रतिमान अभिनव (original), अभिजात (classic) आणि विचारप्रवर्तक आहे. या दृष्टीने त्याचे मूल्यांकन विचारमंथनला निश्चितच पोषक ठरेल.

पेठे यांचे प्रतिमान सैद्धांतिक स्तरावर नवनिर्मिती दर्शविते. अलीकडच्या काळात भारतात गरिबीसंबंधी विचार झाला तो प्रायः दारिद्र्यरेषेसंबंधी होता. या विषयावरील सुखात्मे-दांडेकर वाद सुप्रसिद्ध आहे. पेठे यांनी दारिद्र्यनिर्मूलन आणि लोकसंख्या नियंत्रण यासाठी जो एक पथनकाशा (roadmap) दर्शविला आहे (पृ.१०७) तो खरोखरीच तर्कशुद्ध, वास्तववादी आणि नाविन्यपूर्ण आहे. हा पथनकाशा कार्यान्वित केला, तर दारिद्र्य-निवारण तर होईलच, पण त्याबरोबर लोकसंख्यासकट अनेक गरिबीजन्य प्रश्न सुटू शकतील. सैद्धांतिक दृष्टीने, पेठे यांच्या विचारसरणीची काही खास वैशिष्ट्ये आहेत. त्यापैकी काही महत्त्वाच्या पैलूंचे त्रोटकपणे विविचन करू.

१. पेठे-प्रतिमान हे एखाद्या गणितीय मॉडेलप्रमाणे (mathematical model) संकुचित किंवा मर्यादित नाही. ते समाजपुरुषाचे अनेक अंगउपांग विचारात घेते. शास्त्रीय परिभाषेत ते एक 'आंतर-शास्त्रीय प्रतिमान' (inter-disciplinary model) आहे. त्यांनी प्रतिपादन केलेला मध्यवर्ती सिद्धांत (पृ. ४६), सामाजिक परिवर्तनाच्या प्रक्रियेतील दाखविलेले कार्य-कारण साखळीतील दुवे (पृ. १०७), मानवी गुणवत्तेसाठी अनिवार्य असलेली ज्ञान, आरोग्य व संस्कार ही त्रिसूत्री (पृ. १०६) आणि विकृति-प्रकृति-सुसंस्कृती या संकल्पना (पृ.११०) यासंबंधीच्या सर्व विवेचनात त्यांचा आंतरशास्त्रीय दृष्टिकोन प्रकर्षाने प्रतीत होतो. नवमाल्थसवाद हा 'आंतरशास्त्रीय सिद्धांत' होऊच शकत नाही. कारण तो लोकसंख्या व गरिबी या केवळ दोनच चल घटकात बंदिस्त झाला आहे. (two variable model.) पेठे-मॉडेलमध्ये आर्थिक, लोकसंख्याशास्त्रीय, सामाजिक, मानसिक, नैतिक असे अनेक चलघटक असल्यामुळे ते बहुचलघटक मॉडेल (multivariable model) झाले आहे. म्हणून अनेक ज्ञानशाखांचा समावेश ओघाने त्यामध्ये झाला आहे.

२. आंतरशास्त्रीय दृष्टिकोनाबरोबर पेठे-प्रतिमानाला विश्वव्यापकता (univarsality) प्राप्त झाली आहे. नवमाल्थसवाद किंवा निरंकुश अर्थव्यवहार वाद (laissez-faire) यासारखी एकांगी व टोकाची (extremist) प्रतिमाने भारतासारख्या बहुरूपी संस्कृति लाभलेल्या (cultural pluralism) समाजाला अप्रस्तुत, किंबहुना विघातक आहेत. म्हणून आपल्या देशातील परिस्थितीला उपयुक्त अशी विचारसरणी (paradigm) विकसित करावी, ही पेठे यांच्या सैद्धांतिक संशोधनामागची मूलभूत प्रेरणा असावी, असे दिसते. या प्रक्रियेत पेठे यांचे प्रतिमान सर्व संग्राहक (eclectic) आणि

अनुक्रमणिका

साकल्यशील (holistic) असे झाले आहे. त्यात उदारमतवादातील निकोप स्पर्धा, समाजवादातील समता आणि गांधीवादातील नैतिकता या सर्व सकारात्मक घटकांचा समावेश झाला आहे, असे पेठे यांच्या लेखाचा बारकाईने अभ्यास केला तर दिसून येते. म्हणून पेठे-प्रतिमानाला वैश्विक व्यवहार्यतेचे (universal applicability) स्वरूप आले आहे.

प्रत्येक व्यक्तीच्या सुप्त गुणवत्तेचे इष्टतमीकरण होणे हे बहुतेक सर्व समस्यांवर रामबाण औषध आहे. तसंच ते व्यष्टि व समष्टिसारावरील आर्थिक सुबत्तेची व सामाजिक प्रगतीची गुरुकिल्ली आहे असे पेठे म्हणतात. हा सिद्धांत भारतासारख्या विकसनशील राष्ट्रांना उपयुक्त आहे. तद्वत तो विकसित देशांनाही उपयुक्त आहे असे वाटते. दुसऱ्या शब्दात, व्यक्ती विकासासाठी व पर्यायाने राष्ट्राच्या प्रगतीसाठी 'ज्ञान-आरोग्य-सुसंस्कार' ही त्रिसूत्री-निविष्टि (input) स्थल-काल-सापेक्ष (space time- relative) नाही. ती सर्व सदाकाळ लाभदायी आहे.

पेठे-प्रतिमानच्या वैश्विक उपयुक्ततेचे सर्वोत्तम उदाहरण म्हणजे आजची एकध्रुवीय महासत्ता (unipolar superpower) अमेरिका हे होय. अमेरिकेच्या वैभवाची व प्रगतीची घोडदौड अखंडपणे कशामुळे होत आहे? याचे महत्त्वाचे कारण असे आहे की, अखिल जगतातील देशोदेशींचे ज्ञान-आरोग्य-सुसंस्कार या त्रिगुणांनी विभूषित असे दिग्गज व अनेक विश्वविख्यात बुद्धिमंत त्यांनी पैशाच्या जोरावर खेचून नेले आहेत. यात सर्व ज्ञानशाखांतील कुशाग्र बुद्धीचे व सर्जनशील शास्त्रज्ञ, तंत्रज्ञ, व्यवस्थापन तज्ज्ञ आणि कौशल्यसंपन्न कारागीर यांचा समावेश आहे. अशा तऱ्हेचा 'ब्रेनड्रेन' विशेषतः कॅनडा, ऑस्ट्रेलिया, इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी आदि प्रगत देशांकडे आणि सौदी अरेबिया, दुबई यासारख्या तेल-ऊर्जा संपन्न आखाती देशांकडे सातत्याने होत आहे. देश श्रीमंत किंवा प्रगत झाले म्हणून तेथील एकूण नागरिक तल्लख बुद्धीचे असतात असे नाही. म्हणून बुद्धीची (talent) कमतरता ते आकर्षक किंमत देऊन आयात करून भरून काढतात. असा आहे बुद्धीचा महिमा प्रगतीसाठी!

आपले राज्यकर्ते अनिवासी भारतीयांकडून (NRI = Non Resident Indians) येणाऱ्या वित्त प्रेषणाबद्दल (remittances) दिमाखाने बोलत असतात. पण बुद्धि-हरणामुळे (braindrain) देशाचे अंतिम दृष्ट्या किती अपरिमित नुकसान होत आहे हे त्यांना उमजत नाही. ही देशाची शोकांतिका आहे. एकच उदाहरण पुरेसे आहे. ज्यूंच्या छळवादामुळे अल्बर्ट आईनस्टाईन अमेरिकेत स्थाईक झाले, यामुळे जर्मनीचे केवढे प्रचंड नुकसा झाले! आमच्या नॅशनल लॅबोटरीज्, इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजीज्, इन्स्टिट्यूटस् ऑफ मॅनेजमेंट आणि मुंबई, पुणे, चेन्नई, दिल्ली, कोलकत्ता येथील नामांकित विद्यापीठे ही पाश्चिमात्य देश आणि आखाती देश यांना उच्च प्रतीची बुद्धी आणि सर्वोत्तम कौशल्य (talent and skills) पुरविण्यासाठी निर्माण केली आहेत की काय असा खडा आणि परखड सवाल आम्ही सजग व स्वदेश प्रेमी विचारवंतांनी बेताल, अपरिपक्व व अदूरदर्शी राज्यकर्त्यांना केला पाहिजे. या 'ड्रेन' झालेल्या 'ब्रेन्स'वर पालकांचा व समाजाचा केवढा प्रचंड पैसा आणि विशेषतः मातापित्यांचे शारीरिक श्रम व मानसिक चिंता या रूपाने होणारी निविष्टि - (ज्याची किंमत पैशांत मोजता येणार नाही) - खर्ची पडते, यांचा अंदाज करणे शब्दांच्या व आकड्यांच्याही पलीकडचे आहे. जगभरातील भारतासारख्या देशातून 'ब्रेन' आणि 'स्किल्स' यांच्या सरिता अमेरिकेसारख्या महासागराला अखंडपणे मिळत राहिल्या तर अमेरिका अखंडपणे एकमेव महासत्ता राहणार आणि भारतासारखे ब्रेनड्रेन झालेले देश आणि अल्प विकसित देश (less developed countries) यामधील विषमतेची दरी अधिकाधिक वाढतच जाणार. सारांश, पेठे यांची विचारसरणी - विशेषतः त्यांचा त्रिसूत्री निविष्टी सिद्धांत - मूलभूत आणि सर्वसमावेशक असल्यामुळे ती सर्वच देशांना उपयुक्त वैश्विक व्याप्तीची आहे हे सिद्ध होते. विकसनशील देशांनी यातून धडा घ्यायचा तो हा की, आपण हरएक व्यक्तीला त्रिसूत्री निविष्टीने सक्षम केले पाहिजे. आणि अशा गुणवत्ता संपन्न व्यक्तींना ब्रेनड्रेनमध्ये वाहून जाऊ देता कामा नये. आपल्या देशाच्याच प्रगतीसाठी त्यांचा उपयोग करून घेला पाहिजे. चीन किंवा जपान यासारख्या देशांनी भारतापेक्षा अधिक वेगाने आर्थिक, वैज्ञानिक व तांत्रिक प्रगती केली याचे मर्म यातच आहे. आपला ज्ञान व कौशल्य ठेवा आपल्या देशात राहिला पाहिजे. यासाठी सर्जनशील ज्ञानवंतांना व कुशल कारागिरांना भारतातच रहावेसे वाटेल व येथे त्यांच्या कर्तृत्वाला वाव मिळेल अशा सुविधा, संधी आणि वातावरण निर्मिती केली पाहिजे.



अनुक्रमणिका

३. नवमाल्थसवादाशी तुलना करता, पेठे-प्रतिमान खऱ्या अर्थाने गतिशील (dynamic) आहे. गतिशीलता दोन प्रकारची असू शकते. १. जनता प्राङ्मुखी गतिशीलता (people-oriented dynamism) किंवा २. शिष्टजन-प्राङ्मुखी गतिशीलता (elite-oriented dynamism) नव-माल्थसवादाप्रमाणे, गरीबच त्यांच्या गरिबीला जबाबदार आहेत. कारण त्यांना अनेक मुले असतात, म्हणून जोपर्यंत गरीब संततिनियमन करीत नाहीत तोपर्यंत आम गरिबीचा (mass poverty) प्रश्न सुटणार नाही. या युक्तिवादामुळे दारिद्र्यनिर्मूलनासारख्या समस्येला राष्ट्रीय कार्यक्रम पत्रिकेच्या (national agenda) अग्रक्रम यादीत (priority list) दुय्यम किंवा नीचतम स्थान मिळते. म्हणून जनता जनार्दनाच्या कल्याणाच्या दृष्टीने नवमाल्थसवाद स्थितिशील (status quoist) किंबहुना प्रतिगामी (reactionary) झाला आहे. नवमाल्थस-वादाच्या जोडीला आज निरंकुश अर्थव्यवस्था अस्तित्वात आली आहे. यात गतिशीलता आहे, पण ती श्रीमंत व उच्चभ्रू-प्राङ्मुखी आहे. धनिकांना पूरक पण गरिबांना मारक! यात मोठ्या माशाने लहान माशाला गिळून टाकण्याची व्यवस्था आहे. वास्तव उत्पन्नाचा (real income) विचार केला तर गरीब अधिक गरीब होत आहेत. कनिष्ठ मध्यमवर्ग वेगाने दारिद्र्याच्या खाईत फेकला जात आहे. (उदाहरणार्थ पेन्शन नसणारे ज्येष्ठ नागरिक) स्पर्धा आहे पण ती जीवघेणी. (cut-throat competition). जनतेच्या दृष्टीने ही गतिशीलता नव्हे. ही तर अधोगतिशीलता आहे! गतिशीलतेचे विडंबन आहे.

याउलट पेठे यांच्या प्रतिमानात जनता-प्राङ्मुखी गतिमानता आहे. कारण यात गरिबांतील सर्वात गरीब व्यक्ती किंवा कुटुंब हे केंद्रस्थानी आहे. जेरेमी नेथॅम यांच्या ध्येयानुसार 'सर्वाधिक लोकांचे सर्वाधिक कल्याण' (greatest good of the greatest number) हे संकुचित तत्त्व पेठे यांनी नाकारले आहे. त्यांच्या विचारसरणीत, गांधीप्रणीत 'शेवटच्या गरिबाचे कल्याण' (good of the poorest of the poor) हे अंतिम ध्येय आहे. सर्वोदय, अंत्योदय यांना अग्रक्रमाचे स्थान आहे. व्यष्टिस्तरावर प्रत्येक आणि हरएक व्यक्ति (each and every individual) हिच्या सक्षमतेचा, गुणवत्तेचा यात सखोल विचार आहे. लोकसंख्या नियंत्रण, गरिबी निर्मूलन व गरिबीजन्य समस्यांचे निराकरण यासंबंधीच्या पथनकाशाद्वारे क्रांतिसम सामाजिक परिवर्तन, रूपांतर व नवजीवन (metamorphosis) पेठे यांच्या प्रतिमानात अभिप्रेत आहे. यामुळे लोकसंख्या, दारिद्र्य, आर्थिक विकास, सामाजिक प्रगती यासंबंधीचे प्रश्न मार्गी लागतील. म्हणून हे नवीन प्रतिमान निकोप, सकारात्मक आणि खऱ्या अर्थाने अखिल समाजाच्या दृष्टीने गतिमान आणि प्रगतीशील झाले आहे.

४. काही समीक्षक अशी टीका करण्याची शक्यता आहे की, पेठे यांच्या प्रतिमानातील मध्यवर्ती सिद्धांत व पथनकाशा म्हणजे एक अतिरंजित कविकल्पना आहे. तो कल्पितादर्शवादी (utopian) आहे. त्यात वास्तवता नाही. तो अव्यवहार्य आणि अतिदीर्घकाल घेणारा आहे. या टीकेत तथ्य आहे असे वाटत नाही.

पेठे-प्रतिमानातील पथनकाशा सारांश रूपाने असा : मानवाची दुष्ट प्रवृत्ती - नैतिक अवनति - प्रतिगामी समाजरचना - आर्थिक विषमता - आमजनतेसाठी साधन-सामग्रीसंबंधी वंचितता (no access to resources) - समान संधीचा आभाव - व्यक्तीच्या सुप्त गुणवत्तेचे न्यून इष्टतमीकरण - गरिबी - मोठे कुटुंब, लोकसंख्यासकट गरिबीजन्य समस्या. कार्यकारणभाव दर्शविणारे हे दुवे अगदी योग्य वाटतात. यांत क्रांतिसम परिवर्तन होणे ही एक दीर्घकालीन प्रक्रिया आहे, ही टीका समजू शकतो. परंतु या संदर्भातही चार महत्त्वाच्या बाजू लक्षात घेणे आवश्यक आहे. त्या अशा :

१. वेळ कमी लागो वा जास्त, परिवर्तनाला पर्याय नाही. सद्य:स्थितीत पेठे म्हणतात त्याप्रमाणे, एन्ट्रॉपी स्थितीत, किंवा 'डिस्‌जंक्शन' या समाजशास्त्रीय संकल्पनेप्रमाणे विलयावस्थेत राहिलो तर परिस्थिती अधिकाधिक स्फोटक होत जाईल. जनतेचा अनावर प्रक्षोभ रक्तरंजित क्रांती किंवा भयानक अंदाधुंदी अराजक या स्वरूपात प्रकट होईल. (डिसजंक्शन या संकल्पनेचे विवेचेन विभाग २ मध्ये आहे) हे टाळायचे असेल, तर परिवर्तनाशिवाय तरणोपाय नाही.

२. इतिहासावरून असे दिसते की राजकीय संकल्प (political will) प्रामाणिक व तीव्र असेल तर क्रांति विद्युत प्रहाराप्रमाणे तात्काळ, किंवा परिवर्तन द्रुतगतीने होऊ शकते.

३. पेठे-प्रतिमानाचा व्यक्तीच्या गुणवर्धनासाठी

अनुक्रमणिका

प्रतिपादन केलेला त्रिसूत्री कार्यक्रम पूर्णतः व्यवहार्य आहे. त्यात कपोलकल्पित असे काही नाही. तो अगदी सरळ, सुस्पष्ट व असंदिग्ध आहे. काळाच्या दृष्टीने वेगवान गतीने कार्यान्वित करण्यासारखा आहे.

४. त्रिसूत्री कार्यक्रमामुळे जनतेत मोठी जागृती निर्माण होईल. राज्यकर्ते व शासनाधिकारी यांच्यावरचा जनतेचा दबाव वाढेल. परिवर्तनाला कमालीची गती प्राप्त होईल. खरे म्हणजे त्रिसूत्री कार्यक्रम व पथनकाशातील कार्यक्रमातील दुवे हे एकमेकांसाठी प्रक्रिया - प्रेरक (catalyst) आहेत. ते परस्परपूरक (comple-mentary) आणि परिपूर्णतः व्यवहार्य आहेत. एकूण, पेठे प्रतिमान कल्पितादर्शवादी आहे असा आक्षेप निरर्थक आहे.

५. या लेखात एक अत्यंत महत्त्वाची व निकडीची बाब आग्रहाने मांडावीशी वाटते. पेठे यांच्या लेखाला 'नव्या युगासाठी नवीन प्रतिमान' असे उपशीर्षक दिले आहे. ते सर्वार्थाने समर्पक आहे. पेठे यांनी प्रस्थापित व पाश्चिमात्य नवमाल्थसवादाला जबरदस्त आव्हान दिले आहे. ते अशास्त्रीय व विघातक आहे, हे तर्कशास्त्र व वास्तव यांच्या निकषावर सिद्ध केले आहे. या बरोबरच, त्यांनी एक अभिनव प्रतिमान सादर केले आहे. त्यांनी अर्थशास्त्र व सामाजिक शास्त्रे यामधील विचारप्रवाहाला एक अगदी नाविन्यपूर्ण वळण दिले आहे. म्हणून या मौलिक योगदानाचे प्रबोधन, अध्ययन व डोळस समीक्षा सर्व स्तरावर होणे आवश्यक आहे. दोनशे वर्षे लोटली तरी नवमाल्थसवादाचे अधिराज्य अजूनही कायम आहे! आपली वैचारिक गुलामगिरी जवळजवळ सर्व स्तरावर प्रतीत होते. उदाहरणार्थ १. आमचे शिक्षक व प्राध्यापक वर्षानुवर्षे लोकसंख्या व गरिबी या प्रश्नासंबंधीचे अशास्त्रीय व कालबाह्य सिद्धांत शिकवत आले आहेत. २. तज्ज्ञ आणि विचारवंत नवमाल्थसवादाचाच पुरस्कार करताना आढळतात. ३. राजकीय पुढारी व धोरण नीतिकार यांच्यावर याच जुन्या वादाचा पगडा आहे. ४. वृत्तपत्रातील व मासिकांतील लेख आणि वाचकांचा पत्रव्यवहार पाहिला तर 'लोकसंख्या म्हणजे भस्मासुर व सर्व समस्यांचे मूळ' अशा तऱ्हेची जनमानसात एक 'शास्त्रीय अंधश्रद्धा'च होऊन बसली आहे. ही वैचारिक परिस्थिती गंभीर व चिंतनीय आहे. परिवर्तनासाठी यात आमूलाग्र बदल होणे अत्यंत अगत्याचे आहे. म्हणून पेठे यांच्या नाविन्यपूर्ण व गतिशील विचारसरणीचे प्रबोधन, अध्ययन, अध्यापन व सखोल संशोधन होणे अत्यंत निकडीचे झाले आहे असे वाटते.

यासंबंधीचे प्रबोधन व प्रसार सर्व स्तरावरील विचारमंथनानेच होणे शक्य आहे. उदाहणार्थ - शाळा-कॉलेजनधील सभा-सेमिनार, खास व्याख्याने, विशिष्ट सामाजिक शास्त्र परिषदांची वार्षिक अधिवेशने, इत्यादि. विचारमंथन चार प्रकारचे होऊ शकेल. ते असे :

१. समीक्षात्मक लेख किंवा टिपणे : अर्थसंवादचे प्रमुख संपादक विनायक श्रीधर देशपांडे यांनी पेठे यांचा लेख प्रदीर्घ असला तरी त्याचे सैद्धांतिकरण अनन्यसाधारण महत्त्व जाणले, आणि तो दोन भागात प्रसिद्ध केला. अशा रीतीने त्यांनी विचारमंथनासाठी सुरुवात करून दिली. याबद्दल त्यांचे मनःपूर्वक अभिनंदन. पेठे यांनी त्यांच्या लेखात लोकसंख्या व गरिबी या केंद्रभागी असलेल्या विषयाशी निगडित असे अनेक प्रश्न व मुद्दे उपस्थित केले आहेत, काहींना ते ग्राह्य वाटतील तर काहींना ते वादग्रस्त वाटतील. काहीही असो, यावर अधिक अध्ययन-संशोधन होणे जरूरीचे आहे. म्हणून विविध ज्ञानशाखातील शास्त्रज्ञांनी पेठे-प्रतिमानाच्या संदर्भात लेखन करावे - यात टीकात्मक लेखही हवेत.

२. सरकारतर्फे अभ्यास-समिती : प्रगत देशात एखादा नवीन विचार मांडला गेला तर शासन त्यावर खास अभ्यास-समिती नेमते. प्रस्थापित विचारांपेक्षा अशा निराळ्या विचाराचा, सरकारी धोरणनीती व कार्यक्रम ठरविण्याच्या दृष्टीने काय उपयोग होईल, यासंबंधीचे निष्कर्ष काढणे हा ही समिती नेमण्यामागे प्रमुख उद्देश असतो. पेठे विचारसरणीचा अभ्यास करण्यासाठी एक समिती आपल्या सरकारने नेमावी अशी सूचना काही तज्ज्ञ विचारवंतांनी केली आहे ती योग्य आहे. अशा समितीमध्ये विविध विद्याशाखेतील तज्ज्ञांसह ज्यांनी लोकसंख्या, गरिबी, मानवी विकास, आरोग्य यासारख्या प्रश्नांसंबंधी विशेष कार्य केले आहे असे सामाजिक कार्यकर्ते, धोरण-नीतीकार, लोकप्रतिनिधी, शासनाधिकारी यांचा समावेश करणे उचित होईल.

३. चर्चासत्रे व त्यांचे अहवाल - विविध स्तरांवर चर्चासत्रे आयोजित करावीत. गरिबी, लोकसंख्या, विकास, आरोग्य यासारखे सर्वसामान्यांचे प्रश्न देशाच्या प्रगतीशी व भवितव्याशी निगडित असल्यामुळे ज्ञानशाखांतील अभ्यासकांनी निरनिराळ्या क्षेत्रातील कार्यकर्त्यांसाठी चर्चासत्रे

आयोजित करणे आवश्यक आहे. उदाहरणार्थ : शिक्षक, प्राध्यापक, सर्व सामाजिक शास्त्रातील तज्ज्ञ, डॉक्टर्स, राजकीय नेते, धोरण-नीतीकार, शासनाधिकारी, लोकप्रतिनिधी, पत्रकार, सामाजिक कार्यकर्ते, आकाशवाणी-टीव्ही यासारख्या बहुजन प्रसारमाध्यमातील अधिकारी इत्यादी.

४. पाठ्यपुस्तक समावेश होणे महत्त्वाचे : लोकसंख्या, गरिबी यासारखे सामाजिक प्रश्न आता शाळांच्या स्तरावर येऊन पोहोचले आहेत. लहान वयातच या प्रश्नांविषयीची जाण व सजगता निर्माण करणे योग्यच आहे. शाळेपासून ते विद्यापीठापर्यंत अभ्यासक्रमात व पाठ्यपुस्तकात प्रस्थापित विचारसरणीबरोबर एक अभिनव विचारसरणी म्हणून पेठे प्रतिमानाचा समावेश करणे महत्त्वाचे आहे. या दृष्टीने सर्व शिक्षक-प्राध्यापकांचे तसेच पाठ्यपुस्तकांच्या लेखकांचे प्रबोधन होणे हे ओघाने आलेच.

एकूण विचार केला तर असे वाटते की कोणतीही नवनिर्मित (innovative) आणि नवमार्गीय (path-breaking) विचारसरणी जास्तीतजास्त लोकांपर्यंत त्वरेने पोचणे अगत्याचे आहे. या संदर्भात पुणे विद्यापीठाचे माजी कुलगुरू प्रा. देवदत्त दाभोलकर यांच्या समर्थ नेतृत्वाखाली व पुढाकाराने संपन्न झालेल्या पेठे यांच्या प्रबंधावरील आंतरशास्त्रीय प्रथम चर्चासत्र अनेकांना प्रेरणादायी व मार्गदर्शक ठरेल, असे येथे नमूद करावेसे वाटते. अध्यापक व विचारवंत यांच्या वैचारिक जीवनात आजकाल एक प्रकारचा चाकोरीपणा, स्थितीशीलता व मरगळ आल्या-सारखी वाटते. 'नेमेची येतो मग पावसाळा' याप्रमाणे दरवर्षी विशिष्ट समाजशास्त्राची वार्षिक अधिवेशने भरवली जातात. पण बहुज्ञानशाखीय चर्चा क्वचितच आढळते. ज्ञानवंतांमध्ये आंतरशास्त्रीय विचारमंथन हे एक वैचारिक आंदोलन व्हावे. या दृष्टीने देवदत्त दाभोलकरांचा आंतर-शास्त्रीय चर्चासत्राचा उपक्रम नक्कीच अनुकरणीय आहे. पेठे यांच्या प्रबंधावरील पुणे येथे ९ मार्च २००३ रोजी संपन्न झालेले चर्चासत्र प्रकाशदायी (enlightening) व यशस्वी झाले.

### विभाग २ : काही निवडक मूलभूत प्रश्नांसंबंधी मीमांसा

पेठे यांचा लेख साकल्यशील आणि आंतरशास्त्रीय स्वरूपाचा असल्यामुळे त्यांच्या विवेचनात विविध मुद्द्यांचा अंतर्भाव झाला आहे. त्यातील काही कळीच्या मुद्द्यांचे विश्लेषण या विभागात केले आहे.

राज्यकर्त्यांनी पाश्चिमात्य प्रतिमानाला विकल्प (option) ठेवला आहे का?

पेठे यांनी त्यांच्या लेखात ठामपणे प्रतिपादन केले आहे की, आपण पाश्चात्य प्रतिमानाचा त्याग केला पाहिजे आणि भारतीय परिस्थितीला अनुकूल अशी विचारसरणी विकसित केली पाहिजे. हे म्हणणे सयुक्तिक आहे यात शंका नाही. परंतु खरी अडचण ही आहे की, पाश्चिमात्य प्रतिमान स्वीकारणे किंवा धिःकारणे यासंबंधी सद्यःस्थितीत धोरणनीतीकार व राज्यकर्ते यांनी आपल्याला काही विकल्प (option) ठेवला आहे का? याचे उत्तर 'नाही' असेच आहे.

सोव्हिएट युनियनच्या विघटनेनंतर एक ध्रुवीय महासत्ता म्हणून अमेरिकेचा उदय झाला. या देशाचा प्रचंड प्रभाव आपल्या मानसिकतेवर (mind-set) आहे. अमेरिकेच्या आदेशानुसार आय.एम.एफ., वर्ल्ड बँक आदि वैश्विक धोरणे ठरवितात. हे उघड गुपित (open secret) आहे. आपल्याला या संस्थांची गरज आहे म्हणून आपले सरकार त्यांच्या दबावाखाली आपली आर्थिक नीती ठरविते हेही तितकेच उघड गुपित आहे. आपले शासन, धोरणनीतीकार, सनदी अधिकारी, तज्ज्ञ आणि संधिसाधू विचारवंत अमेरिका व त्यांच्या संस्था यांच्या जणू कळसूत्री बाहुल्या झाल्या आहेत. म्हणून आज घडीला आपल्याला उदारमतवाद, अनिर्बंध व्यापार व जागतिकीकरण या पाश्चिमात्त्य प्रतिमानाशिवाय दुसरा पर्यायच उरला नाही.

पेठे यांनी दर्शविल्याप्रमाणे, महात्मा गांधीजींचे विचार भारत सरकारने प्रथमपासूनच जवळजवळ पूर्णतः दुर्लक्षिलेले आहेत. खरे तर त्यांनी सांगितलेली गरजाधिष्ठित अर्थव्यवस्था (need-based economy) आपण अंगीकारली असती तर आज हा देश आत्मनिर्भर (self-reliant) झाला असता. 'भिक्षा पात्र अवलंबिणे नको जिणे लाजिरवाणे' ही तुकारामाने वर्णन केलेली स्थिती आज आली नसती. स्वदेशी, स्वावलंबन, आत्मनिर्भरता यांचे आपण गोडवे गातो पण त्यासाठी मोजावी लागणारी किंमत द्यायला मात्र तयार नसतो. यासाठी समाजाला विशेषतः धनिक वर्गाला उपभोगवादाला तिलांजली द्यावी लागेल. साधी राहणी आणि जीवनशैली स्वीकारावी लागेल. चीन आणि भूतपूर्व सोव्हिएट युनियन यांनी सामाजिक जीवनाला शिस्त लावून निरर्थक भोगवादाला बंदिस्त ठेवून


अनुक्रमणिका

प्रशंसनीय आर्थिक विकास साधला. हे भारतासारख्या उच्च सांस्कृतिक परंपरा असलेल्या देशाने गंभीरपणे लक्षात घ्यायला हवे. 'पण लक्षात कोण घेतो?' आपण स्वेच्छेनेच नवीन आर्थिक साम्राज्यवादाचे (neo-imperialism) दास्यत्व स्वीकारले आहे. पेंठे म्हणतात हे दास्यत्व हाच आपला खरा मूलभूत प्रश्न आहे. त्यांनी त्यांच्या प्रतिमानाच्या मध्यवर्ती सिद्धांतात गांधीवादाची गरजा-धिष्ठित अर्थव्यवस्था या सकारात्मक संकल्पनेला त्यांच्या साकल्यशील (eclectic) प्रतिमानात गुंफले आहे. केवळ भव्य सामाजिक आंदोलन आणि निर्धारित राजकीय इच्छाशक्ती यांनीच पाश्चात्य प्रतिमान झुगारून देता येईल; आणि पेंठे प्रतिमानासारख्या भारताला अनुरूप फलदायी अशा रूपालोकाचा (paradigm) अवलंब करता येईल.

### आजच्या वास्तवाचे निदान : डिसजंक्शन (Disjunction)

पेंठे यांनी त्यांचे प्रतिमान वास्तववादी व्हावे यासाठी प्रथम भारतातील सद्य:स्थितीच्या वास्तवाचे निदान (diagnosis) केले. त्यांनी या एकाच देशात धनिकांसाठी 'इंडिया' व गरिबांसाठी 'भारत' असे दोन देश आहेत असे म्हटले आहे. हे खरेच आहे. भारतात सध्या आर्थिक व सामाजिक क्षेत्रात विलयावस्था आहे असे त्यांनी केलेले वर्णनही योग्य आहे. या दु:स्थितीचे 'एन्ट्रॉपी' या संकल्पनेचे त्यांनी निदान केले आहे. हे निदान सयुक्तिकपणे एका उचित समाजशास्त्रीय (sociological) संकल्पनेनेही करता येईल. ती संकल्पना म्हणजे 'डिसजंक्शन' (Disjunction) ही होय. या संकल्पनेप्रमाणे, समाजाच्या दु:स्थितीत सर्वसाधारणपणे सामाजिक व्यवहारात कोठेही परस्पर सुसंगती (consistancy) आढळत नाही.

भारतात आज जवळजवळ सर्वत्र व्यावहारिक विसंगती डिसजंक्शन दृष्टोत्पत्तीस येते. याचे विदारक उदाहरण म्हणजे अन्नधान्य. आपल्या देशात अलीकडे अन्नधान्याचे उत्पादन भरपूर झाले आहे. आपण धान्य निर्यात करतो. परंतु आज देशात दारिद्र्यरेषेखाली अशी लाखो कुटुंबे आहेत, की जी दोन वेळचे पोटभर जेवण घेऊ शकत नाहीत. पोषक आणि समतोल आहार हे तर त्यांच्या दृष्टीने मृगजळच आहे! विसंगतीचे दुसरे चित्र : शहरांतून दुकानामध्ये आराम देणाऱ्या, चैनीच्या, विलासी वस्तू भरभरून विक्रीसाठी ओसंडून असतात. वाटावे हा देश किती वैभवशाली आहे! त्याचवेळी गलिच्छ झोपडपट्ट्यातून व खेड्यापाड्यात वंचितांना अन्न, वस्त्र, निवारा या प्राथमिक गरजा भागविणेही अशक्य झाले आहे. नेते आणि सरकार या समस्य सोडविण्यासाठी ठोस कार्यक्रम गंभीरपणे कार्यान्वित करत आहेत असे प्रत्यक्षात दिसत नाही. ही सर्वव्यापी विसंगती समाजपुरुषाची निरोगी अवस्था निश्चितच दाखवीत नाही.

### भारतात लोकसंख्या आतिरिक्त आहे का?
### समाजशास्त्रीय दृष्टिकोन :

भारतात अतिरिक्त लोकसंख्या (overpopulation) आहे असा सार्वत्रिक समज - म्हणजे गैरसमज - आहे. पेंठे यांनी लोकसंख्या विस्फोट, लोकसंख्या बाँब इत्यादी संज्ञा अशास्त्रीय व भयगर्भित (alarmist) आहेत असे म्हटले आहे. हे मान्य आहे. किंबहुना असे शब्दप्रयोग शास्त्रीय साहित्यातून बाद केले पाहिजेत. खरे तर प्रत्यक्षात लोकसंख्या योग्य की अत्याधिक हे दोन बाबींवर अवलंबून आहे. १. कामाच्या प्रतिष्ठेबद्दल (dignity of labour) समाजाची, विशेषत: काम शोधणाऱ्या गरजूंची मानसिकता, २. विविध सोयी-सवलतींची उपलब्धता.

समाजात कामासंबंधी निकोप व सकारात्मक दृष्टिकोन असेल तर लोकसंख्या प्रश्नाचे भय वाटण्याचे कारण नाही. महात्मा गांधींनी गलिच्छ वस्त्यांमधून संडास साफ करण्याचे कार्यक्रम आखले आणि कामाला प्रतिष्ठा मिळवून दिली. कोणतेही काम कमीपणाचे नाही याचे प्रबोधन करण्यात स्वातंत्र्य संग्रामाच्या काळात गांधीजी यशस्वी ठरले. कोणत्याही कामाची लाज वाटत नसेल तर आजच्या काळात अनेकांना काम मिळू शकेल. नोकरी व व्यवसायाची अनेक नवनवीन क्षेत्रे गरजूंना उपलब्ध होत आहेत. उदाहरणार्थ, आयुर्मान वाढल्यामुळे ज्येष्ठ नागरिकांची संख्या वाढली आहे. व्याधिग्रस्त व परावलंबी वृद्धांच्या गरजा भागविणे व त्यांचे जीवन सुकर-सुसह्य होईल अशी कामे करणे, हे एक अर्थार्जनाचे अगदी नवीन सेवा-क्षेत्र (service sector) तरुणांना उपलब्ध झाले आहे. दुसरे उदाहरण म्हणजे एकत्र कुटुंबपद्धती शहरातून जवळजवळ नष्ट झाली आहे. लहान कुटुंबातील पतिपत्नी नोकरी-व्यवसायात गुंतलेले असतात. त्यामुळे अनंत प्रश्न निर्माण झाले आहेत. कुटुंबातील एखादी व्यक्ती आजारी पडली

तर तिची देखभाल करण्यासाठी न परवडणारी प्रशिक्षित नर्स नव्हे तर नर्सिंग-मदतनीसाची (nursing-aid) आवश्यकता असते. उच्च शिक्षण ज्यांना नाही अशी मुलींना किंवा प्रौढ महिलांना हे सेवा क्षेत्र नव्याने निर्माण झाले आहे. अशा गरजूंसाठी नर्सिंग-एड ब्यूरोज निघाले आहे. पुण्याला नर्सिंग मदतनीस महिलेला दिवसाच्या आठ तास ड्यूटीसाठी प्रतिदिनी रु.१००-१५० मिळू शकतात. महिन्याला रु. ३००० ते ४००० अशी मिळकत होऊ शकते. अशी कितीतरी सेवा क्षेत्रे व व्यवसाय सध्याच्या सामाजिक संक्रमण काळात (transition) नव्याने उपलब्ध झाली आहेत. जरूर आहे ती फक्त श्रमाच्या प्रतिष्ठेबद्दल निकोप दृष्टिकोनाची. लोकसंख्या, गरिबी व रोजगार या संदर्भात सर्व शाखेतील समाजशास्त्रज्ञांनी सेवा-व्यवसाय-कामधंदा यासंबंधीची कोणती नवीन क्षेत्रे निर्माण झाली आहेत यांचा शोध घेऊन, त्यामधील मागणी, पुरवठा, द्रव्यार्जनाची संधी यासंबंधीची सर्वेक्षणे (wmpirical surveys) करणे अगत्याचे झाले आहे.

सर्वसामान्य जीवन सुकर होण्यासाठी लागणाऱ्या सोयी-सुविधा पुरेशा प्रमाणात उपलब्ध होत असतील तर लोकसंख्या अत्याधिक आहे असे म्हणण्याचे कारण नाही. ग्रामीण भागातून शहराकडे प्रचंड प्रमाणात स्थलांतर होत आहे. त्यामुळे नागरी सेवा-सुविधांवर खूपच ताण व बोजा पडत आहे. हे टाळावयाचे असेल तर ग्रामीण भागात आर्थिक विकास होणे जरूरीचे आहे. गांधीजींची ग्रामीण स्वयंपूर्णतेची कल्पना प्रत्यक्षात उतरली तर हा प्रश्न सुटू शकेल. जागतिकीकरणाच्या युगातही असे दिसून आले आहे की पुरंदर तालुक्यातून कामधंद्यासाठी मुंबईला स्थलांतरित झालेले कामगार पाणी पंचायतीच्या कार्यामुळे परत आपल्या गावाकडे आले. हे पूर्वस्थितीप्रत स्थलांतराचे (reverse migration) उत्तम उदाहरण आहे. डॉ. पेठ्यांच्या प्रतिमानात स्थलांतर या महत्त्वाच्या घटकाचा समावेश करणे आवश्यक आहे.

### दारिद्र्य : आर्थिक, सामाजिक आणि नैतिक

लोकसंख्येच्या संदर्भात गरिबीची कारण-मीमांसा करणे हा पेठे यांच्या लेखाचा प्रमुख उद्देश आहे. असे असले तरी गरिबीची कोणती व्याख्या त्यांना अभिप्रेत आहे हे स्पष्ट होणे जरूरीचे आहे.

दारिद्र्य हे दोन स्तरावर असू शकेल. १. केवळ दारिद्र्य (absolute poverty) आणि २. सापेक्ष दारिद्र्य (relative poverty). अमेरिकेसारख्या प्रगत देशातही गरिबी आहे. ही गरिबी विशेषतः निग्रो वंशीय समाजात खूप आहे. परंतु अमेरिकेतील गरीब हा भारतातील गरिबापेक्षा काही प्रमामात उच्च असे राहणीमान उपभोगू शकतो. ही झाली सापेक्ष गरिबीची संकल्पना. आपल्या देशातील खरा प्रश्न आहे तो केवळ गरिबांचाच. आणि हाच अर्थ पेठे यांना अभिप्रेत असावा असे दिसते. स्वातंत्र्य मिळून ५६ वर्षे होऊन गेली, तरीही गरिबीचा विचार अजूनही शारीरिक स्तरावरच (physiological level) घोटाळत आहे. केवढे हे लांछनास्पद आहे. २१ वे शतक उजाडले तरी एकीकडे सरकारी कोठारे अन्नधान्याने भरून ओसंडत असताना दुसरीकडे क्रयशक्ती नसल्यामुळे अनेकांना अर्धपोटी रहावे लागते. न्यून आहार आणि कुपोषण यामुळे त्यांना अनेक व्याधींना तोंड द्यावे लागते. ही झाली 'केवळ' गरिबीची कथा आणि व्यथा.

दारिद्र्य हे फक्त आर्थिक असते असे नाही. सामाजिक शास्त्रांच्या दृष्टीने गरिबी ही एक व्यापक संकल्पना आहे. या देशात सामाजिक, सांस्कृतिक व नैतिक दारिद्र्य (cultural and ethical poverty) विपुल आहे. याचाही पेठे यांनी अधिक विस्ताराने विचार केला पाहिजे. कारण अशा प्रकारचे दारिद्र्य 'केवळ दारिद्र्याचे' एक अत्यंत महत्त्वाचे कारण आहे. समाजातली नेते मंडळी, विशेषतः राजकीय पुढारी, सांस्कृतिक व नैतिक दारिद्र्याने ग्रासले गेले आहेत. विरोधाभास म्हणजे असा की हेच 'दरिद्री पुढारी' आम जनतेच्या 'केवळ गरिबीवर' बांडगुळाप्रमाणे (parasites) पोसले जात आहेत. वरकरणी 'गरिबी हटाव' हा नारा असला तरी अंतर्यामी गरीब गरीबच रहावेत असे त्यांना वाटते. कारण उघड आहे त्यात त्यांचे प्रस्थापित हितसंबंध (vested interests) गुंतलेले आहेत. गरीब जनता म्हणजे त्यांची 'व्होट बँक'. निवडणुका आल्या की काही वस्तूंचे, पैशाचे वाटप करून आणि मिठाला जागणे या अंधश्रद्धेचा फायदा उठवून ही मंडळी निवडणूक जिंकतात. निवडणुकीपूर्वी 'सेवक' म्हणून मुखवटा घेतलेले पुढारी 'पालक' होतात. आणि नंतर सत्ता आणि पैसा यांची लयलूट करण्यासाठी मोकाट सुटतात. नैतिक दारिद्र्य हे संधिसाधूपणा, लाचलुचपत, भ्रष्टाचार, श्रीमंतीचे लाजिरवाणे प्रदर्शन अशा हिडीस स्वरूपात प्रकट होते.

ग्रामपंचायतीच्या सभासदापासून ते थेट पंतप्रधानांपर्यंत ती भ्रष्टाचाराची प्रकरणे गाजली, त्यावरून देशात नैतिक दारिद्र्य किती मोठ्या प्रमाणावर फैलावत आहे हे सिद्ध होते. या पुढाऱ्यांच्या उक्ति आणि कृति यामध्ये अजिबात ताळमेळ नसतो. एका बाजूला राष्ट्रप्रेम व समता यावर भाषणे ठोकावयाची व दुसऱ्या बाजूला स्वतःच्या मुलांना मात्र इंग्लंड-अमेरिकेत शिक्षणासाठी पाठवायचे, अशी दुटप्पी कृति या पुढाऱ्यांमध्ये सर्रासपणे आढळते. अशा रीतीने खऱ्या वंचित गरिबांपासून ते पैसा-सत्ता यांनी मंडित झालेले पण अनैतिकतेने बरबटलेले दरिद्री या एकाच देशात नांदत आहेत हा विरोधाभास मनाला अस्वस्थ करतो.

मूलतः गरिबी याचे दुसरे नाव वंचितता (deprivation) असे म्हटले तर वावगे होणार नाही. श्रीमंत व सत्ताधारी कुटुंबांना सर्व प्रकारची साधनसामग्री उपलब्ध होऊ शकते. परंतु स्वतःच्या विकासासाठी शैक्षणिक, व्यावसायिक, सामाजिक व आर्थिक अशा विविध क्षेत्रातील साधन-सामग्री संबंधी ज्यांच्या शिरकाव किंवा संपर्क होऊ शकत नाही (having no access to resources of any kind) अशा व्यक्ती किंवा कुटुंबे गरीबच समजली पाहिजेत.

**गुणवत्तेचे इष्टतमीकरण कशासाठी?**
**पैसा की मनाचा समतोल यासाठी?**

प्रत्येक व्यक्तीच्या सुप्त गुणवत्तेचे इष्टतमीकरण (optimization) न होणे हे गरिबीचे मूलभूत कारण आहे असा पेठे-प्रतिमनानाचा मध्यवर्ती सिद्धांत आहे. या तत्त्वाचे एख खास वैशिष्ठ्य आहे. ते असे की यात व्यष्टिस्तरावर (micro level) गरिबीचा विचार झाला आहे. सर्व पाश्चात्य प्रतिमानात - मग ते उदारमतवादी असो वा साम्यवादी - यात समष्टिस्तरावरील आर्थिक विकास (macro economic developement) ही मध्यवर्ती संकल्पना आहे. पेठे प्रतिमान हे अस्सल स्वदेशी - भारतीय झाले आहे. कारण त्यामध्ये आपल्या पूर्वापार भारतीय परंपरेनुसार व अलीकडच्या गांधी - विनोबा - जयप्रकाश नारायण यांच्या अंत्योदय - सर्वोदय तत्त्वानुसार पेठे यांनी गरिबी निर्मूलनाच्या प्रक्रियेत गरिबातल्या गरिबाला व त्याच्या कल्याणाला व्यष्टिस्तरावर केंद्रबिंदूचे स्थान दिले आहे. शेवटी आर्थिक विकास कशासाठी? शेवटच्या गरिबापर्यंत त्याचा लाभ पोहोचला नाही तर त्याचे काय प्रयोजन आणि समर्थन?

सुप्त गुणवत्ता या संकल्पनेचे काही खोलात जाऊन विवेचन करू. व्यक्तीची गुणवत्ता विविध क्षेत्रातली असू शकते. उदा. कला, क्रीडा, साहित्य, गणित, विज्ञान, तंत्रज्ञान, व्यवस्थापन, साहस, वक्तृत्व, लेखन, संभाषण कौशल्य (communication skills), विनोदबुद्धी, नेतृत्व इ. इतिहासावरून असे दिसते की मानवी गुणांचे महत्त्व व त्याचे मूल्य सापेक्ष, गतिमान व बदलत जाणारे असते. राजसत्ताक युगात (monarchy) राज्यविस्तारासाठी व चक्रवर्ती होण्यासाठी राजांमध्ये अनेक लढाया होत असत. त्यावेळी शारीरिक सामर्थ्य व शौर्य हे गुण महत्त्वाचे असत. अशा व्यक्तींना सैन्य दलात मागणी असे. अकबराच्या राज्यात स्थैर्य व सुबत्ता होती. त्या काळात कलात्मकतेला महत्त्व आले. तानसेन, बिरबल आदि व्यक्ती त्याच्या दरबारातली रत्ने मानली जात. आजच्या औद्योगि-करणाच्या व माहिती तंत्रज्ञानाच्या युगात (Information Age) तुलनात्मक दृष्टीने साहित्य व कला अशा गुणांना कमी महत्त्व दिले जाते. साधारणपणे विद्यार्थी कोणत्या विषयाकडे आकर्षित होतात किंवा वधू कोणत्या वराच्या शोधात असते यावरून कोणत्या गुणवत्तेला किंमत आहे हे समजते.

आजच्या बाजारप्रधान संस्कृतीत (market culture) कोणत्या गुणांना अधिक महत्त्व, मागणी व किंमत आहे हे ठरवावे लागेल. आरोग्य व वैद्यक शास्त्रे, विज्ञान, तंत्रज्ञान, व्यवस्थापन, इलेक्ट्रॉनिक्स, संगणकशास्त्र, माहिती तंत्रज्ञान, स्थापत्यशास्त्र अशा आधुनिक क्षेत्रात आवश्यक असणाऱ्या गुणवत्तेला खूप मागणी आहे असे दिसते. यामुळे भाषा, साहित्य, कला, नाट्य, क्रीडा (कदाचित क्रिकेट सोडून!), सामाजिक शास्त्रे, आदि विषय मागे पडत चालले आहेत. भौतिक संस्कृतीची (materialistic civilization) ही लीला आहे. खरे तर ही एक मोठी चिंतेची बाब आहे. कारण धनापुढे मनाची पिछेहाट होत आहे. या संदर्भात ॲलन ब्लूम (Allen Bloom) यांचा 'क्लोजिंग ऑफ अमेरिकन माइंडस्' (Closing of American Minds) हा ग्रंथ सद्यःस्थितीवर विदारक प्रकाश टाकतो. अमेरिकेत विज्ञान, तंत्रज्ञान, अवकाशशास्त्र (Space science), दूरसंचरण (telecommunication),

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

संगणक, बहुस्तरीय विक्री-व्यवस्था (multi-marketing) अशा भौतिक क्षेत्रात विलक्षण प्रगती झाली आहे. यामुळे धनसंपदा वाढली आहे. पण जीवनात खरा आनंद देणारी व मन प्रसन्न करणारी कला, साहित्य, तत्त्वज्ञान अशी क्षेत्रे मात्र अस्तंगत पावत आहेत. यामुळे सर्वसामान्य जीवन खुरटत चालले आहे. जीवनाचा समतोल बिघडला आहे. मानवाची मानवता विलयाला जात आहे. अशा प्रकारे अमेरिकन मन मोकळेपणा व समतोल (poise) हरवून बसले आहे. ते संकुचित व बंदिस्त (closing) झाले आहे.

अमेरिकेत जे घडले तेच भारतात व इतरत्र घडत आहे ही मोठी चिंतामय बाब आहे असे वाटते. गुणवत्ता वाढविताना जीवनाचा कस (quality of life), मानसिकतेचा समतोल आमि निर्मळ सुख-समाधानाची अवस्था याकडे दुर्लक्ष करणे सामाजिक स्वास्थ्यासाठी केव्हाही घातकच ठरेल. पेठे यांच्या प्रतिमानात प्रत्येक व्यक्तीच्या सुप्त गुणवत्तेच्या इष्टतमीकरणासाठी संस्कार या घटकाला अंतर्भूत केले आहे. हे फार महत्त्वाचे आहे. या संस्कारप्रदान प्रक्रियेत मन निर्मळ व समतोल राहील अशा प्रकारचे ज्ञान व वातावरण प्रत्येकाला उपलब्ध करून दिले पाहिजे. अमेरिकेसारख्या प्रगत देशात पौर्वात्य तत्त्वज्ञान आणि भारतीय योगसाधना यांचे आकर्षण वाढत आहे. संस्काराला नैतिकतेचे व अध्यात्मिकतेचे अधिष्ठान हवे यासंबंधी पेठे सजग आहेत असे त्यांच्या प्रतिमानावरून स्पष्ट दिसते. विज्ञान व अध्यात्म यांचा संगम म्हणजे खरी मानवी संस्कृती. मानवतावादी संस्कृती विज्ञानाविना पांगळी, तर अध्यात्माविना आंधळी हेच खरे. पेठे यांनी म्हटल्याप्रमाणे श्रीकृष्णाची गीता, पतंजलिऋषींचा अष्टांग योग व ज्ञानेश्वरी हे उच्च संस्कृतीचे दीपस्तंभ आहेत.

### विकासासाठी समान संधी : समानता आणि समन्याय

व्यक्तीच्या गुणवत्ता-वर्धनासाठी समान संधीचा अभाव हे गरिबीचे मूलभूत कारण आहे, असे पेठे म्हणतात. समन्याय किंवा समता (equity) आणि समानता (equality) या संकल्पना भिन्न आहेत, हे येथे लक्षात घेतले पाहिजे. समानता ही निसर्गदत्त देणगीवर अवलंबून आहे. तर समन्याय हा समाजाधिष्ठित आहे. 'व्यक्ति तितक्या प्रकृती' या उक्तीप्रमाणे व्यक्तिव्यक्तिमध्ये निसर्गदत्त गुणवत्तेमध्ये मुळातच फरक असतो. म्हणून सर्वपार समानता (universal equality) ही अशक्य कोटीतील बाब आहे. प्रत्येकालाच इच्छा असली तरी डॉक्टर किंवा गणित तज्ज्ञ होता येणार नाही. समानता ही व्यवहार्यही नाही. उदाहरणार्थ, काही मोजक्या शाळाच सर्वोत्तम असतात. तेथे प्रत्येकालाच प्रवेश मिळेल हे कसे शक्य आहे? म्हणून सर्वच शाळांचा दर्जा वाढविण्याचा प्रयत्न करणे हा समान संधी देण्याचा एकमेव पर्याय आहे. पेठे यांच्या त्रिसूत्री निविष्ट कार्यक्रमात शिक्षणाला महत्त्व असल्यामुळे सरकारने सर्व शिक्षणसंस्था अत्युत्कृष्ट (excellence) होण्यासाठी खास प्रयत्न करायला हवेत.

समानता व्यवहार्य नसली तरी समता किंवा समन्याय हा व्यवहार्य आहे आणि इष्टही. 'स्वातंत्र्य, समता आणि बंधुत्व' (liberty, equity and fraternity) या ध्येयवादावर फ्रेंच राज्यक्रांती झाली. समाज एकमेकात वंश, जाति, धर्म, लिंग इ. निकषांवर जेव्हा भेदभाव करतो, तेव्हा समाजात समन्याय नांदत नाही. अमेरिकेत निग्रो आणि भारतात अस्पृश्य यांना समाजरचनेमध्ये समन्यायापासून वंचित रहावे लागत असे. भारतात स्वातंत्र्यानंतर घटनेमुळे (Constitution of India) सर्वांना समन्यायाचे तत्व लागू झाले आहे. कायद्यापुढे लहान-थोर, श्रीमंत-गरीब, सत्ताधारी प्रजा हे सर्व सारखेच. तसेच समन्यायाच्या बाबतीत केवळ कायद्याने सुधारणा होत नाही. त्यासाठी सार्वत्रिक प्रबोधन आणि जनआंदोलन यांचे पाठबळ लागते. पेठे यांनी समान संधीचा अभाव हे गरिबीचे मूलभूत कारण आहे असे जे म्हटले आहे ते समन्यायाचा अभाव या अर्थाने घेतले पाहिजे. त्यांच्या प्रतिपादनाचा रोख हाच आहे असे दिसते.

### वैश्विक साधनसामग्री आणि आंतरराष्ट्रीय स्तरीकरण (Stratification)

वैश्विक साधनसंपत्तीचा गैरवापर प्रगत राष्ट्रे बिनदिक्कतपणे किती मोठ्या प्रमाणात करीत आहेत, याचे पेठे यांनी अत्यंत परखड शब्दात विश्लेषण केले आहे. अल्प विकसित देशातील लोकसंख्या वाढीमुळे या संपत्तीचा काहीसा अधिक वापर होतो हे खरे आहे. परंतु श्रीमंत देशातील धुंद व बेबंध भोगवादामुळे तिचा अवास्तव वापर होतो. आणि शस्त्रास्त्रनिर्मितीमुळे तिचा विध्वंसक वापर होतो हे आकडेवारीने सिद्ध झालेले एक विदारक सत्य आहे. इथियोपिया यासारख्या गरीब देशात ४००-५०० मुले जन्माला

आली तर साधन-सामग्रीचा जितका खर्च होतो तितका अमेरिकेत जन्मलेल्या एका मुलासाठी खर्च येतो. वैश्विक साधनसामग्रीच्या संदर्भात नोबेल पुरस्कार विजेते डॉ. नोअम चोम्स्की (Noam Chomsky) यांच्या 'इंटरनॅशनल स्ट्रॅटिफिकेशन' आणि 'दि पेन्टेगॉन फॅक्टर इन लॅटिन अमेरिका' या दोन ग्रंथात मांडलेले विचार धक्कादायक व मन अस्वस्थ करणारे आहेत. या गाजलेल्या ग्रंथात चोम्स्की यांनी निसर्गदत्त विश्वसंपत्तीवर प्रभुत्व (access) आणि तिचा वापर, पाश्चिमात्त्य श्रीमंत आणि पौर्वात्य गरीब देशांमध्ये कसा असंतुलित आणि समन्यायाच्या विरुद्ध आहे, हे वस्तुस्थिती आणि आकडेवारी देऊन मोठ्या मार्मिकपणे आणि निर्भीडपणे सिद्ध केले आहे. अमेरिका आणि इंग्लंड यांनी तेल-ऊर्जा साठ्यांवर आपली मगरमिठी घट्ट करण्यासाठी इराकशी युद्ध केले असा जो मतप्रवाह आहे तो खरा वाटतो. सर्व सामाजिक शास्त्रज्ञांनी आणि सरकारी धोरण-नीतीकारांनी हे ग्रंथ अवश्य अभ्यासिले पाहिजेत म्हणजे 'लेव्हल फील्ड' नसलेली अनिर्बंध स्पर्धात्मक जागतिकीकरणाची व्यवस्था भारत आणि अल्पविकसित राष्ट्रांना (less developed contries) समन्यायाच्या दृष्टीने तारक आहे की मारक हे कळून येईल. जागतिकीकरणाच्या धोक्यांबद्दल सजग असणे आणि त्यावर वेळीच उपाय शोधणे आणि योजणे हे जागतिकीकरणाच्या प्रातःकाली फार महत्त्वाचे व निर्णायक ठरणार आहे.

**गुणवर्धनासाठी सुसंस्कार निविष्टि : माता-पिता, गुरुजन, नेते**

व्यक्तीच्या गुणवत्ता इष्टतमीकरणासाठी पेठे-प्रतिमानात एक सुस्पष्ट व व्यवहार्य अशी त्रिसूत्री निविष्टि (trinity input) सांगितली आहे. त्यातील सुसंस्कार हा घटक व्यक्ति आणि समाज या दोघांचेही हित व प्रगति साधणारा आहे. परंतु यासंबंधी दोन महत्त्वाचे मुद्दे उपस्थित होतात. १. संस्कार घेणाऱ्याला संस्कार हा जीवनात एक उपयुक्त घटक आहे असे वाटते का? २. संस्कार देणाऱ्याकडे आवश्यक असे कसब व नैतिकता आहे का? या दोनही प्रश्नाबाबत सद्यःस्थिती निराशाजनकच वाटते.

सुसंस्कार म्हणजे उच्च विचार आणि शुद्ध आचार. वृत्तपत्रातील ठळक बातम्या पाहिल्या की आढळतो तो केवळ अविचार, दुराचार आणि स्वैराचार! आजच्या स्पर्धात्मक आणि उपभोगवादी जमान्यात पैसा आणि सत्ता असेल तर जीवनातील सर्व मौजमजा यांची लयलूट करता येते. मग सुसंस्कार कशासाठी असा प्रश्न संस्कार घेणाऱ्याला पडतो. सुसंस्कारापेक्षा 'येनकेन प्रकारेण' सत्ता आणि संपत्ती कशी काबीज करता येईल याचेच प्रशिक्षण जणू उपभोगवादी समाजात (consumer society) महत्त्वाचे ठरत आहे. दुष्ट संस्कारांचे अतिरेकी उदाहरण हे दहशतवाद, अतिरेकीवाद, मूलतत्त्ववाद (fundamentalism) जेहाद यामध्ये सापडतात. दहशतवाद ज्यांना महत्त्वाचा वाटतो त्यांच्यासाठी प्रशिक्षण देण्यासाठी आधारभूत संरचना (infrastructure) अल्कायदा यासारख्या संघटनांनी निर्माण केल्या आहेत आणि त्याचे प्रशिक्षण वर्ग पाकिस्तानमध्ये चालतात हे सर्वश्रुत आहे.

दुसरा प्रश्न संस्कार देणाऱ्यासंबंधीचा आहे. सुसंस्कार व्यक्तिविकास आणि सांस्कृतिक प्रगति यासाठी आवश्यक आहेत असे म्हटले, तरी चांगले संस्कार देतील अशा सन्माननीय व्यक्ती वा संस्था या समाजात उपलब्ध आहेत का? बालके व तरुण पिढी यांच्यावर संस्कार तीन स्तरावर होत असतात. १. माता-पिता, २. गुरुजन आणि ३. समाजधुरीण.

संस्काराच्या बाबतीत स्वातंत्र्यपूर्व व स्वातंत्र्योत्तर काळात खूपच फरक पडला आहे. आम्ही स्वतः जातीय उच्चनीचता अजिबात मानीत नाही. परंतु असे दिसते की ब्राह्मण समाजात शिक्षणासाठी सर्वस्व पणाला लावणे हा एक महान संस्कार मुलांच्या मनावर बालपणापासून होत असे. शिक्षणात आर्थिक अडचण आली तर आई आपले दागदागिने स्वतः होऊन आनंदाने विकायला तयार असे. अनाथ अथवा अत्यंत गरीब मुले माधुकरी मागून आपले शिक्षण पुरे करीत असत. काही शिक्षक केवळ शिकवायचे काम करीत नसत. होतकरू व बुद्धिमान विद्यार्थ्यांचा शोध घेऊन त्यांना विनाशुल्क मार्गदर्शन करीत असत. ध्येयवादी बनवत असत. सामाजिक स्तरावर महात्मा गांधी, विनोबा, सुभाषचंद्र बोस, स्वातंत्र्यवीर सावरकर या महान नेत्यांनी देशाच्या स्वराज्य संग्रामासाठी सर्वस्व त्यागाचा केवढा उदात्त संस्कार समाजावर केला. स्वातंत्र्यासाठी अनेकांनी शाळा-कॉलेजे सोडली, अनेकांनी संसार सोडले, अनेकांनी जीवदान दिले. भूदानापासून ते श्रमदान, जीवनदान अशा चढत्या क्रमाने उच्च संस्कारांचे शिखर गाठले.

आजच्या स्वराज्यात सुराज्य हरवून बसले आहे. त्याग, प्रामाणिकपणा, सहकार, कामांची प्रतिष्ठा, कायद्याचे




पालन, मानवता अशासारखे सुसंस्कार करण्यासाठी जागरूकता आणि ते देण्याची इच्छा व क्षमता कोणाकडे आहे?

आज रोलमॉडेल म्हणून तरुण पिढीने कोणाकडे पहावे? अशा व्यक्ती किंवा संस्था फारच तुरळक आहेत. अनुभवाला येते ते चित्र अस्वस्थ करणारेच आहे. थोडक्यात सांगायचे तर आई-वडील नोकरी, करिअर आणि पार्ट्यांमध्ये मग्न. शिक्षकवर्ग बिगारी कामगार टाकतात त्याप्रमाणे ज्ञानाच्या 'पाट्या टाकण्याच्या' मनःस्थितीत. आणि पुढारी मंडळी सरपंचापासून ते पंतप्रधानापर्यंत भ्रष्टाचार आणि कांड या दुराचारांनी लडबडलेले. अनिष्ट व कलहात्मक संस्कारांचा मारा बाल व तरुण मनावर इतक्या प्रचंड प्रमाणावर होत आहे की 'वास्तववादी' मुलेच आता 'लाच दिल्याशिवाय कामे होणार नाहीत तेव्हा काम जलद होण्यासाठी लाच देण्यात काही गैर नाही. लाच द्या.' असा 'व्यावहारिक' सल्ला आपल्या स्वातंत्र्यकालीन 'आदर्शवादी' आईवडीलांना देताना आढळतात. संस्कारांच्या संदर्भात, समाजाचा चेहरा वारंवार सुंदोपसुंदी होणाऱ्या लोकसभेच्या आरशात वेळोवेळी पहायला मिळतो. याचा भावी पिढीवर काय परिणाम म्हणजे दुष्परिणाम होईल याचा विचारसुद्धा लोकप्रतिनिधींच्या मनात येत नाह, हे एक आश्चर्यच आहे. सर्वसाधारणपणे, आर्थिक विकासासाठी शिक्षण महत्त्वाचे आहे असे सांगितले जाते. पण शिक्षण म्हणजे केवळ पदवी नव्हे. खरे ज्ञान म्हणजे सुसंस्कारांचे ज्ञान. पेठे यांनी संस्कारनिविष्टीचा व्यक्तिविकासाच्या प्रक्रियेत एक प्रमुख घटक म्हणून समावेश केला आहे, ही त्यांच्या प्रतिमानाची खास जमेची बाजू आहे.

### सामाजिक कार्य करणाऱ्या संस्था : एकमेव आशास्थान

लोकसंख्या नियंत्रण आणि गरिबी निर्मूलन यासाठी पेठे-मॉडेलमध्ये दोन प्रक्रियांचा समावेश झाला आहे. १. सामाजिक परिवर्तन, आणि २. ज्ञान-आरोग्य-सुसंस्कार या त्रिसूत्री संबंधी सरकारचे अपेक्षित ठोस कार्यक्रम. दुर्दैवाने, सरकार व शासन प्रश्न सोडविण्यात अपयशी ठरले आहे. हे शासनालाही मान्य आहे. गेल्या ५० वर्षांचा इतिहास पाहिला तर असे दिसते की सरकारी कारभाराला भ्रष्टाचार नावाचा कॅन्सर झाला आहे. भूतपूर्व पंतप्रधान राजीव गांधी यांनीच असे उद्‌गार काढले होते की गरिबांसाठी खर्च करावयाच्या प्रत्येक एक रुपयातील फक्त दहा पैसे प्रत्यक्षात गरिबांपर्यंत पोहोचतात. त्यामुळे आम जनतेमध्ये सरकारबद्दल अत्यंत तीव्र असंतोष धुमसत आहे. याचबरोबर जनमानसात एक प्रकारची उदासीनतेची, वैफल्याची भावना निर्माण झाली आहे. सरकार काही बरे करू शकेल असा विश्वास ढासळून पडला आहे.

अशा निराशाजनक अंधःकारात एक आशेचा किरण दिसतो. तो म्हणजे ध्येयवादाने, निरलसपणे व सेवाभावी वृत्तीने कार्य करणाऱ्या बिनसरकारी सामाजिक संस्था (Non-Governmental Organizzations). गरिबी-निर्मूलनाच्या दृष्टीने मणिभआई देसाई यांची बाईफ (BAIF), विलासराव साळुंखे यांची पाणी पंचायत, अण्णा हजारे यांचे राळेगणसिद्धी येथील कार्य, पांडुरंगशास्त्री आठवले यांचा स्वाध्याय अशासारख्या संस्थांनी भरीव कामगिरी केली आहे. आरोग्य व कुटुंबनियोजन मोहिमेत, रजनीकांत आरोळे, फॅमिली प्लॅनिंग ॲसोसिएशन ऑफ इंडिया इ. संस्थांचे कार्य प्रशंसनीय आहे. शिक्षण क्षेत्रात कर्मवीर भाऊराव पाटील, भारतरत्न महर्षि अण्णा कर्वे यांचे कार्य सर्वश्रुत आहे. हे द्रष्टे कर्मयोगी महर्षि होते, 'सम्राट' नव्हते! अशा प्रकारच्या महान कार्याबद्दलएक खंत वाटते ती अशी की ही कार्य-मॉडेल्स अनुकरणीय असूनही सार्वत्रिक स्तरावर त्यांचा प्रसार होत नाही. तो होईल अशी उमेद बाळगूया. कारण देशाच्या हिताच्या दृष्टीने या सेवाभावी संस्था हेच एकमेव आशास्थान राहिले आहे.

### विभाग ३ :
### प्रतिमानाच्या समृद्धीसाठी काही महत्त्वाच्या रचनात्मक सूचना

सर्वसाधारणपणे कोणतीही विचारसरणी सर्वार्थाने परिपूर्ण असतेच असे नाही. त्यात काही गुणदोष असण्याची शक्यता असते. शिवाय काळ सतत बदलत असतो, आणि त्याप्रमाणे सामाजिक संदर्भही बदलत असतात. म्हणून तर ज्ञानात सदैव भर पडत असते आणि तशी भर पडणे इष्टही आहे. पेठे-प्रतिमानात त्रुटी आहेत असे नकारात्मक भाष्य करण्याऐवजी, त्यांचे प्रतिमान अधिक समृद्ध व्हावे अशा सकारात्मक व रचनात्मक दृष्टीनें काही महत्त्वाच्या सूचना कराव्याशा वाटतात, असे म्हणणे आम्ही अधिक पसंत करतो. या सूचना खाली नमूद करीत आहोत.

१. पेठे यांनी प्रतिमान या संकल्पनेचे महत्त्व सांगताना म्हटले आहे की प्रतिमानानुसार संशोधनाच्या विषयांचे अग्रक्रम

अनुक्रमणिका

आणि शासनाच्या धोरणनीतीच्या दिशा स्पष्ट होतात. त्यांच्या संपूर्ण लेखात मात्र केवळ सैद्धांतिकच विवेचन आहे. नवमाल्थसवादाशी तुलना करता, पेठे-प्रतिमानानुसार प्रचलित संशोधनाच्या विषयांच्या अग्रक्रमात तसेच सरकारच्या धोरणनीतीत कोणते फरक करावे लागतील याचे फारसे विश्लेषण लेखात नाही. धोरणविषयक तीन मार्गदर्शक तत्त्वे त्यांनी मांडली आहेत. पण हे पुरेसे नाही. त्यांच्या प्रतिमानाचा प्रत्यक्ष वास्तवात उपयोग व्हायचा असेल तर सरकारची लोकसंख्या व गरिबी या संबंधीची १. धोरणनीती, २. व्यूहरचना (Strategy) आणि ३. प्रत्यक्ष आघाडीवरचे कार्यक्रम यासंबंधीची रूपरेषा आणि तपशील स्पष्ट होणे जरूरीचे आहे. म्हणून पेठे यांनी संशोधनाचे अग्रक्रम आणि धोरणनीती यावर एक पूर्ण स्वतंत्र लेख लिहावा अशी त्यांना आमची सूचना आहे. लोकसंख्या प्रश्नाचे, प्रतिमानातून प्रतिबिंबित होणारे व्यावहारिक स्वरूप, लोकसंख्या-नियंत्रणाच्या दृष्टीने महत्त्वाचे आहे. अशा रीतीने प्रश्नाची १. सैद्धांतिक बाजू (theoretical aspect) आणि २. व्यावहारिक बाजू (applied aspect) या दोहोंचा एकत्रितपणे विचार एकमेकांना पूरक ठरेल.

२. पेठे प्रतिमानानुसार गरिबी ही लोकसंख्यासंकट अनेक समस्यांची जननी आहे. त्यामुळे गरिबीची कारणमीमांसा हा अर्थशास्त्र व सर्व सामाजिक शास्त्रे यांच्या दृष्टीने एक मूलभूत व अत्यंत महत्त्वाचा विषय ठरतो. पेठे यांनी त्यांच्या प्रतिमानाच्या मध्यवर्ती सिद्धांतात गरिबीची कारणमीमांसा पूर्णतः दिली आहे. सिद्धांत म्हणून मांडल्यामुळे ती अर्थातच सूत्ररूपाने दिली आहे. यावरून गरिबीची पाळेमुळे आर्थिक, सामाजिक, मानसिक, सांस्कृतिक व नैतिक अशा अनेक क्षेत्रात खोलवर रुतलेली आहेत हे स्पष्ट होते. उदाहरणार्थ, विषमता, शिष्ठजन-प्राङ्मुखी आर्थिक नियोजन, कालबाह्य समाजरचना, विषम आंतरराष्ट्रीय आर्थिक व्यवस्था, नैतिक मूल्यांचा ऱ्हास, मानवाची दुष्ट वृत्ती-प्रवृत्ती, अशी गरिबीची अनेक कारणे आहेत. परंतु पेठे यांच्या लेखात गरिबीचे विवेचन लोकसंख्या प्रश्नाच्या संदर्भात केले आहे त्यामुळे ते चंगळवाद आणि लष्करी खर्च या दोनच कारण-घटकांपुरते मर्यादित झाले आहे. गरिबी हा विषय मूलभूत असल्यामुळे त्याची मीमांसा विस्ताराने आणि सर्वांगीणपणे होणे जरूरीचे आहे. म्हणून गरिबी हा विषय वेगळा व स्वतंत्र मानून त्यावर पेठे यांनी एक निराळा लेख लिहावा, एवढेच नव्हे तर एक संपूर्ण ग्रंथ लिहावा अशी आमची सूचना आहे.

३. पेठे यांच्या लेखात बिघडत चाललेल्या पर्यावरणाचा उल्लेख आहे. पण पाहिजे तेवढे विवेचन नाही. लोकसंख्या, गरिबी व पर्यावरण यांचा घनिष्ठ परस्पर-संबंध उदाहरणार्थ, गेल्या काही वर्षात खेड्यांकडून शहरांकडे लोकसंख्येचे प्रचंड अंतःस्थलांतर (in-migration) झाले आहे. त्यामुळे प्रदूषणाचे प्रश्न अधिकाधिक गंभीर होत चालले आहेत. प्रदूषणाला बळी पडते ती प्रामुख्याने गरीब जनता. पाण्याचे उदाहरण घेऊ. श्रीमंत कुटुंबे झीरो बी, ॲक्वागार्ड यासारखी साधने वापरून किंवा शुद्ध पाण्याच्या (distilled water) बाटल्या विकत घेऊन प्रदूषित पाण्यापासून आपले संरक्षण करू शकतात. गरीब किंवा कनिष्ट वर्गाला हे परवडण्यासारखे नाही. दूषित पाण्यामुळे होणाऱ्या व्याधींमुळे त्यांचे आरोग्य सुरक्षित राहू शकत नाही. पेठे यांच्या त्रिसूत्रीतील 'आरोग्य' या निविष्टीवर मोठाच आघात होतो. व्यक्तीच्या सक्षमतेला व पर्यायाने त्याच्या उत्पादकतेला तडा जातो. दुर्दैवाने जीवनाला आधार देणारी मूलभूत पाच तत्त्वेच (पृथ्वी, आप, तेज, वायू आणि आकाश) प्रदूषणामुळे सत्वहीन आणि दूषित झाली आहेत. त्यामुळे मानवाच्या जीवनाची गुणवत्ता धोक्यात आली आहे. पेठे यांनी पर्यावरणाचे त्रोटक का होईना पण काहीसे विवेचन त्यांच्या लेखात करावयास हवे होते, असे वाटते.

४. पर्यावरणावरोबर आणखी एका महत्त्वाच्या घटकाचा केवळ निर्देश पुरेसा नाही; थोडेसे तरी विश्लेषण हवेच. तो घटक म्हणजे विज्ञान आणि तंत्रज्ञान. लोकसंख्येच्या बाबतीत असे दिसते की वैद्यकीय तंत्रज्ञानाने व्याधी आणि मृत्यूवर सर्वत्र वेगाने आणि अल्पावधीत कमी झाला आहे. (उदा. डीडीटी, ॲंटिबायोटक्सचा शोध, रोगप्रतिबंधक लसी इ.) प्लेग, कॉलरा, मलेरिया, इन्फ्लुएंझा, देवी, पोलिओ यासारख्या अनेक जीवघेण्या व शरीर दुबळे करणाऱ्या रोगांवर वैद्यकीय विज्ञान व तंत्रज्ञानाने मात केली. परंतु केवळ विज्ञान-तंत्रज्ञानाने प्रसवदर (fertility rate) आणि जन्मदर मृत्युदरासारखा अल्पावधीत कमी होत नाही असा अनुभव आहे. याचे साधे कारण असे की येथे व्यक्तीच्या प्रेरणेचा (motivation) प्रश्न येतो. प्रेरणा निर्माण होणे ही एक दीर्घकालीन आणि अत्यंत गुंतागुंतीची मानसिक प्रक्रिया आहे.

परंतु सरकारने जन्मदर म्हणजे मृत्युदर सारखा वैद्यक-तंत्रज्ञानाचा प्रश्न आहे असे गृहीतत्त्व मानले. ही एक मोठी घोडचूक होती. ती अजूनही चालू आहे! गरिबी-निर्मूलनाच्या बाबतीतही शास्त्र-तंत्रज्ञान यांचे फायदे, तोटे आणि मर्यादा यांचा खोलवर विचार व्हायला हवा. या संदर्भात शूमाकर यांचा Small is beautiful हा ग्रंथ, ॲप्रोप्रिएट टेक्नॉलॉजी, ग्रामीण विकासासाठीचे तंत्रज्ञान, इत्यादी संकल्पना महत्त्वाच्या आहेत. या सर्वांचा विचार व त्रोटक विविचन पेठे यांच्या प्रतिमानात समाविष्ट व्हावे असे वाटते.

५. पेठे यांनी त्यांच्या लेखात, वाचकांचे त्यांच्या विचारसरणीबद्दल काही गैरसमज होतील, अशी संभाव्यता व्यक्त केली आहे. अशा काही संभाव्य गैरसमजांचे निराकरणही त्यांनी केले आहे. हे योग्यच झाले. त्यांनी लिहिलेल्या गैरसनजांबरोबरच आणखी एक समज होण्याची शक्यता आहे. तो म्हणजे 'पेठे यांचा कुटुंबनियोजनावर विश्वास नाही. असा कार्यक्रम अनावश्यक आहे, असे त्यांना वाटते.' परंतु पेठे यांचा लेख नि:पक्षपातीपणाने वाचला तर पेठे यांचे मत असे असेल असे वाटत नाही. पेठे यांना सरकारप्रमाणेच लोकसंख्यावाढ हा निकडीचा प्रश्न आहे आणि म्हणून कुटुंब नियोजन ही जनतेची मोहीम (people's movement) झाली पाहिजे असे पेठे यांनाही ठामपणे वाटते. जन्मदर कमी करावयाचा असेल तर संतती नियमनाला पर्याय नाही. हे कोणीही मान्यच करील. पेठे यांचा सरकारशी सामना एवढ्याचसाठी आहे की त्यांच्या विचारसरणीप्रमाणे, सरकारचे लोकसंख्या प्रश्नासंबंधीचे आकलन (perception) सर्वथा चुकीचे, विपर्यस्त आणि घातक आहे. त्यामुळेच शासनाचा कुटुंबनियोजनाचा कार्यक्रम दिशाहीन झाला. लोकसंख्या-नियंत्रणाच्या दृष्टीने तो बव्हंशी अपयशी ठरला. पूर्वग्रह न ठेवता सरकारने पेठे प्रतिमानाचा अवलंब केला तर कुटुंबनियोजन ही 'शासकीय' मोहीम राहणार नाही; ती खऱ्या अर्थाने जनतेची मोहीम होईल. कारण जनतेच्या गरिबीनिर्मूलनाचा प्रश्न पेठेप्रतिमानाच्या केंद्रस्थानी आहे.

### उपसंहार :

पेठे यांनी लोकसंख्या, गरिबी व लोकगुणवत्ता या मूलभूत विषयावर नव्या युगासाठी एक नवीन विचारसरणी मांडली आहे. आतापर्यंत व सध्याही माल्थसवादाचे अधिराज्य आहे. हा 'वाद' काही विचारवंतांना भारताच्या संदर्भात अयोग्य वाटतो. परंतु याला पर्याय कोणीच दिला नाही. तो पेठे यांनी दिला. यातच त्यांच्या योगदानाचे अनन्यसाधारणत्व आहे. त्यांनी आपली विचारसरणी एका साकार (articulate) प्रतिमानाच्या स्वरूपात सादर केली. सामाजिक शास्त्रांच्या क्षितिजावर नव्याने उदयास आलेल्या या प्रतिमानाचे आपण मोकळ्या मनाने स्वागत केले पाहिजे.

स्वागत सखोल व अभ्यासपूर्ण विचारमंथनाने व्हावे. ज्येष्ठ विचारवंत प्रा. देवदत्त दाभोलकर यांनी विविध ज्ञानशाखांतील नामवंत संशोधकांचे प्रथम चर्चासत्र पुणे येथे घेऊन सार्थ सुरुवात केली. त्यांनी पेठे प्रतिमानाचे 'नवीन, विचाराला चालना देणारे आणि आंतरशास्त्रीय अध्ययन संशोधनाला आवाहन देणारे' असे मूल्यमापन केले आहे. खालील शब्दांत काही मान्यवरांनी मूल्यांकन केले आहे. उदा. डॉ. प्र. चिं. शेजवलकर : संशोधनाधिष्टित लेख सर्वांना पटण्यासारखा. नवा दृष्टिकोन लाख मोलाचा. प्रा. ग. प्र. प्रधान : मौलिक आणि मूलभूत संशोधन. त्यांच्या वैचारिक कार्याचे महत्त्व फार मोठे आहे. गो. स. कामत : वेगळ्या व सकारात्मक भूमिकेतून मांडलेले प्रतिमान विचार व धोरणांना चांगले वळण देणारे. एल. व्ही. बोकील : जमिनीवर पाय ठेवून सखोल व सर्वंकष असा विचार.

पेठे यांच्या मॉडेलची प्रशंसा होत आहे. तसेच त्यावर टीकात्मक समीक्षाही हवी. त्यातील गुणदोष व उणिवा दाखवून रचनात्मक सूचना कराव्यात. पेठे यांनी काही नवीन मुद्दे नव्या संदर्भात मांडले आहेत. त्यावरही अधिक संशोधन होणे जरूरीचे आहे. पेठे यांची विचारसरणी म्हणजे नवमाल्थसवाद्यांना एक समर्थ, परखड व जबरदस्त आव्हान आहे. त्यांनीही आपली बाजू निर्भिडपणे मांडणे आवश्यक आहे. जितके निर्भीड पण अभ्यासपूर्ण असे अधिक दृष्टिकोन मांडले जातात तितका समस्यांवर अधिक प्रकाश पडत जातो. सकारात्मक दृष्टिकोन असेल तर चर्चा आणि विचारमंथन हे वादविवाद किंवा वादंग होत नाही. तर तो एक संवाद होतो. ज्ञानयज्ञ होतो.

### संदर्भटीपा

अर्थसंवादमधील पेठे यांच्या लेखावर एक चर्चासत्र झाले. त्यासंबंधी ही त्रोटक माहिती. ही माहिती मार्गदर्शक

ठरेल असे वाटते. प्रा. देवदत्त दाभोलकर यांनी संयोजिलेले प्रथम चर्चासत्र पुणे येथे ९-३-०३ रोजी संपन्न झाले. प्रारंभी दाभोलकर यांनी चर्चासत्राचे उद्दिष्ट स्पष्ट केले. आजच्या युगात समस्या बहुमितीय (multi-dimentional) झाल्या आहेत. त्यांच्या विश्लेषणासाठी अनेक ज्ञानशाखा प्रस्तुत ठरतात. म्हणून यासाठी आंतरशास्त्रीय विचारशील व्यासपीठ असावे. शैक्षणिक संस्थांनी अशाच चर्चासत्रांचे संयोजन करावे असे त्यांनी आवाहन केले. चर्चासत्रात विविध ज्ञानशाखातील नामवंत विचारवंतांनी सक्रीय सहभाग घेतला. तपशील असा : समाजशास्त्र : य.भा. दामले, विधिराज्यघटना : सत्यरंजन साठे, राज्यशास्त्र : मा. प. मंगुडकर, तत्त्वज्ञान : एस. व्ही. बोकील, सहकार शास्त्र : पी. आर. दुभाषी, आरोग्य व वैद्यकशास्त्र : विजया साठे, वाणिज्य व व्यवस्थापन शास्त्र : गो. स. कामत, अर्थशास्त्र : बाळ गाडगीळ, मंजुषा मुसमाड. दाभोलकरांच्या आवाहनाला लगेच प्रतिसाद मिळाला व दुसरे चर्चासत्र घ्यावयाचे ठरले.

**संदर्भसूची**

1. Allen Bloom : The Closing of American Mind

2. Noam Chomsky : International Stratification

3. Noam Chomsky : The Pentagon Factor in Poverty in Latin America

टीप : या प्रस्तुत लेखात संदर्भासाठी काही पृष्ठ क्रमांक दिले आहेत, ते पेठे यांच्या एप्रिल, जुलै २००२ अर्थसंवादमध्ये प्रसिद्ध झालेल्या लेखासंबंधी आहेत.

✠ ✠ ✠

डॉ. वसंत पेठे यांच्या प्रतिमानांची स्तुती तर पुष्कळच झाली आहे. परंतु त्यावर सखोल अनुकूल - प्रतिकूल चर्चा प्रयत्न करूनही आजवर होऊ शकलेली नाही. आज अनेक प्रश्न ऐरणीवर आहेत आणि त्यांच्याविषयी आंतरशास्त्रीय चर्चा संशोधन आदि होण्याची नितांत आवश्यकता आहे. ज्या पद्धतीच्या प्रतिक्रिया उपयुक्त होऊ शकतील त्याचे एक निदर्शन म्हणून डॉ. य. भा. दामले व डॉ. रमणम्मा यांचा लेख येथे देण्यात आलेला आहे. डॉ. पेठे यांची मूळ मांडणी ज्या अभ्यासकांना हवी असेल त्यांनी डॉ. पेठे यांना शंभर रुपयांची मनिऑर्डर करावी म्हणजे Xerox प्रत कूरिअरने पाठविली जाईल. डॉ. पेठे यांच्या अशाच संलग्न विषयावरील एका चर्चासत्राचा काही निर्देश याच अंकात आहे. त्याच्याहीविषयी हीच व्यवस्था राहील. प्रतिसाद पाहून उपयुक्त वाटल्यास पुनश्च चर्चासत्रांचे आयोजनही करता येईल.

- देवदत्त दाभोलकर

---

एके दिवशी मी जुन्या बाजारात गेलो आणि तेथे मला एका दीन दलित हताश माणसाचे चित्र आढळले. ते मी विकत घेतले आणि माझ्या कामाच्या मेजावर समोर लावून ठेवले. मला ज्या ज्या वेळी अर्थशास्त्राच्या अभ्यासाचा कंटाळा येई त्यावेळी त्या चित्राकडे पाहत असे आणि स्वतःलाच उद्देशून स्वतःला म्हणे : 'या माणसाची परिस्थिती जर सुधारावयास हवी असेल तर तुला असा कंटाळा येऊन कसे चालेल?' - आणि मी परत कामाला लागे.

**- अर्थशास्त्रज्ञ आल्फ्रेड मार्शल**

(A.C. Pigou : Memorials of Alfred Marshall)

# लोकसंख्या व गरिबी यासंबंधी पेठे प्रतिमान
## दोन टिपणे

**देवदत्त दाभोलकर**
कुलगुरू, पुणे विद्यापीठ (निवृत्त)

### I
**प्रास्ताविक**

१. या क्षेत्रातील प्रा. पेठे यांच्या आस्था अध्ययनाविषयी व काही नवे मार्ग शोधण्याच्या प्रयत्नाविषयी मला नेहमीच कौतुकादर वाटत आलेला आहे.

२. त्यांच्या वरील निबंधातच प्रा. पेठे यांनी माझा अभिप्राय उद्धृत केलेला आहे. तो असा आहे. "प्रा. पेठे यांचे प्रतिमान नवीन विचारांना चालना देणारे आहे. आंतरशास्त्रीय अध्ययन-संशोधनाला आवाहन करणारे व आव्हान देणारे असे आहे." हे प्रा. पेठे यांच्या भारतीय लोकसंख्येच्या प्रश्नाविषयीच्या मूलगामी विवेचनालाही लागू आहे. किंबहुना भारतीय सद्य:स्थितीचा कोणताही व्रतनिष्ठ तत्त्वचिंतक याहून अधिक यशाची अपेक्षा बाळगत नसेल. त्याने बाळगूही नये.

३. हे चर्चासत्र आयोजित करण्यात एक्स फर्ग्युसोनिअन्स असोसिएशनने पुढाकार घेतला याचा मला विशेष आनंद आहे. माझा 'फर्ग्युसन'शी जिव्हाळ्याचा संबंध आहे. आंतरशास्त्रीय अध्ययन-संशोधनासाठी कुवत असणारे अनेक एक्स फर्ग्युसोनिअन्स प्रत्येक शाखेत उपलब्ध आहेत. त्यांनी मनावर घेतले तर भारतीय प्रश्नांची सखोल मांडणी करणारे एखादे Club of Fergussonian असे एखादे व्यासपीठ त्यांना उभे करता येईल. त्या दिशेने असोसिएशन प्रयत्न करणार असल्यास त्यात सर्व सहयोग (आर्थिक सहयोगासह) घ्यावयास मला आनंदच होईल.

### II
**प्रा. पेठे यांच्या मॉडेलविषयी**

१. तळागाळातील माणसांपर्यंत जाऊन पोचावयाचे असेल तर आजची प्रचलित प्रतिमाने अपुरी आहेत हे स्पष्ट आहे. प्रश्न आहे तो नवे प्रतिमान शोधून काढण्याच्या बौद्धिक कुवतीचा व ते कणखरपणे आचरणात आणले जाईल अशा प्रभावी सुसंघटित समाज-अधिष्ठित कार्यक्षम कृतिशक्तीचा. (मी केवळ 'राजकीय' म्हटलेले नाही.) यापैकी पहिली शक्ती आपल्याकडे असल्याचे आभास अनेक विचारवंतांना होत असतात. दुसरी शक्ती आपल्याकडे नाही ही भूमिकाही ते सहजपणे घेऊ शकतात. त्या दिशेने यत्किंचितही प्रयत्न करावयाची मात्र त्यांची सिद्धता नसते. राजकीय शक्ती अंतिमतः जागृत समाजशक्तीवर अवलंबून असते आणि ती तशी करण्यातही आपले प्रत्येकाचे काही उत्तरदायित्व असते. याचे भान आपल्याला राहत नाही. 'The buck ultimately stops with me' हे भान सार्वत्रिक झाले (निदान आपल्याला आले) तरी तो शुभारंभ होईल.

एरवी राजकारणी (चांगल्या अर्थानेदेखील) म्हणू शकतात - जसे चर्चिल म्हणाला, 'I know that democracy is an imperfect form of government, but it is at present the least imperfect form that is available to us' ती सवड चर्चिलला आपण दिली पाहिजे. तरीही ब्रिटिश लोकशाही तशी मजबूत होती. दुसऱ्या महायुद्धात केवळ चर्चिलच्या नेतृत्वामुळे विजय मिळवल्यानंतरही लागलीच झालेल्या निवडणुकीत ब्रिटिश जनतेने त्याला पंतप्रधान पदावरून दूर केले. (What use is the Order of the Queen's Garter to me when the British people have already given me the order of the boot' असे खिलाडू वृत्तीचे विनोदी त्याचे त्याला देऊ केलेल्या अत्युच्च्य पुरस्काराविषयीचे उद्‌गार होते.)

२. अवघड विषय सुगम करून मांडण्याची शैली प्रा. पेठे यांना साधलेली आहे. काही सांस्कृतिक संस्कृतमधील संदर्भ ते देतात तेव्हा माझ्यासारख्याला त्यांच्या अंतःकरणातील ओलाव्याचाही स्पर्श होतो. त्यांच्या विचारावर गांधीजींच्या विचारधारेचा काही प्रभाव आहे असे मला वाटते. विशेषतः आसुरी संपत्तीचा नियंता 'Mammon' याचा ते निर्देश करतात तेव्हा तर गांधीजींचे 'That man cannot serve both God and Mammon at the same time is the highest economic truth that I know' हे गांधीजींचे वचन आठवले. (गांधी, मार्क्स अशी नावे कानावर पडली कीच ज्यांचे








कान टवकारतात किंवा साफ बंद होतात त्यांच्या दृष्टीने असे एखादे विधान करणे धोक्याचे असते. परंतु ते खरे विचारवंत (विचारशील) नसतात. केवळ आग्रही विचारप्रचारक असतात.

३. पाश्चात्त्य प्रतिमानांवर प्रा. पेठे यांनी जी काही टीका केली आहे तिच्याविषयी मी काही सांगत नाही. तशा स्वरूपाची टीका अनेकांनी (पाश्चात्त्यांनीही) यापूर्वी केली आहे. या टीकेचा मुख्य निष्कर्ष हा की आपण आजवरच्या अनुभवातून शिकून काही नवीन चिंतन केले पाहिजे. या निष्कर्षाशी मी सहमत आहे.

४. प्रश्न प्रामुख्याने आहे तो कृति-कार्यक्रमाचा. या संदर्भात प्रा. पेठे यांची मांडणी भाबडी, स्वप्नदर्शी, आदर्शवादी झाली आहे असे मला वाटते. त्यांच्या मांडणीतील 'सिद्धांत-२, निविष्टी-१' या 'शिक्षण' विषयक निविष्टीचा मी याठिकाणी केवळ एक उदाहरण म्हणून निर्देश करतो. या क्षेत्रात मी काम केले आहे. या क्षेत्रात केल्या जाणाऱ्या संशोधनाचे (आंतरशास्त्रीय पद्धतीच्या देखील) जवळून काही निरीक्षण केले आहे व १९७८ साली प्रसिद्ध केलेल्या Education for our people : A development plan for the next decade या अशाच एका आंतरशास्त्रीय क्लबच्या राष्ट्रीय निवेदनावर माझीही एक स्वाक्षरी आहे. प्रा. पेठे यांनी मांडलेल्या बहुतेक कल्पना व अधिकही काही त्या निवेदनात स्पष्ट आहेत. २००३-२००४ मध्ये प्रसिद्ध झालेला 'नवभारत' मासिकाचा अतिथी संपादक म्हणून संपादित केलेला चतुर्मास जोडअंकही 'शिक्षण आणि समाजपरिवर्तन' याच विषयाला वाहिलेला आहे.

५. हे मी प्रा. पेठे यांच्या मांडणीची उणीव म्हणून सांगत नाही तर या एका क्षेत्रातही भारतात आंतरशास्त्रीय अध्ययन, विश्लेषण, संशोधन विषयक अजून किती मोठ्या प्रमाणात आवश्यकता आहे याचे निदर्शन म्हणून सांगत आहे. 'आरोग्य' हा प्रा. पेठे यांच्या प्रत्यक्ष कृतिशील कार्यक्रमाचा भाग राहिलेला आहे परंतु त्या क्षेत्रातही त्यांची विधाने काटेकोरपणे अधिक तपासली जाण्याची आवश्यकता आहे हे त्यांनाही मान्य होईल असे मला वाटते. त्यांची मांडणी आग्रही वाटली तरी त्यांची संशोधन व प्रतिपादन याविषयी मूलभूत वृत्ती हटाग्रही नाही असा मला विश्वास आहे.

६. या व अशा स्वरूपाच्या सर्वच चर्चासत्रात मला रस आहे व आमंत्रण असेल तेथे मी उत्साहाने सहभागी होण्याचा प्रयत्न करतो. सामान्यपणे चर्चासत्रे काहीशी उद्बोधक व बरीचशी रंजक होतात असा माझा अनुभव आहे. Follow up आवश्यक आहे हेही सामान्यपणे मान्य असते. परंतु त्या दिशेने काहीही प्रत्यक्ष कार्य होत नाही असाच आजवरचा अनुभव आहे.

ही भारतीयांचीच मानसिकता आहे की नाही हा आंतरशास्त्रीय संशोधनाचाच विषय आहे. पण हा भारतीय विचारवंतांचा mind-set आहे याविषयी भारतीय विचारवंतांतही दुमत होणार नाही असे मला वाटते. हे चर्चासत्र याला अपवाद ठरले तर तो सामान्य नियम सिद्ध करणारा अपवाद समजावा लागेल.

परंतु मला ती आशा आहे. याचा काही निर्देश मी यापूर्वीच केला आहे.

✠ ✠

**अनेक मान्यवर या चर्चेला उपस्थित होते त्यापैकी कोणी अद्यापीही आपली सविस्तर प्रतिक्रिया पाठविल्यास ती प्रसिद्ध करण्यात व त्याआधारे आणखी एखादे चर्चासत्र आयोजित करण्यात उत्तर-नव भारताच्या दृष्टीने नवभारतला रस आहे. डॉ. पेठे यांच्या मूळ निबंधाची Xerox प्रत ज्यांना हवी असेल त्यांनी शंभर रुपयांची मनिऑर्डर पाठवून डॉ. पेठे यांच्याशी संपर्क साधावा.**

त्यांचा पत्ता :
डॉ. वसंत पेठे
दशभुजा गणपती हौसिंग सोसायटी,
दशभुजा गणपतीजवळ, पौड फाटा,
कर्वेरोड, पुणे-४११०३८.
फोन : ९५२०-२५४३०२५३

✠ ✠ ✠

## डॉ. प्र. चिं. शेजवलकर

(अधिष्ठाता : व्यवस्थापन शास्त्र, पुणे विद्यापीठ)

दि. २ एप्रिल रोजी होणाऱ्या चर्चासत्रात इच्छा असूनही भाग घेणं शक्य नसल्यामुळे माझे विचार थोडक्यात येथे मांडत आहे. ते कृपया उपस्थितांपुढे मांडावेत अशी नम्र विनंती आहे.

डॉ. वसंत प्रभाकर पेठे हे मूलगामी संशोधन करून, आणि साधक-बाधक विचार करून, मगच आपले सिद्धांत मांडत असतात. गरिबी निर्मूलनावर त्यांनी लिहिलेला सैद्धांतिक प्रबंध हा असाच अभ्यासपूर्ण आहे. पेठे यांनी तयार केलेलं प्रतिमान खरोखरीच विचारांना चालना देणारं आणि त्या विषयांवरील नव्या संशोधकांना आव्हान देणारं असं आहे. या त्यांच्या सिद्धांतांची त्यांनी प्रथम मांडलेली पार्श्वभूमी ही देखील






अभ्यासपूर्ण आहे. सर्वसाधारणतः त्यांनी मांडलेल्या गरिबी निर्मूलनाच्या सिद्धांताशी मी पूर्ण सहमत आहे. आणि राज्यकर्त्यांनी देखील त्यांच्या या तळमळीने मांडलेल्या सिद्धांताचा विचार करून त्याप्रमाणे दारिद्र्य निर्मूलनासाठी पावले टाकली पाहिजेत.

मात्र डॉ. पेठे यांच्या व्यासंगपूर्ण अध्ययनाचा विचार करताना मनात काही प्रश्न उभे राहतात.

१. गरिबी निर्मूलनाचे कितीही प्रयत्न केले तरी गरिबी संपूर्णपणे नष्ट होईल अशी अपेक्षा करता येणार नाही. अगदी अमेरिकेसारख्या संपन्न देशातही निदान दहा टक्के लोक दारिद्र्यरेषेखाली आहेत. जसजशी लोकसंख्या वाढत जाईल त्याप्रमाणात गरिबांची संख्याही वाढतच जाईल. श्रीमंत लोकांची श्रीमंती कमी करून गरिबांचे दारिद्र्य दूर होणार नाही.

२. कित्येक वेळा गरीब लोकांनाच गरिबीत जगावंसं वाटतं. ते स्वतःच्या पायावर उभं राहून दारिद्र्य रेषेच्या वर येण्याचा आपणहून प्रयत्न करीत नाहीत. त्यांना दुसऱ्याच्या जिवावर जगण्याचं व्यसन लागलेलं असतं. सुप्रसिद्ध लेखिका आईन रँड यांनी एके ठिकाणी म्हटलं आहे की गरीब लोकांची स्वावलंबी होण्याची इच्छाशक्तीच नसते. असे लोक कायमचे गरीब राहणार. याउलट असे शेकडो आहेत की जे प्रयत्न आणि कष्ट करून स्वतःच्या पायावर उभे राहिले आहेत आणि श्रीमंत झाले आहेत.

३. गरीब आणि श्रीमंत यांच्यातली दरी मोठी असू नये हे मला मान्य आहे. श्रीमंत लोकसुद्धा गैरमार्गाने पैसा मिळवून धनाढ्य होत असतील तर त्यांना कायद्याने वेसण घातली पाहिजे. पण लक्ष्मी मित्तल, नारायणमूर्ती, अजीम प्रेमजी, थॉमस बाटा, राहुल बजाज यांच्यासारखे जे लोक स्वतःची प्रचंड कल्पनाशक्ती वापरून श्रीमंत झाले आहेत त्यांच्याकडून योग्य त्या प्रमाणात कर वसूल केला जातो. आपल्या समाजात कचऱ्यातूनं कांचन निर्माण करणारे असे अनेक उद्योजक आहेत. गरिबांनाच गरिबीची चीड आली पाहिजे आणि प्रशासनावर अवलंबून न राहता त्यांनी दारिद्र्यमुक्त होण्याचा मार्ग स्वतः शोधला पाहिजे.

४. लोकसंख्या वाढीमुळे गरिबी वाढते हे पटत नाही. लोकसंख्या वाढल्यामुळे मागणीही वाढते. उत्पादनाला चालना मिळते. त्यातूनच बाजारपेठ विस्तृत होते. अनेक नवे व्यवसाय निर्माण होतात आणि मग त्यामुळे नोकरी मिळण्याची संधी निर्माण होते. लहान-मोठे हातगाडीवाले, फिरते विक्रेते, पथारीवाले, भाजी विक्रेते, सुरक्षारक्षक असे अनेक लोक आहेत की जे स्वतःहून धडपड करतात आणि त्यातल्यात्यात स्वतःची गरिबी कमी करतात. स्त्रियासुद्धा घरोघरी जाऊन मोलमजुरीचे काम करतात. बांधकामावर कष्टाचं काम करतात. आपण दरिद्री राहण्याची त्यांना लाज वाटते आणि म्हणूनच ते कष्ट उपसतात. असे प्रयत्न आपल्याकडे दारिद्र्य रेषेखाली राहत असलेले लोक करत नसावेत.

५. शेतकऱ्यांसाठी मात्र कोरडवाहू शेतीतून अधिक उत्पन्न मिळविण्यासाठी राज्यकर्त्यांनी प्रथमपासूनच प्रचंड गुंतवणूक करायला हवी होती. आपल्याकडे कारखानदारी आणि सेवाक्षेत्र यांच्या मानाने कृषि विकास क्षेत्रात गुंतवणूक अगदी कमी आहे. शेतकऱ्याला पावसावर अवलंबून राहावं लागतं. आपल्याकडे गेल्या पंचवीस वर्षांत कृषि क्षेत्रात गुंतवणूक पुरेशी न झाल्यामुळे शेतकऱ्यांचं दारिद्र्य त्यांच्या आत्महत्येला कारणीभूत झालेलं आहे.

६. प्रत्येक ठिकाणी फळबागा आणि इतर धान्य मुबलक प्रमाणात आहे. पण त्यांच्यावर आधुनिक तंत्रज्ञान वापरून प्रक्रिया करण्याची सुविधा सरकारने निर्माण केली नाही. उद्योगधंद्यातले लोकही यात गुंतवणूक करीत नाहीत. आंबा, द्राक्ष, पपई यासारख्या फळांवर आधुनिक प्रक्रिया केल्यास शेतकऱ्याच्या या पिकांना चांगली किंमत येईल.

७. शेतकरी गरीब राहतात याचं कारण हे मधले दलाल लोक त्यांच्याकडून स्वस्त भावाने माल विकत घेऊन मुंबईसारख्या बाजारात चढ्या किमतीने विकतात.

८. लोकसंख्या नियंत्रणासाठी गेल्या चाळीस वर्षांत महिलांचं शिक्षण आणि सक्षमीकरण या दोन्ही गोष्टी साफ दुर्लक्षित राहिल्या. खेड्यापाड्यातल्या महिला जर शिकल्या असत्या तर त्यांनी आपणहून कुटुंबनियोजनाचा मार्ग स्वीकारला असता. आज देशात अजून ४६ टक्के स्त्रिया पूर्णपणे निरक्षर आहेत. आणि २४ टक्के पुरुष तसेच निरक्षर आहेत. प्राथमिक शिक्षणावर राज्यकर्त्यांनी फारच कमी खर्च केला. शिक्षणाचं सार्वत्रिकरण करण्यात अपयश आलं. अजूनही मुलींचे कोवळ्या वयात विवाह होतात. खरं म्हणजे अगदी सुरुवातीपासूच मुलींचं लग्नाचं वय किमान वीस असायला हवं होतं.

९. ज्या गोष्टी राज्यकर्त्यांनी करायला पाहिजे होत्या त्या न केल्यामुळे आज दारिद्र्याचा प्रश्न 'आ' वासून वर आला आहे. डॉ. पेठे यांनी खूपच कष्ट घेऊन योग्य ते सिद्धांत मांडले आहेत. पण अशा अभ्यासाकडे लक्ष द्यायला राज्यकर्त्यांना वेळ नाही हे दुर्दैव आहे.

अनुक्रमणिका

## श्रीपाद दाभोलकर प्रयोग परिवार : वाटचालीचा मागोवा

### संदर्भ : नवभारत : पुनर्रचनेचे नवे पर्व, ऑगस्ट २००३

**या मागोव्याच्या आधारे या वर्षी दि. २० व २१ ऑगस्ट रोजी सातारा येथे चर्चासत्र होईल. सहभागी होऊ इच्छिणाऱ्यांनी प्रा. देवदत्त दाभोलकर यांच्याशी संपर्क साधावा.**

### श्रीपाद दाभोलकर दिन

**अरुण डिके**

३० अप्रैल २००६
नेमावार (मध्यप्रदेश)

भारत भूमीपर प्रखरतासे अपना अस्तित्व सिध्द करनेवाले सूर्यनारायण को वैज्ञानिक ढंग से हरितया द्वारा भूमीपर उतारकर भारत के समृद्धी की राह दिखानेवाले श्रीपाद अच्युत दाभोलकर आज ही के दिन सन २००१ में हम सब से सदा के लिए बिदा हुए थे। उनके कार्य को अपने बुद्धी से कार्यरत रखनेवाले उनके अनुयायी देशभर में बिखरे पडे है। इन सबका तथा प्रयोग परिवार का कम से कम सालभर में ३० अप्रैल, और १ मई कहीं तो भी इकठ्ठा सम्मेलन होता ही आ रहा है। इसकी शुरुआत पुणे के साधना प्रेस में १२ मई सन २००१ से की हुई थी। उसके बाद २००२ में वर्धा, २००३ में गुंसावाडी (सिलवासा दमन), २००४ में गोवा, २००५ में पनवेल और २००६ में ग्राम बजवाड (नेमावार) तहसील खाते गाटे जिल्हा देवास में हम कुछ लोग श्री. दीपक सचदे के साथ इकठ्ठा हुए थे। जिन लोगों ने दाभोलकर सर को प्रत्यक्ष सुना था उनके नाम निम्नानुसार है।

१. दीपक सचदे, २. अरुण डिके (इन्दौर), ३. एस. के. बायस (इन्दौर), ४. जयप्रकाश नारायण राठी (हरदा), ५. बाबा चंद्रशेखर, ६. अजय गद्रे। इनमें बायस, राठी और चंद्रशेखर इंजिनीअर है। हरदा के पुराने व्यवसायी श्री. राजेंद्र बाएती १५० एकड जमीन (नेमावार में) पर खेती करते है। और उसे वें वैदिक ग्राम में परिवर्तित करना चाहते है। उनी के प्रयासोंसे तथा श्री. बायस, श्री. महेंद्र जोशी के सहयोगसे श्री. दीपक सचदे को ग्राम बजवाड में एक एकड जमीन स्वयं के लिए तथा ६ एकड जमीन उनके ट्रस्टके लिए मिली है। उस जमीन से लगा एक १३० वर्ष पुराना एक आश्रम है, जहाँ मुंबई के प्रसिद्ध उद्योगपती अरविंद मफतलाल के गुरू रहते है। फिलहाल वह आश्रम दीपकभाई को मिला हुआ है, जहाँ वे अपनी वृद्ध माँ और पुत्र वत्सलके साथ रहते है।

३० अप्रैल को सुबह ११ बजे हम वहाँ एकत्रित हुए। दाभोलकर सर को प्रत्यक्ष मिले हुए, उनका साहित्य पढ़े हुए और उनके कार्यों से प्रभावित हुए वहाँ इकठ्ठे हुए थे। १. श्री. दीपक सचदे, २. श्री अरुण डिके, ३. एस. के. बायस, ४. श्री जयप्रकाश राठी, ५. बाबा चंद्रशेखर, ६. अजय गद्रे, ७. श्री. संदीप नाईक, ८. श्री. पियुब राठी. ९. श्री भरत राठी, १०. श्री. यादव (सभी हरदा से), ११. श्री बाएती (बजवाड) १२. श्री राजेंद्रसिंह राठोड (रतलाम), १३. श्री. रमेश मिरानी (बीडीपत्ता व्यवसायी, कानून विषय के स्नातक तथा खेती में

**Letter from The President of India**
**Shri. A.P.J. Abdul Kalam**

*No. 1-BS/GDN2005* 05 Sept 2005

Shri Arun Dike
53-B, Prem Nagar
Indore - 452007

Sir, This pertains to your book on Indian Agriculture "Our Agriculture, Past, Present & Future" mailed to The President of India on 20.8.05.

I have been directed to convey the appreciation of The President on the book particularly the work of late Shri S.A. Dabholkar and others on similar line.

With regards

Yours Sincerely
Dr. Brahma Singh




रूची.)

११.३० बजे हमने दो मिनिट मौन रखकर दाभोलकर सर को श्रद्धांजली अर्पित की। बाद में दाभोलकर और उनके विज्ञानपर श्री. अरुण डिके ने प्रकाश ड़ाला। दीपकभाईने सृज संस्कृतीपर अपने विचार रखें। दीपकभाई ने विस्तार से जंगल, जमीन, पौधें, सूर्य, जड़े इन पर प्रकाश डाला। मध्यप्रदेश के एक मंत्री और हरदा के विधायक श्री. कमल पटेल चाहते है की हरदा में कृषि का विकास हो। उन्होंने बाएती और दीपकभाई को कहा है कि, 'मैं २१ मे को बजवाड आऊँगा और आपकी क्या माँगे हैं आप लिखके दिजीए।' इस विषय पर भी विस्तृत चर्चा हुई। श्री. संदीप नाईक पेशे से कम्प्युटर इंजिनीअर है। पूने में एक बहुराष्ट्रीय कंपनी में अपनी नौकरी कर रहे थे। उनके वृद्ध मातापिता और हरदा के पास बिजनेर में २०० एकड जमीन को जोतने वे नौकरी छोड़कर आए। उन्हें प्राकृतिक विज्ञान खेती सीखना है। उन्होंने दाभोलकर सर की कुछ पुस्तके पढ़ी है। उन्होंने करीब २० एकड जंगल साफ कर वहाँ गेहून भई बोनी थी मगर उन्हें सफलता नहीं मिली। उन्हें भी श्री. दीपकभाई ने मार्गदर्शन दिया। मसाला मिट्टी तैय्यार करने की विधीपर विस्तृत चर्चा हुई। बहुतांश लोगों का कथन था की जहाँ छोटी जमीन है वहा ये तकनीक उपयोगी है मगर जिनके पास पचास, सौ या दौसौ एकड़ जमीन है वे क्या करे? उनकी शंकाओंका दीपकभाईने समाधान किया।

दोपहर साडेचार बजे भोजन के बाद सभीने मसाला मिट्टी और ग्रिनींग किस तरह से करना है इसपर प्रदर्शन प्लॉट का अवलोकन किया। श्री. बाएतीजी के खेतपर जाकर आम, जाम, निबू, मोसम्बी, नारियल आदि फसलों का निरीक्षण किया। सिंचाई और पौधपोषण में कहाँ कहाँ गलतियाँ हुई हैं उसे समझा। श्री. बायस ने यवतमाळ में सुभाष शर्मा के खेती में प्रयोगों, जलप्रबंध और कृषिउत्पादन के मार्केटिंग पर उनके सफल अभियान का वर्णन किया। श्री. रमेश मिरानी ने हरदा के पास पांच गावों में प्राकृतिक विज्ञान खेती में रूची रखनेवाले किसानों को दीपकभाई किस तरह मार्गदर्शन कर सकते है, इसपर चर्चा की। खेतों की मेढ पर छे फूट उंचे विविध प्रकार के वृक्ष क्यूं और कैसे लगाने चाहिए, खेतों को जोते बगैर खेतों में जैविक कार्बन को किस प्रकारसे काम में लिया जा सकता है इस पर अरुण डिके द्वारा उठाई गई शंकाओं का दीपक भाईने समाधान किया।

रात्री को साडेनौ बजे श्री. राजूभाई बाहेती आए। उन्होंने उत्साहपूर्वक बताया कि बगैर खेती विकसित किए हुए भारत की प्रगति नहीं हो सकती अतः वे जैविक वैदिक ग्राम बसाना चाहते है। अरुणभाई ने उनको बताया कि यदि वे कुछ करना चाहते है तो उन्हें ग्रामवासियों के स्वावलंबन का सबसे पहले सोचना चाहिए। न केवल खेती से मगर ग्रामीण उद्योगों से किसान समृद्ध हो इसपर विचार किया जाय। जी.एम.ओ. अनुबंधित खेती किस तरह खतरनाक है इस पर विचार किया जाय। कानपुर गोशाला द्वारा बैलों से बिजली ऊर्जा उत्पादन, गोमूत्र से दवाई साबुन, तेल, मच्छरअगरबत्तियाँ कैसे बनाकर गावों में रोजगार निर्माण किया जा सकता है इसपर राजूभाई से विस्तृत चर्चा हुई। राजूभाई ने बताया कि आप और हम जैसे समान विचारधारा के लोग ही ये काम कर सकते है। अरुण डिके ने राजूभाई को मध्यप्रदेश के एक सेवात्यागी (स्वेच्छा-निवृत्त) प्रशासनिक अधिकारी डॉ. ब्रह्मदेव शर्मा के ग्रामस्वराज्य अभियान के बारे में बताया कि कैसे मध्यप्रदेश, झारखंड और उडिया के आदिवासी बाहुल कुछ चुनिंदा जिले के कुछ पांच-दस गावों में गावगणराज्य की स्थापना की है कि वहाँ बैठक लेने के पहले जिलाधिकारी और डी.एस.पी. को भी गाँवमुखिया से स्वीकृती लेनी पडती है। गाँववालें ही तय करते है कि शासकीय कार्यों की प्राथमिकता वहाँ क्या होगी।

इस तरह हमने ३० अप्रैल २००६ को नेमावार में श्रीपाद दाभोलकर दिवस मनाया।

⌘ ⌘

## द्राक्षमाऊलीचा वारस

### विनायक पाटील

महाराष्ट्रात द्राक्षबागायत ही काही ठरावीक कुटुंबांची मक्तेदारी होती. प्रा. श्री. अ. दाभोलकर यांनी बत्तीस वर्षे द्राक्षपीक समजावून सांगण्यासाठी शेतकऱ्यांचे अभ्यासवर्ग घेतले. प्रयोग करणाऱ्यांचे गट स्थापन केले. त्याने प्रयोग परिवाराचे रूप धारण केले. सिद्ध झालेल्या प्रयोगांचे सार्वत्रिकरण केले. द्राक्ष पिकाची गीता समजले जाणारे डॉ.


अनुक्रमणिका


विंकलर यांच्या 'जनरल व्हिटी कल्चर' या ग्रंथाचे मराठीत भाषांतर केले 'द्राक्षसंहिता.'

ते बत्तीस वर्षे गावोगावी, खेडोपाडी हिंडले. साधू, बैराग्यासारखा रात्र होईल त्याच गावात मुक्काम केला. भाजी-भाकरीच खाल्ली. अनेक कुटुंबांनी त्यांचे शिष्य होऊन द्राक्षपीक समजावून घेतले, लावले, इतरांनाही समजावून सांगितले. द्राक्षपिकाची शास्त्रशुद्ध लागवड करून त्याचे संगोपन करण्याची एक लाटच महाराष्ट्रात आली. द्राक्षपीक सर्वसामान्य शेतकऱ्यांपर्यंत पोचले. ज्ञानेश्वर महाराजांनी मूठभरांच्या हातात असलेला धर्म, गीतेचे मराठीत भाषांतर करून व गावोगावी प्रवचने देऊन सर्व-सामान्यांपर्यंत पोचविला, म्हणून त्यांना सर्वसामान्यांनी माऊली ही उपाधी बहाल केली. ज्ञानदेवांची ज्ञानोबामाऊली झाली, तसेच मूठभरांच्या हातातले द्राक्ष हे पीक गावोगावी प्रवचने देऊन सर्वसामान्यांपर्यंत पोचविले व त्यांच्या घरात समृद्धीचा दिवा लावला म्हणून उभ्या महाराष्ट्राने दाभोलकरांना 'द्राक्षमाऊली' ही पदवी बहाल केली.

प्रा. दाभोलकर यांनी द्राक्षाचे शास्त्र सरळ, साध्या व सोप्या ग्रामीण भाषेत समजावून सांगितले. त्यांची वाणी ओघवती होती, रसाळ होती व परिणाम साधणारी होती. त्यांच्या कार्याची प्रेरणा घेऊन महाराष्ट्रात अनेक कार्यकर्ते तयार झाले व ते महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यात कार्यरत आहेत. द्राक्षमाऊलीची शिकवण ही एक परंपराच महाराष्ट्रात निर्माण झाली.

श्री. वासुदेव चिमणराव काठे, मु.पो. कसबेसुकेणे, ता. निफाड, जि. नाशिक हे या परंपरेतील एक प्रमुख कार्यकर्ते. द्राक्षमाऊलीचा या शिष्यावर विशेष जीव होता. ते त्यांच्याकडे जात. मुक्कामाला राहत. वासुदेवाशी चर्चा करीत. त्याला समजावून सांगत व त्याने प्रत्यक्ष केलेल्या प्रयोगाची माहिती घेत. त्याच्या शेतात दिवसदिवस प्रयोग समजावून घेत व त्याला मार्गदर्शनही करीत असत. वासुदेव काठे प्रयोग परिवाराशी अठरा वर्षांहून अधिक काळ संपर्कात आहेत. त्यांनी द्राक्षपिकावर शंभरहून अधिक प्रयोग केले. कृषिविषयक वेगवेगळ्या पाच अभ्यासक्रमांचा अभ्यास केला. मराठी नियतकालिकांत डझनावारी लेख लिहिले. राष्ट्रीय स्तरावरील द्राक्ष परिसंवादात भाग घेतला. अनेक जिल्हा स्तरावरील परिसंवादात मार्गदर्शन केले. दोन पुस्तके लिहिली. पहिले 'दर्जेदार द्राक्ष उत्पादनाची प्रयोगसिद्ध मूलतत्त्वे' व दुसरे 'द्राक्ष बागायतदारांच्या ४०० प्रश्नांना उत्तरे' ही दोन्ही अनुभवसिद्ध पुस्तके द्राक्षउत्पादकांना मार्गदर्शक ठरली आहेत. अडीच एकरांवर द्राक्षशेतीची सुरुवात करणाऱ्या वासुदेव काठे यांच्याकडे आज वीस एकर द्राक्षबाग आहे.

निर्यातक्षम द्राक्ष निर्माण करणाऱ्या शेतकऱ्यांची गुपिते समजावून घेण्यासाठी त्यांनी द्राक्षनिर्यात करणाऱ्या पंचवीस कुटुंबांची निवड करून त्यांच्या शेती करण्याच्या पद्धतीतील समान बाबी (फॅक्टर्स) काय आहेत, हे समजावून घेण्यासाठी तीन वर्षे सर्वांच्या शेतांना भेटी देऊन काही निष्कर्ष काढले आहेत. असे प्रयोग काठे त्यांना सुचवीत व स्वतःची पदरमोड करून ते संशोधन करतात आणि मुक्तहस्ताने ही माहिती ते इतरांनाही पुरवतात. शेतकऱ्यांचा काठे यांच्या माहितीवर विश्वास आहे. स्वतः काठे यांचा प्रयोगांवर विश्वास आहे. दाभोलकरी परंपरा पुढे चालू आहे. वासुदेव चिमणराव काठे हा द्राक्षमाऊलीचा खरा वारस आहे.

✠ ✠

## दहा गुंठे प्रयोगाच्या निमित्ताने
### अरुण डिके

महाराष्ट्रात द्राक्षशेतीला विक्रमी चालना देणारे आणि १० आर शेती या क्रांतिकारी प्रकल्पामुळे प्रसिद्धीला आलेले थोर कृषितज्ज्ञ स्व. श्रीपाद अच्युत दाभोलकरांच्या पाचव्या स्मृतिदिनाप्रीत्यर्थ तारा (पनवेल) येथील युसुफ मेहर अली सेंटरमध्ये २९, ३० एप्रिल व १ मे ला एक कार्यशाळा संपन्न झाली. महाराष्ट्राव्यतिरिक्त आंध्र, कर्नाटक, केरळ, गुजरात, मध्यप्रदेश, ओरिसा व उत्तरप्रदेशातून आलेल्या जवळपास दीडशे निसर्गप्रेमींनी या कार्यशाळेत भाग घेऊन दाभोलकरांच्या कार्याचा आढावा घेतला. दाभोलकरांचे पट्टशिष्य दीपक सचदे, दाभोलकर परिवार, सरांवर प्रेम करणारे, त्यांना समजणारे व न समजणारे, शिवाय वैकल्पिक विकासांवर काम करणारे असे आवर्जून सगळे हजर होते.

**मला उमजलेले प्रा. दाभोलकर**

सोलापूरच्या अरुण देशपांड्यांमुळे दाभोलकरांचे नाव

कानावर यायचे. बळीराजाने नेटाने राबवलेल्या त्रिवार्षिक निसर्गशेती संमेलनामुळे त्यांचं साहित्य वाचण्यात आलं. या शतकाच्या प्रारंभीच इंदूरला सरांची भेट झाली, वाढली. त्यांच्या मृत्यूच्या दोन महिने आधी इंदूर व भोपाळला सतत पंधरा दिवस त्यांच्याबरोबर राहायला, ऐकायला, समजायला मिळालं. मला राहून राहून आता वाटतं की हा गृहस्थ बऱ्याच आधी भेटायला हवा होता. गणितात पारंगत असल्यामुळे या चराचरामध्ये वावरणाऱ्या प्रत्येक जीवधारी वस्तूंच्या आपसातल्या समन्वयाचं त्यांचं निरीक्षण व त्यावर मांडलेलं गणित फार मजेदार असायचं.

वानगीदाखल - नागफणी आणि बकरी, कोंबडीच्या आसपास घोंगावणाऱ्या माशांच्या आळ्या, कोंबडीचं खाद्य व तिने दिलेली अंडी, पोपईची झाडे, बिया, गावात झोपड्यांच्या छतावर पसरलेली वालपापडी, भोपळा, घोसाळे, कलिंगडाच्या वेली, दुभत्या जनावरांचे खाद्य व दुधाचे उत्पादन, बिल मॉलिसनने मेलेल्या गायीच्या शिंगातून सिलिकामुळे शेणाचं उत्कृष्ट खत बनविण्याच्या प्रक्रियेवर बोलताना सरांचं "त्यात काय, आपली नखं व न्हाव्याने कापलेले केस पण तेच काम करतात," हे भाष्य! आपण घरात येताजाता तोंड, हातपाय धुतल्यावर किंवा अंघोळ केल्यावर शरीराचा जो चिमूटभर मळ बाहेर टाकला जातो तो केर काढल्यानंतर एकत्र केला तर त्यात शेणाला त्वरित खतांमध्ये परिवर्तित करण्याची किती ताकद आहे माहीत आहे का? अशी त्रोटक पण महत्त्वाची विधाने त्यांच्या तोंडी ऐकण्यात मजा यायची. कुमार गंधर्वांचं एक प्रसिद्ध माळवी भजन आहे. त्यात सासूबाई सकाळपासून जावयाच्या आगमनासाठी अंगण साफ करून तो कचरा कोपऱ्यात साचवायची सूचना देतात अशी ओळ आहे. मला ताबडतोब सरांचं निरीक्षण आठवलं व कैक वैज्ञानिक तथ्यं आपले संत, महात्मे कसे सांगून गेले याची जाणीव झाली. केरसुणीला लक्ष्मी का म्हणतात हे पण समजलं. गंमत ही की अशा निरीक्षणात आपल्याला प्रखरतेनं जाणवतं की यात शेतात उत्पन्न व उत्पादन वाढवायला बाहेरून कुठलंच आदान (इनपुट) वापरलेलं नाही. खतांच्या गोळ्या नाही की बीटी सारखं महागडं बियाणं नाही. सूर्य, पाऊस, माती, वनस्पती आणि यातून उत्पन्न झालेल्या ऊर्जेतून जास्तीतजास्त किती उत्पादन घेता येईल याचा सतत अभ्यास, ध्यास, निरीक्षण, चर्चेनंतर कोपऱ्यात बसून वहीवर टिपलेले धागेदोरे व त्यानंतर प्रयोग हा सरांचा खाक्या होता. शेती संशोधन फक्त पिकांपुरतं मर्यादित न ठेवता गाय, बकरी, कोंबडी, रेशीमकिडे, लाकूड उत्पादन यांचा समग्र विचार करून प्रत्येक वस्तूतून भक्कम ग्रामीण शेतकी दौलत कशी निर्माण करायची ही त्यांची जिद्द होती. हे त्यांचं गणित आणि त्यांचा दृष्टिकोन समजल्याविना त्यांचं १० आर शेतीचं तंत्र समजणं कठीण आहे. माझी खात्री आहे की सरांच्या सहवासातल्या ८० टक्के लोकांना त्यांचं १० आरचं गणित पटलेलं नाही. ज्यांना पटलेलं आहे त्यात १५ टक्के भास्कर सावे, वासुदेव काठे, वैजनाथ शेट्ये, सुरेश देसाई आणि दीपक सचदे यांसारखे सरांच्या खांद्याला खांदा लावून शेतात राबणारे प्रयोगवीर व उरलेले ५ टक्के आपापल्या व्यवसायांमुळे प्रत्यक्ष शेतीपासून लांब असे सरांच्या कार्याचे माझ्यासारखे अभ्यासू. आपल्या विलक्षण प्रतिभेमुळे व अफाट प्रयोगांनी आपले सिद्धांत कागदावरच नव्हे तर शेतात रेखाटणारे दाभोलकर सर याचमुळे विज्ञानाचे रहस्य बाहेर काढून आम लोकांना दाखवणार होते पण जसजसे ते प्रसिद्धीच्या झोतात येत गेले तसतसे त्यांचे हे तंत्र इतर लोकांना कळावे म्हणून त्यांचे प्रचंड दौरे सुरू झाले. कदाचित एक श्रीपाद अजून असता तर एक प्रयोगस्थळांवर राबला असता व दुसरा प्रचारासाठी बाहेर पडला असता.

### कार्यशाळेतली चर्चा

तारा येथील कार्यशाळेत दाभोलकरांच्या पत्नी श्रीमती वृंदा दाभोलकर, थोरले बंधू देवदत्त दाभोलकर, डॉ. नरेंद्र दाभोलकर, डॉ. सौ. शैलजा दाभोलकर, पुत्र अतीश ही कुटुंबीय तर होतीच, शिवाय दाभोलकरांच्या तत्त्वावर शेतात प्रयोग करणारे उम्बरगावचे निसर्गशेतीवर नाव कमावलेले वयोवृद्ध शेतीतज्ज्ञ भास्कर सावे, जल-व्यवस्थापन व बायोमासवर आंतरराष्ट्रीय ख्यातिप्राप्त के. आर. दाते, त्यांचे सहकारी विदर्भाचे श्री. खडसे, संध्या एदलाबादकर, लातूर उस्मानाबादचे दाभोलकरांचे पट्टशिष्य वैजनाथ शेट्ये, बेडकीहाळचे सुरेश देसाई, व्यावहारिक निसर्गशेती परिवाराचे अशोक कोठारे, विदर्भाचे सेंद्रीय शेतीतज्ज्ञ मनोहर परचुरे, महाराष्ट्राचे प्रमुख वनसंरक्षक बी. के. मोहन, चिं. मो. पंडित, वसंत गंगावणे आणि बापूसाहेब देशपांडे यांनी कार्यशाळेत हिरीरीने भाग घेतला. युसुफ मेहरअलीचे पारीख साहेब जातीने हजर होते.








या व्यतिरिक्त लखनऊहून केंद्रीय फळबाग संशोधन केंद्राचे डॉ. दुष्यंत मिश्र, इक्रिसेट (इंटरनॅशनल क्रॉप रिसर्च इन्स्टिट्यूट फॉर सेमिएरीड ट्रॉपिक) हैद्राबादचे मुख्य सूक्ष्म जीव वैज्ञानिक डॉ. ओमप्रकाश रूपैला मुद्दाम दाभोलकरांचे तंत्र समजून घ्यायला पूर्ण वेळ हजर होते. महाराष्ट्रातल्या प्रयोगवीर शेतकऱ्यांची तळमळ व शेतीतले नवीन तंत्र समजून घ्यायची जिज्ञासा बघून ते अचंबित झाले.

प्रत्येक पिकाच्या दमदार वाढीसाठी पांढऱ्या मुळ्यांची वाढ चांगली असायला हवी यावर दाभोलकरांचे विशेष लक्ष असायचे. त्यासाठी कुठल्याच बाह्य आदानाची (इनपुट) या पिकाला गरज नसते. मात्र पिकाखाली माती मसालेदार, कर्बयुक्त असावी असा त्यांचा आग्रह असे. शेतात ओल टिकवण्यासाठी मल्चची फार गरज असते. मात्र ती कशी असावीत व कुठे पसरावी याची चांगली माहिती वैजनाथ शेट्ये यांनी दिली. कमी खर्चात, पाण्याचे व पिकांचे व्यवस्थापन करून भरघोस ऊसाचे उत्पादन कसे करावे हे सुरेश देसाई यांनी सांगितले. दाभोलकरांच्या १० गुंठे कल्पनेविषयी आदर असूनही केवळ त्यामुळे शेतकऱ्यांचे प्रश्न सुटणार नाहीत असे जेव्हा मनोहर परचुरे म्हणाले तेव्हा थोडा गोंधळ उडाला पण त्यांनीच आपली बाजू नीट मांडून खुलासा केला.

कार्यशाळेचे चर्चासत्र सकाळी ९ ते १ व दुपारी २ ते ६ चालायचे. युसुफ मेहरअली शेतात चाललेल्या विविध प्रयोगांची प्रत्यक्ष पाहणी पण सर्वांनी केली. ऑस्ट्रेलियाचे बिल मॉलिसनने आपल्या जगप्रसिद्ध पर्माकल्चर शेती पद्धतीमध्ये गंगम्मा या आदिवासी भारतीय महिलेने आखलेल्या सांडपाण्यावर उभारलेल्या शेतीला गंगम्मा मॉडेल नाव देऊन साऱ्या जगात गंगम्मा मॉडेल प्रसिद्ध केले. वर्तुळाकार न्हाणीघराच्या सर्व बाजूला वर्तुळाकार वाफ्यात वेगवेगळ्या भाज्या, केळी, पोपई, ऊस, मका अशा १५-१६ प्रकारच्या पिकांची सांडपाण्यात शेती कशी करायची याचं जिवंत प्रात्यक्षिक श्री. दीपक सचदे यांनी दाखवलं. मसालामाती कशी तयार करायची याचं घण प्रात्यक्षिक तिथे दाखवलं गेलं.

ही सर्व तत्त्वे दाभोलकरांनीच विकसित केलेली असल्यामुळे नवीन आलेल्यांना विशेष उत्सुकता होती.

या वर्षीच्या कार्यशाळेत ही गोष्ट प्रखरतेने जाणवली की दाभोलकर नावाचा प्रचंड हत्ती समोर उभा आहे आणि प्रत्येक जाणकार त्याच्या अवयवाला चाचपडून आपापले अर्थ काढत आहेत. दाभोलकरांच्या तत्त्वज्ञानाला सरळ भाषेत जर लोकांपुढे मांडता आले तर प्रत्येक ऐकणारा व बघणारा आपापल्या बुद्धीने त्यांचं तत्त्वज्ञान तपासून बघू शकेल. जग हे कुठल्या तत्त्वज्ञानावर किंवा काव्य कल्पनेवर चालत नाही तर पाण्याला लोकांनी जल न म्हणता $H_2O$ म्हटलं असतं. चराचरामध्ये उत्पादित प्रत्येक प्राणी, वनस्पती, सूर्य, जल, आकाश, डोंगर, यांची एकमेकांमध्ये गुंफण काय आहे ते समजायला स्थूलातून सूक्ष्मात जावं लागतं आणि हे करत असताना पण सामाजिक जाणीव ठेवावी लागते. हेच माझ्या मते दाभोलकर सरांचं तंत्र होतं. माझा एक आंतरराष्ट्रीय स्तरावर चीनच्या वैज्ञानिकांबरोबर संकरित तांदळावर काम करणारा वैज्ञानिक मित्र आहे. त्याला मी एकदा विचारलं, 'हा देश सोडून तुला ३० वर्षे झाली. भारताच्या शेतीची आणि शेतकऱ्याची तुला किती माहिती आहे? इंटरनेटवर येते तितकीच.' तो प्रामाणिकपणे म्हणाला, 'त्या संदर्भात मला वाटतं दाभोलकरांना या भारताची सामाजिक जाण होती. दिवसेंदिवस कमी होत चाललेली जमीन, पाणी व इतर नैसर्गिक साधनांच्या ऱ्हासामुळे पुढला पंचवीस वर्षांनंतरचा भारत कसा राहील यावर त्यांनी १० आर शेती कल्पना राबविली असावी असा माझा कयास आहे.'

दोन गोष्टी प्रखरतेने या कार्यशाळेत जाणवल्या. एक चर्चा कमी, निरीक्षण अधिक ठेवणं जरूरीचं आहे. कारण चर्चेमध्ये जं तुमच्या कानावर आदळतं ते मेंदूत शिरायला वेळ लागतो. दुसरं कार्यशाळेचं माध्यम हिंदीत असणं जरूरी आहे किंवा मराठी भाषणाचा त्वरित हिंदी अनुवाद फार आवश्यक आहे. अन्यथा बाहेरून येणाऱ्यांचा ओघ कमी होईल.

दाभोलकरांचं साहित्य हिंदी भाषेत येणं जरूरी आहे. कारण मध्य आणि उत्तर भारतात वैकल्पिक विकासावर उत्तम काम करणाऱ्या कैक संस्था आहेत. नाव घ्यायचं झाल्यास देवास (मध्यप्रदेश) ची समाज प्रगती सहयोग, भोपाळ, देवास होशंगाबादची एकलव्य, गांधीमार्ग, दिल्लीचे अनुपम मिश्र, राजस्थान अल्वरचा तरुण भारत संघ इ.

✠ ✠

अनुक्रमणिका






## श्री. प्र. शं. ठाकूर

(प्रख्यात कृषितज्ज्ञ)

## जमनालाल बजाज पारितोषिक स्वीकृतीचे भाषण

[९ डिसेंबर २००४ रोजी मुंबई येथे 'जमनालाल बजाज अॅवॉर्ड' स्वीकारताना श्री. पी. एस. ठाकूर यांनी केलेले भाषण -]

या समारंभाचे प्रमुख पाहुणे श्री. सिंघवीजी, बोर्ड ऑफ ट्रस्टीजचे प्रमुख श्री. राहुलजी बजाज व मित्रहो,

श्री. जमनालाल बजाज यांच्या नावाचे हे पारितोषिक मिळाल्याबद्दल मी अत्यंत ऋणी आहे. आपल्या सर्वांना माहितीच आहे की, श्री. जमनालालजी बजाज हे महात्मा गांधींचे अतिशय जवळचे सहकारी होते. त्यामुळे त्यांच्या नावाचे पारितोषिक आज मिळत आहे याचा मला आनंद आहे.

याचवेळी मला आणखी दोन व्यक्तींचे ऋण मानले पाहिजे. त्यांपैकी एक म्हणजे श्री. के. जी. जोशी, माजी डायरेक्टर ऑफ अॅग्रीकल्चर, महाराष्ट्र राज्य; आणि प्रा. एस. ए. दाभोलकर 'प्रयोग परिवार' कोल्हापूर, याचे संस्थापक. १९९० साली प्रा. एस. ए. दाभोलकरांना हेच जमनालाल बजाज पारितोषिक मिळाले होते हेही मी येथे नमूद करतो.

या दोन बहुश्रुत व्यक्ती मला गुरूसमान आहेत. कारण त्यांनी माझ्या शेतीविषयक प्रयोगांत मला मार्गदर्शन केले व सर्व प्रकारचे सहाय्य केले. माझ्या या सर्व प्रयोगात त्यांची बुद्धिमत्ता माझ्या मदतीसाठी धावून आली. हे प्रयोग सन १९६४ ते २००० पर्यंत केले. या सर्व कालखंडात ते माझे केवळ गुरू म्हणून नव्हे, तर मित्र म्हणूनही सहाय्यक होते.

शेतीखात्यात मी ६२ वर्षे कार्यरत होतो. त्याबरोबरच खेड्यांचा विकास आणि पर्यावरणाचे रक्षण हे कार्यही चालू होते. या कामात मला बहुसंख्य शेतकऱ्यांचे सहकार्य मिळाले. त्यामुळेच या क्षेत्रांत मी निरनिराळ्या प्रयोगांत यशस्वी झालो. या सर्व सहाय्यकांचे मी मनापासून आभार मानतो. ते असेच सहकार्याने काम करीत राहतील याची मला खात्री आहे.

हे बहुमोल पारितोषिक माझ्या कार्याचा सर्वोच्च बिंदू आहे. परंतु याच वेळी माझ्या हे देखील लक्षांत येते की, कार्य बहरात असतानाच या दोन व्यक्ती या जगातून गेल्या यामुळे माझ्यावर फारच मोठी जबाबदारी येऊन पडली आहे, आणि ती केवळ माझ्यावरच नव्हे, तर माझ्यासारख्या इतरांवरही आहे.

सांगली जिल्ह्यात १९६१ साली मी पाच तरुण शेतकऱ्यांच्या कृतिशील सहकार्याने द्राक्ष-बागायतीस सुरुवात केली. हा पाचजणांचा गट हळूहळू वाढत जाऊन तासगाव वैज्ञानिक द्राक्षकुलात रूपांतरीत झाला. प्रा. श्री. अ. दाभोलकर या गटात १९६५ सालापासून सहभागी झाले. परिणामतः ह्या गटाला एक नवीन दिशा मिळाली व त्यात गुणात्मक फरक झाला. असे घडून येण्यासाठी स्वतःच्या कामाची व विचारांची परतपरत फेरतपासणी व गटातील इतरांबरोबर चर्चा; तसेच त्यामुळे बागायतीत घडवून आणावयाचे बदल, हे सर्व वारंवार करावे लागले. या सर्वांतून द्राक्ष-क्रांती निर्माण झाली. (Grape-revolution) या क्रांतीची सुरुवात व या प्रयोगांतून शिकून केलेले नवीन नवीन प्रयोग हे सर्व वैज्ञानिक द्राक्षकुलाने केले आणि त्यामुळे द्राक्ष-बागायतीत अधिकाधिक प्रगती होत गेली. या सर्व प्रयोगांत सरकारी शेतीखाते किंवा शेतीविद्यापीठे यांचा काहीही सहभाग नव्हता.

वैज्ञानिक द्राक्षकुल सुस्थापित व संपन्न होत गेल्यावर प्रा. दाभोलकर आंबा व केळी या उत्पादनांकडे वळले. कारण नवनवीन प्रयोग केल्याशिवाय त्यांना चैन पडत नव्हते. या प्रयोगांबरोबरच कोरडवाहू जमिनीवर घेण्यात येणारी ज्वारी, बाजरीसारखी पिके यांवर देखील संशोधन करून ही पिके अधिक दाणेदार व विपुल कशी होतील याविषयीही प्रयोग करण्याची त्यांची तयारी चालू होती. परंतु हे सर्व करीत असतानाच, आपल्या संशोधनाच्या योग्यतेची खात्री प्रयोगांती सिद्ध होत असतानाच, कर्तृत्वाच्या शिखरावर आरूढ झालेले प्रा. दाभोलकर अकस्मात ३० एप्रिल २००१ साली आसाममधील कार्य चालू असताना, विषारी मलेरियाचा संसर्ग होऊन मृत्युमुखी पडले. त्यांच्या पाठीमागे राहिलेल्या त्यांच्या सहकाऱ्यांवर आता त्यांनी लावलेली ज्ञानज्योत पुढे घेऊन जाण्याची आणि कोरडवाहू शेतकऱ्यांची दैना नाहीशी करण्याची जबाबदारी येऊन पडली आहे.

'प्रयोग परिवार'ची कार्यप्रणाली स्वीकारून, स्वावलंबी (sustainable) आणि पर्यावरणास उपयुक्त अशी जमीन तयार करण्यासाठी, प्रा. दाभोलकरांची 'मसाला माती' तयार करण्याची पद्धत वापरून मी सध्या प्रयोग करीत आहे.

अनुक्रमणिका

ही जी शेती करण्याची नवीन पद्धत आहे, ती मी अशी विशद करीन : कोरडवाहू जमिनीतसुद्धा आर्थिकदृष्ट्या परवडतील अशी पिके घेता येतात. यासाठी फक्त निसर्गात तयार होऊ शकणाऱ्या मसाला मातीची गरज आहे. रासायनिक खतांचा अधिकाधिक वापर आणि भरपूर पाणी घालण्याच्या हल्लीच्या उपक्रमांमुळे जमिनीचा नैसर्गिक, जैविक (organic) पोत नाहीसा होत आहे. 'प्रयोग परिवारा'च्या पद्धतीनुसार शेतकऱ्यांची प्रवृत्तीच बदलायची आहे. कृत्रिम, रासायनिक खते घालून जमिनीचे नुकसान होते हे त्यांना पटवून द्यावयाचे आहे. निसर्गाने मुक्त हस्ताने देऊ केलेल्या, नैसर्गिक साधनांच्या मदतीने आपण आपले उत्पादन वाढवू शकतो आणि ती वाढीव शक्ती कायमस्वरूपी राखू शकतो हे त्यांच्या लक्षात आणून द्यावयाचे आहे. शेतीविषयक प्रत्येक बाबतीत स्वयंसिद्ध होण्याची गरज आहे, हे त्यांना पटवून द्यायचे आहे.

मला यापुढे जाऊन असंही सांगावयाचे आहे, 'प्रयोग परिवार'चा आणखी एक महत्त्वाचा पैलू आहे. या 'प्रयोग परिवार'चा असा प्रयत्न आहे की हीन-दीन झालेल्या आजच्या शेतकऱ्याला त्याच्या दैन्यावस्थेतून बाहेर काढावयाचे आहे. प्रा. दाभोलकरांचा प्रमुख भर होता की केवळ भरभराट नको तर त्याबरोबर समानता (equity) ही पाहिजे. आणि हे ध्येय गाठण्यासाठी आम्ही कटिबद्ध आहोत. आमचा असा पूर्ण विश्वास आहे की सूर्यनारायण आणि हिरवी पाने जेव्हा एकत्र येतात, तेव्हा कायमस्वरूपी समाधान आणि सुख प्राप्त होते. हे आम्ही आमच्या द्राक्ष-बागायतीद्वारे सिद्ध करून दाखवले आहे.

आज देशात सत्तर टक्के शेतकरी कोरडवाहू जमिनीवर निर्वाह करतात. या शेतकऱ्यांच्या जीवनात 'प्रयोग परिवार' पद्धतीने स्थैर्य व समाधान आणता येईल. अर्थात त्यांना या प्रकारच्या शेतीत धोके पत्करावे लागतील आणि त्यांच्या उत्पादनांत चढ उतारही होत राहतील. ज्या शेतकऱ्यांनी आतापर्यंत 'प्रयोग परिवार' पद्धती स्वीकारून त्याचे फायदे अनुभवले आहेत त्या शेतकऱ्यांनी आपल्या इतर बांधवांना या बाबतीत मार्गदर्शन वा मदत केली पाहिजे, विशेषतः सुरुवातीच्या काळात अशी मदत मिळणे जरुरीचे आहे.

डॉ. पी.बी. पाटील (सांगली) यांनी बांधलेल्या स्वातंत्र्य सैनिक संघटनेने 'नवे गाव आंदोलन' सुरू केले आहे. श्रीपाद दाभोलकर प्रयोग परिवार कृषिविकास पद्धत तरुण शेतकऱ्यापर्यंत पोचविण्यासाठी आम्ही एक अभ्यासक्रम तयार केला आहे. या उपक्रमात आपणा सर्वांच्या शुभेच्छा माझ्या पाठीशी असू द्यात. शेवटी पुन्हा एकवार मी आपणा सर्वांचे आभार मानतो.

❖ ❖

## अल्पभूधारक, महिला, वंचित गट यांच्यासाठी दहा गुंठ्यांचा पथदर्शक प्रयोग

**भावना आपटे**
(कृतिशील कार्यकर्ती)

स्वातंत्र्यप्राप्तीनंतरच्या दोन दशकांपर्यंत भारता-तील बहुतांश लोकसंख्या ग्रामीण भागात राहत होती. शेतीव्यवस्था, गावगाडा बऱ्यापैकी चालला होता. मोठी शहरेसुद्धा शांत आणि लोकसंख्या मर्यादित असल्याने राहायला सुखाची होती. सोईसुविधा होत्या तेवढ्याच पुरेशा होत्या. बरीचशी अर्थव्यवस्था भोवतालच्या परिसरावर अवलंबून होती. लोकांच्या गरजा मर्यादित होत्या, धनलालसा आजच्याएवढी वाढली नव्हती तेव्हा ग्रामीण भागातली कुटुंबव्यवस्था स्थिर होती. कुटुंबातला एखादा मुलगा फारच हुशार असला तर शिकायला शहरापर्यंत पोचत होता. अन्यथा गावातले शिक्षण दैनंदिन व्यवहार पार पाडायला पुरेसे होते.

७० च्या दशकानंतर कारखानदारी वाढू लागली. त्यांना कुशल कामगारांची गरज भासू लागली. शहरात नोकरी केली तर महिन्याच्या महिन्याला ठरावीक पगार हातात येतो. कामाचे ठरावीक तास पूर्ण केल्यावर बाकी काही जबाबदारी राहत नाही. शहरातल्या इतर सुख-सुविधापण आकर्षक होत्या. माफक किंमतीत घरे मिळत होती. त्यामानाने ग्रामीण भागातले जीवन कष्टाचे होते, शेती पावसावर अवलंबून होती, १२ महिने काही ना काही काम असायचेच. जनावरांचा बारदाना सांभाळावा लागत असे, गरजा भागत असल्या तरी हातात पैसा खेळत नव्हता. शेतीच्या मर्यादा लक्षात येऊ लागल्या होत्या आणि जास्त पैसा मिळवण्याचा मार्ग गावातल्या अर्थव्यवस्थेत नव्हता. वेळेवर पगार, ठरावीक काम, शहरी सुविधा,






सुटसुटीत कुटुंब व त्यामानाने शारीरिक कष्ट व चिंता कमी यांमुळे ग्रामीण भागातले लोक शहराकडे ओढीने येऊ लागले. शेतीत सुधारणा झाल्या म्हणजे उत्तम प्रतीचे वाण आले, रासायनिक खते आणि जंतुनाशके आली, धरणे, कालवे, सिंचनयोजना, विजेवर चालणारे पाणी खेचणारे पंप आले आणि काही काळ शेती फायद्याची वाटू लागली. ज्यांच्या शेकडो एकर जमिनी होत्या असे शेतकरी, सावकार, जमीनदार यांनी जमिनीच्या मालकी हक्कावर मर्यादा येण्याची कुणकुण लागताच खटपटी लटपटी करून सीलिंगच्या कायद्यातून पळवाटा काढून आपली मालकी कायम ठेवली. ऊस, संत्रा यांची लागवड करून सहकारी साखर कारखाने काढून आपली सत्ता आणि मत्ता सांभाळली व वाढवलीसुद्धा. पश्चिम महाराष्ट्रात ऊस संपूर्णपणे अनुदानांवर अवलंबून होता. खाजगी भांडवलवाल्यांनी भांडवल घालून संत्रा व केळीच्या बागा लावल्या, पण त्या सर्व पिकांसाठी केलेल्या पाण्याच्या भरमसाठ वापरामुळे, मन मानेल तसा रासायनिक खतांचा वापर यामुळे जमिनीला खारफुटी झाली, भूगर्भाच्या पाण्याची पातळी खाली खाली जाऊ लागली. कापसाच्या बाबतीत पिकांची अनिश्चितता व रोग यांमुळे बहुतांश बागाईतदार कर्जबाजारी झाले.

या सर्व पार्श्वभूमीवर जे मध्यम शेतकरी होते त्यांचीही कुटुंबात वाटणी होऊन जमिनीचे लहानलहान तुकडे झाले होते. पाण्याची सोय नव्हती, रासायनिक खतांच्या खरेदीसाठी पैसा नव्हता. शेतीतून फारसे काही मिळत नाही याची जाणीव होऊ लागली होती. तेव्हा मग नोकरीसाठी शहराकडे स्थलांतर होऊ लागले. नोकरी मिळाली तर नोकरी, नाहीतर मजुरी, जे मिळेल ते काम करून शहरात राहण्याची तयारी होती. पण गावाकडे परत जाण्याची इच्छा नव्हती. या सगळ्यांमुळे गावात शेवटी बायकामुले व आईवडील राहिले व जमेल तशी शेती करू लागले. (यालाच Feminization of Agriculture म्हणतात.) शेती करणारे कष्टकरीच बाहेर जाऊ लागल्याने ग्रामीण भागातली परस्परावलंबी जीवनपद्धतीच मोडीत निघाल्यासारखी झाली. आपल्या एकूणच सामाजिक व्यवस्थेमध्ये स्त्रियांचे स्थान नगण्यच आहे. तिला कुटुंबासंबंधी, दैनंदिन व्यवहारातले किंवा स्वतःच्या जीवनाविषयीसुद्धा निर्णय घेण्याचे स्वातंत्र्य कधीच नव्हते. ग्रामीण भागातले दलित, भटक्ये, विधवा, परित्यक्ता यांची स्थिती तर अतिशय दयनीय होती व आहे. त्यांना मिळेल त्या मजुरीवर, मिळेल ते काम करून आयुष्य कसेबसे ढकलायचे एवढेच माहीत होते. शिक्षण नाही, कोणतेही अंगभूत कौशल्य नाही अशा परिस्थितीत आयुष्य म्हणजे जीवनमरणाची लढाईच होती. समाजात स्थान नाही, हातात साधन किंवा पैसा नाही. आपली स्थिती सुधारली पाहिजे याची जाणीव असली तरी मार्ग माहीत नाही. सगळीकडून कोंडीत सापडल्यासारखी स्थिती झाली होती. केवळ या महिला व इतर वंचित घटकच नव्हे तर अल्पभूधारक शेतकऱ्यांची स्थितीसुद्धा काही चांगली होती असे नाही, कारण जमीन आहे पण त्यातून उत्पादन घेण्यासाठी भांडवलच नाही.

या सगळ्या अडचणींमधून काही मार्ग काढता येईल का याबद्दल समाजातल्या अनेक विचारवंतांच्या मनात विचार चालला होता. या सर्व साधनहीन, समाजातील अगदी खालच्या स्तरातील वंचित घटक, महिला, अल्पभूधारक कोरडवाहू शेतकरी यांच्यासाठी कायमस्वरूपी उत्पादनाचे काही साधन निर्माण करता येईल काय, जीवनाधार मिळेल का? कस-पोतविहीन झालेल्या जमिनी, उजाड माळ, कमी कमी होत चाललेली वनसंपदा, नेमेचि येणारा दुष्काळ, भूगर्भातील खालीखाली जाणारा पाण्याचा साठा या सगळ्यावर हे रिकामे हात काही उपाय शोधू शकतील काय? रोजगार हमी योजना, सामाजिक वनीकरण, संजय निराधार योजना, कुक्कुटपालन, शेळीपालन ह्यांसारख्या अनेक योजना शासनाकडून येत होत्या, पण त्यांतूनही कायमस्वरूपी उत्पन्नाचे साधन निर्माण झाले आहे असे चित्र दिसत नव्हते. या योजनांचा उपयोग नक्की कोणाला झाला हे कळलेच नाही कारण यातून कायमस्वरूपी उत्पन्न देणारी कोणतीच साधने निर्माण होऊ शकली नाहीत. काही ठिकाणी अपवादात्मक स्वरूपात जेथे कुशल योग्य नेतृत्त्व मिळाले तेथे. राळेगणसिद्धीचे श्री. अण्णा हजारे, हिवरे बाजारचे पोपटराव पवार, 'चेतना-विकास'चे श्री. अशोक बंग, आडगावची पाणलोट संस्था यांनी स्थानिक स्वरूपात शेतीचे व पाणलोट प्रयोग केले पण त्यांचे सर्वत्रीकरण होऊ शकले नाही.

यासंबंधी पहिला बऱ्याच व्यापक प्रमाणांवरचा प्रयोग म्हणजे श्री. श्रीपाद दाभोलकर यांचा १० गुंठे प्रयोग. किमान १० गुंठे जमीन, आवश्यक असे रोज १५०० लिटर पाणी व उपलब्ध सूर्यप्रकाश यांच्या मदतीने एका कुटुंबाला पुरेल एवढा

भाजीपाला, फळे, जळण, एका शेळीची वैरण व पूरक धान्य या क्षेत्रातून मिळू शकते अशी त्यांची मांडणी होती. 'केल्याने होत आहे रे' आणि 'आपला हात जगन्नाथ' या पुस्तकातून त्यांनी या प्रयोगाची मांडणी केली आहे. या प्रयोगापासून स्फूर्ती घेऊन १० गुंठ्यांचा प्रयोग साधनहीन कुटुंबाबरोबर तीन ठिकाणी घेतला गेला. कुंजबिहारी यांचा वेल्हाळे ता. भुसावळ येथील प्रयोग, खुदावाडीतील (उस्मानाबाद) महिलांचे प्रयोग व माया वानखेडे यांच्या मेटीखेंडा (यवतमाळ) इथे चाललेला प्रयोग, हातात फारसे काही न आल्याने व गावातून पुरेसे सहकार्य नसल्याने बंद झाले.

या निराशाजनक परिस्थितीतून व प्रयोग परिवाराच्या भूमिकेतून काय घेता येण्यासारखे आहे याचा नेटाने अभ्यास करून व विचार करून श्री. बाळकृष्ण रेणके यांनी भूगाव (उत्तर सोलापूर) येथे पडीक जमिनीवर १० गुंठे प्रयोग केला व काही गोष्टी सिद्ध केल्या.

श्री. रेणके यांनी प्रयोगासाठी जी जागा निवडली होती ती अगदी पडीक होती. वंचित व गरीब कुटुंबातील घटकांच्या साहाय्याने हा प्रयोग सुरू झाला. अनेक तऱ्हेचा बायोमास गोळा करून शेणकाला, माती, राख, पाणी यांच्या साहाय्याने ढीग घातले, त्यानंतर हरितीकरण केले. त्याचे कंपोस्ट झाल्यावर त्याचे ढीग करून त्यांवर लागवड केली. अशा रीतीने कंपोस्ट करून त्याचे ढीग घालायला साधारण एक वर्षाचा कालावधी लागतो. या प्रयोगातून एखाद्या कुटुंबाला कायमस्वरूपी उत्पन्नाचे साधन व उपजीविकेची हमी द्यायची असेल तर किमान काही गोष्टींची आवश्यकता आहे.

किमान १० गुंठे जमीन, त्याला आवश्यक असे रोज २५०० ली. पाणी, किमान १० टन बायोमास, आवश्यक बी बियाणे, रोपे, अवजारे व श्रम करण्याची तयारी, नवीन कौशल्य आत्मसात करण्याची मानसिकता हवी व किमान १००० दिवसांची रोजगारहमीची रक्कम. या गोष्टी उपलब्ध झाल्या तर २ वर्षांनंतर काही प्रमाणात व ३ वर्षांनंतर कमाल उत्पादन (म्हणजे किती?) या क्षेत्रात घेता येऊ शकते हे श्री. रेणके यांनी भूगाव (जि. सोलापूर) इथे दाखवून दिले आहे. श्री. रेणके यांच्या पद्धतीने व त्यांच्या मार्गदर्शनाने सुरवडे (ता. भुसावळ) इथे श्रमसेवा केंद्राच्या महिला गटाने आपल्या १० गुंठ्यांत हा प्रयोग राबवून त्यातून वार्षिक १२,००० रुपये ते १५,००० रुपये पर्यंतचे उत्पादन घेता येते हे दाखवून दिले.

आजचे शेतीच्या बाबतीत जे जटील प्रश्न आहेत त्यांसाठी समाजातील तीन घटकांची - जीवनाधार नसलेली साधनहीन कुटुंबे, साधनहीनांपेक्षा ज्यांची परिस्थिती फारशी चांगली नाही असे अल्पभूधारक कोरडवाहू शेतकरी, ज्यांची चिकाटी खूप पण जाण कमी आहे अशा महिलागटांच्या सहकार्याने काम करू इच्छिणारे शेतकरी यांच्या सहकार्याची गरज आहे. जिथे किमान क्षेत्र आणि आवश्यक तेवढे खात्रीशीर पाणी उपलब्ध आहे, विनाऔषधे व खतांचा वापर करून नैसर्गिक पद्धतीची लागवड व उत्पादन घेण्याची शेतकऱ्यांची तयारी आहे तिथेच ही कार्यपद्धती यशस्वी होईल हे अनुभवाने सिद्ध झाले आहे.

या प्रयोगासाठीच्या किमान गरजा व प्रयोग कोणाच्या साहाय्याने राबवला जाऊ शकतो यासंबंधी अनुभवाने लक्षात आलेल्या काही किमान गोष्टी अशा आहेत - ज्या ज्या गावात महिलांचे स्वयंसहायक गट आहेत अशा बचतगटातील महिला. स्वयंसहायक गट म्हणजेच बचतगट. जे बचतगट किमान २ वर्षे नियमित चालू आहेत, हिशोब स्पष्ट आहेत, कर्जफेड समाधानकारक आहे, नियमित बैठका होतात, अशा महिला सदस्यांना आपली निसर्गशेतीची पद्धत समजावून सांगणे, त्याबाबत त्यांची सहमती झाल्यावर किमान ५ किंवा १० महिलांचा गट तयार करणे. ५ महिलांसाठी किमान २० गुंठे जमीन व त्यासाठी आवश्यक असलेले पाणी उपलब्ध होण्याची शक्यता आहे तिथेच काम सुरू होऊ शकते. आज पाणी उपलब्ध नसले तरी जवळच्या एखाद्या विहिरीतून कराराने पाणी घेता येईल. जमीन किमान ५ वर्षांच्या कराराने मिळावी. एखाद्या संस्थेची उदा. शाळा, ग्रामपंचायतीची, गायरान, कोणाची पडीक जमीन यांपैकी किमान २० गुंठे जमीन ५ महिलांना आवश्यक आहे. पाण्याची सोय होईपर्यंत जमीन तयार करण्यासाठी लागणारा बायोमास गोळा करण्याचे काम करता येईल. जमीन तयार करण्यासाठीही काही पर्याय आहेत.

१. रेणके पद्धतीने बायोमासचे माती, राख, शेणकाला, पाणी यांच्या साहाय्याने ढीग घालून हरितीकरण करणे व कंपोस्ट तयार झाल्यावर त्याचे ढीग घालून त्यावर भाजीपाला, फळझाडे व इतर झाडे लावणे.

२. सुरवाडे (भुसावळ) येथे तयार केलेले कंपोस्ट खत

व तळ्यातली माती एकत्र करून त्याचे ढीग घातले व त्यांवर भाजीपाला लावला.

३. आणखी एक पद्धत म्हणजे मूग, चवळी, तूर, ताग, घेंचा यांची लागवड करून ते सर्व जमिनीत पुरून टाकणे, द्विदल धान्याच्या पेरणीने जमिनीला नत्राचा पुरवठा होतो. यांपैकी कोणतीही पद्धत अमलात आणली तरी उत्पादनक्षम माती तयार होण्यासाठी साधारणपणे एक ते दोन वर्षांचा कालावधी लागतो.

श्रमसेवा केंद्राच्या पाच महिलांच्या गटाने दीड वर्षांत २० गुंठे जमीन उत्पादनक्षम बनवली व श्री. रेणके यांच्या मार्गदर्शनाखाली त्या आता भाजीपाला, तूर, इतर धान्ये, केळी, कापूस, लसूण, कांदा, वाल, हळद, शेवगा याचे उत्पादन घेत आहेत. १६ गुंठ्यांतून १०००० किलो मिश्र पिकाचे (विक्रीलायक ओला माल) उत्पादन घेऊन वार्षिक ४८००० रु. ची विक्री केली. १ गुंठा हळद, लसूण, आले, मिरची, केळी, पपई यासारखी फळे व भाजीपाला हे उत्पादन रबी व उन्हाळी हंगामाचे उत्पादन आहे. पावसाळी हंगामात तिथे केळी व धान्य आहे. पिकांचा फेरपालट करून उत्पादन घेण्याची पद्धत बसवली आहे. भुसावळला एका गुंठ्यातून वर्षाला ६०० किलो ओला माल मिळतो. दिवसाला सरासरी अडीच किलो विक्रीलायक ओला माल व दिवसाला ३५० ग्रॅम सुका माल गुंठ्यामागे मिळतो. यात लावण्याची तारीख, पानांची संख्या, वाढीचे दिवस किती याचा हिशोब नाही पण तो असायला हवा. हे काम महिलांना जमत नाही. त्यासाठी किमान बी.एस्सी. झालेला, शेतीचा अनुभव असलेला एक सहायक हवा. जो ह्या नोंदी ठेवू शकेल. ह्या सहाय्यकाने महिन्यातून ४-५ भेटी दिल्यास आवश्यक त्या नोंदी होऊ शकतील. भुसावळच्या महिला दिवसाला गुंठ्यातून ५०० ग्रॅम उत्पादनापर्यंत पोचल्या आहेत. साठवणूक, प्रक्रिया व वाहतुकीची व्यवस्था केल्यास या महिला याच्या दीडपट उत्पादन घेऊ शकतील.

या सर्व प्रयोगांमागे श्री. बाळकृष्ण रेणके यांनी चिकाटीने केलेले कठोर परिश्रम आहेत. किमान जमिनीतून कमाल उत्पादन घेणे व त्यांतून जीवनाधार निर्माण करणे ही दृष्टी ठेवून त्यांनी त्यातून मार्ग काढला. जमिनीचे क्षेत्र १० किंवा २० गुंठे असावे व पाण्याच्या गरजेविषयी जे निकष आहेत ते फार काटेकोर नसावेत. २५०० ते ३००० लीटर १० गुंठ्यांमागे हे प्रमाण त्यांनी ठरवले. या कक्षेत प्रयोगाला सुरुवात झाली. त्यांच्या प्रयोगाचा केंद्रबिंदू 'उत्पादक रोजगाराची' हमी हा होता. १० गुंठ्यांचे क्षेत्र हे कौशल्य संपादन करण्याची जागा होती. उत्पादनांवर हक्क नसल्यास वंचित घटकांना या प्रयोगाविषयी उत्साह वाटणार नाही, उत्पादनांवरील हक्क हा अंगभूत मानला गेला आहे व त्यांचा अंतिम व प्रमुख उद्देश श्रमाचे मूल्य वाढवणे आहे. निव्वळ श्रमशक्तीतून विकास एवढाच मर्यादित नाही तर श्रमाचे मूल्य वाढवून त्यांचा आत्मविश्वास वाढवणे हा आहे.

असे प्रयोग करायला जो वित्तपुरवठा पाहिजे तो कुठून करायचा किंवा तो कुठून उपलब्ध होईल? आतापर्यंत खाजगी ट्रस्ट व सहानुभूतीदारांच्या मदतीने, रेणके यांनी स्वतःच आपले बरेचसे पैसे घालून हे प्रयोग झाले आहेत पण या प्रयोगाचे सार्वत्रिकीकरण करायचे असल्यास शासनाचे साहाय्य मिळालेच पाहिजे.

आज रोजगार हमी योजना व सुवर्णजयंती योजनाद्वारे जो निधी उपलब्ध आहे तो जर या महिलागटांना हक्काने मिळाला तर यातून खूप मोठे काम उभे राहू शकेल. यासाठी शासनापुढे या वंचित घटकांच्या वतीने एक आराखडा मांडीत आहोत.

प्रत्येक गावात १०० कुटुंबांची एक ग्रामसभा असावी. त्यांपैकी अंदाजे ४० कुटुंबांना कामाची गरज असते. अशा कुटुंबांपैकी दारिद्र्यरेषेखालील कुटुंबातील महिलांची निवड करावी. अशा ५ किंवा १० महिलांचे गट करावे व शासनाने जाहीर केलेली १०० दिवसांची वार्षिक रोजगार हमीची रक्कम गटाच्या नावे बँकेत ठेवावी. काम सुरू होऊन एका क्षमतेपर्यंत पोचल्यावर त्यांना सुवर्णजयंती योजनेचा निधीही उपलब्ध करून त्यांच्या नावे बँकेत ठेवावा. साधारण आराखडा -

१ ग्रामसभा

१०० कुटुंबे

४० गरजू कुटुंबे

२० दारिद्र्यरेषेखालील कुटुंबे

यांतील ५ महिलांच्या प्रमाणे ४ गट होतील.

१० महिलांचा गट केल्यास, ४० गुंठे जमीन आवश्यक.

१० X ६० X १०० = ६०,०००.०० एका वर्षाची

मजुरी.

६०००० X ५ वर्षे = रु. ३ लाख मजुरी.

३ लाख मजुरी + ३ लाख सुवर्णजयंती योजना साहाय्य मिळून ६ लाख होतात. यांपैकी ३ लाख महिला गटाच्या नावे बँकेत ठेवावे.

या निधीचा विनियोग -

किमान ४० गुंठे जमीन १० महिलांच्या गटाला आवश्यक.

महिलांना जमीन फुकट नको. १०० गुंठ्याला वार्षिक भाडे देण्याची तयारी आहे. गावातील एखाद्या संस्थेने, शेतकऱ्याने जमीन उपलब्ध करून दिल्यास भाडे दिले जाईल.

४० गुंठे X १०० रुपये प्रतिगुंठा = ४००० वार्षिक भाडे

१ गुंठा जमीन तयार करायला १५०० रुपये गुंठ्याप्रमाणे खर्च.

४० X १५०० = ६०००० रुपये जमीन तयार करण्याचा खर्च.

५०,००० रुपये पाण्याची सोय यासाठी खर्च होतील.

याप्रमाणे खर्च केल्यास २ वर्षांत किंवा २ वर्षाचे शेवटी दिवसाला २ किलो ओला माल गुंठ्यामागे तयार होतो. गटाची उत्पादनक्षमता या पातळीपर्यंत आल्यावरच S.G.S.Y. च्या निधीतून कर्ज घेऊन ते गटाच्या नावे बँकेत ठेवावे म्हणजे भाजीपाला उत्पादनांबरोबर कुक्कुटपालन, शेळीपालन इत्यादी करून आणखी उत्पन्न वाढवता येईल.

आता या वंचित घटकांना अनुदान, दया, कोरडी सहानुभूती नको आहे, श्रम केल्यावर हक्काची मजुरी हवी आहे. रोजगार हमी योजनेतून गटांच्या नावे निधी उपलब्ध करून तो बँकेत ठेवला व त्यांच्या आवश्यकतेप्रमाणे, जरूर पडेल तसा खर्च करण्याचे, खर्च करण्याचा निर्णय घेण्याचे स्वातंत्र्य दिले तर या महिला या निधीतून कायमस्वरूपी उत्पादनाची खात्रीलायक साधने निर्माण करतील. किमान जमीन, गरजेइतके पाणी व रोजगार हमीतून हक्काचा निधी उपलब्ध करून दिल्यास या महिला आत्मविश्वासाने आपल्या पायावर उभ्या राहतील. पर्यावरणाचा तोल सांभाळतील. पडीक, निःसत्त्व, कसहीन जमिनीचा कायापालट करून भूमीला सुजला सुफला करतील, आत्मनिर्भर होऊन कष्टाची भाकरी मिळवतील ही जिद्द व चिकाटी त्यांच्यात निश्चित आहेच. त्यांना हव्या आहेत किमान सुविधा व मदतीचा हात. मग त्या आपल्या कर्तृत्वाने काय करू शकतात ते आम्हाला दाखवून देतील. रोजगार हमी योजनेतून असे स्वावलंबी, कौशल्ये आत्मसात केलेले उत्पादनक्षम गट उभे राहायला हवेत.

✠ ✠

प्रा. देवदत्त दाभोलकर यांना,

सा. न. वि. वि.

श्रीदाप्रपमुसचा दहा गुठ्यांचा प्रयोग आमच्या अपंग व मूकबधीर मुलांच्या निवासी शाळेत करावयाचा आहे. आमच्याकडे एका वृत्तपत्रात श्री. पद्मभूषण देशपांडे यांचा दहा गुंठ्यात महिन्याला दहा हजार छोटा लेख वाचला. ते कात्रण माझ्याकडे आहे. अधिक माहिती असल्यास पाठवावी. यासाठी जी फी अथवा मूल्य असेल ते पाठवितो. श्रीपाद यांचे विपुलाची सृष्टी हे पुस्तक माझेकडे आहे.

औरंगाबाद जवळच्या डोंगरात वरील शाळा आहे. तेथे दहा गुंठ्याचा प्रयोग करावा असे वाटते.

कृपया कळवावे, ही नम्र विनंती.

आपला नम्र

बाबा भांड

श्री. बाबा भांड यांना,

स. न.

आपले दि. २८-५-०५ चे प्रा. देवदत्त दाभोलकरांना पाठवलेले पत्र मिळाले. त्यांच्या सांगण्याप्रमाणे मी आपणास खालील माहिती पाठवत आहे.

श्रीपाद दाभोलकर प्रयोग परिवाराला अशा प्रकारच्या कामासाठी विद्यार्थ्यांना मार्गदर्शन करण्यात रस आहे. त्यासाठी पुढील प्रश्नांची उत्तरे मिळाल्यास काय व कसे काम करता येईल याची चर्चा करता येईल. १. अपंग विद्यार्थी म्हणजे कोणत्या प्रकारे अपंग - त्यांचा वयोगट कोणता - मुलगा/मुलगी.

२. ज्या जमिनीवर प्रकल्प करावयाचा आहे ती जमीन कशा प्रकारची व कोठे आहे?

३. पाण्याची व्यवस्था काय आहे?

४. काम सुरू करण्यापूर्वी शेतीसाठी साधने विकत घ्यावी लागतील. त्यासाठी आर्थिक व्यवस्था काय आहे?

५. गुरे, शेळ्या, कोंबड्या ठेवता येतील का?

दहा गुंठ्यांच्या प्रयोगात पहिल्याच वर्षी महिना रु. १०००० मिळतील असे मुळीच नाही. हा आकडा वार्षिक उत्पन्नाचा आहे. तसेच जमीन नापीक/मुरमाड/चुनखडी तत्सम असल्यास जमीन सकस, सपोत, सुपीक करण्यासाठी एक वर्ष द्यावे लागेल. तिसऱ्या वर्षी मात्र वार्षिक १०००० रुपये उत्पन्नाचा टप्पा गाठता येईल. या प्रयोगातून मुलांना काही नवीन शिकल्याचा आनंदही मिळू शकेल.

यासाठी आपल्याकडे उपलब्ध असलेली विद्यार्थ्यांची श्रमशक्ती व ज्ञान वापरून हे करता येईल. श्रमशक्तीचा वापर यांच्याकडे असलेले अपंगत्व कोणत्या प्रकारचे आहे यावर अवलंबून राहील. सर्वसाधारण बौद्धिक क्षमता चालू शकेल. (परंतु मेंटली रिटार्डेड नव्हेत त्यांचा विचार करावयाचा असेल तर करता येईल. परंतु तो पूर्णपणे स्वतंत्रपणे करावा लागेल.)

सर्वात महत्त्वाची गोष्ट म्हणजे या कामात मनापासून रस घेणारी व मुलांबरोबर समरसतेने काम करणारी एक तरी व्यक्ती तेथे पूर्णवेळ उपस्थित असावयास हवी. त्या व्यक्तीनेही काही ठिकाणी चाललेले या प्रकारचे कार्य प्रत्यक्ष पाहणे, समजावून घेणे आवश्यक आहे. यासाठी कोणती व्यवस्था आपल्याकडे शक्य आहे याविषयीची कल्पना नाही. तशी व्यक्ती असल्यास तिला प्रशिक्षण देण्याची व्यवस्था सातारा किंवा पनवेल (युसुफ मेहरअली सेंटर, तारा, जि. रायगड) येथे होण्याची शक्यता आहे. श्रीपाद दाभोलकरांची पुस्तके खालील ठिकाणी विक्रीस उपलब्ध आहेत.

१. मेहता पब्लिशिंग हाऊस, बाजीराव रस्ता, पुणे

२. कृषिग्रंथ भांडार (बळीराजा मासिक) बाजीराव रस्ता

श्रीपाद दाभोलकरांची पुस्तके वाचून, त्यांचा अभ्यास करून प्रारंभ करावा. त्यातील शंका कळवाव्यात. निरसन करण्याचा प्रयत्न केला जाईल.

प्रथमदर्शनी हे कदाचित आपल्याला आपल्या अपेक्षेपेक्षा अधिक अडचणीचे वाटण्याची शक्यता आहे. एक व्यक्ती निर्धाराने उभी राहिली तर हे साध्य करता येईल. हा प्रयोग परिवाराचा अनुभव आहे.

प्रत्यक्षात भेटणे शक्य झाल्यास आपल्याला हवी असलेली माहिती सविस्तरपणे देता येईल. तसेच १० गुंठ्याचा आम्ही साताऱ्यात करत असलेला प्रयोगही पाहता येईल. संपर्कासाठी प्रा. देवदत्त दाभोलकर दुपारी २.०० ते ४.०० या वेळात पुढील फोनवर भेटू शकतील.

फोन क्र. ०२१६२ - २२०३७८

आ. विश्वासू

सुनीला सामंत

✠ ✠ ✠

८/५/२००१

प्रिय सुमनताई,

सप्रेम.

चार दिवसांपूर्वी आलेली बातमी ऐकताच तुम्हालाच लिहिणे मनात आले - ठरवले - आज घडले. दाभोलकर गेले... विश्वास ठेवू नये, इतक्या घाईगर्दीने, सहजतेने. त्यांच्या गुणधर्मानुसारच. 'Plenty for All' चे स्वप्न डोळ्यासमोर आहे व पुस्तक शेल्फवर. दाभोलकरच तेवढे नाहीत. संघर्षाच्या चिखलात पाय रुतले असतानाच, त्यात उद्या नवनिर्मितीची कमळे उगवू - उगवतील हा विचार बाळगून असतो. त्यांचे बीज... त्यांचे पालनपोषण... दाभोळकरां-सारख्यांच्याच हाती होते. त्यांचे हजारो एन्ऱॉन्स... त्यांच्या रोमारोमातील व प्रवृत्तीच्या कोनाकोनाड्यातील त्यांना खेळवणारी व त्यांनी खेळवलेली, जपून - अलगद - ऊर्जा सारे मागे ठेवून ते गेले... हवेहवे असताना! त्यांच्या प्रयोगाशी बांधिलकी मानणारा परिवारच आता त्यांचे सारे जपेल. मी त्या परिवाराची दूरची का होईना, नातलग बनूनच राहीन.

नर्मदेच्या खोऱ्याला श्वास घेण्याइतकी फुरसत मिळाली या आयुष्यात तर त्यांच्या मार्गानेच जातील / जाऊ सारे! मात्र दाभोलकर नसतील. याची उणीव कार्कीइतकीच किती-किर्तींना, तुमच्याइतकीच आम्हा साऱ्यांना जाणवत राहील. अधिक काय लिहू?

स्नेहांकित

मेधा पाटकर






# काही विचार : निसर्गप्रधान देशासाठी !

प्रकाश गोळे

(या क्षेत्रातील नामवंत कार्यकर्ते)

भारत हा शेतीप्रधान देश आहे ही कल्पना टाकून तो 'निसर्गप्रधान' आहे ही वस्तुस्थिती स्वीकारली की, नेहमीच्याच गोष्टींचे काही निराळे आकलन होऊ लागते. भारताचा भूगोल, हवामान, पाऊस, तापमान ह्यांची माहिती शाळेपासूनच आपल्याला मिळते. पण ह्या सर्वांमधल्या प्रचंड विविधतेचे सत्यचित्र विद्यार्थ्यांना आजच्या शिक्षणपद्धतीत मिळत नाही. कारण, ती विविधतेचे महत्त्व ओळखत नाही; तर ज्ञानमंजुषेचे निरनिराळ्या कप्प्यांत विभाजन करून एकेका कप्प्यात एकेका विद्यार्थ्याला कोंबून टाकते. मग तो एखाद्या विषयात तज्ज्ञ झाला तरी इतर विषयांबद्दल तो अनभिज्ञ असतो आणि निरनिराळ्या विषयांतील परस्परसंबंध तर त्याला आणि त्याच्या शिक्षकालाही माहीत नसतात. त्यामुळे ह्या पद्धतीतून बाहेर पडलेल्या विद्यार्थ्यांपुढे स्थापत्य, तंत्रज्ञान, वैद्यकी, वकिली, पतपेढ्या, विमा अशी मोजकी क्षेत्रेच खुली होतात. अलीकडे दूरदर्शन आणि संगणक ह्यांच्यामुळे विविध माहितीचा मारा सर्वांवर होतो आहे. त्यामुळे अनेक भिंती ढासळत आहेत आणि कवाडे खुली होत आहेत.

भारतात विविध प्रकारचा निसर्ग, हवामान आणि वातावरण आहे. सर्वत्र विखुरलेल्या डोंगररांगांमुळे इथे विविध प्रकारांची स्थानिक वातावरणे (मायक्रो क्लायमेटस्) आहेत. अक्षरशः हजारो पाणलोट क्षेत्रांत भारताचे क्षेत्रफळ विभागले गेले आहे. ह्या प्रत्येक क्षेत्रातील वातावरणाला सरावलेल्या वनस्पतींच्या जाती आपल्याकडे विकसित झालेल्या होत्या. तिथल्या निसर्गशक्तींशी सामना करण्याची ताकद त्यांना स्वाभाविकरित्याच प्राप्त झालेली होती. त्यांना स्वतःचा पोत, रंग, स्वाद, चव होती. आजही प्रत्येक गावाने अशा वैशिष्ट्यपूर्ण जाती शोधणे, त्या विकसित करणे, त्या चोखंदळ ग्राहकांपर्यंत पोचविण्यासाठी स्वतंत्र वितरणव्यवस्था उभी करून ती चालविणे योग्य ठरेल. आजच्या दलाली पद्धतीवर आधारित बाजारपेठेला हा एक उत्तम पर्याय ठरेल. स्वतःच्या आवश्यक गरजा भागवून असे वैशिष्ट्यपूर्ण उत्पादन वितरित करणे व आपला विशिष्ट ग्राहकवर्ग तयार करणे व टिकविणे, त्यासाठी परिश्रमपूर्वक नवनवीन कल्पनांचा अवलंब करणे, ह्यातून एक वेगळीच वितरणव्यवस्था, जबाबदार असे वितरक आणि ग्राहक तयार होतील. आजचे पारंपरिक मध्यस्थ, दलाल आणि त्यांची तंत्रे ह्यांना आळा बसेल, ह्यासाठी सार्वत्रिक आणि आपल्या पर्यावरणावर आधारित शिक्षणाची नितांत आवश्यकता आहे.

अशा व्यवस्थेमध्ये बाजारपेठेचा मर्यादित उपयोग आणि आपल्या जीवनावर तिला ताबा मिळवू न देता आपल्या जीवनाचा दर्जा उत्तम राखणे ह्या गोष्टी गृहीत आहेत. प्रचलित शिक्षणपद्धती बदलल्याशिवाय हे घडणे कठीण आहे.

आपला देश उष्ण कटिबंधात मोडतो, मोसमी पावसाच्या प्रदेशात येतो, हे सर्वांस ठाऊक आहे. पावसाची उपलब्धताही येथे मर्यादित आहे. त्यातही सर्वत्र पसरलेल्या डोंगररांगांमुळे पर्जन्यच्छायेचे भागही सर्वत्र विखुरलेले आहेत. भारतातला हरयाना ते कर्नाटक असा एक भला मोठा पट्टा कमी आणि अनियमित पावसाचा आहे. त्यातल्या जमिनीचा दर्जाही असा आहे की, त्यात वनस्पतीजन्य पदार्थ कमी असून खनिजे, क्षार जास्त आहेत. अशा ठिकाणी भरपूर पाणी देऊन शेतीचे उत्पादन वाढविणे बरोबर नाही. इथे जमिनीतील वनस्पतिजन्य पदार्थ वाढवून तिची सुपीकता, ओलावा धरून ठेवण्याची शक्ती वाढविण्याचा प्रयत्न हवा. आणि हे सर्व कमीतकमी खर्चात झाले पाहिजे असा आग्रह हवा. त्या दृष्टीने पाण्याचे वितरण हवे. ह्या दृष्टीने पाहता धरणे- कालवे ह्यांवर आधारीत पाणी-वाटप-व्यवस्था योग्य नाही. अशा व्यवस्थेने जास्तीत जास्त एकरी उत्पादन, मर्यादित क्षेत्रावर भरपूर पाण्याचा उपयोग; त्याचबरोबर रासायनिक खते, कीटकनाशके ह्यांचा वापर ह्यांना उत्तेजन दिले आहे. अशामुळे ठरावीक क्षेत्रात शेती व उद्योग एकवटले जाऊन लोकसंख्येचे केंद्रीकरण होते. अशी शेती, उदयोग व लोकसंख्या ह्यांपासून तयार होणारे सांडपाणी, मैला, तसेच शेती आणि कारखाने-उद्योग ह्यांतून होणारे उत्सर्जन हे सर्व नदी-ओढ्यांत शिरून त्यांची खराबी होते. हे सर्व आपण अनुभवीत आहोत. हळूहळू ह्याबाबत जाण वाढत आहे. पण हे प्रदूषण दूर करण्यासाठी पाणी-शुद्धीकरण-









केंद्रासारखे अत्यंत खर्चिक, पण अनेक प्रकारची प्रदूषणे दूर करू न शकणारे उपाय सुचविले आणि वापरले जात आहेत. शेतीच्या, पाणी साठविण्याच्या आणि वितरणाच्या आपल्या विचारांत, आचारांत, दृष्टिकोणांत बदल झाल्याशिवाय हे प्रदूषण आणि विषम वितरण थांबणार नाही. मूलभूत गोष्टींतच बदल हवा.

शेतीमध्ये एका पिकाचे विक्रमी उत्पादन घेण्याऐवजी निसर्गातील विविधतेवर भर हवा. त्यानुसार कृषि विद्यापीठांनी आंतरपिकांची केलेली निवड व बसविलेली पद्धत योग्य होय. मात्र स्थानिक वातावरणाला अनुकूल अशा जाती, वाणे शोधण्यावर, वापरण्यावर भर हवा. जमिनीवर सतत वनस्पतिजन्य गोष्टींचे आवरण हवे. शेतीभोवती व्यवस्थित राखलेली वनस्पतिजन्य कुंपणे हवीत. ह्या सर्वांमुळे किडींचा बंदोबस्त होऊ शकतो. त्यासाठी आपल्याकडच्या निरनिराळ्या वन्य झुडुपांच्या जातींच्या जीवनपद्धतीचे संशोधन, पुनरुज्जीवन आणि लागवड हवी. वन्य झाडेझुडपे आणि जमिनीसरशा व खुरट्या वाढणाऱ्या वनस्पती ह्यांकडे आमचे लक्ष अजून फारसे गेलेले नाही. त्यांपैकी कित्येक वनस्पती औषधी व इतरही गुण असणाऱ्या आहेत. त्या जमवून, त्यांच्यावर प्रयोग, अभ्यास होणे अत्यंत जरूर आहे.

शेतांना पाणी देण्याची व्यवस्था शक्यतो विहिरींतूनच हवी. त्यासाठी भूगर्भातील साठे पुनरुज्जीवित होणे जरूर आहे. ओढे, नाले, नद्या वाहत्या ठेवणे; त्यांच्या शेजारचे, काठचे वनस्पतिजीवन राखणे; त्यांमधील आसरे आणि पात्रातील वनस्पती, भूरचनांची वैशिष्ट्ये राखणे हे इतर उपायांइतकेच आवश्यक आहे. उपसिंचन योजना बाद करून जास्तीतजास्त पाणी भूगर्भात साठेल आणि त्यातून ते विहिरीत येईल असे पाहिले पाहिजे. शेतीभोवतीचे, एवढेच नव्हे तर शेतीतील चाऱ्यांकडेचे वनस्पतिजीवनही योग्य राखायला हवे. शेतातून कमीतकमी पाणी वाहून जाईल, शक्यतो ते शेतातच मुरेल हे पाहिले पाहिजे.

अशा तऱ्हेचे नियोजन होण्यासाठी केवळ शेतीकडेच लक्ष देऊन चालणार नाही. शेतीबरोबरच गाव आणि त्याचा परिसर ह्यांमधील जमीन आणि पाण्याचा योग्य उपयोग, माणूस आणि निसर्ग ह्यांच्या गरजांमध्ये समन्वय आणि संतुलन; सांडपाणी, कचरा ह्यांची योग्य विल्हेवाट अशा प्रकारचे सर्वंकष नियोजन (लँडस्केप प्लॅनिंग) हवे.

पाण्याची वर्षभर उपलब्धता आणि त्याचे सर्वदूर वितरण ह्या दृष्टीने मी ओढ्यांच्या तंदुरुस्तीला फार महत्त्व देतो. अलीकडे धरणे, बंधारे ह्यांना अवास्तव महत्त्व दिल्याने ओढे निकालात निघाले आहेत. पण अगदी उगमापासून त्यांच्या पात्रांची, प्रवाहांची व किनाऱ्यांची निगा राखली, तर पाणी सर्वांना योग्य प्रमाणात मिळेलच, पण त्यांच्यामुळे निर्माण होणाऱ्या व टिकणाऱ्या वनस्पतींमुळे शेतीशी संबंध नसणाऱ्या, पण निसर्गावर अवलंबून राहणाऱ्या हजारो लोकांना, जमातींना उपजीविका करता येईल. ह्या दृष्टीने ह्या लोकांना ओढे, प्रवाह ह्यांच्या संरक्षणात सामील करून घेतले पाहिजे. भटक्या, विमुक्त जमातींच्या गरजा समजून त्यानुसार उपजीविकेची साधने पुरविण्याची योजना त्यांच्यासाठी आखली गेलेली नाही; उलट निसर्गावर आधारित अशा त्यांच्या गरजा न पुरविताच त्यांना आधुनिक समाजात ओढण्याचा प्रयत्न दिसतो. ओढे, नाले ह्यांची सुधारणा करून, पुनरुज्जीवन साधून, अत्यंत माफक खर्चात उपजीविकेची साधने त्यांना देता येतील.

नदी-ओढ्यांचे प्रवाह वाहते असतील तर ते अनेक नैसर्गिक कार्ये करीत असतात. ते पाणी शुद्ध करतात, पाण्यात मिसळलेल्या अन्नांशांचे वितरण व पुनर्भरण करतात, गाळ वितरित करतात, भूगर्भातील जलसाठे राखतात, अनेक आसरे तंदुरुस्त ठेवतात, अनेक जलचरांची वाहतूक व स्थलांतर घडवितात, पृष्ठभागाखालील जलस्रोत नीट राखतात व त्यांमधून ओलावा पसरवितात; अनेक प्रकारांच्या वनस्पती, प्राणी-पक्षी आणि जलचर ह्यांना जीवन पुरवितात. प्रवाह जागोजागी अडविले की, ही सर्व कार्ये खंडित होतात, पाणी अडवून शेती, उद्योग, मनुष्यवस्ती ह्यांना जे पाणी पुरविले जाते, ते बहुशः ओढे-नद्या ह्यांच्यामध्ये सांडपाण्याच्या रूपाने परत येते आणि नैसर्गिकरित्या शुद्ध होत नाही. ते जागोजागी साचते आणि प्रदूषण, रोगराई ह्यांना कारणीभूत ठरते. जलाशयात साठविलेले पाणी नदीतून, कालव्यातून वेळोवेळी सोडूनही नदीची नैसर्गिक कार्ये पुनरुज्जीवित होत नाहीत. कारण, धरणांमुळे नदीतील प्रवाहांचे, त्यांवर अवलंबून असलेल्या जीवनचक्राचे वेळापत्रक बिघडून ती कार्ये बंद पडलेली असतात. फक्त पावसाळ्यात अल्प काळात नदी-ओढे जिवंत होतात.

गेल्या दोन दशकांत नदी-ओढ्यांमध्ये साचणाऱ्या सांडपाण्याचे प्रमाण प्रचंड वाढल्यामुळे धरणे, जलाशय, कालवे ह्यांच्या व्यवस्थापनामध्ये नवे प्रश्न निर्माण झाल्याचे ह्या विषयातील एक तज्ज्ञ आणि महाराष्ट्र शासनाच्या सिंचन विभागाचे माजी सचिव वि. म. रानडे ह्यांनी निदर्शनास आणून दिले आहे. हे सर्व प्रदूषित पाणी शेवटी धरणांत साठते. नदी,

ओढे, जलाशय ह्यांच्या पाण्यावर अजूनही असंख्य लोक त्यांच्या दैनंदिन गरजांसाठी अवलंबून आहेत. त्यांच्या आरोग्यास प्रदूषण हा मोठा धोका आहे. उजनी जलाशया-भोवतीच्या गावांमध्ये टायफॉइड, कावीळ अशा रोगांचे प्रमाण खूपच जास्त आढळले आहे.

हे सर्व प्रश्न निर्माण होण्याचे कारण म्हणजे आपल्या शेतीचे पर्यावरणिक स्वरूप ओळखण्यात कृषि व इतर तज्ज्ञांना आलेले अपयश किंवा त्याकडे त्यांनी केलेली डोळेझाक आणि त्यामुळे अंमलात आलेली अयोग्य पाणीव्यवस्था होय.

प्रसिद्ध संशोधक धर्मपाल ह्यांनी एका लेखात म्हटले आहे की, ज्यावेळी ब्रिटनीय लोकांनी चेन्नईजवळ वखार स्थापन केली, तेव्हा त्यावेळच्या स्थानिक परिस्थितीच्या त्यांनी तपशीलवार नोंदी करून ठेवल्या. ह्या नोंदींमध्ये ते म्हणतात की, त्या भागातील शेती फार उत्तम आणि प्रगत होती. ब्रिटनीय शेतकऱ्यांनी येथील शेतीच्या अवजारांची नक्कल करावी अंशी शिफारस ते करतात. ती शेती नैसर्गिक विविधतेवर आधारित होती. त्या काळी स्थानिक जनतेच्या आहारात धान्यांच्या ४५ जाती वापरल्या जात. अन्नधान्याची इतकी सुबत्ता आणि स्वस्ताई होती, की शेतमजूरही सुखाने जगू शकत होता. तमिळनाडूतील शेती त्या काळी विहिरी आणि तलावांच्या पाण्यावर अवलंबून होती. गावांमध्ये जागोजागी लहानलहान तळी होती. त्यांपैकी कित्येक देवालयांच्या मालकीची होती. त्यामधूनही पाणीपुरवठा होई. ह्या विकेंद्रित पाणीव्यवस्थेतून जी शेती फुलली, तिचे एकरी उत्पादन कमी असले, तरी खर्चही कमी होता. शेतकरी सुशिक्षित होता आणि तो शेतीच्या व्यवस्थापनात वाकबगार होता. ह्या 'मॉडेल'ऐवजी आजच्या शेतीने दर हेक्टरी उत्पादन-वाढीवर भर दिला आहे. नैसर्गिक विविधतेऐवजी थोड्या, प्रमाणित जाती विकसित केल्या आहेत; आणि गहू, तांदूळ, मका, सोयाबिन अशा काही मोजक्या धान्यांवर भर दिला आहे. त्यामुळे विविधता कमी झाली आहे. बी-बियाणे महाग झाली आहेत. ती वाढविण्याचा, जगविण्याचा खर्च वाढला आहे आणि शेतीचे उत्पादन वाढले तरी खर्चही बेसुमार वाढला आहे. एकीकडे धान्याची कोठारे भरून वाहताहेत, तर ते विकत घेण्यासाठी अनेक ग्राहकांच्या खिशात पैसा नाही, अशी स्थिती आहे. सिंचन-पाण्याची किंमत अशी आहे की, त्यावर नगदी पिके घेणे परवडेल. ही पिके घेणे आणि त्यावर प्रक्रिया करणे हे उद्योग वाढले तरी त्यांच्याद्वारे शहरातील उच्च मध्यमवर्ग आणि श्रीमंत ग्राहक ह्यांच्याच गरजा पुरविल्या जातात, असे दिसते. श्रीमंतांच्याच गरजा पुरविणारी शेती फायदेशीर होते, असे स्वरूप शेतीच्या उद्योगाला येत आहे. सर्वसामान्यांच्या गरजा कोणी व कोठून पुरवायच्या? त्या पुरविल्या न गेल्यामुळे समाजात विषमता, अस्वस्थता व गुन्हेगारी वाढत आहे.

ह्या दृष्टीने धान्य आणि दूध ह्यांचे जे उत्पादन आज होते आहे, त्यांपैकी किती भाग प्रक्रिया-उद्योग, धान्यांपासून केले जाणारे तयार पदार्थ, दुधापासून होणारे पदार्थ (उदाहरणार्थ मिठाई, आइसक्रीम, पक्वान्ने, चहा-कॉफी व तत्सम पेयांचे अनेक प्रकार) करण्यात खर्च पडतो, हे पाहणे उद्‌बोधक ठरेल. १९६६-८० ह्या काळात अविकसित देशांमध्ये धान्याचा आहारात उपयोग करण्यामध्ये दरवर्षी २.१ टक्क्यांनी वाढ झाली. तर धान्याचा तयार पदार्थ व जनावरांचे मांस तयार करण्यासाठी उपयोग करण्यामध्ये दरवर्षी ३.८ टक्क्यांनी वाढ झाली. विविध प्रकारांचे तयार पदार्थ, प्रक्रिया केलेले पदार्थ मुख्यतः नागर समाजाच्या गरजा भागवितात. धान्यांच्या किमतीही सतत वाढत राहतील. नेमकी हीच गोष्ट सध्या घडते आहे आणि दारिद्र्यरेषेखालील लोकांना धान्यांचा आहारात समावेश करणे अधिकाधिक कठीण होत आहे. धान्याची शेती सर्वसामान्यांच्या आवाक्यात आणण्याची आज फार गरज आहे.

ह्या गोष्टी साध्य करायच्या तर निव्वळ शेती आणि पाण्याचे व्यवस्थापन ह्यांची तंत्रे व पद्धती बदलून चालणार नाही, तर एका नव्या अर्थनीतीचा स्वीकार करावा लागेल. आधुनिक अर्थशास्त्राचे ॲडम स्मिथसारखे जनक ज्या अर्थनीतीचा पुरस्कार करीत होते, ती बाजूला पडून एक विकृत अर्थव्यवस्था आज रूढ झाली आहे. ॲडम स्मिथने जरी (सरकारी) निर्बंधविरहित, खुली अर्थव्यवस्था पुरस्कारिलेली होती, तरी तिचा पाया हा अत्यंत सुसंस्कृत, सामाजिक जबाबदारी ओळखणारा, विवेकी असा ग्राहक आणि उत्पादक वर्ग आहे, असे त्याने आग्रहाने सांगितलेले होते. असा समाज असेल तर कोणत्या वस्तूंचे उत्पादन करायचे आणि त्यांचे वितरण कसे करायचे ह्यांवर - म्हणजेच बाजारपेठेवर - समाजाच्या विवेकी आवडीनिवडींचे नियंत्रण राहील. माणसाच्या जीवनावर बाजारपेठेचे नियंत्रण असा उलटा प्रकार होणार नाही. ॲडम स्मिथने कल्पिलेला विवेकी समाज अस्तित्वात नसल्याने आज बाजारपेठच माणसाची बुद्धिमत्ता, तंत्रकौशल्य ह्यांना वेठीला धरून, माणसाच्या जीवनावर प्रभुत्व गाजवीत आहे. ही परिस्थिती कशी बदलली जाईल?

❖ ❖ ❖






# निसर्ग शेती अधिवेशन
# ठराव व भूमिका

संदीपन बडगिरे
(संयोजक, निसर्ग शेती अभियान समिती)

**३० जानेवारी २००५ रोजी हुतात्मा दिनी सोनावती (ता. जि. लातूर) येथे पार पडलेल्या पहिल्या राज्यस्तरीय निसर्गशेती अधिवेशनात मंजूर झालेले महत्त्वपूर्ण ११ धोरणात्मक ठराव व भूमिका -**
(अधिवेशन संघटकांच्या सौजन्याने)

**अभियान समितीची चळवळीसंबंधी व्यापक भूमिका**

३० जानेवारी २००५ रोजी महात्मा गांधी स्मृतीदिनी सोनावती (ता. जि. लातूर) येथे पहिले राज्यस्तरीय ऐतिहासिक निसर्ग शेती अधिवेशन पार पडले. या अधिवेशनाला महाराष्ट्र व कर्नाटकातून एक हजार शेतकरी उपस्थित होते. शेतकऱ्यांचे, शेतकऱ्यांसाठी, शेतकऱ्यांनी आयोजित केलेले अधिवेशन असे या अधिवेशनाचे स्वरूप होते. या अधिवेशनात आलेले बहुसंख्य शेतकरी अन्नधान्य पिकविणारे कोरडवाहू शेतकरी होते. गावरान (देशी) गाय - बैलांचे प्रदर्शन हे या अधिवेशनाचे वेगळे वैशिष्ट्य ठरले. या अधिवेशनाचे अध्यक्ष जीवनधर शहरकर होते. तर प्रमुख वक्त्या म्हणून जनआंदोलनाच्या राष्ट्रीय समन्वयाच्या नेत्या मेधा पाटकर व उल्का महाजन उपस्थित होत्या.

**व्यापक भूमिकेची गरज :**

रासायनिक शेतीने नफ्याची संकल्पना शेती क्षेत्रात आणली. त्यामुळे शेती क्षेत्रावर बाजाराचे म्हणजेच देशी - परदेशी कंपन्यांचे व भांडवलदाराचे वर्चस्व प्रस्थापित झाले. त्यामुळे गरजांवर आधारित स्वावलंबी शेतीचे नफ्यावर आधारित परावलंबी शेतीत रूपांतर झाले. जी पिके बाजारात नफा कमावून देणारी अशा जास्त पाणी लागणाऱ्या, जास्त निविष्टा लागणाऱ्या व जास्त भांडवल लागणाऱ्या ऊस, केळी व द्राक्षासारख्या पिकाचे वर्चस्व शेती क्षेत्रात निर्माण झाले. त्यामुळे कमी पाण्यावर येणाऱ्या किंबहुना पावसाच्याच पाण्यावर येणाऱ्या अन्नधान्याच्या पिकाऐवजी शेतकरी ऊस केळी व द्राक्ष पिकाच्या मागे लागला. त्यासाठी विंधन विहिरीद्वारे शेतकरी भूगर्भातील पाचशे फूट (काही ठिकाणी तर एक हजार) खोलीवरचे पाणी उपसू लागला. त्यामुळे पिण्याच्या पाण्याचे कायमस्वरूपी गंभीर संकट निर्माण झाले आहे. गेल्या १२-१५ वर्षात महाराष्ट्रात सेंद्रीय शेतीचा बराच प्रचार- प्रसार झाला. शेती क्षेत्रात घुसलेली नफ्याची प्रेरणा घालवून (तरच पाण्यासहीत सर्व नैसर्गिक साधनसंपत्तीचे संवर्धन होईल.) मूलभूत गरजांवर आधारित सेंद्रीय शेतीचा प्रचार - प्रसार करण्याऐवजी नफ्याची प्रेरणा कायम ठेवून देशी - परदेशी बाजारासाठी ऊस, केळी व द्राक्षासारख्या नगदी पिकावर लक्ष केंद्रीत करून सेंद्रीय शेती शिबिरे घेण्यात आली व ९५ टक्के कोरडवाहू शेतकऱ्यांचे जे पीकच नाही अशा "ऊसाला पर्याय नाही तेव्हा शेतकऱ्यांनी ऊसाचेच पीक घ्यावे" इतक्या टोकाचा प्रचार निसर्ग शेतीचे प्रणेते समजले जाणारे विचारवंत या शिबिरातून करू लागले. तसेच राज्य सरकारची कृषी विद्यापीठे व कृषी खातेही "तुमच्या मालाला देशी - परदेशी बाजारपेठ मिळविण्यासाठी सेंद्रीय शेती करा" असा प्रचार करीत आहेत. त्यामुळे जास्त नफा व परदेशी मार्केट मिळवण्यासाठी सेंद्रीय शेती करायची अशा चुकीच्या भूमिकेमुळे व प्रचारामुळे 'नफ्यावर आधारित व्यापारी सेंद्रीय शेती' असे विकृत स्वरूप महाराष्ट्रात तरी सेंद्रीय शेतीला आले आहे. असे विकृत स्वरूप येणे हे ९५ टक्के सामान्य कोरडवाहू शेतकऱ्यांच्या हिताच्या दृष्टीने आणि सेंद्रीय व निसर्ग शेतीच्या चळवळीच्या दृष्टीने घातक आहे. सामान्य जनतेला, शेतकऱ्याला व सजीव सृष्टीला जगविण्यासाठी, नैसर्गिक साधनसंपत्तीची लूट स्वतः न करता व करू न देता त्या संपत्तीचे संवर्धन करीत सजीव सृष्टीला व मानवी समाजाला मूलभूत गरज पुरविणारी शोषणमुक्त स्वावलंबी कृषीरचना व समाजरचना उभी करण्यासाठी निसर्ग शेतीची चळवळ चालविणे गरजेचे आहे. त्यासाठी मूलभूत धोरणात्मक ठराव करून ही चळवळ गतिमान व धारदार करण्याचा व्यापक विचार प्रथमच सोनावतीच्या अधिवेशनात मांडला आहे.

जागतिकीकरणाला व खाजगीकरणाला वेग

अनुक्रमणिका






आल्यानंतर गेल्या १५ वर्षात अमेरिका व तिच्या बड्या दोस्त राष्ट्रातील बलाढ्य कंपन्या जागतिक व्यापार संघटना व जागतिक बँकेमार्फत सर्व जगातील शेती उत्पादन व्यवस्था व वितरण व्यवस्था आपल्या ताब्यात घेऊन सर्वसामान्य माणसांचे व शेतकऱ्यांचे शोषण करीत आहेत आणि नैसर्गिक साधनसंपत्तीची लूट करण्याचे धोरण राबवित आहेत. या धोरणाला अनुकूल कायदे भारतीय राज्यकर्ते (स्वतःच्या स्वार्थासाठी) करीत आहेत. त्यामुळे हजारो वर्षांपासून आपल्या पूर्वजांनी व निसर्गाने विकसित व जतन केलेले गावरान (देशी) बियाणे, गावरान (देशी) पशुधन (गाय-बैल), जैविक विविधता आणि संवर्धित केलेले पाणी, जंगल व जमीन भारतीय शेतकऱ्याकडून हिसकावून घेतली जात आहे. त्यामुळे काही दिवसांनी माणसांना व सर्व सजीवांना शुद्ध पाणी, हवा, अन्नावाचून मरावे लागणार आहे.

माणसावर व सजीव सृष्टीवर आलेले हे संकट टाळण्यासाठी सर्व पातळ्यांवर शोषणाचे हत्यार बनलेली रासायनिक शेती नाकारून सर्वांगीण निसर्ग शेतीची कास धरून नैसर्गिक कृषी क्रांतीचा नारा देऊन शेतकरी व ग्राहकांना संघटीत करून भक्कम निसर्ग शेतीची चळवळ उभी करणे हे सर्व भारतीयांचे अग्रक्रमाचे काम आहे. ही चळवळ शेतकऱ्यांनी पुढाकार घेऊन चालवावी लागणार आहे. हे केले नाही तर मानवासह सजीव सृष्टीचा विनाश अटळ आहे. कुणालाही नैसर्गिक साधनसंपत्तीची लूट करू न देता व स्वतःही लूट न करता त्या संपत्तीचे संवर्धन करीत सजीव सृष्टीला व मानवी समाजाला मूलभूत गरजा पुरविणारी शोषणमुक्त, स्वावलंबी कृषी रचना व समाजरचना उभी करणे हे या चळवळीचे उद्दिष्ट राहणार आहे. त्यासाठी आपल्याला व्यक्तिगत व सामूहिक पातळीवर निकराचा संघर्ष करावा लागणार आहे.

**लढाई दोन पातळ्यांवर :**

या चळवळीची लढाई शांततामय सत्याग्रही मार्गाने दोन पातळ्यांवर करावी लागेल. १) रासायनिक शेती नाकारून सर्व शेतकऱ्यांनी सेंद्रीय व नैसर्गिक पद्धतीने शेती करणे २) आपल्याला हवी असलेली शोषणमुक्त स्वावलंबी कृषी व समाजरचना निर्माण करण्यासाठी अनुकूल कायदे राज्यकर्त्यांनी करावेत म्हणून मजबूत संघटना बांधणी करणे व सतत सत्याग्रही मार्गाने संघर्ष करणे. जे शेतकरी सध्या सेंद्रीय व नैसर्गिक पद्धतीने शेती करीत आहेत त्यांनी पहिल्या पातळीवरची लढाई सुरू केलेली आहे. अशा शेतकऱ्यांची संख्या वाढवून या शेतकऱ्यांनी व ग्राहकांनी संघटित होऊन दुसऱ्या पातळीवरची लढाई सुरू करण्याची गरज आहे. यापुढे होणाऱ्या शिबिरात व अधिवेशनात त्यासाठीची रणनीती व कार्यक्रम ठरविणे जरुरीचे आहे. त्यासाठी निसर्ग शेती अभियान समितीचे संघटन व्यापक व मजबूत करण्याची गरज आहे.

**चळवळीचे प्रतीक 'झाड' :**

प्रत्येक चळवळीला प्रतीकं लागतात. ती प्रतीकं नवनिर्मिती करणारी व नवी समाजरचना उभी करणारी असावी लागतात तरच ती प्रतीकं टिकतात व लोकही स्वीकारतात. पहिल्या स्वातंत्र्य चळवळीचे प्रतीक 'चरखा' होते, तसे आता दुसऱ्या स्वातंत्र्य (निसर्गशेती) चळवळीचे प्रतीक आपण 'झाड' निवडले आहे. यापुढे निसर्ग शेतीच्या चळवळीत आपण 'झाड' घेऊन लढणार आहोत. सध्या ३३ टक्के जंगल उभे नाही म्हणून शेती उत्पादन वाढत नाही, झाडाची तोड चालू आहे म्हणून शुद्ध व भरपूर पाणी मिळत नाही, झाडोरा कमी झाला म्हणून उष्णतेचे प्रमाण वाढत आहे व कार्बनडायऑक्साईडचे प्रमाण वाढत आहे त्यामुळे वातावरणातील ऑक्सिजनचे (शुद्ध हवेचे) प्रमाण कमी होत आहे. तेव्हा झाड वाचविणे म्हणजे मानवासहित सजीव सृष्टी वाचविणे. म्हणून 'झाड' आपल्या चळवळीचे 'प्रतीक'. म्हणून निसर्ग शेती अभियान समितीने चळवळीचे प्रतीक म्हणून 'तीन झाडे' निवडली आहेत.

**निसर्ग शेती अभियान समितीत सामील होण्याचे आवाहन :**

वरील व्यापक भूमिका घेऊन सामान्य शेतकरी, ग्राहक सजीव सृष्टीचे हीत जपण्यासाठी आपण गेल्या चार वर्षापासून निसर्ग शेती अभियान समितीच्या माध्यमातून काम करीत आहोत. या चळवळीला व कामाला गती यावी व मूलभूत धोरणात्मक मुद्दे ठराव रूपाने मांडावेत म्हणून अभियान समितीने सोनावतीला निसर्ग शेती अधिवेशन आयोजित केले होते. अभियान समिती ही कोणत्याही राजकीय पक्षाशी जोडलेली नाही. सर्व सजीवांचे व निसर्गाचे रक्षण करणे हेच आपले ध्येय आहे. ज्यांना हे ध्येय व वरील व्यापक भूमिका आपली वाटते त्यांनी तन-मन-धनाने अभियान समितीत व चळवळीत सामील व्हावे.

**ज्ञान - नवनिर्मिती - संघटन - संघर्ष :**

ज्ञान, नवनिर्मिती, संघटन, संघर्ष ही आपल्या चळवळीची चार अहिंसक हत्यारे आहेत. प्रत्येक सृजनशील








अनुक्रमणिका

माणूस वरील चार हत्यारांद्वारेच आपले व्यक्तिमत्त्व फुलवत असतो व आपले जीवन आनंदी करीत असतो. वरील चार हत्यारांचा वापर करूनच आपल्याला निसर्ग शेतीची चळवळ यशस्वी करता येणार आहे व सर्वांना आनंदी जीवन जगता येणार आहे. तेव्हा सतत ज्ञान मिळवा, त्याद्वारे सतत नवनिर्मिती करा, संघटित रहा, संघर्ष करा व सतत विजय मिळवीत रहा. स्वत:मधील व दुसऱ्यामधील तृष्णा (हावरटपणा) घालविण्यासाठी केलेला हा संघर्ष असल्यामुळे हा विजय आपण दुसऱ्यावर मिळविलेला नसेल. आपणच आपल्यावर मिळविलेला हा विजय असेल, म्हणूनच आपल्याला त्यामुळे निर्भेळ आनंद मिळेल.

**शेतीच्या क्षेत्रात व मानवी जीवनात मूलभूत बदल सुचवून त्याचा आग्रह धरणारे ११ धोरणात्मक ठराव सोनावतीच्या अधिवेशनात मंजूर करण्यात आले ते ठराव या पुस्तिकेत प्रसिद्ध करीत आहोत. शेतकऱ्यांनी व सर्व नागरिकांनी प्रतिक्रिया कळवाव्यात.**

**निसर्ग शेती मुक्त विद्यापीठ :**

नैसर्गिक शेतीचा विकास करण्यासाठी व निसर्ग शेतीचे ज्ञान शेतकऱ्यापर्यंत पोहचविण्यासाठी सोनावतीच्या अधिवेशनात उपस्थित शेतकऱ्यांच्या मान्यतेने निसर्ग शेती मुक्त विद्यापीठाची स्थापना करण्यात आली. हे विद्यापीठ शेतकऱ्यांनीच चालवायचे आहे, तेव्हा या विद्यापीठाला शेतकऱ्यांनी तन-मन-धनाने मदत करावी ही विनंती.

या निसर्ग शेती अधिवेशनाला ज्यांनी आर्थिक मदत दिली, ठरावावर सूचना पाठविल्या व शुभेच्छा पाठविल्या त्या महाराष्ट्रातील नामवंत व्यक्तींची नावे पुढे देत आहे. श्री. मुकुंदराव किर्लोस्कर, श्री. वसंतराव ठाकरे, बळीराजाचे संपादक प्र. बा. भोसले, श्री. नामदेव बापू माने, डॉ. वा. ब. राहूडकर, श्री. मनोहर परचुरे, श्री. सुरेश देसाई, श्री. विक्रम बोके, श्री. शिवनारायण आढाव, अशोक बंग या सर्वांचे आम्ही आभारी आहोत. अधिवेशनाच्या सर्व बातम्यांना लातूरच्या सर्व पत्रकारांनी मनापासून प्रसिद्धी दिली त्याबद्दल आम्ही त्यांचेही आभार मानतो.

**संदीपान बडगीरे**
**संयोजक, निसर्गशेती अभियान समिती**

### ठराव क्र. १
### सरकारने १०० टक्के निसर्ग शेतीचे धोरण स्वीकारावे

सध्या राज्य व केंद्र सरकारने जुजबी सेंद्रीय व निसर्ग शेतीचे धोरण स्वीकारले आहे परंतु शासनाच्या कृषी विभागात व कृषी विद्यापीठात प्रामुख्याने रासायनिक शेती पद्धतीचे धोरण राबविले जात आहे. त्यामुळे शेतकऱ्यात संभ्रम निर्माण होऊन त्यांची दिशाभूल होत आहे. रासायनिक शेतीमुळे शेतकऱ्यांचे जे शोषण केले जात आहे, त्याला सरकारचे रासायनिक शेतीचे धोरण कारणीभूत ठरत आहे. बेचव अन्न, भाज्या, फळे खाल्यामुळे व विषारी पाणी पिण्यामुळे सर्व ग्राहकांचे आरोग्य धोक्यात आले आहे.

तेव्हा शेतकऱ्यांच्या व ग्राहकांच्या हितासाठी राज्य व केंद्र सरकारने १०० टक्के सेंद्रीय व निसर्ग शेतीचे धोरण स्वीकारावे. तसेच सेंद्रीय व नैसर्गिक शेती पद्धतीवर संशोधनास सुरुवात करून या पद्धतीचा विकास करावा आणि या पद्धतीचा अग्रक्रमाने प्रचार - प्रसार करावा, अशी मागणी हे अधिवेशन करीत आहे.

### ठराव क्र. २
### जमिनीचे रक्षण व संवर्धन

मानवी संस्कृतीचा विकास समृद्ध निसर्गाच्या सानिध्यात झाला. निसर्गाच्या पाच तत्त्वांपैकी जमीन हे एक तत्त्व. जमीन ही सजीव सृष्टीला मिळालेली अमूल्य देणगी आहे. जमिनीच्या माध्यमानेच पीक वाढीसाठी लागणारे पाणी, सूर्यप्रकाश, हवा, सूक्ष्म अन्नघटक इत्यादी घटक वापरून वनस्पती वाढतात व मानवासह सर्व जीवांना लागणारी अन्नसाखळी तयार होते व सर्वांची अन्नाची गरज भागते. म्हणून या जमिनीवर आपलाच ताबा रहावा म्हणून मानव समूहातील त्या त्या वेळी प्रबळ असलेल्या गटांनी खाजगी मालकीच्या संकल्पनेद्वारे ताबा मिळविण्याचा प्रयत्न केला. त्यासाठी तुंबळ लढाया झाल्या. ज्याच्या हातात सत्ता व शस्त्र त्या मूठभर मानव समूहाकडे जास्त जमीन आणि सत्ताहीन व शस्त्रहीन बहुसंख्य माणसांकडे कमी जमीन असेच चित्र दिसून येते.

भारतीय शेतीला हजारो वर्षांचा इतिहास आहे. मानवाने निसर्गाचे निरीक्षण करूनच शेतीचा शोध लावला. निसर्गामध्ये असलेल्या संसाधनाचे रक्षण, संवर्धन व त्यामध्ये विकास करीत माणूस शेती करीत होता. त्यामुळे जमिनीची

अंगभूत उत्पादन क्षमता टिकून होती. त्यामुळे उत्पादनात घट न होता वाढ होत होती. या उत्पादन वाढीसाठी कसलेही संसाधन बाजारातून विकत आणून घालण्याची शेतकऱ्यांना गरज पडली नाही. त्यामुळे शेतीवर जगणारा समाज स्वावलंबी जीवन जगत होता. त्याच्या सर्व अत्यावश्यक गरजा शेती उत्पादनावर भागत होत्या. पाश्चात्त्य देशात औद्योगिक क्रांती झाल्यानंतर औद्योगिक क्षेत्रातील नफ्याची प्रेरणा शेतीत आली व मानवी गरजा भागविण्यासाठी केली जाणारी शेती नफा कमविण्यासाठी केली जाऊ लागली. त्यामुळे शेती व्यवसायाचे व्यापारीकरण झाले. त्यामुळे नैसर्गिक संसाधनांची लूट करून कमी वेळात व कमी क्षेत्रावर (जमिनीत) जास्त उत्पादन घेऊन नफा कमविण्याचा सपाटा माणसाने सुरू केला. त्यासाठी माणसाने रासायनिक शेतीची कास धरली. रासायनिक शेती पद्धतीमुळे जमीनीची सुपीकता संपली व जमीन नापीक झाली. तसेच रासायनिक शेतीपद्धतीमुळे बिनभांडवलाची व अल्प खर्चाची स्वावलंबी शेती भांडवलप्रधान व प्रचंड खर्चाची झाली. त्यामुळे शेतकऱ्यांना शेती करणे परवडेनासे झाले. त्यामुळे ते शेतकरी जमीन विकू लागले किंवा आत्महत्या करू लागले. त्यामुळे गेल्या दहा वर्षात भूमिहीनांचे व आत्महत्यांचे प्रमाण वाढले आहे.

खाजगीकरणाच्या व जागतिकीकरणाच्या परिणामामुळे भारतीय राज्यकर्त्यांनी देशी व परदेशी कंपन्यांना सीलिंगच्या कायद्यातून वगळून त्यांना लाखो एकर जमीन घ्यायला व कंत्राटी पद्धतीने (कराराने) जमीन करायला परवानगी दिली आहे. वरील सर्व प्रतिकूल परिस्थितीमुळे सामान्य शेतकऱ्यांकडील जमीन मूठभर व्यक्तींकडे जाण्याची प्रक्रिया सुरू झाली आहे. ही प्रक्रिया थांबविण्यासाठी हे अधिवेशन खालील मागण्या करीत आहे.

१) नफ्यासाठी रासायनिक पद्धतीने शेती करण्याऐवजी शेतकऱ्यांनी गरजांवर आधारित सेंद्रीय व नैसर्गिक पद्धतीने शेती करावी. हे केल्यामुळे बिनभांडवलात, अल्पखर्चात व जमिनीचा पोत वाढवत जास्त उत्पादन शेतकऱ्यांना मिळेल. त्यामुळे त्याचे कुटुंब स्वावलंबी होईल व जमिनीसहित सर्व नैसर्गिक साधन संपत्तीचे रक्षण व संवर्धन होईल.

२) जमिनीतील सेंद्रीय पदार्थांचे व जीवाणूंचे प्रमाण कमी झाल्यामुळे व जमिनीची बांधबंदिस्ती न केल्यामुळे पावसाच्या पाण्याचा वाहण्याचा वेग वाढून पाण्याबरोबर माती वाहून जाण्याचे प्रमाण वाढले आहे. त्यामुळे दरवर्षी पाव ते अर्धा इंच पिकावू माती जमिनीतून वाहून जात आहे. त्यामुळे जमीन नापीक बनत आहे. त्यासाठी जमिनीची बांधबंदिस्ती करण्याचे व नैसर्गिक पद्धतीने शेती करून मातीतील सेंद्रीय पदार्थ व जीवाणू वाढवण्याचे आवाहन शेतकऱ्यांना आम्ही या ठरावाद्वारे करीत आहोत.

३) राज्यकर्त्यांनी शेती उत्पादनासाठी देशी व परदेशी कंपन्यांना जमीन खरेदी करायला किंवा कंत्राटी पद्धतीने जमीन करायला परवानगी देऊ नये, तसेच शेतकऱ्याच्या जमिनी हडपण्याचे सर्व डाव हाणून पाडण्यासाठी आज अस्तित्वात असलेल्या सर्व कायद्यांची कठोर अंमलबजावणी झाली पाहिजे. हे कायदे पातळ करण्याची व बहुराष्ट्रीय तसेच देशी बड्या कंपन्यांना जमिनी हडप करण्यास सहकार्य करण्याची चाल सरकारने ताबडतोब थांबवली पाहिजे, अशी मागणी आम्ही या अधिवेशनाद्वारे करीत आहोत.

### ठराव क्र. ३
### पाण्याचे रक्षण व संवर्धन

निसर्गाच्या पाच तत्त्वांपैकी पाणी हे दुसरे महत्त्वाचे तत्त्व आहे. पाणी म्हणजे जीवन. पाणी हे प्राणिमात्रांच्या आयुष्यातील एक अविभाज्य अंग आहे. अन्नाशिवाय ८० दिवस जगणारा माणूस पाण्याशिवाय दहा दिवसही जगू शकत नाही. म्हणूनच जेथे पाण्याची कमतरता पडणार नाही अशी गंगा, सिंधू सारख्या नद्यांच्या किनाऱ्यावर येथील हजारो वर्षांची मानवी संस्कृती विकसित झाली. नफ्यावर आधारित रासायनिक शेती पद्धत येण्यापूर्वी माणूस पडलेल्या पाण्याचा सुयोग्य वापर करून व पाण्याचे संवर्धन करून शेती करायचा, त्यामुळे त्या वेळी जमिनीतील पाण्याची पातळी कमी झाली नाही. सलग तीन वर्षं पाऊस कमी पडला तरी माणसांना व जनावरांना पाणी कमी पडले नाही.

परंतु नफ्यावर आधारित रासायनिक शेती पद्धत आल्यानंतर जास्त पाणी लागणारी पिके व एक पीक पद्धत आली. त्यामुळे पाण्याचा उपसा प्रचंड वाढला. तसेच पाण्याची पातळी प्रचंड वेगाने खाली गेली. त्यामुळे पिकाला तर सोडाच पण प्यायलाही पाणी मिळणे मुश्कील झाले. भूगर्भातील पाणी असेच उपसणे चालू राहिले तर पुढच्या पिढ्यांवर पिण्याच्या पाण्यासाठी वणवण भटकण्याची पाळी येईल.

जमिनीप्रमाणेच पाण्यावर ताबा मिळविण्यासाठी तंटेबखेडे चालू आहेत. सरकारने पाणी विकण्याचे धोरण चालू

केले आहे. देशी व परदेशी कंपन्या नद्या व भूगर्भातील पाण्यासाठी जमीन विकत घेत आहेत व आपले राज्यकर्ते त्याला परवानगी देत आहेत.

देशातील व महाराष्ट्रातील ९५ टक्के शेती पावसाच्या पाण्यावर अवलंबून आहे. तेव्हा पावसाच्या पाण्याचे नीट नियोजन करणे गरजेचे आहे. तरच कोरडवाहू शेतकऱ्यांच्या घरात समृद्धी येईल. पावसाच्या पाण्याचे चांगले नियोजन व्हावे, तसेच उपलब्ध पाणी जास्त क्षेत्रातील पिकाला मिळावे यासाठी या अधिवेशनाच्या माध्यमातून आम्ही खालील उपाय सुचवत आहोत.

१) पाणी नैसर्गिक संपत्ती आहे म्हणून ती सर्व जनतेच्या मालकीची आहे. त्यामुळे पाण्याचे खाजगीकरण करून जमिनीवरचे व जमिनीखालचे पाणी सरकारने कंपन्यांना किंवा कोणत्याही व्यक्तीला विकू नये अशी मागणी आम्ही करीत आहोत.

२) पावसाचे पडणारे पाणी शेतात व शिवारातच अडविण्यासाठी, जिरविण्यासाठी व जिरलेले पाणी पिकाला पुरविण्यासाठी शेताची व शिवाराची बांधबंदिस्ती करून पाणलोट क्षेत्र शेतकऱ्यांनी व सरकारने विकसित करण्याचे आवाहन या अधिवेशनाद्वारे आम्ही करीत आहोत. असे पाणलोट क्षेत्र विकसित झाले व निसर्ग शेती पद्धतीने मातीची सुपीकता वाढली तर पहिल्या एक महिन्याकरिता पावसाचे पाणी शेताच्या बाहेर जाणार नाही व दुसऱ्या महिन्याचे पाणी शिवाराच्या बाहेर जाणार नाही. त्यामुळे पिकाला पाणी कमी पडणार नाही व जमिनीतून पिकासाठी जास्त पाणी उपसावे लागणार नाही.

३) पिण्यासाठी व शेतीसाठी सर्वांना पाणी उपलब्ध व्हायचे असेल व जमिनीतील पाण्याची पातळी वाढवायची असेल तर बोअरद्वारे (विंधन विहिरीद्वारे) जमिनीतील पाणी उपसून पिकाला पाणी देणे थांबविण्याचे आवाहन आम्ही या अधिवेशनाद्वारे करीत आहोत. तसेच मोठ्या व छोट्या धरणांद्वारे उपलब्ध होणारे पाणी काटकसरीने वापरण्याचे खालील उपाय आम्ही सुचवित आहोत.

पाण्याचे वितरणांतर्गत फक्त ठिबक, तुषार अथवा अशा प्रगत तंत्राद्वारेच पिकास पाण्याचा वापर व्हावा. पाट-पाणीपद्धत टप्प्याटप्प्याने बंद करण्यात यावी.

पीक निहाय पाण्याची नक्की गरज व त्याच्या वापराच्या पद्धती यावर त्या त्या परिसरातील शेतकऱ्यांना तंत्राची माहिती करून देऊन 'संगणक पद्धतीचा' अवलंब पाणी वापरात व्हावा.

पाणी जमिनीला न देता ते पिकाच्या मुळाच्या सानिध्यात देण्याचे तंत्र विकसित करून त्याचा अवलंब करावा.

महाराष्ट्र व देशातील वाढत जाणारे ऊसाचे क्षेत्र मर्यादित करून ऊस पिकासाठी होत असलेल्या पाणी वापराच्या पद्धतीत सुधारणा करून पाट-पाणी पद्धत बंद करून, रुंद लागवड पद्धती, तुषाराचा वापर व किमान ८-१० खोडवे पद्धतीचा तात्काळ अवलंब करावा.

शहरे व खेडी येथील सांडपाणी संकलन पद्धती विकसित करून त्यावर प्रक्रिया करून त्याचा वापर शेतीसाठी करावा.

नद्या, तलाव, धरणे यातील शासनाच्या मालकीचे पाणी वापरासाठी शेती, उद्योग व पिण्याच्या पाण्याचे प्रमाण निश्चित करून उपलब्धतेच्या प्रमाणात सर्वांना ते मिळावे.

धरणातील पाणी, पाट/कॅनॉल पद्धतीने वितरीत न करता ते पाइपलाइनद्वारे वितरीत व्हावे.

पिकाला दिलेल्या पाण्याचा खोलवर निचरा होऊन 'व्यय' होऊ नये व जमीन खराब होऊ नये म्हणून सेंद्रीय व नैसर्गिक शेती पद्धतीचा अवलंब सर्वांनी करावा.

## ठराव क्र. ४
## जंगलाचे रक्षण व संवर्धन

जंगलाचे रक्षण व संवर्धन करण्यासाठी जमिनीच्या उपयुक्ततेनुसार तिचा वापर करायला पाहिजे. जी कमी उताराची जमीन कुरण व फळझाडे इत्यादीच्या वापरासाठी आहे तसेच जी जमीन जास्त उताराची व अत्यल्प मातीची आहे ती केवळ वृक्ष व वने यासाठी उपयुक्त आहे, ती त्याच प्रयोजनासाठी उपयोगात आणावी. जी जमीन सपाट आहे व २५ सेंमी. खोलीची माती आहे अशा जमिनी शेती करण्यासाठी वापराव्यात व सजीव सृष्टीच्या चिरस्थायी अस्तित्वाकरिता एकूण भौगोलिक क्षेत्राच्या ३३ टक्के जमीन वृक्ष अच्छादित असणे आवश्यक आहे व ती भारताने राष्ट्रीय वननीती म्हणून स्वीकारलेली आहे. महाराष्ट्रात व भारतात एकूण भौगोलिक क्षेत्राच्या २० ते २१ टक्के जमीन वनाखाली आहे. (काही ठिकाणी ती १ टक्का सुद्धा नाही.) ३३ टक्के जमीन वनाखाली आणायची झाल्यास खाजगी व सामाजिक मालकीच्या जमिनीवर वृक्ष लागवडीशिवाय दुसरा पर्याय नाही. शेतकऱ्यांकडे वर नमूद केल्याप्रमाणे वन व कुरणाकरिता योग्य

अनुक्रमणिका

असलेल्या जमिनी शेतीखाली आणून किंवा त्यांचा कसलाही उपयोग न घेता आर्थिक तोटा करण्यापेक्षा त्याचा सुयोग्य वापर करून स्वतःची व देशाची आर्थिक व पर्यावरणाची उन्नती साधावी लागेल. त्याचप्रमाणे शेतीयोग्य असणाऱ्या जमिनीला लागणारी नैसर्गिक संसाधने जसे पाणी, जीवाणू समृद्ध माती व ही श्रृंखला अबाधित ठेवण्यासाठी लागणारा सेंद्रीय कर्ब इत्यादीचे संवर्धन करावे लागेल. त्यामुळे ढोबळ मानाने खालील फायदे आपल्याला मिळतील.

१) डोंगरमाथा व अतिउताऱ्याच्या अनुउत्पादक असलेल्या जमिनी, तेथे उपलब्ध असलेली व तयार होणारी माती व पावसाचे पाणी याचा गवत व वृक्षामुळे योग्य वापर होऊन उत्पादनात तर वाढ होईलच, त्यासोबतच सूर्याच्या प्रकाशाचा उपयोग होऊन जीवसृष्टीला उपयोगी उत्पादन तयार होईल. अन्यथा वाहून जाणारी माती व पाणी कायमस्वरुपी आपल्या हातून निघून जाते. किंवा इतरत्र ठिकाणी गंभीर प्रश्न निर्माण करते. डोंगरमाथ्यावर मुरलेले पाणी भूगर्भातील पाण्याची पातळी वाढवते व पर्यायाने ते जीवसृष्टीला उपयोगी पडते.

२) गवत व वृक्ष अच्छादनामुळे पर्यावरणीय संतुलनास व जैविक विविधतेस मदत होईल. त्याचबरोबर रात्र व दिवसाचे तापमानाचे फरकास कमी करून एकंदर जीवसृष्टीला सुसह्य असे वातावरण निर्माण होईल. त्याचबरोबर वातावरणातील आर्द्रता वाढल्यामुळे जीवसृष्टीस विशेषतः पीक वाढीसाठी फायदा होईल.

३) वातावरणातील कार्बनडाय ऑक्साईड हा प्राणीमात्रासाठी असलेला अपायकारक घटक वृक्षाकडून शोषण होऊन सूर्यप्रकाशाच्या मदतीने अन्नात रूपांतर होईल व हाच सेंद्रीय कर्ब मातीला देखील समृद्ध बनवेल. त्यामुळे शेती उत्पादन वाढेल. त्याचप्रमाणे वृक्षाकडून उत्सर्जित होणारे ऑक्सिजन वायू प्राणीसृष्टीस आजमितीस तरी अतिउपयोगाचे ठरणार आहे.

४) एकंदरीत निसर्ग चक्रातील आजमितीस तरी अतिदुर्मिळ घटक असे पाणी, सेंद्रीय कर्ब, ऑक्सिजन, जैविक विविधता यांचे अबाधित अस्तित्व म्हणजेच जीवसृष्टीचे चिरस्थायी अस्तित्व निश्चित करणारे ठरणार आहे.

वरील सर्व चिरस्थायी फायद्यासाठी शेतकऱ्यांनी व सरकारने अग्रक्रमाने जंगल रक्षण व संवर्धनाचे काम करावे, व शासनाने खालील मागण्या मान्य करण्याचे आवाहन हे अधिवेशन करीत आहे.

१) जंगल संरक्षणाचे व संवर्धनाचे सुरक्षित अधिकार आजच्या घडीला स्थानिक समूहांना व शेतकऱ्यांना देण्यात आलेले नाहीत. किंबहुना सामान्य शेतकरी, आदिवासी व अन्य जंगलवासी जंगलाच्या नाशास कारणीभूत ठरतात म्हणून शासनाने जंगल राखण्याची जबाबदारी एकाधिकाराने घेतली पाहिजे, अशी धारणा आजच्या शासनाची आहे. जंगलवासीयांच्या सहकार्याशिवाय जंगल वाचूच शकणार नाही म्हणूनच शेतकरी व जंगलात तसेच जंगलाच्या आसपास राहणाऱ्या स्थानिक समूहांच्या उपजीविकेचे आधार लक्षात घेऊन जंगल रक्षण व संवर्धनाचे अधिकार तसेच जबाबदारी स्थानिक समूहांना विश्वासात घेऊन देण्यात यावेत, त्यासाठी योग्य ती कायदेशीर तरतूद करण्यात यावी अशी मागणी हे अधिवेशन करीत आहे.

२) शेतकऱ्यांकडे उपलब्ध असलेल्या जास्त उताराच्या व अत्यल्प मातीच्या वृक्ष-वने व कुरणाकरिता योग्य असलेल्या जमिनी वृक्ष-वने व कुरण लागवडीसाठीच वापराव्यात व त्या बदल्यात त्या शेतकऱ्यांना सरकारने दरवर्षी योग्य ती रक्कम मोबदल्यापोटी द्यावी अशी मागणी हे अधिवेशन करीत आहे.

### ठराव क्र. ५
### शिक्षणात पहिलीपासून सेंद्रीय व निसर्ग शेतीचा समावेश करणे

भारताला स्वातंत्र्य मिळाल्यानंतर खरे तर शिक्षणात मूलभूत बदल करणे गरजेचे होते. श्रमावर व गरजांवर आधारित मूलभूत शिक्षण विद्यार्थ्यांना मिळायला पाहिजे होते. हे न झाल्यामुळे कारकून निर्माण करणारी ब्रिटिश काळातील शिक्षण पद्धत आजपर्यंत चालू राहिली. त्यामुळे नोकरीची व लाचारीची मानसिकता घेऊन विद्यार्थी शाळेतून व कॉलेजमधून शिक्षण घेऊन बाहेर पडत आहेत. त्यामुळे आपल्या शेतीप्रधान देशातील शिकलेला शेतकऱ्याचा मुलगा शेती करण्यासाठी शेतात जायला तयार नाही. कारण त्याला पहिलीपासून शेतीचे शिक्षण मिळालेच नाही. तू 'शेती करण्यासाठी शिकले पाहिजे' असे पालकांनी व शिक्षणाने त्याला सांगितलेलेच नाही. त्यामुळे मुलांच्या सृजनशीलतेचा विकास झाला नाही. श्रम आधारित शिक्षणातूनच माणसाच्या सृजनशीलतेचा विकास होतो व सृजनशीलतेच्या विकासातूनच नवनिर्मिती होते. प्रत्येक माणसाने आपली बौद्धिक व शारीरिक शक्ती वापरून नवनिर्मिती केली तरच माणूस व देश बलवान होतो. सृजनशील




माणूस लाचारीची मानसिकता घेऊन जगत नाही. त्यासाठी माणसांच्या सृजनशीलतेचा विकास करून नवनिर्मिती करणारे शिक्षण देण्याची गरज आहे. शेतीमध्ये माणसाच्या सृजनशीलतेच्या विकासाला व नवनिर्मितीला जास्त वाव आहे. त्यासाठी पहिलीपासून विद्यार्थ्याला श्रम आधारित सेंद्रीय व निसर्ग शेतीचे शिक्षण देण्याची मागणी आम्ही या अधिवेशनाद्वारे करीत आहोत.

कृषी विद्यापीठातून सध्या रासायनिक शेती पद्धतीचे शिक्षण दिले जात आहे. रासायनिक शेतीचे शिक्षण म्हणजेच संकरीत बी, रासायनिक खत, रासायनिक औषध व ट्रॅक्टरच्या मशागतीद्वारे शेती करण्याचे दिले जाणारे शिक्षण. त्यामुळे कृषी विद्यापीठे संकरीत बी, रासायनिक खत, औषध व ट्रॅक्टर निर्माण करणाऱ्या कंपन्यांच्या प्रचाराचे माध्यम बनले आहेत. गावरान बी वापरून व बैल मशागतीच्या साह्याने शेतातच असलेली नैसर्गिक संसाधने वापरून सेंद्रीय - नैसर्गिक पद्धतीने शेती करून जमिनीचा पोत वाढवत शेती उत्पादन वाढवू शकतो हे अनेक शेतकऱ्यांनी सिद्ध केले आहे. तेव्हा कृषी विद्यापीठातून सेंद्रीय व नैसर्गिक शेती पद्धतीवर आधारित अभ्यासक्रम आखून शिक्षण द्यावे, अशी मागणी या अधिवेशनाद्वारे करीत आहोत.

### ठराव क्र. ६
### प्रसार माध्यमाद्वारे सेंद्रीय व निसर्ग शेतीचा प्रसार करणे

जनतेच्या पैशातून चालवले जाणारे टी.व्ही., रेडिओ, वृत्तपत्रे सध्या रासायनिक शेतीचा अग्रक्रमाने प्रचार करीत आहेत. रासायनिक शेतीसाठी लागणाऱ्या वस्तूंचे उत्पादन करणाऱ्या कंपन्यांच्या प्रचाराचे हत्यार ही प्रसार माध्यमे झाली आहेत. त्यामुळे शेतकऱ्यांची दिशाभूल होऊन त्यांचे प्रचंड शोषण सध्या होत आहे. त्यामुळे तो दिवसेंदिवस नुकसानीत जात असून त्यांच्या आत्महत्येचे प्रमाण वाढत आहे. हे होऊ नये यासाठी जनतेच्या पैशातून चालणाऱ्या वरील प्रसार माध्यमांनी सेंद्रीय व नैसर्गिक शेती पद्धतीचाच प्रचार व प्रसार करावा अशी मागणी हे अधिवेशन करीत आहे.

### ठराव क्र. ७
### गावरान बियाण्यांचे रक्षण व संवर्धन

'बी' हा शेतीचा आत्मा आहे. कोणतेही 'बी' च नसेल तर शेतीच होऊ शकत नाही. वनस्पतीच्या विकासाच्या प्रक्रियेमध्येच निसर्गामध्ये बियांची निर्मिती झाली आहे. याच नैसर्गिक गावरान बियांवर प्रक्रिया करून संकरीत बियाणे निर्माण करून बियाणे निर्मितीवर मूठभर व्यक्तींनी कंपन्यांच्या माध्यमातून मक्तेदारी निर्माण केली आहे. गावरान बियाण्यांचे रक्षण व संवर्धन करण्याऐवजी शेतकऱ्यांनी संकरीत बियाणे वापरून गावरान बियाण्यांच्या अनेक जाती गमावल्या आहेत. त्यामुळे शेतकरी बियांसाठी परावलंबी होत आहे. हे परावलंबन थांबविण्यासाठी सर्व जातीच्या गावरान बियाण्यांचे रक्षण व संवर्धन करण्याचे शेतकऱ्यांना हे अधिवेशन आवाहन करीत आहे.

तसेच सरकारने संकरीत बियाण्याऐवजी गावरान बियाण्यावर संशोधन करून अधिक चांगले गावरान बियाणे शेतकऱ्यांना उपलब्ध करून द्यावे, अशी मागणी या अधिवेशनाद्वारे करण्यात येत आहे.

### ठराव क्र. ८
### गावरान गाय बैलांचे संवर्धन

भारतीय शेतीचा मुख्य आधार गावरान गाय व बैल आहेत. शेतीमध्ये मशागतीसाठी ट्रॅक्टरची गरजच नाही. ट्रॅक्टरच्या मशागतीतून फायद्याऐवजी तोटेच होतात. अनेक प्रयोग करून आपल्या पूर्वजांनी शेतीमध्ये मशागतीसाठी बैलाची निवड केली व ती योग्यच ठरली आहे. शेती मशागतीसाठी दुसऱ्या कोणत्याही प्राण्यांच्या नर किंवा मादी जास्त कार्यक्षमतेने कार्य करू शकत नाहीत असे दिसून येते. बैलासाठी गावरान गाय तर हवीच परंतु गावरान गाईच्या पोटात खालील सात कारखाने आहेत.

गाईच्या पोटातील सात कारखाने असे

| | |
|---|---|
| १) शेण | खत |
| २) मूत्र | कीटकनाशक औषधी, माणसांसाठी औषधी |
| ३) शेणापासून गॅस | ऊर्जा, वीज, पेट्रोल, डिझेल |
| ४)दूध | पुष्टिकारक पेय, औषधी गुणधर्म |
| ५) बैल | परिवहन, ट्रॅक्टर - ट्रक |
| ६) तूप | प्रदूषण - मुक्ती, ओझोनच्या छिद्रांना भरून काढण्याची क्षमता, औषधी गुणधर्म |

अनुक्रमणिका

७) चामडे वस्त्र- अच्छादन,
गर्मी - थंडीपासून रक्षण

परंतु या मूलभूत बाबींकडे दुर्लक्ष करून संकरीत गोपैदासीचा कार्यक्रम फक्त शहरी विभागाला दूध पुरवठा करणे या एका उद्देशासाठी सुरू ठेवल्यामुळे देशी गोवंशाची वाताहत झाली आहे. आज महाराष्ट्रात देशी गोवंशाची जैविक विविधता संपवून जवळजवळ ४० लाख संकरीत जनावरांची संख्या फक्त गेल्या तीस वर्षात निर्माण झाली आहे. त्याचे वाईट परिणाम शेतीवर, माणसावर होत आहेत. म्हणून तो मशागतीसाठी ट्रॅक्टरसारख्या यंत्राच्या मागे लागला आहे. त्यामुळे गेल्या चाळीस वर्षात पुढीलप्रमाणे जमिनीचे नुकसान झाले आहे. जमिनीतील कर्बाचे प्रमाण ६० टक्क्यांनी घटले आहे. जमिनीतील एकूण नत्र ४२ टक्क्यांनी घटले आहे. एकूण स्फुरद ४२ टक्क्याने घटले आहे. पालाश ६० टक्क्याने घटले आहे. इतर सूक्ष्म अन्नघटक ५० टक्क्याने घटले आहेत आणि सर्वात महत्त्वाचा भाग म्हणजे महाराष्ट्रातील जमिनीच्या धुपीमुळे न भरून येणारे नुकसान झाले आहे.

तेव्हा वरील सर्व नुकसान टाळावयाचे असेल तर विविध जातीच्या देशी (गावरान) गाय व बैलाच्या संगोपनाला व संवर्धनाला शेतकऱ्याने व सरकारने अग्रक्रम द्यावा असे आवाहन हे अधिवेशन करीत आहे.

## ठराव क्र. ९
## शेतकरी व ग्राहकामधील दलाल हटविण्यासाठी बचत गटाचे संघटन करणे

शेती व्यवस्थेची तीन विभागात विभागणी होते. १) शेती माल उत्पादन करणे २) शेती मालावर प्रक्रिया करणे ३) शेतीमालाचे वितरण करणे. या तीनपैकी दोन व तीन विभागावर व्यापारी, देशी व परदेशी कंपन्यांचे वर्चस्व आहे. त्यामुळे शेतकऱ्यांच्या मालाला योग्य भाव व ग्राहकांना योग्य भावात माल मिळत नाही. शेतकरी व ग्राहकांची प्रचंड लूट व्यापारी व देशी-परदेशी कंपन्या करीत आहेत.

तिसऱ्या विभागात आतापर्यंत शेतकऱ्यांचाच सहभाग होता. भारतीय राज्यकर्त्यांनी रासायनिक शेतीचा स्वीकार केल्यानंतर व गॅट करार स्वीकारल्यानंतर देशी-परदेशी कंपन्या व व्यापारी मोठ्या प्रमाणात शेतमाल उत्पादनाच्या क्षेत्रात उतरल्या आहेत व शेतकऱ्यांच्या जमिनी हडप करीत आहेत. देशी-परदेशी कंपन्यांना सीलिंगच्या कायद्यातून वगळून त्यांना हजारो एकर जमीन खरेदी करण्याचा परवाना आपल्या सरकारने दिला आहे. त्यामुळे परदेशी कंपन्या व देशी उद्योगपती - व्यापारी कंपन्यांच्या नावाने हजारो एकर जमीन खरेदी करीत आहेत व त्यामुळे लाखो शेतकरी भूमीहीन होत आहेत. रासायनिक शेती उत्पादनासाठी लागणाऱ्या सर्व वस्तू (संकरीत बी, रासायनिक खत, औषधे व ट्रॅक्टर) या कंपन्या निर्माण करतात व वितरीतही करतात. त्यामुळे शेतकऱ्यांचे प्रचंड शोषण या कंपन्या करीत आहेत.

महाराष्ट्रात व देशात अनेक ठिकाणी महिलांचे बचत गट मोठ्या प्रमाणात स्थापन झाले आहेत. महिलांना स्वावलंबी बनविण्यासाठी या बचत गटांच्या माध्यमातून प्रयत्न होत आहेत. परंतु देशाचे उत्पादनाचे व उदरनिर्वाहाचे मुख्य साधन असलेल्या शेती व्यवसायावर मूठभर शेतकरी, व्यापारी, देशी-परदेशी कंपन्याचे वर्चस्व प्रस्थापित झाल्यामुळे बहुसंख्य शेतकरी कुटुंबातील स्त्री - पुरुषांना संपूर्ण स्वावलंबी व्हायचे असेल व त्यांचे शोषण थांबवायचे असेल तर शेतकरी स्त्री - पुरुषांचे व ग्राहक स्त्री - पुरुषांचे बचत गट स्थापन करून पुढील दोन उपाय करून त्यावर अधिक लक्ष केंद्रीत करून संघटितरित्या काम करावे लागेल.

उपाय :

१) सेंद्रीय व नैसर्गिक पद्धतीने शेती करणे

२) शेती मालावर प्रक्रिया करून वितरणाची व्यवस्था उभी करणे.

हे दोन उपाय केल्यामुळे शेतीमध्ये विनभांडवलात, कमी पाण्यात, कमी मशागतीत, कमी उत्पादन खर्चात जमिनीचा पोत वाढवत विषमुक्त, सकस व चवदार प्रचंड उत्पादन मिळेल. हे करीत असताना निसर्गाचा समतोल कायम राहील. नैसर्गिक साधनसंपत्तीचे संवर्धन होईल. त्यामुळे बहुसंख्य शेतकऱ्यांना शेती करणे परवडेल. तसेच शेतीमालावर प्रक्रिया करण्याचे व वितरणाचे काम बचत गटांनी हाती घेतल्यावर ग्रामीण शहरी स्त्री-पुरुष बेकारांना मोठ्या प्रमाणात रोजगार मिळेल आणि शेतकऱ्यांच्या मालाला योग्य भाव मिळेल व ग्राहकांना योग्य किंमतीत धान्य, भाज्या, फळे मिळतील. अशा प्रकारे बचत गटाच्या माध्यमातून ग्रामीण व शहरी स्त्री-पुरुषांना खऱ्या अर्थाने स्वावलंबी सुखी जीवन जगता येईल.

म्हणून हे अधिवेशन शेतकरी व शहरी ग्राहक स्त्री, पुरुषांना वरील उद्दिष्टासाठी संघटित होण्याचे आवाहन करीत आहे.

"शेतकऱ्याच्या कमी प्रतीच्या मानल्या जाणाऱ्या शेती

उत्पादनांना म्हणजे ज्वारी, बाजरी, नाचणी, इ. पिकांना हमी भाव देण्याची जबाबदारी सरकारने घ्यायची गरज नाही" अशा प्रकारचा बाजारधर्जिणा दबाव सरकारवर सतत येत आहे. त्या दबावाला न जुमानता हमी भाव देण्याची जबाबदारी सरकारने परिणामकारकपणे पार पाडली पाहिजे व जे जे उत्पादन या देशात पुरेशा प्रमाणात उपलब्ध आहे त्या पिकांना संरक्षण देऊन त्याची आयात थांबविली पाहिजे. तसेच रेशनवर उल्लेखलेली धान्ये उपलब्ध करून छोट्या शेतकऱ्यांना संरक्षण दिले पाहिजे अशी मागणी हे अधिवेशन करीत आहे.

## ठराव क्र. १०
## मानवी शरीराला हानीकारक पांढऱ्या साखरेऐवजी रसायनविरहीत गूळ धोरण राबविणे

वसंतदादा शुगर इन्स्टिट्यूट पुणे यांनी साखर कारखानदारीमुळे अनेक जटील समस्या निर्माण झाल्या असल्याचे नमूद केले आहे. राजकीय समस्या सर्वांना माहीत आहेतच परंतु शेतकरी ऊस उत्पादकांच्या आणि उपभोक्त्यांच्या समस्या फार दूरगामी, गंभीर असून राष्ट्राच्या स्थैर्याच्या दृष्टिकोनातून भयानक हानीकारक आहेत.

अ) शेतकरी उत्पादकांच्या समस्या :

१) महाराष्ट्रातील प्रती हेक्टरी ऊस उत्पादकता वरचेवर खालावत आहे.

२) ऊसाचे ३ टक्के क्षेत्र एकूण पाण्यापैकी ७० टक्के पाणी वापरते. अती पाणी वापरामुळे जमिनी पाणथळ, क्षारपट होवून खराब होत आहेत. अती पाणी वापरामुळे भूगर्भातील पाण्याची पातळी सरासरी ६ ते ७ मीटर घटली आहे. पाणी टंचाईचे भीषण संकट समाजव्यवस्था विस्कळीत करण्याच्या मार्गावर आहे.

३) रासायनिक खताचा अतिरेकी वापर, विषारी तणनाशके, कीटकनाशके वापरामुळे जमिनीच्या कसाचे व जैविक भाराचे अपरिणित नुकसान झाले आहे आणि होत आहे. या नुकसानकारक निविष्टांच्या जबर वाढीमुळे उत्पादकांची आर्थिक परिस्थिती सतत खालावत आहे.

४) ऊस कारखान्याने वेळेवर न्यावा म्हणून कारखान्याचे प्रशासन, ऊस तोड कामगार व वाहतूकदारांच्या समोर लाचारीने केलेले प्रयत्न शेतकऱ्यांचे स्वत्व हिरावून नेते.

५) ऊसाचा भाव - भारत सरकारने शुगर केन कंट्रोल ऑर्डर १९६६ अन्वये वैधानिक किमान भाव किंवा एस.आय.पी. अन्वये ८.५ टक्के रिकव्हरीला जाहीर केला जातो. या ८.५ टक्के रिकव्हरीच्या पुढे प्रत्येक १ टक्का रिकव्हरीला किती भाव द्यावा हे निर्धारीत केले जाते. आजतागायत ८.५ टक्के रिकव्हरी इतकाच भाव पुढच्या रिकव्हरीला साखर कारखान्याने दिल्यामुळे ऊस उत्पादकांचे कोट्यवधीचे नुकसान झाले आहे.

ब) ऊस मजुरांच्याही समस्या फार व्यापक आणि गंभीर आहेत. प्रत्येक कारखान्याकडे स्थलांतरीत मजूर आहेत. त्यामुळे त्या मजुरांच्या मुलांच्या शिक्षणाची अबाळ होते. त्यामुळे त्या मुलांचे भविष्य अंधःकारमय होते. देशाचे भविष्य असलेल्या या पुढील पिढीचे नुकसान होते.

क) उपभोक्त्यांच्या समस्या :

साखर कारखान्यात उत्पन्न होणाऱ्या पांढऱ्या साखरेची शरीराला मुळीच आवश्यकता नाही. साखर सेवनामुळे मानसिक आरोग्य, रोगप्रतिकारकशक्ती कमी होते. थकवा, ॲलर्जी, रक्तदाब कमी होणे इत्यादी अनेक आजार उद्‌भवतात. मागच्या महिन्यात अखिल भारतीय सायन्स काँग्रेस अहमदाबाद येथे भरली होती. त्या सायन्स काँग्रेसमध्ये भारत मधुमेहाची २०३० साली जागतिक महासत्ता बनेल, असे भाकीत केले आहे. याच परिसंवादात भारत हृदयरोगाच्या बाबतीत जगाच्या एकूण हृदयरोग पीडितांपैकी ५० टक्के रोगपीडित घेऊन अग्रेसर आहे.

वैज्ञानिक दृष्टी असेल तर साखरेच्या वापराला, उत्पादनाला प्रोत्साहन दिले जाऊ नये. याउलट सर्व शेतकऱ्यांनी गूळ तयार करून, ग्राहकांनी गूळ खाऊन आर्थिक, सामाजिक व आरोग्यदायी उन्नती साधावी. शेतकऱ्याने ऊस उत्पादन फक्त सेंद्रीय पद्धतीने, पट्टा पद्धत व जैविक आच्छादनाचा वापर करून कमीत कमी पाण्याचा वापर करावा व ऊसाचे क्षेत्र मर्यादित ठेवावे.

वरील सर्व समस्या टाळण्यासाठी हे अधिवेशन खालील उपाय सुचवित आहे. १) शासनाने पांढऱ्या साखर निर्मितीला प्रोत्साहन न देता रसायनविरहीत गूळ निर्मितीला प्रोत्साहन देण्याचे कायदे करावेत. २) आजारी साखर कारखान्यांना जनतेच्या (सरकारी) तिजोरीतून कसलीच मदत देऊ नये. ३) यापुढे खाजगी व सहकारी साखर कारखान्यांना परवानगी देऊ नये. ४) शेतकऱ्यांनी गूळ निर्मितीसाठीच ऊसाचा उपयोग करावा.






## ठराव क्र. ११
## मन व शरीर निरोगी ठेवण्यासाठी निसर्गोपचार पद्धतीचा अवलंब व प्रचार करणे

निसर्गशेती, सेंद्रीय शेती जसे आपणास शाश्वत जीवनाकडे, स्वावलंबी जीवनाकडे नेणारी आहे. त्याचप्रमाणे निसर्गोपचारही आपणास स्वावलंबी जीवनाकडे नेतो. आपल्या देशाचा, गावाचा व स्वतःचा आरोग्याचा प्रश्न सोडवायचा असेल तर रोग होऊ न देण्याचे म्हणजेच आजारी न पडण्याचे व आजार उद्भवल्यास ज्या पंचतत्त्वांनी आपले शरीर बनले आहे त्या माती, पाणी, हवा, तेज, आकाश यांचा वापर करून आरोग्याचे रक्षण करण्याचे ज्ञान मिळविणे ही अन्न, वस्त्र, निवारा यांच्या इतकीच प्राथमिक गरज आहे.

ॲलोपॅथी आपणास डॉक्टरवर, औषधांवर अवलंबून रहायला शिकवते. निसर्गोपचार आपणास स्वावलंबी राहण्यास शिकवतात. ॲलोपॅथी रोगाचे दमन करते, तर निसर्गोपचार रोगाचे मुळासकट निर्मूलन करतो. खेडोपाडी दवाखाने झाले. बड्या देशी कंपन्या किंवा विदेशी कंपन्यांची औषधे व डॉक्टर खेड्यापाड्यात जरी आले तर ते खेड्यातील लोकांना रोगमुक्त बनवू शकणार नाहीत. कारण रोगमुक्तीसाठी शरीराची अंतर्बाह्य शुद्धता महत्त्वाची असते. जिथे घाण असेल तिथे जिवाणू वाढतात व जिवाणूंमुळे रोग उत्पन्न होतात म्हणून शरीरातील घाण बाहेर टाकून शरीर शुद्ध करणे महत्त्वाचे आहे. मातीलेपातून शरीरातील विजातीय द्रव्ये बाहेर टाकली जातात. बाष्पस्नानातून, मृतपेशी शरीरातून बाहेर फेकल्या जातात. घर्षण स्नान, सूर्यस्नान यातून स्नायूंना, पेशींना ऊर्जा मिळते. उपवासातून शरीर शुद्धी होऊन मल बाहेर फेकला जातो. योग्य आहार, विहाराने शरीरातील बलवृद्धी होते.

निसर्गोपचार ही एक जीवनप्रणाली, जीवनपद्धती आहे. तिचा अवलंब केल्यास आपण रोगमुक्त दीर्घायुष्य मिळवू शकतो. जर ॲलोपॅथी औषधाने आरोग्य ,मिळाले असते तर कोणताच डॉक्टर आजारी पडला नसता. ॲलोपॅथी हा तात्पुरता उपचार आहे. या पद्धतीत औषधाने थोड्या वेळासाठी बरे वाटते. एखाद्या रोगासाठी घेतल्या गेलेल्या औषधे, गोळ्यामुळे शरीरात इतर व्याधी होताना दिसतात. ॲपेंडिक्स, मुळव्याध यासारखे रोग मलावरोधामुळे होतात. डॉक्टर या रोगावर ऑपरेशन करतात पण ज्या मलावरोधामुळे रोग उत्पन्न झाला, ऑपरेशन करावे लागले ती व्याधी, ते मूळ कारण कायम तसेच राहते व ऑपरेशनमुळे जीवनशक्ती क्षीण होऊन शरीर आणखी रोगांना बळी पडण्याची शक्यता वाढते. निसर्गोपचारात मलावरोध झाल्यास उपवासाने तो दूर होऊन कोंडायुक्त, चोथायुक्त अन्न ग्रहण करून आतड्यांना व शरीराला शुद्ध करून रोगाचे मूळ कारण नष्ट करता येते.

निसर्गोपचाराचे ज्ञान म्हणजे स्वस्थ निरोगी जीवन जगण्याची कला म्हणजेच विज्ञान आहे. यात स्वास्थ वाढविणे, रोग प्रतिबंधन, रोग निवारण करण्याची अपार क्षमता आहे.

आहार हा निसर्गोपचारातील महत्त्वाचा घटक आहे. आज रासायनिक खते घातलेले, रासायनिक औषधे फवारलेले अन्न खाल्ल्यामुळे विविध प्रकारचे रोग माणसात दिसून येत आहेत. ह्या रोग निवारणासाठी ॲलोपॅथीच्या महागड्या औषधांच्या विळख्यात श्रीमंतापासून गरिबांपर्यंत सर्वजण भरडले जात आहेत.

समाजाला रोग होण्याची कारणे न सांगता, रोगापासून शरीराला दूर कसे ठेवावे ह्याचे ज्ञान न देता, विदेशी महागड्या औषधांनी रोग दडपून टाकले जातात. यामुळे माणसाचे आरोग्य अधिक धोक्यात येत आहे. म्हणूनच चांगल्या स्वास्थ्यासाठी डॉक्टर व महागड्या औषधांवर अवलंबून न राहता स्वावलंबी व्हायचे असेल तर निसर्गोपचार पद्धतीचाच अवलंब करणे हितावह होणार आहे. म्हणूनच दूरदृष्टी असलेल्या गांधीजींनी निसर्गोपचाराचे महत्त्व जाणून त्याचा प्रचार केला, आज गांधींचे अनुयायी म्हणवणाऱ्या सगळ्यांनीच निसर्गोपचार पद्धतीचा प्रसार, प्रचाराची धुरा एकत्रितपणे पेलण्याची कामगिरी करणे उचित ठरणार आहे. ह्यासाठी काही मागण्या सरकारने मान्य कराव्या लागणार आहेत.

१) निसर्गोपचार पद्धतीचा सरकारने पुरस्कार करावा.

२) निसर्गोपचार पद्धतीचा अभ्यासक्रमात प्राथमिक शिक्षणापासून समावेश करावा.

३) सरकारच्या पुढाकाराने खेडोपाडी, गावोगावी प्राथमिक आरोग्य केंद्राप्रमाणे निसर्गोपचार केंद्रे चालवली जावीत.

४) सरकारने लोकांना शुद्ध पाणी, शुद्ध हवा, शुद्ध अन्न मिळण्यासाठी सर्व प्रकारचे प्रयत्न करावे.

५) अन्न, वस्त्र, निवारा ह्याप्रमाणे स्वावलंबी स्वस्थ आरोग्य ही जीवनावश्यक बाब समजावी.

मित्रहो, ज्या धरतीवर आपण जन्म घेतला, त्या पृथ्वीचा मातीचा, पाण्याचा, सूर्यशक्तीचा, हवेचा, आकाशाचा वापर करा आणि स्वस्थ दीर्घायुष्य मिळवा.








स्वावलंबी, स्वस्थ, निरोगी जीवन हा आमचा निसर्गदत्त अधिकार आहे. तो आपण मिळवला पाहिजे. निसर्गोपचार ही चिकित्सा नव्हे जीवन पद्धती आहे. तिचा आपण अवलंब करण्याचे आवाहन या अधिवेशनाद्वारे करण्यात येत आहे.

निसर्ग शेती अभियान समितीच्या वतीने ३० जानेवारी २००५ रोजी म. गांधी स्मृतीदिनी सोनावती (ता. जि. लातूर) येथे पहिले राज्यस्तरीय 'निसर्ग शेती अधिवेशन' आयोजित करण्यात आले. या अधिवेशनात राज्यातून एक हजार शेतकरी प्रतिनिधींनी सहभाग नोंदविला. निसर्ग शेती पद्धतीचा विकास करण्यासाठी व निसर्ग शेतीचे ज्ञान शेतकऱ्यांपर्यंत पोचविण्यासाठी या अधिवेशनात 'निसर्ग शेती मुक्त विद्यापीठाची' स्थापना करण्यात आली. अधिवेशनाच्या प्रमुख वक्त्या मेधा पाटकर यांच्या हस्ते मुक्त विद्यापीठाच्या फलकाचे अनावरण करण्यात आले. या निसर्ग शेती मुक्त विद्यापीठाचे मुख्य केंद्र सोनावती येथे असेल. या मुक्त विद्यापीठामार्फत ताबडतोबीने खालील कार्यक्रम राबविले जातील.

१) मुक्त विद्यापीठातर्फे दर महिन्याच्या तिसऱ्या रविवारी (तिसऱ्या रविवारी सण असल्यास चौथ्या रविवारी) सोनावती येथे संदिपान बडगीरे यांच्या शेतात शेतकरी व विद्यार्थ्यांसाठी निसर्ग शेतीचे प्रात्यक्षिकासह प्रशिक्षण शिबीर घेण्यात येईल. शिबिराची वेळ दुपारी १२ ते ५ वाजेपर्यंत राहील. दुपारचा जेवणाचा डबा शिबिरार्थींनी सोबत आणावा लागेल.

२) या मुक्त विद्यापीठामार्फत शेतकरी व विद्यार्थ्यांना आपल्या गावात एक किंवा दोन दिवसाचे प्रशिक्षण शिबीर घ्यायचे असल्यास त्यांनी एक महिना अगोदर मुक्त विद्यापीठाशी संपर्क साधावा. प्रशिक्षण देण्यासाठी विद्यापीठामार्फत प्रत्यक्ष निसर्ग शेती करणारे तज्ज्ञ प्रशिक्षक पाठविण्यात येतील. प्रशिक्षकांच्या प्रवास खर्चाची व्यवस्था शिबिरार्थींना करावी लागेल.

३) महाराष्ट्रात व देशात अनेक शेतकरी सेंद्रीय व नैसर्गिक पद्धतीने शेती करीत आहेत. त्याची माहिती लिखीत स्वरूपात जमा करण्यात येईल व ती विद्यापीठाच्या वाचनालयात ठेवण्यात येईल. जे शेतकरी सेंद्रीय व निसर्ग शेती करीत आहेत त्यांनी लिखीत स्वरूपात माहिती विद्यापीठाकडे पाठवावी ही विनंती.

४) सेंद्रीय व निसर्ग शेतीवर प्रसिद्ध झालेली सर्व पुस्तके मुक्त विद्यापीठामार्फत संकलीत करून विद्यापीठाच्या वाचनालयात ठेवण्यात येतील. ज्यांच्याकडे अशी पुस्तके असतील त्यांनी पुस्तके किंवा पैसे विद्यापीठाला देणगी म्हणून द्यावीत ही विनंती.

५) या मुक्त विद्यापीठामार्फत सर्व जातींच्या गावरान (देशी) बियाण्यांचे संकलन करून 'बियाणे बँक' तयार करण्यात येत आहे. ज्या शेतकऱ्यांकडे गावरान बियाणे असेल त्यांनी विद्यापीठाकडे पाठवावे ही विनंती.

६) या मुक्त विद्यापीठामार्फत सर्व जातींच्या देशी (गावरान) गाय व वळूच्या फोटोचे संकलन करण्याचे काम सुरू करण्यात आले आहे. ज्यांच्याकडे चांगल्या गावरान गाय व बैलांचे फोटो असतील त्यांनी विद्यापीठाकडे पाठवावेत ही विनंती.

✠ ✠ ✠

विश्वम्
तुष्टम्
ग्रामे
अस्मिन्
अनातुरम् !

ऋग्वेद : १.१४.८

आपल्या गावामध्ये आरोग्यवान्, परिपुष्ट विश्वाचे दर्शन होवो.

पुष्टीमध्ये उत्पादन, उद्योग आदि सर्व येऊन जाते. पुष्टि केवळ शारीरिक नव्हे, भौतिक आणि मानसिक अर्थानेही असावी.

- विनोबा (वेदामृत : पृ. १२)

# विशेष संधीचे तत्त्व

## डॉ. राम मनोहर लोहिया

आजकाल प्रत्येकजण म्हणत असतो की, जातीयवाद फार बोकाळला आहे. गंमत अशी की प्रत्येक जात दुसऱ्या जातीवर जातीयवादाचा आरोप करीत असते. असे असूनही सर्व मिळून जातिव्यवस्थाच मुळात नाहीशी करण्याचा प्रयत्न का करीत नाहीत? प्रत्येक राजकीय पक्ष व माणूस जातीजातीमधील भेदभाव नाहीसा केला पाहिजे असे म्हणतो. पण संपूर्ण जातिव्यवस्थाच निकालात काढली पाहिजे असे कोणीच म्हणत नाही. जाती-जातींमधील भेदभाव नष्ट करणे म्हणजे जातिव्यवस्था नाहीशी करणे नव्हे. जातींचे अस्तित्व जोवर कायम आहे तोवर जातीयवृत्ती व जातीजातीमधील भेदभाव राहणारच.

देशातील व देशाबाहेरील बड्या बड्या विद्वानांना व समाजशास्त्रज्ञांना असे वाटते की, जसा जसा भारतीय माणूस पाश्चात्त्य संस्कृतीच्या, शिक्षणाच्या, आधुनिक जीवनपद्धतीच्या व सुधारणांच्या संपर्कात येईल तसतशी जातिव्यवस्था ढिली पडत जाईल. या शतकातील प्रख्यात समाजशास्त्रज्ञ मॅक्स वेबरनेही असाच अंदाज व्यक्त केला होता. पण तो साफ खोटा ठरला आहे. देशात रेल्वे येऊन शंभर वर्षे होऊन गेली ; रेडिओ येऊन चाळीस-पन्नास वर्षे झाली ; आधुनिक हॉटेले शहराशहरात आहेत ; शाळा-कॉलेजे-विद्यापीठे निघूनही एक शतक होऊन गेले. पण याचा जातिव्यवस्थेचा नायनाट होण्याच्या दृष्टीने कितीसा उपयोग झाला? सर्व जातीचे लोक रेल्वेतून एकत्र प्रवास करतात; हॉटेलात एकत्र खातात-पितात; सिनेमा एकत्र बसून पाहतात; शाळा-कॉलेजात एकत्र शिकतात. पण जाती नाहीशा झाल्या काय? जन्म, विवाह, मृत्यू या महत्त्वाच्या प्रसंगी वेळेचे सर्व संस्कार आपापल्या जातीय रिवाजांनुसार सर्वजण करीत असतात. निवडणुकीचे वेळी जातीचा विचार करतात. नोकऱ्या देताना व मिळवताना जातीचा विचार करतात.

मॅक्स वेबरप्रमाणे काही विद्वानांना पूर्वी वाटत असे आणि आजही काहींना वाटते, की तरुण लोक युरोप-अमेरिकेत शिक्षण घेऊन आले की आपल्या देशातील जातीयवाद कमी होईल, पण एकतर आपल्या देशातील किती तरुणांना युरोप-अमेरिकेत शिक्षण घेता येते? आणि ज्यांना ही संधी मिळते त्यांत ९५ टक्के तरुण उच्च जातीमधीलच असतात. ते शिक्षण घेऊन परत आले की आपल्याच जातीमधली किंवा अन्य आपल्या तोलामोलाच्या वरिष्ठ जातीमधली दिसायला सुंदर, आधुनिक रीतिरिवाजाची मुलही पाहून लग्न करतात. विलायतेहून शिक्षण घेऊन आलेल्या या लोकांची त्यांच्या उच्च जातीत पुन्हा एक नवीन अतिउच्च जात निर्माण होते असाच अनुभव आहे. हिंदुस्थानातील जातिव्यवस्था ही कशी चिवट आहे आणि जातिव्यवस्था मोडायची भाषा व प्रत्यक्ष व्यवहारात ती दृढमूल करण्याचा प्रयत्न या दोन्ही गोष्टी या देशात एकाचवेळी कशा चालू असतात याची बिचाऱ्या पाश्चात्त्य समाजशास्त्रज्ञांना कशी कल्पना येणार?

जातिप्रथेला तीन मार्गांनी विरोध करण्यात येतो. एक शाब्दिक, दुसरा हीन आणि मिश्रित स्वरूपात आणि तिसरा प्रत्यक्ष व्यवहाराने खराखुरा असा. प्रस्थापित सामाजिक चौकटीला धक्का लागणार नाही अशा बेताने जातिप्रथेविरुद्ध खूप आक्रोश केला जातो. जातिप्रथा ही अत्यंत गलिच्छ गोष्ट आहे अशी तिची खूप निंदाही केली जाते. पण गंमत अशी की जातिप्रथेचा अंत करण्याच्या दृष्टीने प्रत्यक्ष कृती करणाऱ्यांची देखील तितकीच निर्भत्सना केली जाते.

जातिप्रथा नष्ट करावयाची असेल तर सर्व जनतेचे जीवनमान वाढवले पाहिजे. लायकीप्रमाणे काम दिले पाहिजे आणि सर्वांना समान संधी दिली पाहिजे असे काही जातितोडक सांगत असतात. 'सर्वांची आर्थिक प्रगती करा', 'सर्वांना विकासाची समान संधी द्या' अशा घोषणा हे लोक मोठमोठ्यांदा करीत असतात. पण ही निव्वळ लबाडी आहे. भोंदूपणा आहे. आजच्या विशिष्ट समाजव्यवस्थेत सर्वांना समान संधी याचा अर्थ पाच हजार वर्षांच्या जुन्या वरिष्ट जातींनाच पुन्हा विद्या, प्रतिष्ठा आणि विकासाची संधी अधिक प्रमाणात मिळवून देणे होय. कनिष्ठ जातीतील एखादीच प्रतिभाप्राप्त व्यक्ती पाच हजार वर्षांच्या परंपरेवर मात करून समान संधीचा फायदा घेऊ शकेल. बहुसंख्य कनिष्ठ जातीय आहे तेथेच राहतील. कारण त्यांना विकासाची समान संधी दिली तरी ते उच्च जातींच्या बरोबरीने या शर्यतीत धावूच शकणार नाहीत. भारतातील राजकीय पक्षांच्या बुद्धीतही हे समान संधीचे मतलबी तत्त्वज्ञान पक्के रुजले आहे. कनिष्ठ वर्णीयांमधील विशेष लायक असलेल्या स्त्रीपुरुषांना








अनुक्रमणिका

आपल्यात सामावून घेऊन जातिप्रथेची जुनी चौकट जशीच्या तशीच त्यांना कायम ठेवायची आहे. राजकीय पक्षातील नेते वरिष्ठ जातींमधीलच आहेत, पाच हजार वर्षांच्या परंपरेमुळे विशेष लायकी आणि आचार-विचार लाभलेल्या वरिष्ठ जाती आपल्या हितसंबंधांना आच लागत नाही तोवरच जातीय विषमतेविरुद्ध बोलतात. कनिष्ठ जातींतील खास योग्यतेच्या आणि रीतीभातींच्या व्यक्तींचे तेवढे हे लोक स्वागत करतात. पण असे लोक किती असणार? फारच कमी. व्यक्ती आणि तिची प्रतिभा याविरुद्ध पाच हजार वर्षांची क्रूर परंपरा आणि शिक्षण पद्धती अशी ती विषम शर्यत असते. साहजिकच ही कुस्ती केवळ खूपच तेजस्वी आणि फारच लायक व्यक्ती जिंकू शकेल. ही कुस्ती तुल्यबळांची व्हावयाची असेल तर ज्या कनिष्ठ जातींना आजवर दडपून ठेवले त्यांना विशेष संधीच दिली पाहिजे. पण आज नकली युरोपियन बनलेल्या नेहरूंच्या हिंदुस्थानातील भ्रष्ट व उथळ युरोपाभिमुख राजकीय पक्ष विशेष संधी देण्याच्या या तत्त्वाविरुद्ध भयंकर ओरड करीत असतात. जणू आपल्या पराभूत, परधार्जिण्या आणि निहित स्वार्थ साधणाऱ्या समाजवादी धर्मावर भयंकर प्रहार केला जातो आहे असेच त्यांना वाटते.

हितसंबंधी समाजवाद केवळ राजकीय आणि आर्थिक क्रांतीचीच भाषा बोलतो. कामगारांना वेतनवाढ आणि बोनस मिळवून देणे आणि उद्योगधंद्यांचे राष्ट्रीयीकरण एवढाच या समाजवादाचा आशय आहे. जेथे व्यक्तीला आपला वर्ग बदलता येतो अशा समाजवादी क्रांती झालेल्या युरोपीय देशांत शारीरिक आणि बौद्धिक काम करणाऱ्या वर्गांच्या सामाजिक आणि आर्थिक दर्जात फार अंतर नसल्याचे दिसून येते. भारतीय समाजात बौद्धिक श्रम करणाऱ्यांची जात ठरलेली आहे. ते सर्व ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आदी वरिष्ठवर्णीय आहेत. भारतात आर्थिक आणि राजकीय क्रांती झाली तरी राज्यकारभार आणि कारखाने चालवणारे वरिष्ठ जातीमधलेच असणार. बहुसंख्य जनता तुलनेने सदैव शारीरिक आणि बौद्धिकदृष्ट्या हीन अवस्थेत पडून राहील. आज जसे जन्म आणि बुद्धि या आधारावर वरिष्ठ वर्णीयांना लायक ठरविले जाते तसे त्यावेळी योग्यता आणि आर्थिक स्थिती या आधारावर त्यांनाच लायक ठरविले जाईल. म्हणूनच तर भाषा, जातिप्रथा आणि मूलभूत क्रांतीच्या सर्वच गोष्टींची हिंदुस्थानातील वरिष्ठवर्णीय बुद्धिजीवी वर्गाला भीती वाटते. हा वर्ग जातिप्रथेला केवळ मोघम शाब्दिक विरोध करतो. त्यापलीकडे त्याची मजल जात नाही. आपल्याला फायदेशीर अशा योग्यता आणि समान संधी या तत्त्वाबाबत चढत्या आवाजात बोलता येण्याजोगी अवस्था आहे तोवरच हा वर्ग सर्वांत उच्च स्वरात जातिप्रथेविरुद्ध तात्त्विक टीका करील. जातिप्रथा यदाकदाचित नष्ट झालीच तर त्यामुळे वरिष्ठजातीय लोक जे गमावण्याचे भय आहे ते हे लोक योग्यतेचा दावा करून मिळवू पाहतात. भाषा, वाक्पटुता, रीतिरिवाज, समन्वयक्षमता, व्यावहारिक परामर्ष इत्यादी बाबींमध्ये त्या वर्गाची योग्यता निर्विवाद आहे. ही पात्रता मिळविण्यास वरिष्ठ जातींना पाच हजार वर्षे लागली आहेत. किमान काही दशके तरी कनिष्ठ जातींना विशेष संधी देऊन पाच हजार वर्षांच्या या कारस्थानाचा अंत करावयास हवा. नेहरूंच्या राजकीय नेतृत्वाखालील आजच्या भारतातील राजकीय पक्ष - काँग्रेस - कम्युनिस्ट आदी कनिष्ठ जातींना मोठ्या प्रमाणात विशेष संधी द्यावयाच्या पूर्णपणे विरुद्ध आहेत. हे सर्व स्वतःच कळत नकळत दुष्ट जातीय भावनेने पछाडलेले आहेत ते जन्मना जातिव्यवस्थेची निंदा करीतअसले तरी कर्मणा जातिप्रथेचा-योग्यतेचा सिद्धांत लागू करून आपला खास दर्जा सुरक्षित राखू पाहात आहेत.

देशातील झाडून साऱ्या राजकीय पक्षांत एका बाबतीत एकवाक्यता आहे, ती म्हणजे स्त्री-शूद्रादिक अफाट समाजाला राजकारणापासून दूर ठेवायचे आणि त्यांना वर येऊ द्यायचे नाही. अन्य प्रश्नांबाबत या पक्षांत मतभेद असतील, त्यांचे एकमेकांत वैर असेल, परंतु जनतेविरुद्धच्या या कटात ते सर्वजण एकदिलाने सामील झालेले आहेत. वरिष्ठ जातींचे समाजातील नेतृत्व कायम ठेवण्यासाठी हे पक्ष अखेरपर्यंत लढतील आणि जनतेलाही आपल्या बरोबर नेण्याचा प्रयत्न करतील. जे कोणी वरिष्ठजातीय नेते जातीपातींविरुद्ध बोलत असतात ते केवळ एक कर्तव्य म्हणून. त्यांच्या भाषणा-लेखनावर विसंबून राहण्यात अर्थ नाही. त्यांची स्वतःची व त्यांच्या पक्षांची प्रत्यक्ष कृती तपासून पहावी लागेल. विरोधी पक्षांत असले की क्रांतिकारक भाषा बोलतात आणि सत्तेवर पोचले की ती साफ विसरून जातात. तमाम राजकीय पक्षांचे प्रभावी नेतृत्व वरिष्ठ जातीय नेत्यांच्या हाती आहे. क्वचित काही ठिकाणी ते कनिष्ठ जातींमधील वरिष्ठ व बहुसंख्य जातींच्या हाती आहे. हे नेतृत्व देशाची नवनिर्मिती करू शकणार नाही. दलित व शूद्रजातींना विशेष संधी द्यावयास ज्या पक्षांचा विरोध आहे ते जातिप्रथेचा अंत कधीच करू शकणार नाहीत.

कसाही हिशेब केला तरी हिंदुस्थानच्या लोकसंख्येत वरिष्ठ जातींचे लोक वीस टक्क्यांपेक्षा जास्त नाहीत. परंतु देशाच्या नेतृत्वातील सुमारे ८० टक्के जागा ते बळकावून बसले आहेत. देशाच्या चार प्रमुख कार्यक्षेत्रांत - व्यापार, सैन्य, वरिष्ठ शासकीय नोकऱ्या आणि राजकीय पक्ष यांच्या उच्चस्थानी जवळपास ८० टक्के वरिष्ठवर्णीय प्रतिष्ठित आहेत. राजकीय पक्षांच्या आमदार-खासदारांत सर्वोच्च समित्यात व अधिकार-पदांवर कनिष्ठ जमातींचे किती लोक आहेत हा प्रश्न महत्त्वाचा आहे. कोणत्याही राष्ट्राच्या मर्मस्थानी असणारे ८० टक्के नेतृत्व

अनुक्रमणिका

१० टक्के लोकांतून निवडले जाते तेव्हा निःसंशयपणे ते राष्ट्र पतनाच्या मार्गाला लागते. त्या राष्ट्रातील ८० टक्के लोक अपात्र ठरविल्याने निष्क्रीय बनतात. आपला देश रोगग्रस्त असून मृत्यूपंथाला लागला आहे. अशा राष्ट्राला निरोगी बनविण्यासाठी व पुनश्च जिवंत करण्यासाठी त्याला योजनापूर्वक नवे नेतृत्व मिळवून दिले पाहिजे. सर्व क्षेत्रांतील किमान ६० टक्के वरिष्ठ जागा योजनापूर्वक कनिष्ठ जातींना त्यांच्या योग्यायोग्यतेचा प्रश्न उपस्थित न करता दिल्या पाहिजेत. ही गोष्ट कायदा करून करता येण्याजोगी नाही. उपयुक्तता समजूनच ती करणे अधिक चांगले! राष्ट्राच्या राजकीय नेतृत्वात बदल करून या गोष्टीचा प्रारंभ करता येईल. अलीकडेच झालेल्या समाजवादी पक्षाच्या राष्ट्रीय समितीच्या निवडणुकीत (१९५८) मागासवर्गाचे ६० टक्के प्रतिनिधी निवडून आले आहेत. त्यामुळे ही गोष्ट करता येते हे सिद्ध झाले आहे. अर्थातच पक्षाबाहेरच्या आणि पक्षातील अज्ञानी वरिष्ठ जातींनी याबद्दल पक्षाची खूपच बदनामी केली. हे धोरण फलदायी होते की नाही हे काळच ठरवील. तूर्त तरी या राष्ट्राला पुनरुज्जीवित करण्यासाठी फलप्राप्तीपर्यंत पुनःपुन्हा प्रयत्न करीत राहिले पाहिजे. तसे पाहिले तर वरिष्ठ जातींची अधिकांश मते निवडणुकांमध्ये कनिष्ठ जातींनाच पडतात, पण ते समजून उमजून होत नाही. त्यामुळे भारतातील ही अजोड कृत्रिम सामाजिक व्यवस्था जगात अजूनही कायम टिकून आहे.

दलितांना व शूद्रांना समाजाच्या सर्व प्रमुख क्षेत्रांत ६० टक्के जागा देण्याच्या सूचनेवर अनेक आक्षेप घेतले जात आहेत. पहिला आक्षेप असा की, तुम्ही ब्राह्मण आदी वर्णीयांना खतम करीत आहात. खरे तर मला सर्वच जाती खतम करावयाच्या आहेत. आणि ब्राह्मण वगैरे वरिष्ठ जातींची एकूण लोकसंख्या केवळ १० टक्के असताना त्यांना ४० टक्के जागा दिल्या जात आहेत, यात त्यांच्यावर अन्याय कसा काय होतो ते समजत नाही. आणखी एक आक्षेप असा की, तुम्ही नालायक, मूर्ख व अडाणी लोकांना खुर्चीवर बसवू पाहत आहात. त्यामुळे देशात भ्रष्टाचार माजेल; अराजक माजेल, देशाची प्रगती थांबेल. देश रसातळाला जाईल. हजारो वर्षे तथाकथित लायक, शहाण्या, शिक्षित लोकांच्या हातात देशाची सर्व सूत्रे होती व आजही आहेत. त्यांनी देशाची काय प्रगती केली? देश रसातळाला चाललाच आहे. भ्रष्टाचार व अराजक माजलेच आहे. उलट मी तर म्हणेन की, कोट्यवधी कनिष्ठवर्णीयांना सत्तास्थानापासून वंचित ठेवल्यामुळेच देशाची सर्वंकष पीछेहाट झाली; देश विनाशाप्रत पोचला.

दलित व कनिष्ठ जातींना प्रथम लायक बनवा, शिक्षित करा आणि मग उच्च पदांवर बसवा असाही तर्क केला जातो. म्हणजे प्रथम योग्यता व नंतर संधी असा हा सिद्धांत आहे. इंग्रज अगदी हाच तर्क देत होते. प्रथम स्वातंत्र्याला लायक व्हा, मग स्वातंत्र्य देतो. योग्यतेच्या नावाखाली कोट्यवधी शूद्रांना सत्तेपासून दूर ठेवण्याचा हा डाव आहे. माझे म्हणणे उलट आहे. आधी संधी द्या; मग आपोआप शूद्रांत योग्यता येईल. गांधीजींनी इंग्रजांना हेच सांगतले होते. आज योग्यता, संस्कार, शिक्षण, चांगले आचार-विचार हे सर्व जातिप्रथेमुळे काही विशिष्ट जातींत व परिवारात सीमित झाले आहेत. आपल्या विकासाची शूद्रांना व दलितांना खास, विशेष संधी देऊनच त्यांच्यात योग्यता निर्माण करता येईल; त्याना सुशिक्षित, चांगल्या आचार-विचारांचे आणि सुसंस्कारित बनविता येईल. अशी विशेष संधी देऊनच त्यांच्यात योग्यता निर्माण करता येईल. अशी विशेष संधी दलितांना व शूद्रांना फारतर ३०-४० किंवा ७०-८० वर्षे द्यावी लागेल. त्यानंतर ते वरिष्ठ समाजाच्या बरोबरीने येतील आणि समाजातील सारे घटक समान प्रगती करू लागतील. मात्र शूद्रांना व दलितांना ६० टक्के जागा देऊन विशेष संधी देण्याच्या या तत्त्वाचे इमानदारीने पालन झाले पाहिजे, त्यावर प्रत्यक्ष कृती झाली पाहिजे; मनःपूर्वक कृती झाली पाहिजे. अर्धवट व अप्रामाणिक कृतीने देशाचा घातच होईल.

काही तथाकथित व पढिक समाजवाद्यांना वाटते की, जातिप्रथेविरुद्ध अशा प्रकारे सरळ सामना करायची गरज नाही. वर्गसंघर्षाद्वारे धनिकशाही व सामंतशाही खतम केली की जातिव्यवस्थेचा आपोआप नाश होईल. जातीजातींमधील संघर्षामुळे जनतेत फूट पडेल. परंतु केवळ वर्गसंघर्षाद्वारे धनिकशाही व सामंतशाहीतून निर्माण झालेली विषमता हिंदुस्थानसारख्या जातिप्रथाप्रधान देशात नाहीशी करता येईल हा शुद्ध भ्रम आहे. आणि शिवाय ज्यांना वर्गविहीन समाजाच्या प्रस्थापनेसाठी वर्गसंघर्ष अनिवार्य आहे असे वाटते त्यांचा जातिविहीन समाजाच्या स्थापनेसाठी जातिसंघर्ष करण्याच्या बाबतीत एवढा विरोध का असावा?

खरोखरच वरिष्ठ जातींचे लोक पाच-दहा लाखांपेक्षा अधिक नाहीत. हेच मूठभर लोक धनसंपन्न, बुद्धिसंपन्न आणि प्रभावशाली आहेत. उदा. बंगाली बड्डी, मारवाडी, बनिये, काश्मिरी ब्राह्मण. त्यांच्या त्यांच्या जातीमधील विशिष्ट उपजातीच आर्थिक व राजकीय क्षेत्रातील नेतृत्वपदावर आहेत. वरिष्ठ जातींमधील या दहा लाख लोकांच्या या सुईच्या नाकाएवढ्या कट्यारीच्या आधारावर अन्य ८ कोटी वरिष्ठवर्णीय टिकून आहेत. आणि त्याच कट्यारीवर तीस कोटी कनिष्ठ जातींचे ओझेदेखील आहे. वरिष्ठवर्णीयांच्या या कट्यारीने साऱ्या राष्ट्रातील जीवात्म्यांना छिन्नविछिन्न केले आहे.

जातीचे जाते क्रूरपणाने फिरत असते. त्यात कनिष्ठ जातीचे कोट्यवधी लोक तर भरडले जातातच पण ते वरिष्ठ

वर्णांनाही भरडते. आणि असली व नकली असे वरिष्ठ वर्णीयांमध्येदेखील दोन तट पाडते. अस्सल उच्चवर्णीय कोट-नेकटाय किंवा शेरवाणी चुडीदार पैजमा वापरतात. हे लोक म्हणजे दिल्ली आणि अन्य राजधान्यांमधील ब्राह्मण, बनिये, कायस्थ इत्यादी वरिष्ठ वर्णीयांतील बडे सरकारी व बिनसरकारी अधिकारी, उद्योगपती वगैरे होत. इतर शहरात आणि खेडेगावात राहणाऱ्या ब्राह्मण, कायस्थ, बनिया इत्यादि त्यांच्या गरीब जातभाईंमध्ये आणि या बड्या लोकांत काहीही साम्य नसते. हे वरिष्ठ जातींचे गरीब लोक धोतर किंवा लेंगा हा जनतेचा पोषाख वापरीत असले तरी गंमत अशी की आपण वरिष्ठ जातीचे आहोत या भ्रामक कल्पनेला कवटाळून बसलेले असतात. त्यांना आपल्या खऱ्या दर्जाचे भान नसते. ही माणसे शरीर धारण करणारे मानव नसतातच. ते परंपरेची केवळ निष्क्रीय सावली बनलेलेअसतात.

बलाढ्य आणि शक्तिशाली रशियन व अमेरिकन लोकदेखील जगातील आपल्यापेक्षा कमजोर व गरीब राष्ट्रांशी मिसळून वागतात. पण आमच्या देशातील वरिष्ठवर्णीय मात्र आपल्या मिजासीत कनिष्ठवर्णीयांशी फटकून वागत असतात. आपल्या सामर्थ्याची व ऐश्वर्याची ऐट गरीब राष्ट्रांच्या सहकार्या-वरच अवलंबून आहे याची जाणीव रशिया-अमेरिकेला आहे. पण आमच्या वरिष्ठवर्णीयांना आपली मिजास स्वतःपेक्षा कनिष्ठवर्णीयांवरच अवलंबून आहे हे काही कळत नाही. कारण ते वरिष्ठपणाच्या परंपरागत कल्पनांचे गुलाम बनले आहेत. पं. नेहरू आणि इतर राजकीय नेते स्वतःला फार मोठे समजतात. देशही त्यांना तसे मानतो. परंतु साऱ्या जगाच्या संदर्भात ही मंडळी म्हणजे एका दुबळ्या राष्ट्रातील उगीच उड्या मारणारी माकडे होत.

पंडित नेहरू ब्राह्मण म्हणजे श्रेष्ठ वर्गातले आहेत. परंतु हा ब्राह्मण श्रेष्ठ आहे असे आपण समजतो तो कोणापेक्षा श्रेष्ठ? भारतातील महार, कापू, मादिगा, चांभार यांच्यापेक्षा श्रेष्ठ. पण तो दुनियेतील रशिया-अमेरिकेसारखी जी श्रेष्ट ब्राह्मण राष्ट्रे आहेत त्यांच्याशी तुलना करता हिंदुस्थानचा हा ब्राह्मण पंतप्रधान हरिजनच आहे. तो सतत हरिजनांप्रमाणे जगभर भीक मागत हिंडतो आहे. कधी गव्हासाठी भीक, तर कधी तांदळासाठी भीक, कधी रशियाकडे भीक मागतो तर कधी अमेरिकेकडे भीक मागतो. आणि या दोन बड्या राष्ट्रांकडून भीक मिळाली नाही, की तो नॉर्वे, स्वीडन, डेन्मार्क यासारख्या छोट्या छोट्या राष्ट्रांकडेही भीक मागायला जातो. यात कोणा एका व्यक्तीचा दोष नाही. साऱ्या देशाचा दोष आहे. देशातील कोट्यवधींचा दलित व शूद्र समाज जोवर व्यक्तित्त्वहीन, स्वाभिमानशून्य व दरिद्री आहे तोवर आंतरराष्ट्रीय जगात या देशाला भंग्याएवढेसुद्धा स्थान मिळणार नाही. आंतरराष्ट्रीय जगात रशिया व अमेरिका यांच्या दृष्टीने हिंदुस्थान शूद्रच आहे.

जातिप्रथा किती व्यापक आहे आणि जातीची चक्की सर्व समाजाला किती निर्दयपणे भरडत असते याची साक्ष मारवाडी समाजातील भेदभावावरून पटते.

ठोक व्यापार करणारे किंवा खाऊनपिऊन सुखी असलेले मारवाडी वैश्य समजले जातात, तर बाकीच्या किरकोळ व्यापाऱ्यांना बनिये म्हटले जाते. पुन्हा बनियामधील पोकळ वरिष्ठपणाचा अहंकार बाळगणारे लोक तेली, जयस्वाल, पंसारी इत्यादी गरीब व्यापाऱ्यांना शूद्रासारखे वागवितात. हे पंसारी जयस्वाल वगैरे जुन्या काळातील फुटकळ व्यापारी आहेत आणि आजही बहुतेक फुटकळ व्यापार त्यांच्याच हाती आहे. जुन्या काळात ठोक व्यापार द्विजांकडे होता, तर फुटकळ व्यापार शूद्रांकडे होता.

आजवरच्या भारतीय इतिहासात ठोक व्यापारी वर्ग आणि पुरोहित वर्ग यांची नेहमी युती असल्याचे दिसते. या दोघांच्या राजकीय, आर्थिक आणि सामाजिक युतीला महाराष्ट्रीय राजकारणात एक अन्वर्थक नाव मिळाले आहे. 'शेटजी-भटजींची युती.' पुरोहित वर्गाला आणि मोठ्या व्यापाऱ्यांना हिंदुधर्मातील सर्वोत्कृष्ठ उच्च जातींचे स्थान आजही दिले गेले आहे. या दोघांची युती ही पैसा व प्रतिष्ठा यांची युती आहे. या युतिद्वारे जातिप्रथेचे जेवढे प्रदर्शन होते तेवढे अन्य कशातूनही होत नसेल. जातिप्रथेविरुद्ध ब्राह्मण समाजाने इतके दिवस पोकळ व खोटे आंदोलन चालविले. आता तसलेच आणखी एक पोकळ आंदोलन शूद्र समाजातील बहुसंख्य जातींच्या नेतृत्वाखाली तामिळनाड, आंध्र, महाराष्ट्र येथे चालू आहे. अनुक्रमे मुदलियार, रेड्डी, व मराठा या तीन शूद्र जाती या तीन प्रांतात बहुसंख्य व शक्तिशाली आहेत. आपापल्या प्रांतातील राजकारणातून ब्राह्मण आदि वरिष्ठ जातींना त्यांनी आज हुसकावून लावल्याचे दिसते. प्रौढ मताधिकारामुळे त्यांना ते शक्य झाले. आज आपापल्या भागात या तीन जाती सर्वसत्ताधीश आहेत. पण समाजातील सर्व कनिष्ठ व दलित जातींना आपल्या सत्तेमधील वाटा देऊन समाज न्यायसंगत, क्रियाशील आणि गतिमान बनवून सामाजिक परिवर्तन घडवून आणण्याचे उद्दिष्ट या जातींपुढे आहे. असे दिसत नाही. केवळ ब्राह्मण आदी वरिष्ठवर्णीयांच्या हातातील अधिकारपदे व त्यांना मिळणारी विकासाची संधी आपणास मिळावी एवढाच त्यांचा प्रयत्न आहे. पण एवढ्याने मूळ प्रश्न सुटत नाही. उलट अन्य कनिष्ठजातींत निराशा व असूया निर्माण होते आणि जातिप्रथा अधिकच मजबूत बनते. ब्राह्मण आदी वरिष्ठ जाती राजकारणातून उखडल्या गेल्या असल्या तरी




आर्थिक क्षेत्रात त्या मजबूत बनत आहेत. राजकारणात घुसण्याचाही या जाती अन्य मार्गांनी हुशारीने आणि लबाडीने प्रयत्न करीत आहेत आणि मुदलियार, रेड्डी व मराठा यांचा जातिविरोध पोकळ व खोटा असल्याने ब्राह्मणांच्या या प्रयत्नांना यश येण्याचीच शक्यता आहे.

अहीर अथवा गवळी किंवा गोपाळ तसेच चांभार या नावांनी ओळखल्या जाणाऱ्या उत्तर भारतातील कनिष्ठ जातींची आणि महार या महाराष्ट्रातील कनिष्ठ जातींची संख्या साऱ्या देशात सर्वात जास्त आहे. गवळी शूद्र आहेत तर चांभार अस्पृश्य आहेत. हिंदुस्थानातील वरिष्ठ समाजाचे जसे ब्राह्मण आणि क्षत्रिय हे दोन मोठे घटक आहेत, तसेच गवळी आणि चांभार हे कनिष्ठ समाजाचे दोन मोठे घटक आहेत. अहीर, चांभार व महार, ब्राह्मण आणि क्षत्रिय प्रत्येकी दोन ते कीन कोटी आहेत. या सर्वांची मिळून एकूण १० ते १२ कोटी संख्या आहे तरीही एकूण लोकसंख्येपैकी तीन-चतुर्थांश म्हणजे ३६ ते ३८ कोटी लोकसंख्या शिल्लक राहतेच. ज्या जातिविरोधी आंदोलनामुळे परिस्थितीत आणि सामाजिक दर्जात परिवर्तन होत नाही ते निष्फळच मानावे लागेल. आपापला दर्जा सुधारण्याचा अहीर, चांभार, ब्राह्मण आणि क्षत्रिय या बृहत्काय जाती अलग अलग प्रयत्न करीत असतात. पण एकूण सर्वच कनिष्ठ समाजाची सुधारणा होण्याच्या दृष्टीने त्यांच्या या प्रयत्नांना फारसा अर्थ नाही. आंध्रातील रेड्डी आणि महाराष्ट्रातील मराठा जातींप्रमाणे उत्तर हिंदुस्थानातील अहिरांनी आणि चांभारांनीदेखील आपापली स्थिती सुधारण्याचे प्रयत्न केले. उत्तर हिंदुस्थानात ब्राह्मणांची संख्या फार मोठी आहे. आणि शिवाय तेथील कनिष्ठवर्णीयांमध्ये संख्येच्या दृष्टीने अहीर आणि चांभार तेवढे शक्तिशालीही नाहीत. त्यामुळे त्यांना या प्रयत्नात यश मिळणे शक्यच नव्हते. तरीदेखील काहीसे सुप्त प्रयत्न चालूच आहेत.

अनेक दृष्टींनी लोकशाही म्हणजे संख्येचे शासन होय. ज्या देशात मानव समाजातील परस्परसंबंधाचे आधार जन्म आणि जुनी परंपरा असतो तेथे सर्वात अधिक संख्या असलेल्या जातीला स्वाभाविकपणेच राजकारणात आणि आर्थिक व्यवस्थेत विशेषाधिकार प्राप्त होतो. लोकसभा आणि विधानसभांच्या निवडणुकांसाठी त्यांच्यातूनच उमेदवार निवडावे लागत असल्यामुळे राजकीय पक्षही त्यांच्याच मागे धावत असतात. व्यापार आणि नोकऱ्या यांतील वाटा मिळवण्यासाठी या जाती सर्वात मोठ्याने आरडाओरड करत असतात. याचे फारच भयंकर परिणाम होतात. देशात शेकडो कनिष्ठ जाती आहेत. त्यांतील एकेकट्या जातीची संख्या कमी आहे पण त्या सर्वांची एकत्रित संख्या एकूण लोकसंख्येत फार मोठी आहे. या जाती एकेकट्या अगतिक असतात. कोणत्याही एकाच मोठ्या जातीची उन्नती साधणे म्हणजे काही जातिप्रथेचा नाश करणे नव्हे. सर्व कनिष्ठ जातींची एकदम उन्नती केल्यानेच जातिप्रथा नष्ट होईल. एकाच जातिसमूहाच्या उन्नतीमुळे जातीजातींचे काही संबंध बदलत असले तरी जातिप्रथेच्या मूळ आधारात काही परिवर्तन होत नाही.

आणखीही एका दृष्टीने कोणत्याही एकाच जातीची - श्रेणीची उन्नती घातक ठरते. कारण उन्नतीच्या या प्रयत्नात कनिष्ठ जातींचे जे लोक उच्चपदावर पोचतात ते प्रस्थापित वरिष्ठ जातींमध्ये मिसळून जाण्याचा प्रयत्न करतात. या प्रक्रियेत कनिष्ठ जाती स्वाभाविकपणे वरिष्ठ जातीचे दुर्गुण तेवढे शिकतात. वरिष्ठ जागी पोचल्यावर कनिष्ठ जातीचे लोक आपल्या स्त्रियांना पडद्यात ठेवू लागतात. वस्तुतः वरिष्ठ जातीत पडदा नसतो. मध्यम व उच्चवर्णीयांत असतो. आज अस्सल उच्चवर्णीय जानवे काढू लागले आहेत, तर वर येण्यासाठी धडपडणाऱ्या कनिष्ठवर्णीय जाती ब्राह्मणांची नक्कल म्हणून आतापर्यंत त्यांना बंदी असलेले जानवे वापरू लागले आहेत. वरिष्ठवर्णीयांच्या दोषांचे अशा प्रकारे अनुकरण करण्याने कनिष्ठवर्णीयांना आपली उन्नती करता येणार नाही किंवा त्यांच्यामध्ये नवा जोशही निर्माण होणार नाही. स्वतःची उन्नती करून घेतलेले कनिष्ठवर्णीय आपल्या जातीपासून अलगच होतात, आणि आपल्या मूळच्या जातिसमाजात आवेश निर्माण करण्याचा प्रयत्न करण्याऐवजी ते स्वतःच वरिष्ठ जातीचे अंग बनण्याचा प्रयत्न करतात. उन्नती करण्याच्या या अत्यंत उथळ प्रयत्नातून एक दुर्दैवी अवस्था उद्भवते. वरिष्ठवर्णीयांचे चांगले गुण आत्मसात करण्याच्या दृष्टीने अथवा स्वतःची पात्रता वाढविण्याच्या दृष्टीने कनिष्ठवर्णीयांच्या उन्नतीच्या या प्रयत्नांचा काहीही उपयोग तर होत नाहीच उलट जातीजातींत विद्वेष आणि कलह मात्र त्यामुळे उद्भवतात.

खरेखुरे जातिविरोधी आंदोलन कसे उभे करता [illegible]इल [illegible] देशापुढील खरा प्रश्न आहे. स्त्रिया, शूद्र, हरिजन, (कनिष्ट [illegible]) मुसलमान आणि आदिवासी या समाजाच्या पाच दलित वर्गांना त्यांच्या योग्यायोग्यतेचा विचार न करता नेतृत्व देणे हे या खऱ्या जातिविरोधी चळवळीचे उद्दिष्ट असले पाहिजे. आज या समाजांची योग्यता कमी आहे हे खरे आहे. शिवाय वरिष्ठ जातीच लायक ठराव्यात अशा सध्याच्या योग्यतेच्या कसोट्या आहेत. जातिव्यवस्थेचा हजारो वर्षांचा अन्याय, त्याविरुद्ध धर्मयुद्ध पुकारूनच दूर करता येईल. उच्चवर्णीय स्त्रियांसकट साऱ्या स्त्रियांची संख्या पददलितांच्या संख्येत धरली तर एकूण लोकसंख्येशी पददलितांचे प्रमाण ९० टक्के पडते. म्हणजे दर दहा भारतीयांतील ९ स्त्रीपुरुष पददलित आहेत. दलित मानवतेच्या त्या अथांग दर्यात ते मूकपणाने डुलक्या घेत असतात. फारच







झाले तर जिवंतपणाचे चिन्ह दर्शविणारे त्यांचे भयभीत विव्हळणे केव्हातरी ऐकू येते. या अफाट जनसमुदायाची आर्थिक आणि राजकीय उन्नती झाली तर आपोआप त्यांच्या क्षीण देहावर काहीसे मांस चढेल हे खरे. पण आर्थिक प्रगती समवेतच अपरिहार्यपणे जातिप्रथेचा नाश करण्याचे प्रयत्न झाले पाहिजेत तरच दलित समाज मनुष्यत्वास प्राप्त होईल; जागृत होईल; स्वाभिमानी बनेल. जातिव्यवस्थेच्या या क्षयरोगापायी ब्राह्मणांसह सर्व वरिष्ठ जातींचेदेखील भयंकर नुकसान झालेले आहे. हे विसरता कामा नये. दलित समाजांना वर उठविण्यासाठी होणाऱ्या धर्मयुद्धात वरिष्ठ जातींचे देखील पुनरुज्जीवन होईल. त्यांच्यातील कपटीपणाची व खोटेपणाची वृत्ती नाहीशी होईल आणि त्यामुळे समाजाची आजची बिघडलेली घडी आणि मूल्ये दुरुस्त होतील.

कनिष्ठ जातींच्या पाचपंचवीस व्यक्तींना मोठे उदार होऊन काही मोठी अधिकारपदे देणे आणि जातिप्रथेचा संपूर्ण विनाश करण्यासाठी धर्मयुद्ध करणे यांत गल्लत करता कामा नये. कनिष्ठ वर्णीयांतील चारदोन लोकांना अधिकारपदे दिल्यामुळे वरिष्ठ जातींची आरडाओरड मात्र सुरू होते आणि कनिष्ठ जाती वस्तुतः आहे तेथेच राहतात. त्यांना आपल्या वास्तव अधिकारासंबंधी जागृत करण्याच्या दृष्टीनेही या उपायाचा उपयोग होत नाही. हजारोंनी असलेल्या उच्चवर्णीयांच्या मिरासदारीत कनिष्ठ जातींच्या पंधरावीस लोकांना सामील करून घेतले तरी ते विशेष ते काय करणार आहेत? कनिष्ठवर्णीयांना शेकडो-हजारोंच्या संख्येने सत्तास्थानावर नेऊन बसविले पाहिजे. आज प्रौढ मतदान हे फसवणुकीचे, भांडणाचे विद्वेषनिर्मितीचे एक साधन बनले आहे. पण कनिष्ठवर्णीयांना संधी देण्याचे धोरण अमलात आणले तर प्रौढ मतदानाला मग धर्मयुद्धाचे स्वरूप येईल. उच्च पदांवर कनिष्ठ जातींतील एखाद दुसरी व्यक्ती पोचली की, लोक डोळे फाडफाडून बघतात. पण वरिष्ठ जातींच्या वीस-पंचवीस माणसांना एकदम उच्च पदे मिळाली तरी ती गोष्ट त्यांना स्वाभाविक वाटते. जातिप्रथेविरुद्ध केवढे मोठे धर्मयुद्ध पुकारण्याची गरज आहे हे या गोष्टीवरून स्पष्ट होईल. अहीर आणि चांभार यांच्यासारख्या महाकाय जाती येनकेनप्रकारेण आपल्याकडे वरिष्ठ वर्णीयांचे लक्ष वेधून घेतातच. म्हणून कनिष्ठ जातींतील कोट्यवधी लोकांकडे आपण होऊन हेतुपुरस्सर लक्ष देणे जरूर आहे.

परंतु येथे एक गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे. कनिष्ठ जातींना विशेष संधी देण्याच्या हेतूने समाजाच्या सर्व क्षेत्रांतील ६० टक्के वरिष्ठपदे दिली तरी तेवढ्याने काम भागणार नाही. या धोरणाचे इष्ट व भरीव परिणाम दिसायचे असतील तर कनिष्ठ व अतिशूद्र समाजातील योग्य, प्रतिभावान व कर्तृत्ववान व्यक्तींचा शोध घेऊन त्यांना शिकवावे लागेल, तयार करावे लागेल, त्यांच्यातून नवे कर्तृत्ववान नेतृत्व निर्माण करावे लागेल. द्विजादि वरिष्ठ जातींनी मनापासून शूद्र जातींना विशेष संधी देण्याच्या धोरणांचा स्वीकार केला तरच त्यांना हे कार्य करता येईल. स्वतः दलित बनून किती उच्चवर्णीय लोक कनिष्ठवर्णीयांना समतेची वागणूक देतात किंवा त्यांची पात्रता वाढविण्याचा प्रयत्न करतात?

मराठा, रेड्डी, नायर, महार, चांभार, कापू इत्यादी कनिष्ठ जाती आज राजकारण, शिक्षण वगैरे क्षेत्रात पुढे येतच आहेत. त्यांना वरिष्ठ अधिकारपदे मिळतच आहेत. मग त्यांना आणखी ६० टक्के जागा देऊन विशेष संधी देण्याची गरज काय असाही प्रश्न विचारला जातो. तथापि या जाती म्हणजे सर्वच कनिष्ठ, शूद्र व अस्पृश्य जाती नाहीत. या विशिष्ट जातींना मोठी अधिकारपदे आणि नोकऱ्या मिळाल्या म्हणजे देशातील इतर शूद्र व अस्पृश्य समाजातील सर्व जातींना अधिकारपदे आणि नोकऱ्या मिळाल्या असे नाही. आज प्रौढ मतदानाचा जमाना आहे. या विशिष्ट कनिष्ठ जाती बलिष्ठ, संघटित व जागृत आहेत. त्या प्रौढ मतदानाचा फायदा घेऊन सत्ता व नोकऱ्या मिळवू शकतात. आज ना उद्या इतर शूद्र कनिष्ठ जाती जागृत व संघटित होतील आणि प्रौढ मतदानाच्या मार्गाने त्याही सत्ता व नोकऱ्यांतील आपला वाटा मागू लागतील. मग त्यांच्यात व इतर कनिष्ठ जातींत संघर्ष सुरू होईल. समाजात एक विचित्र परिस्थिती निर्माण होईल. ती टाळायची असेल तर एका कनिष्ठ जातीने दुसऱ्या कनिष्ठ जातीला मागे सारून स्वतः तेवढे पुढे जायचे बंद झाले पाहिजे. समाजातील सर्वच कनिष्ठ जातींना सारखे अधिकार देऊनच हे बंद करता येईल. सर्वच कनिष्ठ जातींना आपला विकास करण्याची संधी मिळेल असे धोरण स्वीकारले पाहिजे. सर्व कनिष्ठ जातींची प्रगती एकदम एकाच वेळी समानपणे झाली पाहिजे. ६० टक्क्यांच्या विशेष संधीच्या धोरणात ही गोष्ट अभिप्रेत आहे. कोणा एका विशिष्ट जातीची प्रगती त्यात अभिप्रेत नाही.

दलित जातींची आणि समाजाची उन्नती करण्याच्या या धोरणातून मोठ्या प्रमाणात विष निर्माण होण्याची शक्यता जरूर आहे. सावधपणे वागलो तर या विषापासून समाजाला होणारे अपाय टाळता येतील. पण ते विष पूर्णपणे नष्ट करता येणार नाही. या धोरणाचे तत्कालिक अनिष्ट परीणाम पुढीलप्रमाणे होऊ शकतील : १. या धोरणामुळे ब्राह्मण तत्काळ नाराज होतील, पण शूद्र मात्र तत्काळ प्रभावित होणार नाहीत. द्विजांची बुद्धी निश्चितच जागृत असते आणि दुसऱ्याची बुद्धी संभ्रमित करण्याची त्यांच्यापाशी क्षमता देखील असते. म्हणून शूद्रांमध्ये जागृती निर्माण होण्याआधीच या धोरणाचा अंगीकार करणाऱ्यांना बदनाम करण्यात द्विजलोक सफल होतील. २.

अनुक्रमणिका

कनिष्ठ जातींमधील रेड्डी, मराठा, नायर, अहीर आणि चांभार किंवा महार या महाकाय जाती या धोरणाचे फायदे स्वतःच उपटतील आणि अन्य शेकडो कनिष्ठ जातींना त्यापासून वंचित ठेवतील किंवा अखेरीला ब्राह्मणादी वरिष्ठ जातींची जागा रेड्डी, नायर, मराठा अहीर, चांभार, महार इत्यादी कनिष्ठ जाती घेतील. पण जातिप्रथा मात्र कायमच राहील. ३. कनिष्ठ जातींतील स्वार्थी लोक आपली तुंबडी भरण्यासाठी या जातिनीतीचा अनुचित उपयोग करतील; भांडणे व जातीय विद्वेष पसरवतील. ४. शूद्र आणि ब्राह्मण यांच्यात प्रत्येक निवडणुकीच्या वेळी कटु भांडणे आणि मारामाऱ्या होत राहतील. दलित जातींमधील क्षुद्र व स्वार्थी लोक ज्या ब्राह्मण कार्यकर्त्यांवर त्यांचा राग आहे त्यांची हकालपट्टी करण्याचा तर प्रयत्न करतीलच; शिवाय कदाचित सर्वच ब्राह्मणांची हकालपट्टी करण्याचा प्रयत्न करतील अथवा त्यात अपयश आले तर सर्व वातावरण संशय पसरवून कलुषित करतील. ५. आर्थिक प्रश्नांना कमी महत्त्व देण्याचा प्रयत्न होईल; किंवा ते मागे सारले जातील. या संदर्भात केंद्र सरकारच्या मागास जाती आयोगाच्या अहवालातील शिफारसी उदाहरण म्हणून देता येतील. त्या अहवालात दलित जनतेच्या महत्त्वपूर्ण आर्थिक प्रश्नांची उपेक्षा केलेली दिसते. अलाभकर शेतीवरील सारा माफी आणि व्यक्तीच्या उत्पन्नावर व खर्चावर मर्यादा घालणे हे दलितांच्या उन्नतीशी निगडित असे आर्थिक प्रश्न आहेत. पण आयोगाच्या अहवालात या प्रश्नांचा उल्लेख देखील नाही. आयोगाने फक्त दोन ठोस शिफारसी केल्या आहेत. त्यांपैकी एक चांगली आहे आणि दुसरी वाईट. मागासजातींना नोकऱ्यांप्रमाणे संरक्षण देण्याची एक शिफारस आहे. ती चांगली आहे. पण शिक्षणातही असे संरक्षण देण्याची शिफारस आयोगाने केलेली आहे, ती चूक आहे. त्याऐवजी मागासजातींनी शाळा-कॉलेजांची संख्या वाढविण्याची किंवा सध्याच्या शाळा-कॉलेजात दोन किंवा तीन पाळ्या सुरू करण्याची मागणी करावी. पण त्यामुळे मागासेतर जातींमधील एखाद्या मुलाला शाळा कॉलेजात प्रवेश मिळणे अशक्य होईल अशी मागणी मागासवर्गीयांनी करता कामा नये.

जातिविषयक नव्या धोरणातून अशा प्रकारचे विष निर्माण होऊ शकेल आणि सतत सावध राहिले तरी या हलाहलामुळे जातिनीतींच्या मार्गात आडकाठी निर्माण होऊ शकेल. परंतु या विषाच्या भयाने या धोरणाच्या सर्जनात्मक आणि अमृतमय अद्‌भुत शक्तीकडे डोळेझाक करता कामा नये. जातिनीतीतून निर्माण होणाऱ्या जहराची भीती सोडली तरच हिंदुस्थानला आपल्या इतिहासातील सर्वश्रेष्ठ स्फूर्तिदायक क्रांतीचे दर्शन होईल. पूर्वी कधी नव्हे इतकी जनता जिवंत होईल. या नव्या जातिविषयक धोरणामुळे मानवतेलाही एखाद्या नव्या मार्गाचा साक्षात्कार होऊ शकेल. कार्ल मार्क्सने वर्गविनाशाचा सिद्धांत मांडला. पण जातींत परिवर्तित होणाऱ्या वर्गाच्या शक्तीची त्याला जाणीव नव्हती. हिंदुस्थानातील जखडबंद जातींप्रमाणे नव्हे तरी, युरोपात अपरिवर्तनीय असे वर्ग तर आहेतच. नव्या जातिनीतीचा स्वीकार झाला तर जगात प्रथम एकाच वेळी वर्ग आणि जाती यांचा एकत्रित नाश करण्याचा अनुभव मिळू शकेल.

उच्च वर्गातील तरुण वर्गाने आता आपल्या संपूर्ण शक्तिनीशी उठले पाहिजे. जातिविनाशाचे हे नवे धोरण म्हणजे आपल्या स्वार्थावरील संकट आहे असे न मानता जनतेला नवजीवन देणारी एक शक्ती या स्वरूपात या धोरणाकडे त्यांनी पाहिले. कदाचित त्यांच्यावर या प्रयत्नात प्रासंगिक अन्याय होईल. पण तो त्यांनी सहन केला पाहिजे. वरिष्ठ आणि कनिष्ठ जातींत फारच थोडे विवाह होतात. ब्राह्मण आणि अस्पृश्यांमध्ये झालेली लग्ने आढळतात. पण शूद्र आणि हरीजन यांच्यातील विवाह मात्र फारच क्वचित आढळतात. उच्च जातींच्या युवकांनी खालच्या जातींसाठी स्वत: खत बनण्याचा निश्चय केला पाहिजे. तरच जनतारूपी वृक्ष चोहोबाजूंनी फळाफुलांनी पल्लवीत होईल. अपरिमित त्यागाची तयारी दाखवून वरिष्ठ जातींनी केवळ सल्लागार बनावे आणि अधिकारपदे व कार्यकारिण्या कनिष्ठ जातींच्या हाती ठेवाव्या. सर्वच ठिकाणी हे शक्य नसेल, पण शक्य तेथे असे केले पाहिजे. मानवजातीच्या महान भट्टीवर आणि समग्र हिंदी जनतेच्या पौरुषावर तितकीच श्रद्धा ठेवून वरिष्ठ जातींना आपली परंपरा आणि जनतेच्या आकांक्षा यांचा मेळ घालण्यासाठी तयार झाले पाहिजे. त्याबरोबरच कनिष्ठ जातींमधील युवजनांच्या खांद्यावर फार मोठे जबाबदारीचे ओझे पडते. त्यांनी वरिष्ठ जातींच्या सर्वच परंपरा आणि शिष्टाचार यांची नक्कल करू नये. शारीरिक श्रमांना कमी लेखता कामा नये. व्यक्तिगत स्वार्थाच्या आहारी जाऊ नये; त्याचप्रमाणे केवळ विद्वेषाने प्रेरित होऊन वागू नये. ब्राह्मणादी वरिष्ठवर्णीयातील अधिकांश लोकही गरीब व मृतवत आहेत हे त्यांनी विसरू नये. आपण एक पवित्र कार्य हाती घेतले आहे आणि राष्ट्राच्या नेतृत्वाचा भार आपणास वाहावयाचा आहे हेच आता स्त्री, शूद्र, हरिजन, मुसलमान आणि आदिवासी यांचे सर्वोच्च उद्दिष्ट असले पाहिजे.

✠ ✠ ✠



अनुक्रमणिका

# शिक्षणप्रसार गुणवत्ता आणि क्रांतिकारी समाजपरिवर्तन

वसंत पळशीकर
'नवभारत' चे संपादक (निवृत्त)

शिक्षणाचा प्रसार आणि शिक्षणाची गुणवत्ता यांचा संबंध हा आजचा एक अत्यंत ज्वलंत आणि वादग्रस्त मुद्दा आहे. अलीकडच्या काळात शिक्षणाची गुणवत्ता घसरली आहे ही गोष्ट एका बाजूला कोणालाही स्पष्ट दिसू शकेल अशी आहे. शिक्षणाच्या प्रत्येक पातळीवर ती ती पातळी पूर्ण करण्याची तयारी किती, समज किती, भाषेचा वापर करण्याची कुवत किती हे पाहावयास गेले तर एक अती दुःखद चित्र पुढे येते. पण या गोष्टीचा संबंध पुष्कळांकडून शिक्षणाच्या अलीकडील प्रसाराशी जोडला जातो. असा संबंध जोडणारे बहुतेकवेळा उच्चवर्णीयांमधील असतात आणि त्यामुळे केवळ शैक्षणिक परिस्थितीवरील टीकाटिप्पणी म्हणून तिच्याकडे पाहिले जात नाही. बहुजनसमाजाला शिक्षणापासून पुन्हा एकवार दूर ठेवण्याचा यात डाव आहे असे समजून या टीकेचे अतिशय जोरदारपणे खंडन केले जाते. शिक्षणप्रसाराशी शैक्षणिक गुणवत्ता घसरण्याशी कितपत संबंध आहे हे तपासून पाहण्याऐवजी, गुणवत्ता कमी होण्याची कारणे स्पष्ट करण्याऐवजी, शैक्षणिक गुणवत्ता घसरलेली नाहीच अशी भूमिका आग्रहाने मांडली जाते. शिक्षणप्रसाराचा पक्ष उचलून धरण्याचा हा एकमेव मार्ग आहे अशी समजूत इतकी ठाम आढळते की, शैक्षणिक क्षेत्रातील गुणवत्तेशी संबंधित कोणत्याच बाबीशी मोकळेपणाने चर्चा होऊ शकत नाही. दुसरीकडे, ही गोष्टही खरी की, गुणवत्ता घसरण्यास शिक्षणाचा प्रसार जबाबदार आहे, ज्यांना शिक्षण घेण्याची कुवत नाही अशांना शिक्षित करण्याच्या अट्टाहासापोटी गुणवत्ता घसरली आहे, असा समज उच्चवर्णियांच्या ठिकाणी फार मोठ्या प्रमाणात आढळतो. गुणवत्ता उंचवावयाची असेल तर प्रसाराला आळा घातला पाहिजे, वेचक प्रवेश द्यायला पाहिजे हा एकच मार्ग आहे असे या मंडळींमध्ये गृहीत धरले जाते.

या मुद्द्यावरून ही जी अशक्यप्राय कोंडी निर्माण झाली आहे तिच्यात महाराष्ट्रीय समाजातले सामाजिक ताणतणाव प्रतिबिंबित झालेले आपण पाहतो. गेल्या पन्नासपाऊणशे वर्षांचा महाराष्ट्राचा सामाजिक-राजकीय इतिहास हा एका अंगाने ब्राह्मण-ब्राह्मणेतर यांच्यातील संघर्षाचा इतिहास आहे. ब्राह्मणेतरांमध्ये एकेकाळी मराठ्यांखेरीज इतरही गट एकत्र आले होते. पण पुढे ती एकी राहिली नाही. उदाहरणार्थ, सीकेपी, सारस्वत आदि मंडळी आज मराठा समाजाऐवजी ब्राह्मण समाजाच्या जास्त जवळ आहेत. महाराष्ट्रातील/समाजाचा महार जाती हा एक प्रमुख घटक भाग आहे. आता बव्हंशी बौद्ध बनलेला हा समाज आज आपली स्वतंत्र संघटना बांधून आहे, आणि त्यांचे हितसंबंध मराठ्यांशी एकरूप नाहीत. शिक्षणाच्या क्षेत्रातही हितसंबंधियांच्या भिन्नतेतून उत्पन्न झालेले हे ताणतणाव प्रकट झालेले आहेत. आजही ते तीव्र आहेत याचा अर्थ असा की, हितसंबंधांमधील विरोध आज टिकून आहेत, किंवा, याचा असाही अर्थ की, समाजातील भिन्न भिन्न घटकांची वेगवेगळी ऐहिक परिस्थिती विषम आहे, आणि त्यामुळे त्यांचे हितसंबंध वेगळे आहेत.

शिक्षणक्षेत्रातील गुणवत्तेच्या प्रश्नाची सारी चर्चा ही वस्तुतः मतलबी स्वार्थापोटीच उपस्थित केली जाते असा यावरून निष्कर्ष काढणे फार सोपे आहे. असा निष्कर्ष सवंग समाधान देणारा ठरू शकतो. ब्राह्मण व इतर उच्चवर्णीय यांच्यावर मतलबीपणाचा आरोप करून त्यांची टीका निष्प्रभ करणे हे आजही चटकन शक्य आहे, आणि तसे केलेही जाते. पण शैक्षणिक गुणवत्तेचा प्रसार आज इतका गंभीर बनलेला आहे की, वेळीच त्यासंबंधी योग्य ती उपाययोजना न केल्यास समाजस्वास्थ्य धोक्यात येईल हे पुरेसे स्पष्ट झाले आहे. प्रश्नपत्रिका फुटणे, 'संभाव्य प्रश्न' या सोज्वळ नावाखाली शिक्षकांनीच प्रश्नपत्रिका सांगणे, सर्रास कॉपी केली जाणे, कॉपीस शिक्षण/प्राध्यापक/संस्थाचालक यांचे प्रछन्न उघड प्रोत्साहन असणे वा त्याकडे काणाडोळा करण्याचे धोरण अवलंबिले जाणे, उत्तरपत्रिका तपासण्यात वेगवेगळ्या पातळ्यांवर भ्रष्टाचार करणे, निकाल फिरविणे, वस्तुतः पासांची अगदी कमी टक्केवारी असताना ग्रेस मार्क देऊन निकाल फुगविणे, इत्यादी अनेक प्रकार शैक्षणिक गुणवत्तेशी संबंधित आहेत, आणि त्यांनी सारी शिक्षणव्यवस्था व शिक्षण

अनुक्रमणिका






धोक्यात आलेली आहेत. समाजातील भिन्न हितसंबंध आणि पूर्वापार चालत आलेले ताणतणाव यांचा उल्लेख करण्याचे मुख्य कारण हे की, ही पार्श्वभूमी आणि त्यातील तथ्य डावलून या प्रश्नाची योग्य उकल अशक्य आहे हे लक्षात घ्यावे. सामाजिक वास्तवाची दखल घेऊनच आपण शैक्षणिक गुणवत्ता व शिक्षणक्षेत्रातील सचोटी या प्रश्नांचा योग्य प्रकारे विचार करू.

ब्रिटिश राजवट स्थापन झाल्याला दीडशे वर्षांहून थोडा अधिक काळ लोटला आहे. आजच्या शैक्षणिक धोरणांचा, शिक्षण व्यवस्थेचा, शिक्षणाच्या आशयाचा, शैक्षणिक पद्धतींचा उगम ब्रिटिशांच्या राजवटीपासून होतो. नवा भारतीय माणूस घडविण्याचे साधन म्हणून शिक्षणाकडे जसे पाहिले गेले तसेच आपल्या राजवटीसाठी लागणारे वेगवेगळ्या पातळ्यांवरील मदतनीस तयार करण्याचे कारखाने म्हणूनही शिक्षणाकडे पाहिले गेले. नव्या राजवटीत पोटा-पाण्यासाठी चाकरी करावयाची तर त्यासाठी नवे शिक्षण घेतलेले असण्याची गरज होती. नव्या प्रकारचे शिक्षण थोडेफार जरी घेतले तरी चटकन नोकरी लागते ही गोष्ट लक्षात आल्यावर जातिधर्मांची कोणती बंधने आड येऊ न देता ब्राह्मणवर्ग नव्या शिक्षणावर तुटून पडला असे आपल्याला अगदी अव्वल इंग्रजी काळातही अढळते. नवे व्यक्तित्त्व घडविण्यासाठी, ज्ञानाची वृद्धी करण्यासाठी, बौद्धिक सामर्थ्य वाढविण्यासाठी शिक्षण घ्यावयाचे नसून चांगली नोकरी हस्तगत करण्यासाठी शिक्षण घ्यावयाचे हे वळण तेव्हाच अतिशय दृढपणे पडले. ज्ञानाच्या कसोटीवर ठरणाऱ्या शैक्षणिक गुणवत्तेसंबंधी आपल्याकडे कधीच भर नव्हता, त्यासंबंधीचा कधीच आग्रह नव्हता ही गोष्ट लक्षात घेणे आवश्यक आहे. ज्यावेळी शिक्षणाचा प्रसार अत्यल्प होता तेव्हापासूनच अशी परिस्थिती होती. अमूक एक अभ्यासक्रम मुलांकडून चांगला तयार करवून घ्यायचा याचा अर्थ लावलेली पुस्तके परीक्षेच्या दृष्टीने घटवून घ्यावयाची असाच तेव्हापासून लावला गेलेला आहे. त्याचे एक मोठे कारण असे की, स्वायत्त सामाजिक-आर्थिक जीवनाच्या गरजांमधून, प्रवाहांमधून नवे शिक्षण साकार झालेले नव्हते. साम्राज्यसत्तेच्या गरजांपोटी, पूर्वग्रहांतून, साचेबंद कल्पनांमधून ते लादले गेले होते. प्रथमपासूनच ते त्यामुळे पुस्तकी, निर्जीव व असंबद्ध राहिले. नोकरी करण्याच्या दृष्टीने मात्र ते अत्यंत प्रस्तुत होते. दुसरी गोष्ट अशी की, पारतंत्र्याच्या काळात ज्ञानसाधनेला विशेष वाव नव्हता; येथील दुबळ्या, परावलंबी व पराभूत सामाजिक, आर्थिक व राजकीय जीवनाला स्वतंत्र प्रवृत्तीच्या ज्ञानसंपन्न व्यक्तींची गरज नव्हती. ब्रिटिश राजवटीच्या काळात स्वतंत्र व प्रतिभावंत अशा कितिएक व्यक्तींचे योग्य व प्रोत्साहक पर्यावरणाऐवजी खच्चीकरण झाले असे आपण पाहू शकतो. परीक्षा पास होण्यास, फारतर ती चांगल्या प्रकारे उत्तीर्ण होण्यास, त्यामुळे अपरंपार महत्त्व प्राप्त झाले, कारण त्यावर तुमचा अभ्युदय अवलंबून असे. पुढे जशी स्पर्धा वाढली तशी परीक्षा उत्तम गुण मिळवून पास होणे आणि, त्याहीपेक्षा, उच्चतर पातळीवरील परीक्षा पास होण्यासाठी वेगवेगळी तंत्रे अवलंबिण्यात येत गेली. गाईडस्, घोकंपट्टी, 'गेसपेपर्स' इत्यादी.

मुद्दा असा की, पूर्वीच्या काळी शैक्षणिक गुणवत्तेबद्दल समाजाचा अग्रह होता असे नाही. भर होता परीक्षा पार पडण्यावर. पूर्वीचे अभ्यासक्रम ज्या दर्जाचे होते त्या दर्जाचा त्या त्या ज्ञानशाखेतील ज्ञान जिवंत व चिकित्सक स्वरूपात संपादन करण्याच्या उद्दिष्टांशी संबंध फारसा नव्हता. अशा उद्दिष्टांशी असंबद्ध अशा अन्य काही कसोट्यांवरून अभ्यासक्रम आखले जात. उदाहरणार्थ, ब्रिटिश विद्यापीठातले अभ्यासक्रम पुरेसे पातळ करून लावले जात. (कारण ब्रिटिश आदर्श असला तरी येथील विद्यार्थ्यांच्या कुवतीबद्दल राज्यकर्त्यांचे विशेष चांगले मत नव्हते.) व्यावसायिक व वैयक्तिक जीवनात ज्या कामांची जबाबदारी घ्यावी लागत असे, ज्या आव्हानांना तोंड द्यावे लागत असे, त्यांच्या दृष्टीने व्यक्तीस तयार करण्याच्या दृष्टीने या अभ्यासक्रमांची मदत वा उपयुक्तता फारच सीमित होती. तो एक अडथळा होता, आणि तो युक्तीप्रयुक्तीने प्राप्त करण्यास किंवा पार करण्यास काही हरकत नव्हती.

शिक्षित व्यक्तींसाठी उपलब्ध रोजगाराचे मान ही जर कसोटी मानली तर उपलब्ध नोकऱ्याचाकऱ्यांच्या मानाने 'शिक्षणाचा प्रसार' जास्त झालेला आहे अशी परिस्थिती प्रथमच आज निर्माण होत आहे असे नाही. समाजाच्या एकंदर व्यवहारांचा वाढविस्तार कमीजास्त गतीने चढउतार होत होतो, तर शिक्षणाचा प्रसार एका सरळ चढत्या श्रेणीने होतो, आणि त्यामुळे मधूनमधून शिक्षणाचा प्रसार फाजील जादा झालेला आहे असे आढळते. शिक्षणाचा प्रसार नको एवढा झाला आहे हे ठरविण्यासाठी समाजाला त्या त्या क्षणी उपलब्ध असलेल्या नोकऱ्याचाकऱ्यांचे, रोजगाराच्या संधीचे मान तेवढे कसोटी म्हणून वापरणे धोक्याचे व चुकीचे आहे हे यावरून लक्षात

येईल.

लक्षात घ्यावयाची गोष्ट अशी की, शैक्षणिक गुणवत्तेची घसरण आणि उपलब्ध नोकऱ्याचाकऱ्यांच्या तुलनेने जादा संख्येने वेगवेगळ्या पातळ्यांवर शिक्षित व्यक्तींचे उत्पादन ही दोन स्वातंत्र्योत्तर काळातल्या बदलाची वैशिष्ट्ये नसून, ती ब्रिटिशांनी उभारलेल्या विशिष्ट शिक्षणव्यवस्थेचीच अंगभूत वैशिष्ट्ये आहेत. कनिष्ठ नोकरवर्ग तयार करण्यासाठीच मुख्यत्वेकरून शिक्षणव्यवस्थेची निर्मिती झाल्याकारणाने शिक्षणाचा आशय, कस, गुणवत्ता हे प्रश्न मुळातच कधी येथील समाजाच्या गरजांच्या संदर्भात सोडविले गेले नव्हते. त्यामुळे घसरण हा शब्दप्रयोग करणं हेही पुष्कळसे निरर्थकच आहे. तसंच या शिक्षणव्यवस्थेतून निर्माण होणाऱ्या व्यक्ती व्यवसायासाठी प्रामुख्याने सरकारवर अवलंबून राहत आल्या असल्या तर तेही स्वाभाविकच म्हणावयास हवे. कारण स्वतःच्या हिंमतीवर सामाजिक - आर्थिक पुनरुत्थान घडवून आणण्याची कुवत निर्माण करण्यासाठी जर शिक्षणाची आखणी नव्हतीच तर त्या कुवतीचे पदवीधर बाहेर पडतील कसे? साहजिकच, सरकारी धोरणे व उपक्रम यांचा परिणाम म्हणून ज्या कालखंडात नोकऱ्या-चाकऱ्यांची संख्या वाढे ते कालखंड सोडले तर थेट १८८० इतक्या आधीच्या काळापासून शिक्षणाचा प्रसार जादा झाल्याचे कालखंड मधूनमधून येतच राहिले आहेत.

तात्पर्य असे की, शैक्षणिक गुणवत्तेची समस्या ही शंभर टक्के खरी असली तरी तिचा स्वातंत्र्योत्तर काळातील शिक्षणाच्या प्रसाराशी फार संबंध नाही. शिक्षणक्षेत्रातील या दोन्ही प्रश्नांना दीर्घ इतिहास आहे. त्यांची सोडवणूक करावयाची असेल तर शिक्षणासंबंधी नव्याने व स्वतंत्रपणे विचार करण्याची गरज आहे.

आणखीही एक वैशिष्ट्य ध्यानात घेण्यासारखे आहे. शिक्षणप्रसाराची आपली कल्पना व पद्धती अतिशय यांत्रिक स्वरूपाची आहे. शिक्षणाचे उद्दिष्ट्य काय याचा आणि शैक्षणिक संस्थांच्या निर्मितीचा संबंध जोडण्याचा प्रयत्न आपल्या शैक्षणिक इतिहासात आढळत नाही. एक नवा प्रगत मानव घडविण्याचे उद्दिष्ट शिक्षणाने डोळ्यासमोर ठेवले होते असे म्हणावयाचे तर, नव्या शाळा काढल्याने हे उद्दिष्ट कितपत साध्या होणार आहे याचा विचार होत होता असे आढळत नाही. शिकून बाहेर पडलेल्यांना नोकऱ्या मिळाल्या पाहिजेत असा आग्रह असता तर नोकऱ्या मिळण्याची शक्याशक्यता लक्षात घेऊन शिक्षण संस्थांचा वाढविस्तार केला गेला असता, किंवा व्यापक सामाजिक व आर्थिक-औद्योगिक धोरणांशी वाढ-विस्तारांच्या योजनांचा सहसंबंध प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केला गेला असता. असा कोणताच प्रयत्न पद्धतशीरपणे केला गेल्याचे आढळत नाही.

शाळा नावाच्या (आणि अलीकडच्या काळात कॉलेज नावाच्या) संस्था काढणे आणि त्यातून जास्तीतजास्त संख्येने पदवीधर प्रसवणे याला एक स्वयंभू मूल्य प्राप्त झालेले दिसते. अलीकडच्या काही वर्षांमध्ये तर अंतिम परीक्षेस आपल्या संस्थेतील किती मुले बसतात, कशी उत्तीर्ण होतात, गळतीचे प्रमाण किती, याविषयीही प्राथमिक व माध्यमिक शाळांना काही आस्था नव्हती असे दिसते. महाविद्यालयांच्या बाबतीत, महाविद्यालयातला पदवीधर हा जास्त उपद्रवकारक असल्याने, नोकरीची त्याला जास्त तातडी असल्याने, निकालांविषयी इतकी उदासीनता आढळत नाही. पण त्याचा अर्थ एवढाच की, रिझल्ट चांगला लावणं हे कॉलेजांचे व विद्यापीठांचे एक यांत्रिक उद्दिष्ट बनलं. थोडक्यात आपला शिक्षणप्रसार हा बहुतेक वेळा शिक्षणाचा प्रसार नव्हता तर तो संस्थांचा संख्यात्मक वाढविस्तार होता.

या संख्यात्मक वाढविस्ताराचे समर्थन मुख्यतः त्या वाढविस्तारातच आहे, फारतर एकेका विवक्षित शिक्षण-संस्थेच्या संदर्भात त्या संस्थेच्या निकालांच्या प्रमाणावर आहे, अशी भूमिका सार्वत्रिक आढळते. साहजिकच निकाल चांगले लावण्यासाठी विद्यार्थी वापरीत त्या भल्याबुऱ्या तंत्रामध्ये अलीकडच्या काळात संस्थांनी व सरकारनं अनेक प्रकारे भर टाकली.

या आपल्या धोरणांमुळे आपण कोठे येऊन पोचलो आहोत ते पाहण्यासारखे आहे. आपण शाळा-कॉलेज काढून बसलो आहेत. ती चालू राहावयाची तर एका बाजूने विद्यार्थी भरती होत राहिले पाहिजेत. प्राथमिक शाळांच्या पातळीवर आणखीन विशेष परिस्थिती आढळते. इथे तर केवळ पगारापुरती व रिपोर्टपुरती जाग्यावर शाळा असल्यानेही आपल्या समाजाचे पूर्ण समाधान होते. अशी असंख्य खेडी आहेत जेथे शाळा व्यवस्थित भरत नाही. माध्यमिक शाळेच्या पातळीवर भरती करावयास विद्यार्थी मिळण्याची अडचण लोकसंख्या वाढीच्या प्रमाणामुळे सुटलेली आहे. पण अलीकडच्या काळात खालून भरती होणाऱ्या विद्यार्थ्यांचा प्रवाह तुंबून राहण्याची समस्या उग्ररूप धारण करीत आहे. पासांचे






काही एक प्रमाण कायम ठेवून ही समस्या थेट वरपर्यंत एस.एस.सी. पर्यंत सोडविली जात आहे. त्यासाठी अनेक सवलती दिल्या जात आहेतत. महाविद्यालयीन पातळीवर विद्यार्थ्यांची पुरेशा संख्येने भरती ही एक समस्या अनेक महाविद्यालयांच्या बाबतीत निर्माण होत आहे. १८०० रु. खालील उत्पन्नाच्या चालकांच्या विद्यार्थ्यांना फी माफ केल्याने हा प्रश्न सुटत नाही. पुरेसे विद्यार्थी मिळविण्यासाठी अनेक महाविद्यालयांना वेगवेगळ्या क्लृप्त्या योजाव्या लागतात. केवळ महाविद्यालयांनाच नाही तर, वेगवेगळ्या ज्ञान-शाखांवरही ही पाळी आली आहे. परीक्षा पास होणे, वरचा वर्ग मिळवणे सोपे करण्याचे उपाय योजून विद्यार्थ्यांची भरती टिकवून धरली जाते. म्हणजे, शिक्षणप्रसार याचा अर्थ आपल्या लेखी शिक्षण देण्याचा दावा करणाऱ्या संस्थांच्या संख्येत वाढ, त्यांचा विस्तार असाच प्रामुख्याने आला आहे. या अर्थाचा अतिरेक आज झालेला दिसतो हे खरे. पण हा अर्थ जुनाच आहे, ही आपली यांत्रिक कार्यपद्धती जुनीच आहे.

शिक्षणप्रसार म्हणजे शाळा - महाविद्यालय - विद्यापीठे यांच्या चरकातून जन्मास आलेल्या सर्व व्यक्तींना एकदा पिळून काढणे असा अर्थ आपण केला. पुस्तकी, 'लिबरल', सर्व-सामान्य शिक्षण देणाऱ्या संस्थांचाच गुणाकार आंधळेपणाने होत राहिला ही गोष्टही याचीच द्योतक आहे.

आज आपण अशा एका टप्प्यावर येऊन पोचलो आहोत की, सुशिक्षणाच्या कसोट्या स्वतंत्रपणे ठरवून त्यांच्या-वर शाळा-कॉलेजातील पदवीधरांचे मापन केले तर बहुधा शिक्षणसंस्थांचा प्रसार झालाय आणि शिक्षणाचा संकोच झालाय असे फलित हाती येईल.

शिक्षणाच्या प्रसारामुळे गुणवत्ता घसरलीय असेच आपण म्हणत नाही काय, असा प्रश्न कोणी विचारील. त्याचे उत्तर येथे दिले पाहिजे. बहुजन समाजातील मुलांना शिक्षण घेण्याची कुवत नसते पण तरीही अट्टाहासाने त्यांना शिक्षण देण्यासाठी शिक्षणचा प्रसार करण्यामुळे गुणवत्ता जाणूनबुजून कमी केली जात आहे. अपात्र मुलांना प्रवेश देण्याचे धोरण थांबविले पाहिजे, अशी भूमिका सामान्यतः घेतली जाते ती येथे मुळीच अभिप्रेत नाही. ठरावीक वर्षे शाळेत जाऊन शेवटी एक परीक्षा पास होणे म्हणजे शिक्षित होणे असा यांत्रिक अर्थ अव्वल इंग्रजी काळातच पक्का रुजला. कारण नोकरीस पात्र ठरणे, शिक्षित होणे हे समीकरण शिक्षणप्रक्रियेच्या गाभ्याशी होते. या बीजाचाच अटळ विस्तार आजच्या परिस्थितीत झालेला आहे. शिक्षण घेण्यास अपात्र असलेली बहुजन-समाजातली व पूर्वास्पृश्य, आदिवासी इत्यादी जातिजमातीतली मुले शाळा कॉलेजांमध्ये गर्दी करीत आहेत म्हणून आजची अवस्था आलेली नाही. शाळा-कॉलेजच्या चाकोरीतून काढून विद्यार्थ्यांकडून परीक्षा उतरवून घेणे, त्याला एक प्रमाणपत्र देवविणे म्हणजे शिक्षण ही समज शिक्षणव्यवस्थेने इतकी दृढपणे शिक्षकांमध्ये, समाजामध्ये व विद्यार्थ्यांमध्ये रुजविली आहे की, सगळी शिक्षणव्यवस्था हळूहळू त्या एका उद्दिष्टासाठी राबत असल्याचे दृश्य आपण पाहत आहोत. आणि वेगवेगळ्या पातळ्यांवरील प्रमाणपत्रधारकांचे संख्यात्मक उत्पादन तेवढे जर पाहिले तर सर्व काही उत्तम चालले आहे असेच म्हणावे लागेल.

तुम्ही म्हणत असाल ते जर खरं असेल तर बहुजनसमाज याविरुद्ध खवळून उठत का नाही, उलट तो याच प्रकारच्या विस्तारासाठी अधिक आग्रह का धरतो, असा प्रश्न उपस्थित होईल. कारण वस्तुस्थिती अशी असेल तर शिक्षणाच्या नावाने बहुजनसमाजाची प्रचंड फसवणूक चालली आहे, इतकेच नव्हे तर पिळवणूक चालली आहे असे म्हणावे लागेल.

आपण असे पाहिले की, प्रथमपासूनच शिक्षण हे नोकरी मिळविणयाचे साधन मानले गेले. शिक्षणाला स्वातंत्र्यपूर्व काळात आणखीही एक अंग होते. ब्रिटिश राजवटीच्या काळात अंतिम राजकीय सत्ता ब्रिटिशांच्या हाती होती. पण त्या खालोखाल राजकीय सत्ता शिकलेल्या व सरकारी नोकरीचाकरीत असलेल्या वर्गाच्या हाती होती. हे बहुतेक सर्व उच्चवर्णीय होते. या वर्गानी चालविलेल्या पिळवणुकीची, त्यांच्या हातात असलेल्या राजकीय सत्तेची जाणीव महात्मा फुल्यांनी आपल्या सत्यशोधन समाजाच्या द्वारा तीव्र स्वरूपात निर्माण केली. शिक्षण आणि प्रशासकीय नोकऱ्यांवरील पकड यामध्ये त्यांच्या सत्तेचे रहस्य आहे हे ओळखण्यास फार बुद्धिमत्तेची आवश्यकता नव्हती, इतकी ही गोष्ट स्पष्ट होती. शिक्षणाच्या आधारे ज्या पांढरपेशी व्यवसायांमध्ये प्रवेश मिळत होता त्या सर्व व्यवसायांवरही उच्चवर्णियांची पकड जमली होती. म्हणून शिक्षण हे नोकरी मिळवण्याचे एक अत्यंत महत्त्वाचे व प्रमुख साधन मानले गेले. तसेच ते उच्चवर्णियांच्या हातातील राजकीय सत्ता आपल्या हाती खेचून घेण्याचे साधन म्हणून तेवढेच महत्त्वाचे मानले गेले.

अनुक्रमणिका

इतके करूनही बहुजन समाजात शिक्षणाचा प्रसार, विशेषतः माध्यमिक व उच्च शिक्षणाचा प्रसार सुरू होण्यास बराच कालावधी लागला. स्वातंत्र्यपूर्व काळात ब्रिटिश सरकारचे शिक्षणविषयक धोरण बहुजनसमाजास शिक्षित करण्याच्या दृष्टीने फारसे क्रियाशील नव्हते. माध्यमिक व उच्च शिक्षणाच्या स्तरावर खाजगी संस्थांच्या अभिक्रमशीलतेवर गोष्टी सोडलेल्या होत्या. राजकीय-सामाजिक सत्तेचे लक्ष्य डोळ्यासमोर ठेवून ब्राह्मणेतर समाजातील मुले शिकून तयार करण्याच्या कामास पहिली मोठी चालना शाहू महाराजांनी दिली, आणि त्यांच्यापासून स्फूर्ती घेऊन मग इतरांनी हे काम जागजागी हाती घेतले. पश्चिम महाराष्ट्रापुरता तरी त्यातला सर्वात व्यापक आणि पद्धतशीर प्रयत्न कर्मवीर भाऊराव पाटील यांचा म्हणावा लागेल. पण त्यांचा प्रतिमाबंध (मॉडेल) पुढे ठेवून इतरही व्यक्तींनी संस्था स्थापन करून शिक्षणसंस्थांचे जाळे उभे केले. ही घडामोड विशेषतः १९३० सालानंतरची आणि विशेषतः १९४७ नंतरची आहे.

प्रारंभीच्या काळात ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या धोरणामुळे आर्थिक-औद्योगिक विकास हा रोखूनच धरल्यासारखा होता. त्यामुळे नव्या प्रकारचे पांढरपेशे व्यवसाय सोडले तर बहुतेक नोकऱ्याचाकऱ्या सरकारच्या प्रशासन यंत्रणेतच उपलब्ध होत्या, ही यंत्रणा दीर्घकाल उच्चवर्णीयांच्या हाती होती. अव्वल इंग्रजीच्या काळात नव्या शिक्षणाकडे हाच वर्ग तेवढा वळला आणि त्यामुळे त्या वर्गाची मक्तेदारी स्थापन झाली. पुढे, राष्ट्रीय चळवळ आकारास आली तेव्हा तिला काटशह देण्यासाठी समाजातील इतर गटांना, विभागांना आपल्या बाजूस वश करून घेण्याच्या धोरणाचा एक भाग म्हणून ब्रिटिशांनी प्रशासन यंत्रणेतील नोकऱ्यांच्या बाबतीत विभागवार कोटा ठरवून देण्याचे धोरण अंगीकारले. याचा फायदा पश्चिम महाराष्ट्रात ब्राह्मणेतर पक्षास, त्यातही मराठ्यांना मिळाला. असे झाले तरी, एकंदरीतच नोकऱ्याचाकऱ्यांची संख्या कमी होती, आणि सरकारी व्यवहाराचा वाढविस्तार न करण्याचेच एकंदर धोरण होते. दीर्घकाळ आधीपासून नोकऱ्याचाकऱ्यांच्या क्षेत्रात मारलेली आघाडी, राजकीय चळवळींचे नेतृत्व, लोकनियुक्त प्रतिनिधींच्या हाती सत्ता सोपविण्याचे तत्त्व मान्य झाल्यावर काही प्रमाणात हाती आलेली राजकीय सत्ता, प्रशासन यंत्रणेवरील पकड यामुळे उच्चवर्णीयांच्या मक्तेदारीला तडे गेले असले तरी, दीर्घकाळ बहुजन समाजाच्या आकांक्षा अतृप्तच राहिल्या. त्यांच्या मनात त्यामुळे असूयेची, कटुत्वाची, शत्रुत्वाची भावना टिकून राहिली. या सबंध काळात उच्चवर्णीयांचे वागणेही संकुचित व अदूरदृष्टीचे राहिले. ब्राह्मणेतर मंडळींनी प्रामुख्याने ब्राह्मणेतरांसाठी चालविलेल्या शिक्षण-संस्थाही तुरळक होत्या.

उच्चवर्णीयांनी समाजातल्या इतर विभागांच्या आकांक्षा समजून घेतल्या नाहीत. म. फुल्यांच्या सत्यशोधक समाजाची, त्यांच्या कार्याची, आणि त्यामागील भूमिकेची एक तर दखल घेतली गेली नाही. आणि दखल घेतली तेव्हा जास्त करून उपहासात्मकच तिचे स्वरूप होते. उच्चवर्णीयांनी ब्राह्मणेतरांना आपले प्रतिस्पर्धी, स्वहितसंबंधाच्या आड येणारे मानले आणि ते आपल्या बरोबरीने येण्यास जितके अडथळे उपस्थित करता येतील तितके केले. हा जो दुरावा प्रस्थापित झाला त्यात ब्राह्मणेतर चळवळीने भर पडली, तो अधिक पक्का झाला. त्यापुढे १९३० नंतरच्या काळात मराठे मंडळी मोठ्या प्रमाणावर काँग्रेसला येऊन मिळाली. तरी राजकारणाच्या बाहेरच्या सत्तेच्या क्षेत्रातील स्पर्धा संपुष्टात आली नव्हतीच. काँग्रेसमध्येही राजकीय नेतृत्व उच्चवर्णीयांच्या हाती होते.

स्वातंत्र्योत्तर काळात प्रौढ मताधिकारामुळे संख्याबळाला महत्त्व आले. आता बहुजनसमाजाचा अनुनय वाढला, त्यांना जाणीवपूर्वक सत्तेचा वाटा देण्यात येऊ लागला. हा बदललेला राजकीय-सामाजिक संदर्भ, आणि आर्थिक-औद्योगिक विकासाच्या दिशेने सुरू झालेली योजनाबद्ध वाटचाल यामुळे सत्तेच्या क्षेत्रातील उच्चवर्णीयांची मिरासदारी मोडून काढण्याची परिणामकारक संधी उपलब्ध झाली. तरीपण अद्यापही राजकीय सत्तेवर स्वातंत्र्य पूर्वकाळातील ज्येष्ठ उच्चवर्णीय मंडळींची पकड होती. आपल्या संख्याबळास अनुसरून सत्ता आपल्या हातात घेण्याची एक प्रकारची उत्कंठा मराठा नेत्यांच्या ठिकाणी उत्पन्न झाली होती, पण तिची तत्काल पूर्तता न झाल्याने कडवटपणात, शत्रुत्वाच्या भावनेने भर पडली असावी असेही मागे वळून पाहता स्पष्ट दिसते. शेतकरी कामगार पक्षाच्या निर्मितीत या भावनेचा बराच भाग असावा.

या सर्वाचा परिणाम असा झाला की, मराठा समाजातील धुरीणांचे सत्तेची सर्व ठाणी काबीज करण्यांवर अतिरिक्त प्रमाणात लक्ष केंद्रित झाले. लोकशाहीची राजकीय प्रक्रिया, शिक्षण ही त्याची प्रमुख साधने बनली. लोकशाहीचा, स्वराज्याचा, शिक्षणाचा व्यापक आशय आणि त्यांची उच्चतर उद्दिष्टे तसेच या क्षेत्रात सांभाळावयाची पथ्ये यांची खूप व

सार्वत्रिक उपेक्षा झाली.

संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीनंतर सर्वार्थाने अनुकूल परिस्थिती निर्माण झाली. कॉंग्रेसमध्ये राजकीय सत्ता मराठा नेतृत्वाच्या हाती आली. या सत्तेचा वापर करून सत्तापदे, नोकऱ्याचाकऱ्या आपल्या लोकांना योग्य प्रमाणात देण्याचा मार्ग मोकळा झाला. दुसऱ्या बाजूला पुरेशा प्रमाणात शिक्षित पदवीधर निर्माण होण्याच्या दृष्टीने माध्यमिक व उच्च शिक्षणसंस्थांची उभारणी होण्यास सुरुवात झाली होती. नियोजनपर आर्थिक-औद्योगिक विकासास गती आली होती. सरकारी, निमसरकारी, सहकारी संस्थांचा पसारा वेगाने विस्तार पावत होता. राज्य अखेरीस आपल्या हाती आल्याची अनुभूती उत्साहवर्धक होती तशीच ती थोडी धुंदी आणणारी होती. धुंदीने येणारा आंधळेपणा, संकुचितपणा या नंतरच्या काळातील राज्यकर्त्यांच्या व्यवहारात आढळतो. राजकीय नेतृत्व, शेती, कारखानदारी, व्यापार, सहकारी संस्था, शिक्षण अशा अनेक क्षेत्रात बहुजनसमाजाने आपले कर्तृत्व सिद्ध केले. या सर्व क्षेत्रात मोठ्या प्रमाणावर रोजगार निर्माण होत होता. त्यातला काही पांढरपेशा नोकऱ्यांच्या स्वरूपात होता. राजकीय सत्ता हातात असल्याच्या कारणाने यापैकी ज्या नोकऱ्या-चाकऱ्या, जे व्यवसाय व धंदे, जी पदे यांचे वाटप आपल्या हाती आले आहे त्यांचे वाटप करताना आपल्या 'समाजा'तील (म्हणजे प्रथम नातेवाईक, नंतर मित्र, नंतर जात, नंतर इतर अशाही क्रमाने पुष्कळ वेळा) लोकांना लावून घेणे काहीसे पद्धतशीरपणे चालू झाले. त्याचे प्रमाण उत्तरोत्तर वाढतच गेले.

हे एक क्रांतिकारक सामाजिक परिवर्तन होते आणि त्यातून सामाजिक न्यायही महत्त्वाच्या अर्थी साध्य होत होता. म्हणून हे जे घडले त्याचे सरसकट खंडन करणे चुकीचे होईल. तसा येथे हेतूही नाही. या प्रक्रियेच्या दोन विशेष अंगांकडे लक्ष वेधण्यासाठी येथवर ही प्रक्रिया विस्ताराने वर्णिली.

या आर्थिक-औद्योगिक-प्रशासकीय वाढविस्तारातून निर्माण होणाऱ्या पांढरपेशा नोकऱ्याचाकऱ्यांसाठी एक ना एक पातळीवरच्या प्रमाणपत्राची अट असे. ही अट पुरी करणारे वेगवेगळ्या पातळ्यांवरचे पदवीधर निर्माण करणाऱ्या शिक्षणसंस्था काढण्याच्या कार्यक्रमास आता विशेष गती मिळाली. ज्ञानसंपादन हे उद्दिष्ट मुळातच आपल्या शिक्षण व्यवस्थेत क्षीण होते. ते आता पार मागे पडले. प्रमाणपत्र मिळवून देणाऱ्या कमिशन एजंट्सचे स्वरूप शिक्षणसंस्थांना येऊ लागले. हे एक विशेष अंग.

स्वातंत्र्योत्तर काळात सर्व क्षेत्रात विकास करावयाचा, हे एक स्वयंभू उद्दिष्ट ठरले. संख्यात्मक वाढविस्तारावर अतिशय भर दिला गेला कारण या पद्धतीचा विकास मोजणे सोपे असते. शिक्षण हे स्वातंत्र्यपूर्व काळापासूनच एक महत्त्वाचे अंग मानलेले होते. ब्रिटिश राज्यकर्त्यांवर एक सतत केला जाणारा आरोपच मुळी असा होता की, शिक्षणाची त्यांनी हेळसांड केली. उच्चवर्णीयांनी बहुजनसमाजापर्यंत शिक्षण पोचविण्याच्या बाबतीत उदासीनता दाखविली, अडचणी उपस्थित केल्या. हा आरोप असाच दीर्घकाळ केला जात होता, व त्यात पुष्कळ तथ्य होते. स्वातंत्र्योत्तर काळात शिक्षणाचा प्रसार हे एक स्वतंत्र उद्दिष्ट म्हणून स्वीकारले गेले. व्यवहारात त्याचा संख्यात्मक अन्वयार्थच लावला गेला. राजकीय सत्तेवर पकड जमल्यानंतरच्या काळात या सत्तेचा वापर करून शिक्षणसंस्था काढण्याची एक हातघाई सुरू झाल्याचे दृश्य आज पुष्कळ वर्षे आपण पाहत आहोत. यात अनेक गोष्टी साधल्या जात होत्या. आर्थिक साधनसंपत्ती आपल्या भागात खेचून आणल्याचे समाधान होते. एक स्थानिक सत्ताकेंद्र उभारले जात होते, अनेक लोकांना रोजगार पुरविण्याचे साधन हाती आल्याने सत्ता वाढत होती, शिक्षणाची गंगा खेड्यात नेल्याची कृतकृत्यता होती, उच्चवर्णीयांवर मात केल्याचे समाधान होते, इ.

शिक्षणाच्या क्षेत्रातल्या आजच्या अवस्थेने बहुजन-समाज अस्वस्थ न होण्याचे कारण आता स्पष्ट व्हावे. ती कारणे अशी सांगता येतील. १. उच्चवर्णीयांशी चाललेल्या सामाजिक, आर्थिक व राजकीय प्रभुत्वासाठीच्या संघर्षातले एक अत्यंत प्रभावी हत्यार म्हणून शिक्षणसंस्थांकडे पाहणे आजही त्याला अर्थपूर्ण वाटते. २. पांढरपेशा नोकऱ्यांसाठी लागणारी प्रमाणपत्रे देणाऱ्या संस्था याच दृष्टीने प्राधान्येकरून या संस्थेकडे पाहिले जाते व ते काम या संस्था पार पाडीत असल्याने त्यांच्या संदर्भात गुणवत्तेवरून केली जाणारी तक्रार त्याला उमगत नाही. ३. आपल्या मुलांना पांढरपेशा नोकऱ्या मिळाल्या आहेत, मिळत आहेत, ती आता पांढरपेशा व्यवसाय करून उत्कर्ष साधत आहेत ते शिक्षणसंस्थांच्या अस्तित्वा-मुळेच, ही बहुजनसमाजाची अनुभूती आहे. या शिक्षणसंस्थांचा पसारा वाढविल्यानेच आपल्या मुलांना नोकऱ्याचाकऱ्या जास्त प्रमाणात मिळू शकतील, किंबहुना, आपली मुले बेकार रहात असली तर, त्यांना सहजपणे चांगल्या श्रेणीची पदवी मिळण्याची व्यवस्था करणे हा त्यावर उपाय आहे, कारण








म्हणजे ती उच्चवर्णीयांशी यशस्वीपणे स्पर्धा करू शकतील, असे या समाजाला जेव्हा सांगितले जाते तेव्हा ते त्याला चटकन पटते.

म्हणून शिक्षणक्षेत्रातल्या आजच्या अवस्थेबद्दल विद्यार्थी व पालक यांपैकी कोणाची तक्रार नाही. पांढरपेशा नोकऱ्या हे बहुसंख्य विद्यार्थी-पालकांचे एकमेव उद्दिष्ट असते, आणि नोकरी मिळण्यासाठी गुणवत्तेपेक्षाही प्रमाणपत्रांचे कागदी घोडे नाचविता येणे महत्त्वाचे असते. हे कागदी घोडे हस्तगत करण्यास आजचे शिक्षण त्याला सर्वतोपरी मदत करते. तेव्हा त्याची तक्रार असत नाही.

गुणवत्तेचा मुद्दा उपस्थित करून शिक्षणप्रसाराविषयी आक्षेप उपस्थित केले गेले की, त्यामागे उच्चवर्णीयांचा वेगळाच डाव दिसतो. याचेही कारण हेच. आपल्या मुलाबाळांनी पांढरपेशा व्यवसाय केलेले उच्चवर्णीयांना पाहवत नाही असे त्यांना वाटते.

सामाजिक वास्तवाची दखल घेण्याची गोष्ट आपण सुरुवातीसच केली होती. गेल्या २५/३० वर्षात जो शिक्षण-प्रसार झाला त्याने जे व्यापक सामाजिक परिवर्तन घडून आले ते आवश्यक व स्वागतार्ह होते. सामाजिक न्याय व समता प्रस्थापनेच्या दृष्टीने त्यातून पाऊल पुढे पडले आहे, आणि या सर्व प्रक्रियेत बहुजनसमाजाच्या धुरीणांनी गावोगाव उभ्या केलेल्या शिक्षणसंस्थांच्या जाळ्याने एक महत्त्वाची कामगिरी बजावली आहे, हे जाणणे, मोकळेपणी त्याचा स्वीकार करणे हा सामाजिक वास्तवाची दखल घेण्याचा अर्थ आहे. सामाजिक, आर्थिक व राजकीय सत्तेचे वाटप विषम झालेले होते; या विषमतेवर प्रहार करण्याच्या कामी उच्चवर्णीयांनी विशेष पुढाकार घेतला नाही, उलट शिक्षणाचे लोण शहराबाहेर पोचण्याचे काम न करून विषम परिस्थिती चालू राहण्यासच अकारणात्मक हातभार लावला, हाती आलेली राजकीय सत्ता वापरून मोठ्या प्रमाणावर शैक्षणिक संस्था उभारून, त्याद्वारा शिक्षित व्यक्तींचे मोठ्या संख्येने उत्पादन करून या विषमतेवर बहुजनसमाजाने यशस्वीपणे प्रहार केला, याचे भान राहणे म्हणजे सामाजिक वास्तवाची दखल घेणे.

सामाजिक परिवर्तनाच्या या ऐतिहासिक प्रक्रियेत शैक्षणिक गुणवत्तेचा बळी गेला अशी फार तक्रार करणेही उचित नाही. कारण याच प्रकारच्या शिक्षण विस्ताराद्वारा उच्चवर्णीयांच्या मुलांना नोकऱ्याचाकऱ्या मिळत होत्या त्यावेळी त्यांनी गुणवत्तेचा मुद्दा कधी लावून धरला नाही.

आजच्या संदर्भात प्रश्न उपस्थित केला पाहिजे तो असा की, सामाजिक परिवर्तनाने यापुढची जी सिद्धी गाठावयाची आहे ती गाठण्याच्या दृष्टीने याच प्रकारच्या शिक्षणप्रसाराचा उपयोग होणार आहे का? गेल्या २५/३० वर्षातील परिवर्तनाने सामाजिक संरचनेत व परिस्थितीत घडून आलेल्या बदलांची दखल या प्रकारच्या शिक्षणप्रसारात घेतली जात आहे का? गुणवत्तेचा प्रश्नही वांछित अशा सामाजिक परिवर्तनाच्या संदर्भातच उपस्थित केला पाहिजे.

पण सामाजिक वास्तवाची दखल घ्यायची म्हणजे आणखीही काही गोष्टी लक्षात घ्यावयाच्या. समाजातील सर्व घटकांचा विचार करून क्वचितच आपले वागणे पूर्वी घडलेले आहे किंवा आज घडत आहे. स्वहितसंबंधीही जातीय वा जमातीय व्याख्या करण्याची आपली सवय अद्यापि टिकून आहे. सगळ्या समाजाच्या उत्कर्षाचा, वाटचालीचा, समाज-स्वास्थ्याचा विचार करण्याची जबाबदारी परस्पर कोणीतरी पार पाडत आहे, आपण फक्त आपल्या गुणवत्तेपुरते, जातिजमातीपुरते पाहिले तरी पुरे, अशी आपली दृढ समजूत दिसते.

मराठा समाजाच्या धुरीणांच्या हातून या प्रकारचा संकुचित विचार पुष्कळ घडला आहे व घडत आहे. 'ब्राह्मणशाही'चे वर्चस्व मोडून काढणे हे एक आवश्यक व इष्ट असे उद्दिष्ट होते यात शंका नाही. समाजशकट चालविण्याची जबाबदारी शिरावर येऊन पडली नव्हती त्यावेळी हे स्वहितसंबंधात्मक मर्यादित उद्दिष्ट तेवढे डोळ्यासमोर ठेवून वागण्यात समाजाचे फारसे अहित घडत नव्हते. बहुजन समाजाच्या वतीने केलेले समाजकारण, राजकारण यांना एक संकुचितता त्यामुळे येत असली तरी त्याचे परिणाम सीमित राहत होते.

राज्य हाती आल्यावर काही अधिक जबाबदाऱ्या मराठा समाजाच्या धुरीणांवर येऊन पडल्या. राजसत्तेचा वापर करून त्यांनी सत्तेचा समतोल प्रस्थापित करण्याचे धोरण अंगीकारले तर त्यात गैर काही नव्हते. पण साऱ्या समाजाचे हित, व्यापक उद्दिष्टे यांच्याकडेही लक्ष देऊन धोरण आखण्याची गरज होती. आपल्या धोरणांनी व कृतींनी घडून आलेल्या सामाजिक परिवर्तनाचीही दखल घेण्याची व त्यानुसार जुन्या उद्दिष्टांमध्ये, युद्धनीती (स्ट्रॅटजी) मध्ये योग्य ते बदल करण्याची गरज होती.

नवीन समाज निर्माण करण्याचे जे ध्येय आपण समोर

ठेवले आहे त्या समाजाला योग्य असे नागरिकत्वाचे शिक्षण सर्वांना देण्याचे उद्दिष्ट आपल्या शिक्षणव्यवस्थेसमोर असावयास हवे. नोकऱ्याचाकऱ्या, त्याही पांढरपेशा सरकारी व (निमसरकारी) नोकऱ्याचाकऱ्या हस्तगत करण्यास आवश्यक असणारी प्रमाणपत्रे संपादन करण्याची यंत्रणा म्हणून शिक्षणव्यवस्थेकडे पाहणे हा अतिसंकुचित दृष्टिकोन नव्या संदर्भात सांडावयास हवा होता. पण दुर्दैवाने असे घडले नाही. शिक्षणप्रसाराचे धोरण राबविताना उच्चवर्णीयांबरोबर संघर्षालाच जास्त प्राधान्य दिले गेले. परिणामी या काळात उच्चशिक्षणावर सापेक्षतः अतिरिक्त भर दिला गेला असे आपल्याला आढळते. त्याहीपेक्षा या चुरशीपोटी कसेही करून पदवी पदरात टाकता येण्यावर संस्थाचालक व सतत सत्ताधारी यांचा आग्रह वाढला.

शिक्षणप्रसाराच्या द्वारा सामाजिक परिवर्तनाच्या क्षेत्रातील एक इष्ट उद्दिष्ट पुष्कळ अंशी साध्य झाले असले तरी त्याचबरोबर काही अत्यंत अहितकारक अशा प्रवृतींचा अतिरेक झाला आहे हे मोकळेपणी स्वीकारण्याची वेळ आली आहे. या प्रवृतींचे निर्मूलन करावयाचे म्हणजे शिक्षणप्रसारास आळा घालावयाचा नसून शिक्षणप्रसाराची उद्दिष्टे व तो घडवून आणावयाचे मार्ग यासंबंधी फेरविचार करावयाचा व नवे धोरण आखावयाचे. सामाजिक न्याय व समता प्रस्थापित करण्यासाठीही अशा फेरविचाराची व मूलग्राही कृतीची आवश्यकता आहे. लेखाच्या या पुढच्या भागात त्याचा विचार केला आहे.

## II

असा विचार करण्याआधी काही शब्दांच्या अर्थाविषयी फेरविचार केला पाहिजे. शिक्षणप्रसार, बहुजनसमाज, गुणवत्ता हे ते शब्द होते.

शिक्षणाचा प्रसार याचा अर्थ वेगवेगळ्या पातळ्यांवर प्रमाणपत्र संपादन करून बाहेर पडणाऱ्या व्यक्तींच्या संख्येतील वाढ असा घेणे पुरेसे मानले तर प्रमाणपत्र धारण करणाऱ्यांना प्रत्यक्षात फारसे काही ज्ञान नसले, त्यांच्या ठिकाणी कौशल्य नसले तरी चालते. भारतात नवे शिक्षण सुरू झाल्यापासून प्राधान्येकरून शिक्षणप्रसाराचा असाच अर्थ लावला गेला. त्याने दीर्घकाळ फार घोटाळे झाले नाहीत. याचे कारण असे की, आर्थिक-औद्योगिक विकासाला गती येण्यापूर्वी सर्वसाधारण नोकऱ्याचाकऱ्यांमध्ये ज्या प्रकारची कामे कारकुनांना करावी लागत त्यांच्यासाठी लिहिण्यावाचण्याचे प्राथमिक कौशल्य बऱ्यापैकी जवळ असलेले पुरत असे. बऱ्याच ठिकाणी नोकरीला लागल्यानंतर अंगच्या हुशारीने माणूस आपले काम थोडक्या काळात शिकून घेऊ शकत असे.

आर्थिक- औद्योगिक विकासाला गती आल्यानंतरच्या काळात व स्वातंत्र्य मिळाल्यानंतर कारकुनी कौशल्यापेक्षा अधिक ज्ञान व कौशल्य यांची गरज असलेले अनेक नवे व्यवसाय मोठ्या संख्येने निर्माण झाले. शिक्षकाचा पेशा हा देखील असा अधिक ज्ञान व कौशल्य आवश्यक असलेला पेशा आहे. दिसावयास केवळ कारकुनी काम, पण त्या कामातही काही तांत्रिक स्वरूपाच्या ज्ञानाची प्रगल्भ समज असण्याची, निर्णय घेता येण्याची कुवत असल्याची गरज असते अशाही जागांची संख्या आर्थिक-औद्योगिक व संलग्न क्षेत्रामध्ये पुष्कळ वाढली आहे. एकीकडे परिस्थिती अशी बदलली तर दुसरीकडे प्रमाणपत्रावर भर देण्याच्या प्रवृत्तीची स्वाभाविक परिणती उत्तरोत्तर शैक्षणिक अधोगतीमध्ये होत गेली. मराठी, इंग्रजी भाषांमधील प्राथमिक स्वरूपाचे लेखनवाचन कौशल्यही जोपासले जाईनासे झाले आहे.

ही उपेक्षा केवळ ग्रामीण भागातील बहुजनसमाजाच्या शाळांमधून आढळून येते असे नाही. म्हणूनच, या ऱ्हासाचा संबंध बहुजनसमाजात झालेल्या शिक्षणप्रसाराशी सरळसरळ जोडता येत नाही अशी भूमिका आग्रहाने प्रथमपासून मांडली आहे. अपवादभूत शाळा सोडल्या (ज्या शहरात असतील वा ग्रामीण भागात) तर हा ऱ्हास सर्व थरातील शाळांमध्ये आढळतो. या ऱ्हासाचे प्रमाण त्या त्या शाळेतील शिक्षकवर्ग आणि शाळेतले शैक्षणिक वातावरण यांवर अवलंबून राहतो.

शिक्षणाचा प्रसार म्हणजे ज्ञानाचा व कौशल्यांचा प्रसार असा अर्थ कागदोपत्री आजही आहे. पण अंदरकी बात अगदी वेगळी आहे हे सर्वांना माहीत आहे. पेपर कसे काढले जातात, पेपर कसे तपासले जातात, निकाल कसे लावले जातात इत्यादी गोष्टींच्या खोलात गेल्यास आपण आपली किती घोर आत्मवंचना करून घेत आहोत ते जाणून घेणे अगदी सहज शक्य आहे. अशी वस्तुनिष्ठ परीक्षा करावयास आज बहुजनसमाजाच्या धुरीणांचा व संस्थाचालकांचा सर्वात मोठा विरोध आहे. शिक्षणसंस्थांच्या वाढविस्तारावर गदा येईल, अशा तपासणीच्या फलितांचा आधार घेऊन शिक्षणाचा संकोच केला जाईल अशी भीती त्यांना वाटते, ही भीती दूर केल्यास त्यांच्याकडून अशा तपासणीस पाठींबा मिळावयास हवा. त्यांना जर खरोखरी बहुजनसमाजाच्या शिक्षणाची आस्था असेल तर






असा तपासणीचा आग्रह धरण्याची असलेली तातडीची गरज त्यांना नाकारता येणार नाही.

आपण बहुजनसमाज हा शब्द वापरला आहे, त्याचा अर्थ निश्चित करण्याची इथे गरज निर्माण होते. महाराष्ट्रात उच्चवर्णीय/ब्राह्मण यांच्या विरोधी अर्थाचे, त्यांचे प्रतिपक्षीय कोण ते स्पष्ट करणारे या अर्थाने ब्राह्मणेतर व बहुजनसमाज हे शब्द वापरले गेले आहेत. बरीच वर्षे या शब्दांचा वापर अर्थपूर्ण होता. या अर्थाने की, एका बाजूला ब्राह्मण आणि दुसऱ्या बाजूला इतर सर्व अशी विभागणी करण्यास वस्तुस्थितीचा आधार बराच होता. पण 'ब्राह्मणेतर' व 'बहुजनसमाज' या दोन्ही शब्दांमधील संदिग्धता सामाजिक वास्तव समजून घेण्याच्या दृष्टीने उत्तरोत्तर अधिकाधिक अडचणीची ठरत आहे. राजकारणातील डावपेचांच्या दृष्टीने बहुजनसमाज या शब्दाचा वापर आजही फायद्याचा ठरत असल्यामुळे मराठा राजकीय पुढारी तो वापरत असतात व त्या आड आपले संकुचित हितसंबंध दडवीत असतात.

महात्मा फुल्यांनी ब्राह्मणशाहीच्या वर्चस्वाविरुद्ध आवाज उठविला त्याही काळात ग्रामीण भागात शेतजमीनी वरील मालकीच्या रूपात उत्पादन साधनांवर पकड असलेले व त्या आधारे समाजात सत्ता असलेले ब्राह्मणेतर होते. शहरातही सधन, मालमत्तावान व समाजात वजनदार असलेल्या इतर व्यक्तीही होत्या. संस्थानिक व सरदार होते. नव्या जमान्यातल्या प्रशासनातील मक्तेदारांमुळे व पांढरपेशा व्यवसायातील अग्रेसरत्वामुळे निर्माण झालेल्या ब्राह्मणशाही वरील म. फुल्यांची टीका योग्य असली तरी या सत्तावान ब्राह्मणेतर गटाचे त्यावेळीही अस्तित्व होते हे आज मान्य व्हायला हरकत नाही. शाहू महाराजांनी या गटातील व नविशिक्षितांमधील व्यक्तींना हाताशी धरूनच ब्राह्मणेतर चळवळ महाराष्ट्रात संघटित केली. या वर्गाचे हितसंबंध गोरगरीब बहुजनसमाजाशी त्याहीवेळी एकरूप नव्हते. ब्राह्मणेतर चळवळीत उतरलेल्या पुढाऱ्यांना राजकीय सत्तासंपादनात, प्रशासनातील नोकऱ्याचाकऱ्यांवर पकड जमविण्यात अधिक आस्था होती. पण मॉंटेग्यु चेम्सफर्ड सुधारणांनुसार स्थानिक स्वराज्याच्या व प्रांतिक पातळीवर काही प्रमाणात सत्ता हाती येईतोवर साऱ्या ब्राह्मणेतर बहुजनसमाजाच्या वतीने या मंडळींनी बोलणे अर्थपूर्ण होते. कारण ते स्वतःही महत्त्वाच्या अर्थाने राजकीय सत्तेपासून वंचित होते.

पण १९२२ नंतर ही परिस्थिती पालटली. प्रौढ मताधिकाराच्या तत्त्वावर राजसत्तेची स्वातंत्र्योत्तर काळात पुनर्रचना झाल्यावर तर परिस्थितीत झपाट्याने बदल झाला. स्वातंत्र्यापूर्वीही, ब्राह्मणेतर चळवळ पूर्वास्पृश्यांना आपल्यामध्ये समावून घेऊ शकली नाही. ती बव्हंशी मराठ्यांची चळवळ झाली असेही आज मागे वळून पाहता दिसते. 'मराठा' या नावाने ओळखला जाणारा समाज महाराष्ट्रात संख्याबळाने अधिक आणि सामाजिक-आर्थिक सत्तेच्या दृष्टीने ग्रामीण भागात वजनदार असा होताच. त्या समाजास १९२२ नंतर राजकीय सत्तेतही उत्तरोत्तर वाढत्या प्रमाणावर वाव मिळत गेला. त्यामुळे दलित, पीडित या अर्थाने 'बहुजनसमाज' हा शब्द त्या समाजाला उद्देशून वापरणे अधिकाधिक विसंगत ठरत गेले. खुद्द मराठा समाजाचीही स्थिती आज अशी आहे की, आर्थिक, सामाजिक व राजकीय दृष्ट्या त्यात उच्च, मध्यम व कनिष्ठ असे तीन थर केले पाहिजेत. या तीन थरांचे हितसंबंध वेगळे व परस्परांशी विरोधी आहेत.

ही वस्तुस्थिती लक्षात घेता, ब्राह्मण/उच्चवर्णीय विरोधी ब्राह्मणेतर/बहुजनसमाज या भाषेत आता वाद घालणे दिशाभूल करणारे आहे. मराठा समाजातील उच्च व मध्यम थरांचा समावेश बहुजन समाजात करण्यात या थरांचा स्वार्थ असला तरी मराठ्यांमधील तसेच इतर जातिजमातींमधील गोरगरीब, कनिष्ठ थरांचे अनहित आहे. इतकेच काय, पण पूर्वास्पृश्य समाजातही संख्येने लहान असला तरी एक उच्च व मध्यम भर अस्तित्वात आला आहे हे स्पष्ट दिसते.

'बहुजनसमाज' या शब्दाला परंपरेने एक विविक्षित अर्थ चिकटलेला आहे ही गोष्ट लक्षात घेऊन या पुढच्या विवेचनात तो मराठा व तत्सम समाजाला उद्देशूनच वापरला गेला आहे.

गुणवत्ता हा तिसरा शब्द. गुणवत्ता ही सामाजिक संदर्भ नसलेली गोष्ट नाही. अर्थ असा की, गुणवत्ताप्रधान शिक्षण असे म्हणत असताना आपल्या आजच्या गरजा लक्षात घेऊन, आपली आजची पातळी लक्षात घेऊन गुणवत्तेची इष्ट पातळी ठरवावी लागते.

शिक्षणाच्या द्वारे आपणास एकाच वेळी तीन गोष्टी साध्य करावयाच्या आहेत. समाजाची धारणा करण्यासाठी आणि त्याचा उत्कर्ष करण्यासाठी जी वेगवेगळी असंख्य कामे पार पाडली पाहिजेत त्या कामांसाठी आवश्यक ते मनुष्यबळ शिकवून तयार करावयाचे, हे पहिले उद्दिष्ट. सर्वांना नव्या






युगातील समताधिष्टित समाजात आवश्यक ते नागरिकत्वाचे शिक्षण द्यावयाचे. आपल्या समाजाचा इतिहास, त्याची सध्याची जडणघडण, त्याचे सध्याचे प्रश्न याविषयीची समज हा शिक्षणाचाच भाग आहे. तसेच, नव्या समाजाच्या बुडाशी असणारी तत्त्वे, श्रद्धा व मूल्ये यांचे संस्कारही यातच समाविष्ट आहेत. हे शिक्षणाचे दुसरे उद्दिष्ट झाले. व्यक्तीस आपल्या अंगच्या गुणांचा, अंगभूत व्यक्तित्व वैशिष्ट्यांचा विकास करण्याची जबाबदारी गुरुकिल्ली शिक्षणाने हस्तगत झाली पाहिजे, तिला आपली स्वतःची ओळख झाली पाहिजे, आपल्या अंतःप्रेरणांची, शक्तींची व मर्यादांची नीट समज आली पाहिजे. हे शिक्षणाचे तिसरे उद्दिष्ट म्हणता येईल.

या तीन उद्दिष्टांची पूर्तता जर होत असेल तर आपले शिक्षण गुणवान शिक्षण आहे असे म्हणावयास हरकत नाही. शिक्षणक्षेत्रात माजलेल्या भ्रष्टाचाराची, अपप्रकारांची व्याप्ती पाहिल्यास ही तीन उद्दिष्टे साध्य होत नाहीत अशी मोठ्या खेदाने आपणास कबुली दिली पाहिजे. शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या, शिक्षणसंस्थांची संख्या यांच्यात वाढ करण्यावर आणि प्रमाणपत्र हस्तगत करण्यावर अतिरिक्त भर दिला गेल्याने शिक्षणाच्या उद्दिष्टांवरून लक्ष ढळले आहे असे आपणास आढळते. एकीकडे अभ्यासक्रमांचा दर्जा उंचावण्यांत आला आहे, नवी दर्जेदार पाठ्यपुस्तके तयार केली जात आहेत. पण ते सर्व कागदोपत्रीचे घोडे ठरावेत अशी आजची प्रत्यक्ष परिस्थिती आहे.

गुणवान शिक्षण म्हणजे ज्याला ॲकेडेमिक दर्जा म्हणतात त्या अर्थाने उच्चदर्जाचे, आंतरराष्ट्रीय पातळीवर तुल्यबळ अशा दर्जाचे शिक्षण असा अर्थ करण्याकडे अलीकडच्या काळात प्रवृत्ती वाढत आहे. गुणवत्तेची ही व्याख्या येथे स्वीकारलेली नाही. आपल्या गरजा जर वेगळ्या असतील तर पाश्चात्त्य सामाजिक-औद्योगिक तांत्रिक संदर्भात आवश्यक असलेला तांत्रिक दर्जा गाठण्याची कृत्रिम धडपड ही अपकारक ठरण्याचीच शक्यता जास्त. इंग्रजी फर्डे लिहिताबोलता येणे ही आपल्या देशातल्या सर्वासामान्य शिक्षित माणसाची गरज आहे असे खचितच म्हणता येणार नाही. आधुनिक विज्ञानयुगात रहावयाचे तर आपल्या विद्यार्थ्याला इतके ज्ञान अवगत असले पाहिजे अशी समजूत करून घेऊन अभ्यासक्रम तयार केले जात आहेत. किती ज्ञान अवगत असले पाहिजे हे निश्चित करताना सर्वसामान्य भारतीय माणसाच्या जीवनाचा पुढच्या २०-२५ वर्षांचा संदर्भ लक्षात घेण्याच्या ऐवजी अमेरिका, रशिया या देशातील विद्यार्थ्यांची तयारी लक्षात घेतली जात आहे. हा गुणवत्तेचा शोध नसून आंतरराष्ट्रीय प्रतिष्ठेचा हव्यास आहे. त्यासाठी आपण आपल्या विद्यार्थ्यांचा मोठ्या प्रमाणवर बळी द्यावयास तयार आहोत.

ब्रिटिशांनी इथे ब्रिटिश धर्तीचे अभ्यासक्रम सुरू केले तेव्हा केलेली चूकच आपण परत करीत आहोत. येथील जीवनाचा संदर्भ, या समाजाच्या गरजा, या समाजाच्या पुनरुत्थानाच्या दृष्टीने आवश्यक गोष्टी यांना मध्यवर्ती महत्त्व देऊन अभ्यासक्रम तयार केले गेले नाहीत. पाश्चात्त्य देशांमध्ये, म्हणजे व्यवहारात इंग्लंडमध्ये जे जसे होते ते आदर्श समजून त्याची भ्रष्ट नक्कल येथे केली गेली. आजही आपला तोच प्रकार चालला आहे. हे थांबले पाहिजे.

शिक्षणाच्या तीन पातळ्या आपण करीत आलो आहोत. प्राथमिक, माध्यमिक आणि उच्च. आता यात आणखी दोन पातळ्या जोडावयास पाहिजेत. एक पूर्वप्राथमिक आणि दुसरी विशेषीकृत प्रगत उच्च शिक्षण ही.

ग्रामीण व शहरी भागात राहणाऱ्या सर्वसामान्य जनतेच्या दृष्टीने विचार केला तर प्राथमिक व माध्यमिक या दोन पातळ्या सर्वात महत्त्वाच्या आहेत असे म्हणावे लागेल. आपल्या दैनंदिन व व्यावसायिक जीवनात उच्च व प्रगत उच्च शिक्षणाची अनिवार्यता ज्यांना भासेल अशा व्यक्तींची संख्या फार मोठी असणार नाही. 'सुधारलेल्या' व 'प्रगत' अशा सधन पाश्चिमात्त्य देशांमधूनही आजही अशांचे प्रमाण सीमितच आहे. इथे आपण उपजिविकेच्या संदर्भात आवश्यक असलेल्या तांत्रिक ज्ञान व कौशक्ये यांच्या स्वरूपातल्या शिक्षणासंबंधी बोलत आहोत.

शिक्षणाची जी दुसरी दोन उद्दिष्टे त्यांच्या बाबतीत या सर्वसामान्य जनतेची गरज वेगवेगळ्या पातळीवरची नाही. या दोन उद्दिष्टांच्या संदर्भात देशातील सर्वच व्यक्तींचे सर्वोच्च शिक्षण होणे आवश्यक आहे.

या बाबतीतली आज आपली स्थिती काय आहे? शाळाप्रधान औपचारिक शिक्षणव्यवस्थेच्या सीमित चौकटीत देखील आजचे चित्र काय आहे ते पाहणे उद्बोधक ठरेल. प्रा. अ. रा. कामत यांनी 'शिक्षण प्रगतीचा सामाजिक संदर्भ' या विषयावर 'समाज प्रबोधन पत्रिका' या द्वैमासिकात तीन लेख प्रसिद्ध केले आहेत. (मे-जून, जुलै-ऑगस्ट व सप्टेंबर-ऑक्टोबर १९७६) १९७३-७४ च्या आकडेवारीच्या आधारे प्रा. कामतांनी प्राथमिक व माध्यमिक स्तरावरील प्रगतीचे




पुढीलप्रमाणे चित्र रेखाटले आहे : 'संबंधित वय गटातील प्रमाण पाहू गेले तर प्राथमिक शिक्षणाच्या वयगटात दर पाचापैकी चार मुले, माध्यमिक वयगटातील तिसरा हिस्सा मुले आणि हायस्कूल वयगटातील पाचवा हिस्सा मुले आज हजेरीपटावर आहेत' ही प्रगती आहे पण ती समाधानकारक नाही. कारण ते म्हणतात '१९६० पर्यंत, सहा ते चौदा वर्ष वयाची सर्व मुले मोफत सार्वत्रिक शिक्षणाच्या योजनेखाली शाळांत भरती व्हावीत असे ठरले होते. सहा ते चौदा वयगट बाजूलाच राहिला, पण सहा ते अकरा या वयगटातील सुमारे ७५ टक्के मुले हजेरीपटावर नोंदलेली आहेत आणि नोंदलेल्या मुलांपैकी शाळेत सतत गैरहजर असणाऱ्या मुलांची वजावट करता साधारणपणे ६० ते ६५ टक्के मुले प्राथमिक शाळांत प्रत्यक्षात शिकत आहेत. म्हणजे सहा ते अकरा वयाची एकतृतीयांश मुले अद्याप शाळेबाहेरच आहेत. त्याचप्रमाणे अकरा ते चौदा वयाची दोन तृतीयांश मुले अद्याप शाळेत दाखल होत नाहीत.'

शाळांची सार्वत्रिक सेवा उपलब्ध आहे. मुलांची भरती अपुरी आहे. तिसरी गोष्ट, भरती झालेल्या सगळ्या मुलींचे शिक्षण चौथ्या इयत्तेपर्यंत पुरे होणे, ही आहे व तीवरच प्राथमिक शिक्षणाची खरी प्रगती अवलंबून आहे. त्याबाबतीतला आपला अनुभव असा की, पहिलीत दाखल झालेल्या दर शंभर मुलांमागे फक्त ४० मुले चौथी पार होतात आणि फक्त २५ सातवी पास होतात. म्हणजे ६ ते १४ वयाला अभिप्रेत असलेले सात यत्तांचे प्रथम स्तरावरील शिक्षण पुरे करतात'... आपल्या प्राथमिक शिक्षणातील शोकांतिकेचे (आणि दूरदूरच्या दृष्टीने निरक्षरतेचे) हे एक फार मोठे कारण आहे.'

खऱ्या अर्थाने बहुजनसमाज ज्याला म्हणावयाचे त्याच्या दृष्टाने प्राथमिक शिक्षण हेच सर्वात महत्त्वाचे. प्राथमिक शिक्षण सकस केल्यास, ते सर्वांपर्यंत मिरासदारी खऱ्या अर्थाने शिक्षणप्रसार होईल. गावोगाव शाळा काढणे आणि त्यांच्या इमारतींसाठी आणि शिक्षकांच्या पगारासाठी तरतूद करणे एवढ्यावर आज आपला समाज थांबलेला आहे असे दिसते.

नेमकी याउलट उच्च शिक्षणातली परिस्थिती आहे. पाव शतकात प्राथमिक शिक्षणाच्या स्तरावर तिप्पट, माध्यमिक स्तरावर पाचपट, हायस्कूल स्तरावर सात पट वाढ झाली, आणि उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थी संख्येत तर दसपटीहून वाढ झाली, असे प्रा. कामतांनी नमूद केले आहे. संबंधित वयगटातील ५ ते ६ टक्के तरुण कॉलेजात दाखल झाले आहेत. या वयगटातील कॉलेजात शिकणाऱ्यांचे प्रमाण इतर प्रगत देशांच्या मानाने भारतात अध्याप कमीच आहे हे खरे असले तरी, प्रा. कामत या वैशिष्ट्यांकडे निर्देश करतात की, 'शालांत परीक्षा पास होणाऱ्यांपैकी फार मोठे प्रमाण, जवळजवळ निम्म्याहून अधिक विद्यार्थी उच्च शिक्षणासाठी प्रवेश घेतात' यापैकी जवळजवळ ९० टक्के विद्यार्थी सर्वसाधारण बी.ए., बी.एस्सी., बी.कॉम. या अभ्यासक्रमात दाखल होतात.

या वस्तुस्थितीचा अर्थ असा की, काही कारणाने आपल्या समाजातील धुरीणांना समाजाच्या उत्थानाच्या दृष्टाने पायाभूत महत्त्वाच्या असलेल्या प्राथमिक शिक्षणापेक्षा उच्च शिक्षणाविषयी अधिक आस्था आहे. समाजातील महत्त्वाकांक्षी वर्गांना/गटांना उच्च शिक्षणाच्या अंती मिळणारी पदवी ही विशेष महत्त्वाची वाटते, असा या गोष्टीचा अर्थ आहे.

बी.ए., बी.एस्सी., बी.कॉम. यासारखी पदवी घेतल्यानंतर पांढरपेशी नोकरी मिळू शकते, आणि पांढरपेशी नोकरी हा आपल्या पारंपरिक भारतीय संस्कृतीत सामाजिक व सांस्कृतिक प्रतिष्ठेचा मोठा आधार आहे. हे झाले व्यक्तीच्या दृष्टीने. समूहाच्या, गटाच्या वा समाजहिताच्या दृष्टीने विचार केला तर, एकंदर समाजात कोणत्या जातींच्या, गटांच्या हाती सत्ता राहील ही गोष्ट कोणत्या जातींच्या/गटांच्या हाती पांढरपेशा नोकऱ्या जास्त आहेत यावर अवलंबून आहे अशी स्थिती आतापर्यंत होती. आज समाजात राजकीय, आर्थिक व सामाजिक सत्ता पांढरपेशा नोकरदार गटांच्या वा जातींच्या हाती नाही. पण पांढरपेशा नोकऱ्यांना आजही विशेष महत्त्व आहे. उच्चपदस्थ नोकरदारांची पाश्चात्य शहरी जीवनसरणी इतरांना आदर्श वाटते व ती स्वतःच्या जीवनात साध्य करण्यासाठी समाजातील मध्यम व उच्चवर्गीय धडपडत असतात.

पदवी संपादन करून पांढरपेशी नोकरी मिळविण्याच्या आकांक्षेत एकेकाळी सामाजिक क्रांतिकारकता होती. पांढरपेशा जीवन व राजकीय सत्ता ही काही जातिजमातींची मिरासदारी बनली होती. ती मोडून काढण्याचे कार्य या आकांक्षेतून घडते. ग्रामीण व शहरी भागातील सर्वसाधारण प्रतीच्या शाळेत व कॉलेजात जाणाऱ्या विद्यार्थ्यांच्या दृष्टीने शिक्षणात आज ही शक्ती किंतपत उरलेली आहे? ती तशी उरलेली नाही, याचे कारण काय?

या आकांक्षेने आकार घेतला तेव्हा सरकारी नोकऱ्यांचे क्षेत्र हेच पांढरपेशा रोजगारांचे सर्वातमोठे, सर्वात अधिक प्रतिष्ठेचे व राजकीय सत्तेच्या दृष्टीने सर्वात अधिक महत्त्वाचे क्षेत्र होते. येथेही एक गोष्ट लक्षात घेतली पाहिजे. ती अशी की, सरकारी नोकऱ्याचाकऱ्यांच्या क्षेत्रातही उच्च पातळीवर जागांसाठी तसेच तांत्रिक स्वरूपाच्या जागांसाठी आकांक्षा लोकांची उडी नव्हती. त्य पदांना लक्ष्य केलं नव्हतं. एकतर स्वातंत्र्यपूर्व काळात त्या उच्च पातळीवरील पदांसाठी नेमणुका एकतर ब्रिटिशांसाठी तरी असत किंवा हिंदी माणसाला त्या खुल्या असल्या तर विशेष प्रकारच्या परीक्षा त्यासाठी उतराव्या लागत. तांत्रिक स्वरूपाच्या पदांशी राजकीय सत्ता इतकी निगडित नव्हती, आणि म्हणून राजकीय सत्तेवर लक्ष केंद्रित झालेल्या धुरीणांना त्यांचे विशेष महत्त्व वाटत नव्हते. त्यामुळे एक फार वरची पातळी म्हणून व एक गौण महत्त्वाची पातळी म्हणून त्या वगळून मधल्या पातळीवरील सर्वसाधारण प्रशासनातील पदांची आकांक्षा विशेष राखली गेली. त्यासाठी सर्वसाधारण आर्टस् व विज्ञान शाखेतील पदवी पुरत असे. त्यामुळे त्या प्रकारच्या उच्च शिक्षणाचा प्रसार करण्यावर भर दिला गेला. एका मर्यादेपर्यंत त्यामागील उद्दिष्ट साध्यही झाले. पण हा जो एकांगी भर दिला गेला, व ज्या मिरासदारी मोडण्यासाठी ज्या साधनांवर भिस्त ठेवली गेली, त्यामुळे आज या मार्गात ती ताकद उरली नाही.

रोजगाराचे एकंदर चित्र आपण पाहिले तर आपल्याला आज असे दिसते की, उच्च मध्यम व उच्च दर्जाच्या नोकऱ्यांसठी, व्यवसायांसाठी सर्वसाधारण शिक्षण उपयोगी पडत नाही. त्यासाठी विशेष दर्जाच्या प्रगत अशा शिक्षणसंस्थांमधून शिक्षित होऊन बाहेर पडावे लागते किंवा इंग्रजी माध्यमाच्या शाळांमधून शिक्षण घेतलेले असावे लागते किंवा अगदी वेचक अशा मराठी माध्यमाच्या शाळांमधून शिक्षण घ्यावे लागते. शिक्षणक्षेत्रात हा एक उच्चभ्रू प्रवाह निर्माण झाला आहे, आणि त्याला दृढता प्राप्त होत आहे. बहुजनसमाजातले सधन व उच्च मध्यमवर्गीय थर आपल्या मुलांसाठी अवर्जून इंग्रजी माध्यमाच्या शाळा (पब्लिक स्कूल्स) काढून या प्रवाहाला बळकटी आणत आहेत. प्रा. अ. रा. कामत लिहितात, 'आपले शिक्षण असे हे विभागलेले द्विमार्गी शिक्षण बनले आहे. एक वाट अती अल्पसंख्य अशा संपन्न वर्गाची आणि दुसरी बहुसंख्य सामान्य बहुजनांची.'

असं होण्याची कारणेही समजावून घेणे आवश्यक आहे. समाजातल्या सरसकरट सर्व नोकऱ्याचाकऱ्यांसाठी, व्यवसायांसाठी फार मोठी ॲकेडेमिक वा तज्ज्ञ पात्रता लागत नाही हे आपण वर पाहिले. पण रोजगारांचा असा एक भाग असतो की, जेथे अशी तज्ज्ञ पात्रता आवश्यक असते. आर्थिक औद्योगिक वाढीबरोबर, शासनाने अनेक तांत्रिक क्षेत्रात अधिक क्रियाशील भूमिका घेतल्यामुळे झालेल्या प्रशासकीय विस्तारानंतर अशा रोजगारांचा भाग पुष्कळ मोठा झाला आहे. या पातळीवरील नोकऱ्याचाकऱ्यांसाठी आणि व्यवसायांसाठी पुष्कळदा तांत्रिक शिक्षण घ्यावे लागते. यासाठी प्रवेश मिळवण्यासाठी ॲकेडेमिक गुणवत्ता दाखवावी लागते. मागे आपण पाहिले की, शिक्षणप्रसाराचा एक उद्देश ब्राह्मण व तत्सम उच्चवर्णियांची राजकीय सत्तेवरची पकड ढिली करणे हा होता. त्या दृष्टीने प्रशासन यंत्रणेतील नोकऱ्यांमध्ये शिरकाव याला अग्रस्थान दिले गेले होते. हा शिरकाव स्पर्धेच्या माध्यमातून साधण्यापेक्षा राजकारणी दबावातून साधण्यावर प्रथमपासून भर होता व स्वातंत्र्योत्तर काळात तर हातातल्या राजकीय सत्तेचा त्यासाठी पद्धतशीरपणे वापर केला गेला. या मार्गाचा वापर करण्याचे तीन दुष्परिणाम झाले. १. तज्ज्ञ पात्रता जिथे आवश्यक आहे अशा नोकऱ्या, व्यवसाय यांच्याकडे दुर्लक्ष करून सर्वसाधारण प्रशासनयंत्रणेतील पदांवर भर दिला गेला. २. राजकीय सत्तेच्या दृष्टीने विशिष्ठ प्रकारच्या नोकऱ्यांना लक्ष्य केल्याने बी.ए., बी.एस्सी., बी.कॉम. सारख्या सर्वसाधारण पदव्या घेण्याच्या पलीकडे विद्यार्थ्यांचे लक्ष जावे या दृष्टीने प्रयत्न झाले नाहीत. ३. राजकारणी दबाव व सत्तेचा वापर यावर साधने म्हणून भर असल्याने शिक्षणसंस्थांतून मिळणारे शिक्षण – पात्रता निर्माण करण्याच्या दृष्टीने गुणवत्तापूर्ण असले पाहिजे हा आग्रह समाजधुरीणांचा राहिला नाही. आपल्याला नोकरी मिळणे याचा आपल्या जातीशी, राजकीय प्रभुत्वाशी आपल्याला देऊ केलेल्या सवलतींशी संबंध जोडण्यास विद्यार्थ्यांना समाजधुरीणांनी इतके पक्केपणी पढविले आहे की, आज त्याच युक्तिवादाचा वेळोवेळी वापर करून कोणत्याही प्रकारच्या गुणवत्तेची आवश्यकता मान्य होऊ द्यावयास ते तयार नाहीत. परिणामी शिक्षणाचा जो सर्वसामान्य प्रवाह आहे तो समाजाची काही प्रकारच्या रोजगारांच्या संदर्भातली गरज भागवू शकेनासा झाला आहे. ही गरज भागविण्यासाठी शिक्षणव्यवस्थेच्या पोटात आधीपासूनच अस्तित्वात असलेला उच्चभ्रू शिक्षणाचा प्रवाह अधिक जोमदार बनत आहे आणि बहुजनसमाजातून आलेला सत्ताधारी वर्ग त्या



अनुक्रमणिका

प्रवाहाची कास धरीत आहे. यामुळे शिक्षण प्रसारामध्ये पूर्वी जी क्रांतिकारक शक्ती होती ती आज फार दुबळी ठरत आहे.

याचे सामाजिक परिणाम अत्यंत अनिष्ट होत आहेत. शिक्षणाच्या क्षेत्रात आधीच संधीची विषमता अस्तित्वात होती. प्रा. कामत यांनी म्हटल्याप्रमाणे, 'आपल्या समाजात दारिद्र्य, सामाजिक नीचता, सांस्कृतिक मागासपण इत्यादी प्रकारचे दैन्य... कितीतरी पटीने तळाशी एकत्रित झाल्याचे दिसून येते. त्यामुळे आपल्या देशात दिसून येणारी शिक्षणातील असमानता सुद्धा आपल्या देशातील गरीबीप्रमाणेच कितीतरी अधिक निर्घृण आहे.' त्यातच शिक्षणाच्या द्वारा समान संधी उपलब्ध होण्याच्या दृष्टीने पाऊल पुढे पडण्याच्या ऐवजी पाऊल मागे ओढण्याची प्रक्रिया सुरू झाली आहे.

तथाकथित बहुजनसमाजाच्या मुलांसाठी निघणाऱ्या 'पब्लिक स्कूल्स' वा अन्य इंग्रजी माध्यमाच्या शाळा या वस्तुतः बहुजनसमाजातील उच्च व सधन थरातल्या मंडळींसाठी असतात. याचाच अर्थ असा की, ही मंडळीही आता मिरासदारी प्रस्थापित करू इच्छित आहेत. उच्चभ्रू शिक्षणप्रवाहाच्या मार्गाने उच्च दर्जाच्या रोजगारांवर व व्यवसायांवर प्रभुत्व प्रस्थापित करणाऱ्या वर्गात त्यांनी स्वतःला सामील करून घेणयासाठी प्रयत्न चालविलेला आहे.

दुर्दैव असे की, याच वर्गाच्या हाती राजकीय सत्ता आहे आणि वेळीअवेळी बहुजनसमाजाचे नाव पुढे करून हा आपला स्वार्थी डाव साधीत असतो. ब्राह्मण व तत्सम उच्चवर्णियांची मक्तेदारी मोडून काढण्याची गरज मोठ्या अभिनिवेशाने मांडीत तो अतिअल्प अशा भूधारक जातीतल्या सधन गटाचा संकुचित स्वार्थ साधणारी शैक्षणिक धोरणे पुढे रेटीत असते. बहुजनसमाजाच्या नावाने त्यांचीच चाललेली घोर व निर्घृण फसवणूक जाणण्याची आज वेळ आली आहे. आपल्याच जातिजमातीतील, गणगोतातील या पुढारी मंडळींना उघडे पाडण्याची जबाबदारी बहुजनसमाजातील डोळस व जागृत व तत्त्वनिष्ठ व्यक्तींनी पार पाडली पाहिजे. उच्चवर्णियांकडून होणाऱ्या टीकेस जातीय वळण दिले जाऊ शकते व मक्तेदारी टिकविण्याचे हेत्वारोप करून जनतेची दिशाभूल करता येते, ही आजही दुर्दैवाने वस्तुस्थिती आहे.

उच्च पातळीवरील रोजगार व व्यवसाय बहुजन-समाजाच्या हाती यावेत यासाठी काही धुरीण मंडळी दुसऱ्या एका मार्गाचा अवलंब करीत असल्याचे आढळून येते. हा मार्ग तात्कालिकदृष्ट्या कार्यक्षम वाटला तरी दूरदृष्टीने पाहता तो अतिहानीकारक आहे. हा दुपदरी मार्ग आहे आणि या मार्गाची मदार बहुजनसमाजाच्या हाती असलेल्या राजकीय सत्तेवर आहे. उच्चतर पातळीवरील रोजगार व व्यवसाय यात प्रवेश मिळविण्यासाठी जे शिक्षण घ्यावे लागते ते घेता यावे यादृष्टीने सर्व प्रकारच्या अटी शिथिल केल्या वा निष्प्रभ ठरविल्या जातात. 'काहीही करून आमच्या मुलांना पदव्या मिळाल्या पाहिजेत' ही भूमिका घेतली जाते. परीक्षा सोपी करणे, कॉपीस प्रच्छन्न वा प्रकट उत्तेजन देणे, वशिल्याने वा पैसे चारून मार्क वाढवून घेणे, निकाल चांगले लावणे, इत्यादी नाना प्रकारचे भ्रष्टाचार यातून फोफावत चालले आहेत. हा एक पदर. दुसरा पदर, आपल्या हातातील राजकीय सत्तेचा वापर करून आपल्या जातिजमातीतील, नात्यागोत्यातील, पाठीराख्यातील मंडळींना नोकरीवर चिकटविणे, राखीव कुरणे उपलब्ध करून देणे, बढत्या देणे इत्यादी. हा दुसरा पदर.

एका मर्यादेपर्यंत या मार्गाने उच्चतर पातळ्यांवरील नोकऱ्याचाकऱ्या व व्यवसाय या क्षेत्रांतराची उच्चवर्णियांची पकड ढिली करण्यात यश आले हे निश्चित. पण या मार्गाने जाण्यात फार जबर किंमत चुकवावी लागत आहे. अनेक जागी किमान स्वरूपाची तज्ज्ञ पात्रता, कर्तृत्व, सचोटी आणि कार्यक्षमता यांची आवश्यकता असते. समाजिक न्याय व समता प्रस्थापित करण्यासाठी या जागा काही मोजक्या जाति-जमातींच्या हातीच राहणार नाहीत या दृष्टीने शैक्षणिक व रोजगारविषयक धोरणे आखली पाहिजेत यात शंका नाही. या पदांवर जी नवी माणसे यावयाची त्यांच्या ठिकाणी वरील गुण असतील याची खात्रीही करून घेतली पाहिजे. म्हणजे त्याला अनुरूप असा आग्रह शिक्षणव्यवस्थेत व रोजगारासाठीच्या निवडीच्या संदर्भात राखला पाहिजे. हा विवेक दाखवला न गेल्याने वरील गुणांचा व नोकरी मिळण्याचा, व्यवसायात प्रवेश मिळण्याचा काही संबंध नाही अशी विद्यार्थ्यांची फार पक्की समजूत झाली असल्याचे त्यांच्या वागणुकीवरून वाटते. किंबहुना अशी समज त्यांच्या ठिकाणी पुढाऱ्यांनीच करून दिली आहे.

सामाजिक कारभारात वशिलेबाजी, खाबूगिरी आणि अकार्यक्षमता, दिरंगाई हे दुर्गुण फार मोठ्या प्रमाणावर पसरलेले आहेत. समाजस्वास्थ्य धोक्यात आले आहे. आपल्या देशाची प्रगती मंद गतीने होत आहे वा प्रगतीला खीळ पडत आहे, इतका मोठा देश पण कितीएक क्षेत्रात त्याच्या कर्तृत्वाची उंची अगदी खुजी सिद्ध होत आहे, या स्वरूपाची किंमत आपण

मोजत आहेत.

बहुजनसमाजाच्या धुरीणत्वाचा, पुढारीपणास दावा करणारे गट राजकीय सत्तेचा अदूरदर्शी वापर करण्याचे सहजासहजी सोडून देतील हे शक्य नाही. कारण समाजाचे मोठे अनहित होत असले तरी एका अल्पसंख्य सत्ताधारी गटाचे उखळ या मार्गाने पांढरे होत आहे. एक विशेषाधिकार संपन्न असा गट जनतेमधून अलग असा निर्माण झाला आहे. बहुजन समाजाला पुढ्यात घालून तो आपला स्वार्थ साधीत आहे. यासाठी त्याला हा मार्ग फार उपयोगी पडत आहे.

या देशातल्या सर्वसामान्य जनसामान्यांनी आपल्यातील या मतलबी धुरीण व पुढारी मंडळींची चालबाजी ओळखली पाहिजे. शेवटी तज्ज्ञ पात्रता, कर्तृत्व, कार्यक्षमता व सचोटी यांना डावलून त्यांची उपेक्षा करून शिक्षणव्यवस्था चालविली जाते. रोजगारविषयक धोरणांची अंमलबजावणी केली जाते. तेव्हा फावते कोणाचे व अडचण कोणाची होते? राजकीय सत्ता आपल्या हातात नाही. संख्याबळावर राजकारण चालण्याच्या जमान्यात ती आपल्या हाती येणारही नाही हे उच्चवर्णीयांनी जाणले आहे. नव्या जमान्यात नोकऱ्याचाकऱ्या व व्यवसाय यासाठी आपणास आपल्या तज्ज्ञ पात्रतेवर, आपल्या कर्तृत्वावर, कार्यक्षमतेवर, सचोटीवर प्राधान्येकरून विसंबून रहावयाचे हे दिवस आहेत हे ओळखून त्यांच्या मागे या थरातील मुले लागतात असे आपण पाहतो. कालपरवापर्यंत केवळ पांढरपेशा कारकुनी नोकऱ्या करणारी ही मंडळी नव्या जमान्यातील अनेक व्यवसायांमध्ये शिरत आहेत. जातपात, ओळखीपाळखी, लागेबांधे यांचा उपयोग ते अगदीच करीत नाहीत असे नाही. किंवा त्यांना अग्रक्रमाने पसंत करणाऱ्या कंपन्या/संस्था नाहीत असेही नाही. पण उत्तरोत्तर अशा साधनांच्या वापराचे क्षेत्र आकुंचन पावत असल्याची जाणीव बाळगून स्पर्धेतून वर येण्यावर अधिक भिस्त बाळगण्यास ते शिकले आहेत. तेव्हा या मंडळींचे अडत नाही. नव्या सत्ताधारी वर्गात ज्यांची उठबस आहे, लागेबांधे आहेत, जे सधन आहेत त्यांची ही अडचण नाही. त्यांचे तर फावते आहे. त्यांच्यासाठी सगळ्या अटी सैल केल्या जातात. जनसामान्यांपैकी ज्यांचे लागेबांधे नाहीत, जे सधन नाहीत, ज्यांची सत्ताधारी वर्गात वट नाही अशा होतकरू तरुणांची सर्वात जास्त कोंडी होते.

ही कोंडी दुहेरी, तिहेरी आहे. अशा होतकरू तरुणांना त्यांच्या सामान्य परिस्थितीमुळे उच्चभ्रू शिक्षणप्रवाहात दाखल होण्याचा विचारही करता येत नाही आणि समजा तरी त्यांच्या पालकांनी झीज सोसून, पोट बांधून त्यांना इंग्रजी माध्यमाच्या शाळांमध्ये घातले (अशा प्रकारे इंग्रजी माध्यमाच्या शाळांमध्ये आपल्या मुलांना घालणारे पालक आहेत) तरी, अन्य अनुकूलतांच्या अभावी इंग्रजी माध्यमाच्या शाळांत जाणाऱ्यामधला जो कनिष्ट/निकृष्ठ प्रवाह आहे त्यात ते बहुतकरून रिचविले जातात. त्यांना ज्या शिक्षणसंस्थांमधून शिक्षण घ्यावे लागते त्या त्याच्या ठिकाणच्या गुणवत्तेची जोपासना करीत नाहीत. त्या संस्थांतले शैक्षणिक गुणवत्तेच्या दृष्टीने असलेले औदासीन्यपूर्ण वातावरण त्याची वाढ खुरटलेली ठेवते. शिक्षणक्षेत्रातील वाढत्या गैर व भ्रष्ट प्रकारांचेच संस्कार त्याच्यावर होत राहतात. मूळच्या अंगच्या गुणांचा विकास होण्याऐवजी, ते गुण प्रखर प्रज्वलित होण्याऐवजी, ते कोळपतात, बोथट होतात. स्पर्धेच्या मार्गाने पुढे येण्याची, उत्कर्ष साधण्याची पात्रता त्याच्या ठिकाणी निर्माण होत नाही. सधन थरातून, जातजमात व गणगोत या दृष्टीने भाग्यवान म्हणता येईल अशा घरातून न आल्याने त्याला जे निकृष्ट शिक्षण मिळते त्यावर राजकारणी मार्गाने वा पैशाच्या जोरावर मात करण्याचीही आशा त्याला बाळगता येत नाही. अशी त्याची तिहेरी कोंडी होते.

तात्पर्य असे की, आज ज्या प्रकारचा शिक्षणप्रसार झाला आहे व होत आहे त्यातून खऱ्याखुऱ्या बहुजनसमाजाचा उत्कर्ष साधला जाण्याचे दिवस संपले आहेत. विषम समाजव्यवस्थेची आधारशिला बळकट करण्याचे काम पुढच्या काळात या प्रकारच्या शिक्षणप्रसारातून होईल हे स्पष्ट आहे.

बहुजनसमाजातून आलेल्या व आता राजकीय, आर्थिक व सामाजिक सत्तास्थानी जम बसविलेल्या अल्पसंख्य गटाने एका बाजूला समाजातल्या इतर सत्ताधारी गटांशी, वर्गाशी हातमिळवणी केली आहे. (त्यांच्याशी एकरूपता साधण्यासाठी तो उच्चभ्रू शिक्षणप्रवाह आपलासा करीत आहे) तर दुसरीकडे आपला राजकीय व ऐहिक स्वार्थ निर्वेधपणे साधता यावा म्हणून बहुजनसमाजाची दिशाभूल व फसवणूक करणारे राजकारण/समाजकारण शिक्षणक्षेत्रात तो खेळत आहे.

मराठा व तत्सम भूधारक जाती या मर्यादेतला बहुजनसमाज घेतला तरी आज त्यात सत्ताधारी बहुजनसमाज व सामान्य बहुजनसमाज असे दोन थर पडलेले स्पष्ट दिसतात. ज्या प्रकारच्या शिक्षण प्रसाराचा आग्रह माध्यमिक व उच्चशिक्षणाच्या क्षेत्रात सत्ताधारी बहुजनसमाज धरीत आहे त्याने या मर्यादित अर्थाच्या बहुजनसमाजातल्या सामान्य

थराचाही लाभ साधला जात नाही. या प्रकारच्या उच्च शिक्षणातून पसार झालेल्या व्यक्तींना स्वातंत्र्योत्तर काळातील वाढविस्तारांच्या काळात मोठ्या संख्येने नोकऱ्याचाकऱ्या मिळाल्याने, आणि त्यांचाच आज सत्ताधारी वर्ग तयार झालेला असल्याने ते बदललेल्या वास्तवाची जाणीव आपल्या बांधवांना करून देत नाहीत. अर्थव्यवहार, प्रशासन, उद्योगधंदे, सेवाव्यवसाय इत्यादींचा या पुढच्या काळातील वाढविस्तार पूर्वीच्याच पद्धतीने करावयास गेल्यास आपल्याला दिवाळे काढावे लागेल. खुद्द उच्च शिक्षणाच्या क्षेत्रातही कॉलेजे, विद्यापीठे यांच्या आर्थिक अडचणींनी उग्र स्वरूप धारण केलेले आपण पाहत आहोतच. बदललेल्या वास्तवाचे भान सामान्य बहुजनसमाजाला आल्याखेरीज राहणार नाही. आपली कोंडी नेमकी कशामुळे होत आहे व ती कोण करते आहे ते त्यांना सांगणं हे आजच्या बहुजनसमाजातील प्रबोधनकारांचे कर्तव्य आहे. उच्चवर्णीयांचा मतलबीपणा, त्यांची मक्तेदारी, त्यांनी चालविलेली पिळवणूक यांचे उघडेनागडे दर्शन एकेकाळी म. फुल्यांनी घडविले आणि उच्चवर्णीयांवर, ब्राह्मणांवर कोरडे ओढले, तीच कठोर सत्यान्वेषी दृष्टी व तोच रोखठोकपणा या नवप्रबोधनकारांकडून अपेक्षित आहे.

समाजातला जो दलित थर आहे त्यात अनेक जातिजमाती आहेत. काही जाती जमातींमधील जवळपास सगळीच लोकसंख्या दलित आहे. काहीमध्ये अल्पसंख्य असा दलितेतर वर्ग निर्माण झाला आहे. पण बहुसंख्य अजून दलित आहेत. तर काही जमातींमध्ये लहानमोठे विभाग दलितांमध्ये समाविष्ट आहेत. असा हा जो विराट दलित थर त्याच्या हितसंबंधाच्या दृष्टीने विचार करता, त्याला न्याय मिळवायचा असला, त्याला समान संधी उपलब्ध व्हावयाची असली तर शिक्षणप्रसाराचा कोणता आकृतिबंध स्वीकारला पाहिजे? त्याच्याशी सुसंगत अशी इतर कोणती धोरणे अंगीकारली पाहिजेत?

शिक्षण घेतल्यावर त्या शिक्षणाला अनुरूप अशी नोकरी मिळाली पाहिजे वा रोजगार मिळाला पाहिजे वा व्यवसाय करता आला पाहिजे अशी अपेक्षा असेल तर समाजाच्या वाढविस्ताराच्या टप्प्यानुसार शिक्षणप्रसार वेगवेगळ्या पातळ्यांवर नियंत्रित करणे आवश्यक आहे. ही गोष्ट प्रथमच लक्षात घेतली पाहिजे. पण उच्च वा माध्यमिक शिक्षणाच्या प्रसाराची गोष्ट निघाली म्हणजे अजून तर इतकेच टक्के मुलेमुली या पातळीवर शिक्षण घेत आहेत, बहुसंख्य तर वंचित आहेत असा युक्तिवाद केला जातो. हा युक्तिवाद करणारा गृहीत असे धरतो की, समाजातील प्रत्येक मुलामुलीस उच्च शिक्षण मिळाले पाहिजे. हा त्याचा वा तिचा जन्मसिद्ध हक्क आहे, आणि हे जोवर घडून येत नाही तोवर शिक्षणप्रसार थांबविणे गैर होईल. अमूक एका प्रकारच्या नोकरीशी अशा व्यक्ती शिक्षणाचा संबंध जोडीत असल्याकारणाने, एक ना एक दिवस समाजातल्या सर्व व्यक्तीना खास पांढरपेशी नोकरी वा व्यवसाय करता येईल असेही गृहीत धरतात हे उघड आहे. आपल्यापेक्षा कित्येक पटींनी सधन असलेल्या पाश्चिमात्त्य देशांमध्येही तंत्रविद्या उच्च दर्जाची असूनही, खास पांढरपेशी व्यवसाय व नोकऱ्या यांची संख्या अल्पच राहिलेली आहे. यातून योग्य तो बोध घेण्याची वेळ आलेली आहे.

पांढरपेशा जीवन हे आपल्याकडे सांस्कृतिकदृष्ट्या उच्च मानले गेले आहे. याची काही कारणे अगदी साधी समजण्यासारखी आहेत. पांढरपेशा व्यवसाय व नोकऱ्या यात होणारी मिळकत ही पुष्कळ अधिक, जास्त सुरक्षित असते. त्यामुळे एक संपन्न व चतुरस्त्र जीवन जगता येते. पांढरपेशा जीवनात फाजील काबाडकष्ट करावे लागत नाहीत. माफक मेहनत करावी लागते. हे जीवन जगणारे समाजात सत्तावान, मालमत्तावान व प्रतिष्ठित राहिले. साहजिकच या जीवनाचे आकर्षण इतरांना वाटते. हे जीवन ही काही जातिजमातींची मक्तेदारी राहता कामा नये हा आग्रह व निर्धार भारतासारख्या जातिधिष्ठित समाजात आवश्यक आहे.

पण पांढरपेशा जीवनाचे जे शिखर आहे तेथे थोड्या लोकांनाच जागा असणार हे मान्य, मात्र हे शिखर गाठण्याच्या स्पर्धेत भाग घेण्यास सर्वांना मोकळीक असावी अशी आपण भूमिका घेणार आहोत का? विवक्षित जातिजमातीतल्या जन्मावरून संधी ठरविण्यापेक्षा अशी स्पर्धात्मक व्यवस्था बरी हे खरे. अशा स्पर्धात्मक व्यवस्थेवर आपले समाधान असेल तर, उच्चशिक्षणाच्या वयगटातील ५/६ टक्के पेक्षा जास्त मुले कॉलेजमध्ये येऊन चालणार नाही. हे मान्य करून या वेचक जागांसाठी स्पर्धा व्हावी व जे यशस्वी होणार नाहीत त्यांनी आपले दुर्दैव मान्य करावे, आलीया भोगासी सादर असावे, असे आपणास म्हणावे लागेल. पण आपणास हे माहीत आहे की, स्पर्धा सर्वांसाठी खुली करणे आणि समान संधी या दोन वेगवेगळ्या गोष्टी आहेत. स्पर्धकांची तयारी, कुवत अगदी असमान असेल तर खुली स्पर्धा विषमतेलाच खतपाणी देते. तर मग असे म्हणायचे का की, या ५/६ टक्के जागा वेगवेगळ्या

जातिजमातींमध्ये लोकसंख्येच्या प्रमाणात वाटून द्याव्या? या विचाराला आपल्याकडे चटकन पाठिंबा मिळतो. पण एकतर या पद्धतीने समाजरचनेची जातिधिष्ठित बैठक अधिक पक्कीच होते आणि, दुसरी गोष्ट, ज्या त्या जातीतली सधन व लब्धप्रतिष्ठित मंडळींची मक्तेदारी प्रस्थापित होऊन गोरगरीब, दलित हे ढोरमेहनतीचे जीवन जगत राहतील.

ही गोष्ट आजही आपण आपल्या डोळ्यासमोर पाहत आहोत. कारण एकेक जात ही मामाजिकदृष्ट्या कनिष्ठ, आर्थिकदृष्ट्या निकृष्ट अवस्थेत असली तरी एक अल्पसंख्य थर त्याही जातीत असा असतो की जो लब्धप्रतिष्ठित, सधन व सत्ताधारी असतो. आणि टाळूवरचे लोणी खायला तो परंपरागत सोकावलेला असतो,

ज्याला आपण सांस्कृतिकदृष्ट्या उच्च श्रेयस्कर व संपन्न जीवन समजतो ते फक्त वरच्या पाचपंचवीस टक्के लोकांच्या वाट्याला न येता, एका विशिष्ठ प्रकारच्या बुद्धिजीवी रोजगारांतील व्यक्तींच्या वाट्यास न येता ते सर्वांच्याच वाट्याला यावे अशा प्रकारे आपल्या रोजगाराची नोकऱ्यांची व व्यवसायांची, तसेच मिळकतींची फेररचना करण्याची आवश्यकता जाणली पाहिजे. ही आवश्यकता जाणणे व त्या दृष्टीने बदल घडवून आणणे म्हणजे योग्य तो बोध घेणे होय.

औद्योगिकरण, शेतीव्यवसायाची उर्जितावस्था आणि विकासाच्या इतर प्रक्रिया यांच्यामुळे आज काही प्रमाणात या दिशेने मर्यादित स्वरूपाचा बदल घडून येत आहे. शिक्षण अर्धवट सोडून वा फारसे झालेले नसतानाच वेगवेगळ्या व्यवसायांमध्ये शिरून स्वकर्तृत्वाने चांगली मिळकत मिळवीत असलेले असंख्य व्यावसायिक आपण पाहतो. तंत्रज्ञ व कुशल कामगारांच्या पातळीवरही उत्पन्नाची श्रेणी आज पुष्कळ व्यवसायात चांगली आहे. पण या सगळ्यांची गणना आपण पांढरपेशांमध्ये करीत नाही. का, तर कडक इस्त्रीचे कपडे घालून, हात न 'मुडवता' त्याना हे व्यवसाय करता येत नाहीत. याचा एक परिणाम असाही झाला आहे की, अशा व्यवसायातल्या लोकांना किंवा असे व्यवसाय ज्यांना करावयाचे आहेत त्यांचे फार तर तांत्रिक शिक्षण झले तर पुरे अशी भूमिका समाज घेतो. व्यक्तित्वविकासाच्या दृष्टीने, बौद्धिक-दृष्ट्या संपन्न जीवन जगण्यासाठी आवश्यक क्षमता निर्माण करण्याच्या दृष्टीने त्यांचे शिक्षण करावयास हवे असे समाज मानत नाही. याचा अर्थ असा की, ब्राह्मणांची वा उच्चवर्णीयांची मिरासदारी मोडावयास निघालेल्या बहुसंख्य पुढाऱ्यांना व त्यांच्या पाठीराख्यांना पांढरपेशा व श्रमिक हा भेद मोडावयाचा नसतो तर आपला शिरकाव तेवढा पांढरेशांमध्ये करून घ्यावयाचा असतो. मिरासदारी त्यांना चालूच ठेवावयाची असते. हे बदलले पाहिजे.

समाजाच्या धारणेसाठी आवश्यक असलेला कोणताही व्यवसाय वा कोणतेही काम माणसास करावयास लागो, त्या रोजगारापासून त्याला १. सुसंस्कृत जीवन जगण्याइतपत मिळकत झाली पाहिजे. २. त्या रोजगारात त्याला योग्य प्रमाणात बौद्धिक वा शारीरिक मेहनतही करावी लागलीच पाहिजे. पण फाजील ढोर काबाडकष्ट करावे लागता कामा नयेत, आणि ३. रोजगार कोणताही असो त्याचे बौद्धिक-मानसिक शिक्षण असे झाले पाहिजे की, संपन्न बौद्धिक-भावनिक असं सुसंस्कृत जीवन जगण्याची क्षमता त्याच्या ठिकाणी निर्माण होईल, ही भूमिका घेण्याची गरज आहे.

या भूमिकेतून कोणत्या गोष्टी निष्पन्न होतात तेही पाहू. १. प्राथमिक व माध्यमिक शिक्षण हे त्या क्रमाने (म्हणजे प्राथमिक ६-१४ वयोगटाचे अधिक व माध्यमिक -१४ ते १६-१८ वयोगटाचे - त्या खालोखाल) महत्त्वाचे ठरते. २. पुस्तकी उच्चशिक्षण आणि कारकुनी प्रकारच्या नोकऱ्यांना असलेली फाजील प्रतिष्ठा पद्धतशीरपणे कमी करणे. याचे दोन भाग पडतील. १. अशा प्रकारच्या नोकऱ्यांमध्ये मेहनतीचा भाग पुष्कळ वाढविणे, ही मेहनत प्राधान्येकरून बौद्धिक असेल पण ती कसोशीने करावी लागेल हे एक, व दुसरे असं की, प्यून ही संस्था बरखास्त करून तिच्याच अंगमेहनतीचाही किमान आवश्यक शिरकाव करता येईल; २. अशा सुरक्षित नोकऱ्यांची मिळकत बुद्धिजीवी व्यवसायांशी तुल्यबल अशी ठेवता येईल; अशा सुरक्षिततता, सुट्ट्या, पगारवाढ, बढत्या, पेन्शन इत्यादी स्वरूपाचे जे लाभ आहेत त्यातले काही सर्वांना उपलब्ध करायला हवेत आणि काही काढूनच टाकायला हवेत. ३. उच्चतर रोजगार, व्यवसाय यांना फाजील जास्त वेतन/मिळकत व विशेषाधिकार व विशेष लाभ यांची खैरात करण्याची परंपरा ब्रिटिशांनी निर्माण केली. सरंजामदारी युगाचीच रीत आधुनिक युगात चालू राहिली. यात मूलग्राही बदल होणे आवश्यक आहे. किंबहुना एका मर्यादेनंतर कितीही वरच्या पदास माणूस गेला तरी त्याचे वेतन, त्याची मिळकत, त्याचे विशेषाधिकार व विशेष लाभ वाढण्याची अजिबात गरज नाही. ४. उच्चपदवी संपादन करणाऱ्यांची उच्च पदांवर सरळ भरती करण्याच्या रीतीचा मुळातून फेरविचार करण्याची गरज








अनुक्रमणिका

आहे. कनिष्ठ स्थानापासून काम करीत, उमेदवारी करीत अनुभवाने, कर्तृत्वाने, गुणांनी वरीष्ठ पदी व्यक्तीने पोचावे. ही रीत अवलंबणे पुष्कळ जागांच्या बाबतीत योग्य ठरेल. ५. तसेच आजच्या पद्धतीच्या उच्च शिक्षणास पुष्कळ अंशी फाटा देणे इष्ट होईल. माध्यमिक शिक्षणानंतर तरुणाने काही काम पत्करावे. वेगवेगळ्या कामात गुंतलेल्या तरुणांमधून त्यांनी कामाच्या ठिकाणी प्रकट केलेल्या गुणांच्या, कामगिरीच्या आधारे वेगवेगळ्या प्रकारच्या उच्च शिक्षणासाठी होतकरू तरुणांची निवड व्हावी. उच्च शिक्षणही टप्प्याटप्प्याने पुरे व्हावे. उच्च शिक्षितांना अधिक मोठ्या जबाबदारीचे, प्रतिभेला, बुद्धीला, भावनेला जास्त मोठे आवाहन करणारे काम करावयाची संधी मिळेल हेच तर प्रधान प्रलोभन ठेवले तर उच्च शिक्षणासाठी झुंबड उडण्याची भीती नाही.

वरील दोन परिच्छेदांमध्ये सुचविलेले बदल मिरासदारी टिकवून धरण्याची इच्छा असणाऱ्या आजच्या तथाकथित बहुजनसमाजवादी पुढाऱ्यांना आणि त्यांच्या-पाठीराख्यांना मान्य होणार नाहीत हे उघड आहे. आजच्या पद्धतीच्या उच्च शिक्षण संस्था चालविण्यात ज्यांचे आर्थिक, सामाजिक व राजकीय हितसंबंध गुंतलेले आहेत त्या संस्थाचालक , अध्यापक व सधन थरातील विद्यार्थीवर्ग यांनाही हे बदल मान्य होणार नाहीत. राजकीय सत्तास्थानी पोचण्याची वाट म्हणून उच्च शिक्षण व नोकऱ्याचाकऱ्या यांच्याकडे पाहणाऱ्या व जातवार राखीव जागांचा आग्रह राखणाऱ्या मंडळींनाही हे बदल रुचणार नाहीत. कारण या सर्वांना विषम समाजव्यवस्था हवीच आहे; त्यांची शर्त एवढीच आहे की, त्यांचे स्थान राज्यकर्त्यांमध्ये असावे.

ज्यांना मिरासदारी, मग ती कोणाचीही असो, नष्ट करावयाची आहे व जातपात विरहित व समताधिष्ठित समाज प्रस्थापित करावयाचा आहे त्यांना आजच्या पद्धतीच्या शिक्षणप्रसाराची क्रांतिकारकता संपुष्टात आल्याची, किंबहुना आजचा शिक्षणप्रसार हा क्रांतीच्या वाटेतील अडथळा ठरत असल्याची दखल घ्यावी लागेल. उच्चभ्रू शिक्षण प्रवाह हा अधिक दृढ व अनुल्लंघनीय अशा विषमतेला जन्म देत आहे, आणि त्यातून उपस्थित होणाऱ्या आव्हानाला आपणास तोंड द्यावयाचे आहे, हे त्यांना जाणावे लागेल. पात्रता नसतानाही पदवीच्या कागदी घोड्यांच्या जोरावर नोकऱ्या देणे हा राजकारणी दबावाचा मार्ग सत्ताधारी थरातील अल्पसंख्य गटासाठीच उपयोगाचा असतो. उच्चभ्रू शिक्षणप्रवाहाचे आव्हान पेलावयाला प्रभावी असा अंतिमतः एकच मार्ग आहे; तो प्राथमिक - माध्यमिक - उच्च शिक्षणसंस्थांचा कस वाढविणे हा आहे. कसाचा विचार न करता उच्च शिक्षण संस्थांची संख्या वाढविणे, विद्यार्थ्यांची संख्या फुगविणे, नाना प्रकारांनी प्रमाणपत्र संपादण्यास सहाय्य करणे, या द्वारा आपण सामाजिक परिवर्तनाला या जनसामान्यांच्या उद्धाराला हातभार लावीत नसून उच्चभ्रू शिक्षण प्रवाहाचे हात बळकट करीत आहोत, विषमता जोपासत आहोत हे लक्षात घेतले तर अशा शॉर्टकट्सचा, आडवळणांचा मोह दूर होईल.

आपल्या लोकांना नोकरीला चिकटविणे, किंवा नोकरीला लावून लोकांना अंकित बनवून मग त्यांना आपल्यासाठी राबवून घेणे यासाठी शिक्षणक्षेत्राचा वापर मोठ्या प्रमाणावर झाला आहे. ही जी शिक्षणाची अप्रतिष्ठा आहे ती थांबवावी लागेल. भारतासारख्या जातीपातीच्या समाजात निखळ खुली स्पर्धा ही विषमता वाढविणारी ठरेल हे आपण एके ठिकाणी पाहिले. तेव्हा, इतर क्षेत्रांप्रमाणेच, शिक्षणाच्या क्षेत्रातही नोकऱ्या देताना वरकरणी जातीय म्हणता येईल असे निवड-नेमणुकीचे धोरण अवलंबावे लागेल. हरकत अशा प्रकारच्या भरतीस नाही हे येथे स्पष्ट केले पाहिजे. एकात्म समाजनिर्मितीसीठी अशी भरती डोळसपणे व समंजसपणे दीर्घकाळ करावी लागेल. पण भरतीचा एक निकष जात वा आर्थिक परिस्थिति हा असला तरी दुसरा निकष पात्रता व गुणवत्ता राहील हे फार आग्रहाने सांगण्याची वेळ आली आहे. योग्य ती जात असली की, पात्रतेचा मुद्दा उपस्थित होतच नाही अशी जी धारणा रुजली/रुजवली गेली आहे ती तात्कालिक-दृष्ट्या शिक्षकांना सोयीची वाटते पण याच ढिलाईच्या जोरावर संस्थाचालक/राजकारणी पुढारी शिक्षकांना हवे तसे वाकवू शकतात, त्यांचे शोषण करू शकतात, आणि त्यातून व्यक्तिशः त्यांची व शिक्षक पेशाची अप्रतिष्ठा होते. हे शिक्षकांनी जाणण्याचीही तितकीच निकड आहे.

प्राथमिक ते उच्च शिक्षण या सर्व पातळ्यांवरील सर्वसाधारण शिक्षणसंस्थांचा कस वाढवायचा असेल तर चार अत्यावश्यक सुधारणा होण्याची गरज आहेत १. शिक्षकांच्या वेतनश्रेणीमधील फरक नाममात्र म्हणता येईल एवढाच राहील असे पाहिले पाहिजे. प्राथमिक शिक्षकाचे काम हे प्राध्यापकाच्या कामाइतकेच प्रतिष्ठेचे गणले जाईल या प्रकारचे मूल्यपरिवर्तन समाजात घडून येण्याची गरज आहे. शिक्षकाच्या पेशात शिरणाऱ्या प्रत्येकाने काही काळ प्राथमिक/माध्यमिक



अनुक्रमणिका

पातळ्यांवर शिक्षकाचे काम केल्यावरच त्याला प्राध्यापकाच्या श्रेणीत दाखल होता येईल असेही धोरण अवलंबिणे योग्य होईल का याचा विचार केला पाहिजे. २. उच्च शिक्षणाचा सर्व खर्च विद्यार्थ्यांस कर्ज म्हणून दिला जावा व त्याच्या सव्याज परतफेडीची योजना असावी. सधन पालकांच्याही मुलांना कर्जाच्या पद्धतीनेच शिकणे आवश्यक करावे. ३. उच्च शिक्षण संस्था, शहरी वातावरण, श्रमजीवींपासून दूर नेणारे पांढरपेशी जीवन अशी सांगड आज पडली आहे. प्राचीन कालीन आश्रमांप्रमाणे उच्च शिक्षण संस्था ग्रामीण भागातच असाव्यात असा कटाक्ष ठेवावा. तसेच, शिक्षक व विद्यार्थी यांचे जीवनमान, इमारती, सुखसोयी इत्यादी दृष्टींनी तिथला परिसर यांची पातळी साधी, काहीशी गरिबीचीच राखण्याचाही कटाक्ष ठेवावा. तिथली सर्वसाधारण व्यवस्था स्वावलंबी असावी. ४. उच्च शिक्षणाच्या कालात विद्यार्थ्यांच्या हातून राष्ट्रीय पुनर्रचनेचे निश्चित व ठोस प्रकल्प करून घ्यावेत. शिक्षणाचाच हा एक अंगभूत भाग जर बनला तर शिक्षणाची पद्धतही बदलावी लागेल. या पद्धतीने शिक्षण पुरे करण्यास जास्त कालावधी लागेल पण ते इष्टच होईल. जे विषय विद्यार्थी शिकत असेल त्यांच्याशी संबंधित अशी कामे वा अन्य सर्वसाधारण कामे त्याला करावी लागतील.

शिक्षणाचे असे विकेंद्रीकरण, असे ग्रामीणीकरण, असे गरिबीकरण, असे श्रमजीवीकरण करणे दोन कारणांसाठी आवश्यक आहे. देशातील श्रमिकांची प्रतिष्ठा वाढण्यासाठी, त्यांना शिक्षणाविषयी व शिक्षितांविषयी आस्था व जवळीक वाटण्यासाठी, त्यांच्याबरोबर समरसता निर्माण होण्यासाठी यांची गरज आहे. आपला देश पैशाने दरिद्री आहे; दरिद्रीनारायणांचा तो देश आहे. या देशात शिक्षण मिळणे हा विशेष प्रकारचा लाभ आहे; उच्च शिक्षण तर चैन आहे असेही एका अर्थी म्हणता येईल. तेव्हा, खरोखर जर शिक्षण सर्वांपर्यंत पोचवायचे असेल तर ते सर्वप्रकारे लोकांच्या गरीब जीवनमानाशी जुळवणूक साधणारे असले पाहिजे. एरवी शिक्षण प्रसाराला लागणारा पैसा नाही म्हणून काही मूठभरांपुरतेच कसदार शिक्षण सीमित राहील. आज आपण असे झालेले पाहत आहोत. सर्वसामान्यांसाठी फोलकट शिक्षण व मूठभरांसाठी दाणेदार शिक्षण अशी विभागणी आधीच झाली आहे, ती जास्त पक्की होईल.

म. फुले, शाहू छत्रपती, कर्मवीर भाऊराव पाटील आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचा क्रांतिकारक वारसा सांगणाऱ्या विशाल, प्रतिष्ठित व वजनदार शिक्षणसंस्था महाराष्ट्रात आहेत. शिक्षणाने घडवून आणावयाच्या सामाजिक परिवर्तनाच्या पहिल्या पर्वात या संस्थांनी महत्त्वाची कामगिरी बजावली. ते पर्व संपले आहे आणि एक नवे वळण घेण्याचे आव्हान त्यांच्यासमोर उभे आहे.

आपले वजन हे कोणाच्या बाजूने घालणार हा यक्षप्रश्न आहे. संस्थाचालक या भूमिकेत त्यांचे हितसंबंध आजच्या व्यवस्थेशी निगडित झाले आहेत. हे हितसंबंध जपावयाचे की, क्रांतिकारक वारसा पुढे न्यावयाचा याचा निवाडा त्यांना करावयाचा आहे. क्रांतिकारक वारसा पुढे न्यावयाचा असेल तर त्यांना आजच्या मतलबी व लब्धप्रतिष्ठित राजकारणी पुढाऱ्यांच्या विरोधात उभे राहावे लागेल. जातीचे भांडवल करून संकुचित स्वार्थाचे मतलबी समाजकारणी राजकारण करण्याच्या डावपेचांची व्यर्थता उघड करून सांगावी लागेल. आणि जातपातीच्या पलीकडे जाऊन पोचणाऱ्या पुरोगामी क्रांतिकारक शक्तींचे संघटन करावे लागेल.

महाराष्ट्रीय समाजात बहुसंख्यांक असलेल्या व राजकीय सत्ता हाती असलेल्या मराठा व तत्सम जातींच्या 'बहुजनसमाजा'तील व्यक्तींनीच पुढाकार घेणे आवश्यक आहे. कारण मग मतलबी धुरीणांना नेहमीप्रमाणे तो वाद जातीय वळणावर नेण्याचा घाणेरडा खेळ खेळता येणार नाही.

ही ऐतिहासिक जबाबदारी पार पाडावयास बहुजनसमाजातील क्रांतिकारक तरुण पुढे येतील अशी आशा करूया.

✠ ✠ ✠

अनुक्रमणिका

# शिक्षणाची समान संधी
## देवदत्त दाभोलकर

**समान संधीचा आशय**

समान संधी उपलब्ध करून देण्याच्या प्रयत्नाची रूपरेखा देण्याआधी काही गोष्टी स्पष्ट करणे आवश्यक आहे. त्यातील काही सहज लक्षात येण्यासारख्या आहेत. परंतु तरीही त्यांचा एकवार निर्देश करणे उचित होईल. त्या अशा :

१. शिक्षणाची समान संधी याचा अर्थ पात्रतेचा विचार न करता सर्वांना सारख्याच ज्ञानशाखांचे सारख्याच पद्धतीचे शिक्षण देणे असा नव्हे. विद्यार्थ्यांच्या नैसर्गिक प्रवृत्तींना अनुरूप असे विविध अभ्यासक्रम असतील. कमीअधिक बुद्धीच्या विद्यार्थ्यांना पेलतील असे कनिष्ठ, मध्यम व वरीष्ठ पातळीचे अभ्यासक्रमही असतील. आजही ते तसे असतात. परंतु बुद्धीची कसोटी आज केवळ परीक्षेतील गुणसंख्येच्या आधाराने मापली जाते. विद्यार्थ्यांच्या आर्थिक व सामाजिक अडचणींचा विचार या तुलनेत होत नाही व झाला तर फारच ढोबळपणे होतो.

२. सर्वांना शिक्षणाची समान संधी देणे याचा अर्थ आज जे वर आहेत त्यांना खाली ओढून सर्वांना समपातळीत आणणे असा नव्हे. सुदैवाने आज तो तसा करण्याची गरजही नाही. विकसनशील अर्थव्यवस्थेत सुशिक्षित व प्रशिक्षित लोकांची एवढी वाढती गरज असते की आपण जितक्या अधिक लोकांना शिक्षण देऊन तयार करू तितके हवेच आहे. परिस्थिती अशी राहिली नाही व कोणत्याही कारणाने विकासाची गती रोखली गेली तर आपले धोरण काय राहावे असा ह्यावर तात्त्विक प्रश्न विचारता येईल. याला तात्त्विक उत्तर अर्थातच भूदानाच्या संदर्भात विनोबाजींनी दिले त्याच पद्धतीचे कदाचित् द्यावे लागेल. आपल्याकडे वाटण्यासाठी दारिद्र्याखेरीज दुसरे काही नसेल तर दारिद्र्य समविभागात वाटून घेणे हे आपले कर्तव्य आहे असा या उत्तराचा आशय आहे. या उत्तरामागील भावनेची उत्कटता स्पष्ट आहे. तशा निकराने पाहिल्यासच केवळ, आपले हितसंबंध साचेबंद समाजरचनेत सांभाळत राहणे एवढेच आपले कर्तव्य नसून, परिवर्तनशील व गतिमान समाजव्यवस्थेसाठी आपण क्रियाशील राहणे व आज आपल्याला मिळेल ते अनेक वंचित वर्गांना उत्तरोत्तर अधिकाधिक कसे मिळेल याविषयी विचार करणे ही आपली प्रमुख जबाबदारी आहे ही गोष्ट वरिष्ठ वर्गांच्या लक्षात येईल.

३. प्रगतिशील अर्थव्यवस्थेत एकाला वर चढविण्यासाठी दुसऱ्याला खाली ओढण्याची गरज नसते ही गोष्ट खरी असली तरी, पुरेशी दक्षता जर घेतली गेली नाही तर प्रगतीच्या प्रक्रियेत वर असणारे आणखी वर जातात व खालचे वर्ग तसेच दडपले राहण्याचा धोका निर्माण होतो. इंग्लंडच्या इतिहासात ही गोष्ट आपल्याला आढळून येते. ब्रिटिश साम्राज्य चालविण्यासाठी लागणाऱ्या अधिकारी वर्गाचा पुरवठा ब्रिटनमधील वरिष्ठ व इटन-हॅरो यासारख्या शाळा व ऑक्सफर्ड-केंब्रिज यांसारखी विद्यापीठे यातूनच झाला. जसे अधिकारी वर्गांबाबत झाले त्याचप्रमाणे औद्योगिक विकासासाठी आवश्यक असणाऱ्या तंत्रज्ञ वर्गाबाबतही होऊ शकते. यासाठी एकूण समतेच्या, समाजवादी रचनेच्या दृष्टीनेही शिक्षणाची समान संधी सर्व वर्गांना लाभेल अशी व्यवस्था करणे आवश्यक आहे. समाजाचाही यात अंतिम अधिक फायदा आहे. कारण निवडीचे क्षेत्र व्यापक झाल्यामुळे समाजजीवनाच्या सर्व क्षेत्रांत अधिक कसदार भरती अधिक मोठ्या प्रमाणावर करण्याची शक्यता निर्माण होते.

सामाजिक न्यायाच्या व सामाजिक स्वास्थ्याच्या दृष्टनेही आज अशी समान संधी सर्वांना उपलब्ध करून देणे आवश्यक आहे. आर्थिक लाभ व सामाजिक प्रतिष्ठा मिळविण्याचा शिक्षण हा एकमेव मार्ग आहे अशी कनिष्ठ वर्गातील पालकांची निश्चित समजूत झालेली आहे. ही वस्तुस्थिती केवळ भारतातच आहे असे नव्हे तर इतर प्रगत समजल्या जाणाऱ्या राष्ट्रांतही आहे. भारतासारख्या राष्ट्रात सामाजिक प्रतिष्ठेची ही भूक इतकी तीव्र असू शकते की एक वेळ आर्थिक लाभाचे निश्चित आश्वासन नसले तरी तेवढ्याने पालक आपल्या मुलाच्या शिक्षणविषयक प्रयत्नांपासून परावृत्त होत नाही. अशा वेळी, आर्थिक लाभ कसा होत नाही हे त्याला समजावून सांगून परावृत्त करण्याचा प्रयत्न करण्यापेक्षा, आपले शिक्षण आर्थिक व्यवहाराच्या दृष्टीनेदेखील उत्पादनक्षम कसे होईल याचा विचार करणे व त्यासाठी आवश्यक ती आपल्या शिक्षणप्रयत्नांची व आर्थिक नियोजनाची पुनर्रचना करणे या

गोष्टी केल्या पहिजेत.

शिक्षणाच्या आज अस्तित्वात असलेल्या रचनेत संधीची समता किंवा विषमता किती प्रमाणात अस्तित्वात आहे याचे काटेकोर शास्त्रशुद्ध मापन करण्याची पद्धती आपल्याला अद्याप उपलब्ध झालेली नाही. शिक्षणाच्या अर्थशास्त्राचा, शैक्षणिक खर्चाचा पाश्चात्त्य देशातून गेली दहापंधरा वर्षे कसोशीने अभ्यास चालू आहे. परंतु तरीही अजूनही त्यांनी ते तंत्र बसवलेले नाही. सर्व आर्थिक, सामाजिक संदर्भ लक्षात घेऊन करावयाच्या समान संधीच्या प्रयत्नाचे तंत्र त्यांनी अद्याप बसवलेले नाही याचे नवल नाही. कारण त्या विचारात येणाऱ्या कित्येक गोष्टी आकडेवारी मोजमापाच्या पलीकडे असण्याचीही शक्यता आहे. परंतु असे असले तरी, अशा अनेक अडचणींना तोंड देत अर्थशास्त्राने ज्याप्रमाणे राष्ट्रीय उत्पन्न मोजण्याचे शास्त्र तयार केले, सर्वसामान्य भाववाढीची बदलती पातळी दाखवणारे निर्देशांक तयार केले, मजुरीचे दर ठरविताना त्या निर्देशांकांचा वापर केला जाऊ लागला, त्याचप्रकारे शैक्षणिक संधीचे मापन करण्याची पद्धत बसवली जाऊच शकणार नाही असे नाही. परंतु आज मात्र अगदी मर्यादित स्वरूपात देखील तसे मापन करणे अवघड होत आहे. अमेरिकेत कमीअधिक उत्पन्नाच्या प्रादेशिक विभागात (डिस्ट्रिक्टस्) समान संधीच्या तत्त्वाला अनुसरून सरकारतर्फे समानता अस्तित्वात आणणारी अनुदाने देण्यात येतात. परंतु तेथेही प्रत्यक्ष अनुदानाच्या रकमेची युक्तायुक्तता ठरवताना आज विषमतेचे असे मोजमाप अस्तित्वात नाही ही अडचण जाणवतेच. भारतासारख्या देशात ही गोष्ट विशेष बिकट, किंबहुना अशक्यप्राय, म्हणून त्या दिशेचा विचार बाजूला टाकण्याचा मोह होणे शक्य आहे. परंतु तो तसा टाळून चालणार नाही, तर तो अधिक कसोशीने केला पाहिजे.

### लोकशाही समाजवादाचा पाया

भारताला अभिप्रेत असलेली 'समाजवादी समाज-रचना' लोकशाही समाजवादाची आहे.

रक्तमय क्रांतीच्या मार्गाने समता प्रस्थापित करावयाचा साम्यवादाचा मार्ग हा इष्ट मार्ग नव्हे हे भारताने ओळखले आहे. परंतु नजीकच्या भविष्यकाळात - निदान एका पिढीच्या काळात - समृद्धी व समता या दिशेने आपल्याला काही स्पष्ट वाटचाल करावयाची असेल, तर त्याची काही पथ्ये कसोशीने पाळली पाहिजेत याची जाणीव आपल्याला जितकी असावयास हवी तितक्या प्रमाणात आहे असे म्हणता येणार नाही. या सर्वच पथ्यांचा शिक्षणाशी निकटचा संबंध येतो असे नाही. योग्य शिक्षणाने या पथ्यांच्या पालनाविषयी सर्वसामान्य जनतेची अनुकूल मनोभूमिका तयार होण्यास मदत होते असा एक सर्वसाधारण फायदा सांगता येईल, परंतु यातील काही पथ्ये अशी आहेत, की त्यांचा शिक्षणाच्या प्रसाराशी आणि शिक्षणाच्या समान संधीशी निकटचा संबंध आहे. सुरुवातीला लोकशाही समाजवादाच्या दृष्टीने आवश्यक अशी कोणती पथ्यं आहेत ते पाहू. ती अशी :

१. आर्थिक विकासाच्या काळात अपरिहार्यपणे जी विषमता प्रादुर्भूत होईल किंवा वाढीला लागेल तिच्याविषयी जागरूक राहणे, ती जरूरीपेक्षा अधिक वाढणार नाही अशी दक्षता घेणे, भावी काळात या विषमतेचा निरास करता येईल अशा योग्य तरतुदींच्या दिशेने तयारी ठेवणे व ही विषमता दैनंदिन जीवनात लोकांच्या डोळ्यात खुपणार नाही (श्रीमंतांच्या भपकेबाज चैनीच्या प्रकारामुळे) याची काळजी घेणे. या सर्व बाबतीत शिक्षणाला करता येण्यासारखे कार्य थोडे आहे. श्रीमंत वर्गाला आपल्या सामाजिक जबाबदारीची जाणीव करून देण्याचे कार्य काही प्रमाणात शिक्षणाकडून अपेक्षिता येईल. परंतु ते प्रमाण अत्यल्पच राहणार.

२. समाजवादाच्या दिशेने वाटचाल होत असताना सरकारी अर्थक्षेत्र हे फार झपाट्याने वाढत असते. केंद्रसरकार, राज्यसरकार, जिल्हापरिषद, अशा वेगवेगळ्या स्तरांवर हे अर्थक्षेत्र काम करू शकते. लोकशाही समाजवादाला उपयोगी अशी सहकाराची चळवळदेखील भारतासारख्या देशात पुष्कळशी सरकारी प्रेरणेने, पैशाने व पाठिंब्याने उभी राहत असते. अशा परिस्थितीत दोन गोष्टी सांभाळाव्या लागतात : अ) या सरकारी छायेतून अधिकाररूढ पक्षाची भावी निवडणूक यंत्रणाच अप्रत्यक्षपणे उभी होत नाही याची काळजी घेणे, व ब) याच्या उलट, सर्व काही व्हावयाचे ते सरकारनेच करावयाचे आहे, सरकारने ते केलेच पाहिजे, आपल्या कर्तृत्वाचा काही भाग त्यात असण्याची आवश्यकता नाही अशी उर्मट अपेक्षेची व तटस्थ कर्तृत्वशून्यतेची भूमिका जनता घेत नाही याची दक्षता बाळगणे. आजच्या भारतीय परिस्थितीत हे दोन्ही धोके अस्तित्वात आहेत हे जाणकार मान्य करतील. लोकशाही समाजवादी समाज-रचनेत नागरिकांचे काही हक्क असतात; ते मिळाले म्हणून त्याने सरकारचे किंवा राज्यकर्त्या पक्षाचे मिंधे असण्याचे कारण नाही. त्याचप्रमाणे त्याची काही कर्तव्येही असतात आणि ती त्याने उत्साहाने, कर्तव्यभावनेने पार पाडली तरच लोकशाही टिकू शकते व समृद्धी निर्माण होऊ शकते. या गोष्टींची जाणीव जनतेला करून देणे आवश्यक असते. जुन्या

पिढीत ही जाणीव शिक्षणक्षेत्राच्या प्रयत्नाने निर्माण होणे दुर्घट आहे. परंतु नव्या पिढीत हे संस्कार शिक्षणक्षेत्राच्या प्रयत्नाने रुजविता येतील.

३. समृद्धीसाठी प्रयत्न करीत असताना देशातील साधनसामग्रीचा, मनुष्यबळाचा, बुद्धिबळाचा अधिकात अधिक वापर करून घेणे आवश्यक असते. यातील कोणताही भाग अज्ञानाने, रूढीच्या बंधनाने, अवहेलनेने दुर्लक्षित ठेवणे विकासाला हानिकारक असते. पुढील दहावीस वर्षांच्या काळात कोणकोणत्या कार्यक्षेत्रांत किती तंत्रज्ञांची, अधिकाऱ्यांची, कारागिरांची, व्यावसायिकांची गरज लागणार आहे याचे अंदाज घेणे हे योजनाकारांचे काम आहे. त्या त्या क्षेत्रातील ह्या अपेक्षा पूर्ण कशा होतील याचा विचार करणे व त्या दिशेने कार्यवाही करणे हे शिक्षणक्षेत्राचे काम आहे. आज अजूनही अशा नेमक्या आखणीच्या दृष्टीने आपण बरेचसे अंधारातच आहोत हे मान्य केले पाहिजे. यामुळे अशा अंदाजांच्या आधारावर आपले प्रवेशविषयक धोरण आखले पाहिजे या शिक्षणमहामंडळाच्या सूचनेचा पायाच धोक्यात येतो. परंतु आपल्या साधनसामग्रीचा अपव्यय टाळावयाचा असेल, व कमी साधनांच्या साहाय्याने अधिक यश संपादन करावयाचे असेल तर त्याच दिशेने वाटचाल चालू राहिली पाहिजे यात शंका नाही.

४. अविकसित राष्ट्रांत लोकशाही समाजवादाच्या दिशेने वाटचाल करीत असताना वरील तीनही गोष्टी महत्त्वाच्या असल्या तरी शिक्षणाची समान संधी ही या संदर्भात सर्वात महत्त्वाची गोष्ट आहे असे म्हणावयास हरकत नाही. लोकशाही समाजवादाच्या सुदृढ उभारणीसाठी भारतासारख्या देशात जर आपण दोन पिढ्यांचा (सुमारे अर्धशतकाचा) काळ आवश्यक मानला तर त्या काळात करावयाच्या पायाभूत प्रयत्नांत आर्थिक विकासाचा प्रयत्न, आर्थिक विषमतेचे अंतर कमी करण्याचा करयोजनेचा प्रयत्न व शिक्षणाच्या समान संधीचा प्रयत्न या तीन गोष्टींना अग्रक्रम द्यावा लागेल. या तिन्हीतही तरतमभावाने क्रम लावावयाचाच असेल तर शिक्षणाच्या समान संधीच्या सुजाण प्रयत्नाला अग्रक्रम द्यावा लागेल. सुजाण या शब्दामागे आडवळणाने शिक्षणाचा प्रयत्न आजच्या तथाकथित बुद्धिमान वर्गापुरता मर्यादित करण्याचा हेतू नाही. परंतु शिक्षणाची दिशा विकासाच्या प्रयत्नाशी सुसंवादी असेल, कोणताही बुद्धिमान विद्यार्थी शिक्षणापासून वंचित राहणार नाही, मागासवर्गातील शोधून काढण्याचा विशेष कसोशीने प्रयत्न होईल, ज्या व्यक्तिगत, कौटुंबिक, सामाजिक, आर्थिक अडचणींमुळे त्यांच्या अंगभूत बुद्धिमत्तेचा आज विकास होत नाही त्या अडचणी दूर करण्याचा कटाक्षाने प्रयत्न केला जाईल, या अशा सर्व गोष्टींचा अंतर्भाव या 'सुजाण' प्रयत्नात आवश्यक मानलेला आहे. शैक्षणिक दर्जा घटतो या भीतीने संख्येवर मर्यादा ठेवून हा प्रश्न सुटणार नाही. त्याचप्रमाणे आपण अनेक विद्यालये व महाविद्यालये खेड्यातून, ग्रामीण भागातून काढली व सामाजिक क्रांतीचे कार्य पूर्ण केले अशा कृतकृत्यतेच्या भावनेतूनही हा प्रश्न सुटणार नाही.

या प्रयत्नातून दोन गोष्टी साध्य होतील. एकतर योजनाबद्ध द्रुत विकासाच्या काळात कुशल तंत्रज्ञांची, अधिकाऱ्यांची, कार्यकर्त्यांची नेहमीच उणीव भासत असल्यामुळे शिक्षणक्रम जर विकासाच्या प्रयत्नांशी सुसंवादी असेल तर एकाला संधी देण्यासाठी दुसऱ्याला मागे ओढण्याचे तत्त्व अंगीकारण्याचे कारणच पडणार नाही. विशिष्ट परिस्थितीत निर्माण झालेली ही प्रतिक्रिया आपोआप विरून जाईल. द्रुत आर्थिक विकास झाला नाही, किंवा होऊनही लोकसंख्येच्या भरमसाठ वाढीमुळे आपले जीवनमान वर सरकू शकले नाही तर भारताचे सर्वच प्रश्न, केवळ बिकटच नव्हे तर, स्फोटक होतील हे या संदर्भात निरंतर लक्षात ठेवले पाहिजे. त्या परिस्थितीत वर्गावर्गातील, जातीजातीतील संघर्ष तीव्रतरच होत जातील व लोकशाही हे केवळ एक दिवास्वप्न ठरेल. म्हणून आपण करावयाचे विवेचन ही गृहीतकृत्ये धरूनच केले पाहिजे. व्यवहारत: हे अशक्य आहे असे मानणारे लोक एका आगामी सर्वनाशाची ग्वाही देत आहेत, किंबहुना आपल्या वृत्ताने तो जवळ आणण्यासही मदत करीत आहेत, एवढेच फारतर म्हणता येईल.

सकस शिक्षणाचे प्रवाह आपण प्रत्येक वर्गातील, जातीतील बुद्धिमान विद्यार्थ्यांपर्यंत पोहोचवू शकलो तर समान संधीचे हे तत्त्व आपण साध्य केले असे म्हणता येईल. त्यासाठी करावयाची योजना ही आज कल्पिलेल्या योजनेपेक्षा कितीतरी अधिक सर्वंकष असावी लागेल. हा शिक्षित वर्ग जातिबंधनांनी जखडलेला राहणार नाही, जातिभावनेला खतपाणी घालून आपले हितसंबंध समाजहिताच्या विरोधी जाऊन टिकविण्याचा प्रयत्न करणार नाही, त्याचप्रमाणे अहंकारी भावनेने, परकीपणाने आपल्या समाजापासून अलग पडून फटकून राहणार नाही, याविषयीही दक्षता घ्यावी लागेल. असे झाले तर पाच हजार वर्षांच्या सामाजिक विषमतेचे अंतर आपण पन्नास वर्षात काटू शकू व त्यानंतरची येणारी पिढी अधिक समपातळीवरून स्पर्धेच्या क्षेत्रात उतरू शकेल.








### संधीच्या समानतेचे तंत्र

शिक्षणाची समान संधी उपलब्ध करून देण्याच्या दिशेने आज अनेक राष्ट्रांत विचार चालू आहे. प्रगत भांडवलशाही राष्ट्रांतून हा विचार चालू आहे, त्याचप्रमाणे साम्यवादी राष्ट्रांतूनही अर्थातच हा विचार चालू आहे. या दोन्ही प्रकारच्या राष्ट्रांतून या दिशेने जागरूक वाटचालही चालू आहे. परंतु संधीची अशी समानता पूर्णपणे प्रस्थापित करण्यात अजून कोणत्याही राष्ट्राला यश आलेले नाही. शिक्षणाची समान संधी निर्माण करण्याच्या दिशेने साम्यवादी राष्ट्रांचा विशेष आग्रह असणे स्वाभाविक आहे. परंतु जवळजवळ पन्नास वर्षांच्या साम्यवादी समाजरचनेच्या दिशेने केलेल्या वाटचालीनंतर अद्यापही रशियात ही संधीची समानता पूर्णपणे अस्तित्वात आलेली नाही.

दीर्घ कालावधीच्या प्रयोगानंतरही रशियाला आपल्या शिक्षणव्यवस्थेत समान संधीच्या दृष्टीने विचार करता दोन दोष आढळून आले. एक दोष असा की अधिकारी वर्ग व बुद्धिजीवी वर्ग यांच्या मनात आपल्या मुलांना शारीरिक श्रमाची कामे करावयास लागणे फार कमीपणाचे वाटते असे आढळून आले. आपले वजन खर्ची घालून वा लाचलुचपतही करून आपापल्या मुलांना ते उच्च शाळांतून वा विद्यापीठातून प्रवेश मिळवून देण्याचा प्रयत्न करीत. कारण त्यानंतर श्रमाचे व्यवसाय टाळून पांढरपेशा वर्गात सामील होणे शक्य होई. याशिवाय दुसरे असेही आढळून आले की शेतकरी किंवा कामकरी वर्गांतील फारच थोडी मुले दुय्यम शिक्षण घेतल्यानंतर उच्च शिक्षण घेऊ शकत असत. साम्यवादी युवक संघटनेच्या १३ व्या सभेपुढे भाषण करताना १९५८ मध्ये क्रूश्चेव्हने ह्या 'लाजिरवाण्या परिस्थिती'चा निषेध केला आणि ही घटना समाजवादी जनताभिमुख समतेच्या तत्त्वाच्या विरोधी असल्याचा आरोप केला. यात सुधारणा करण्यासाठी डिसेंबर १९५८ मध्ये एक कायदा पास करण्यात आला. या कायद्यान्वये उच्च शाळांतून गुणवत्तेच्या कसोटीवर प्रवेश देण्यात यावयाचा आहे. तसेच विद्यार्थ्यांची निवड करताना कामगार संघटना व साम्यवादी युवक संघटना यांचे प्रतिनिधी त्या निवड समितीवर असावयाचे आहेत. आपल्याकडे ज्याला आपण आर्टस् व सायन्स अभ्यासक्रम म्हणतो त्या अभ्यासक्रमाखेरीज इतरत्र प्रवेश देताना ज्यांना प्रत्यक्ष कामाचा निदान दोन वर्षांचा अनुभव आहे त्यांनाच प्रवेश देण्यात यावयाचा आहे. यातही आधी नोकरीस असलेल्या व तेथील व्यवस्थापकांकडून पुरस्कृत होऊन आलेल्या उमेदवारांना अग्रक्रम मिळावयाचा आहे.

या कायद्याचे प्रत्यक्ष फलित काय झाले ह्याची निश्चित माहिती उपलब्ध नाही. परंतु संपूर्ण समान संधीच्या ध्येयाच्या दिशेने रशियालाही अजून बरीच वाटचाल करावयाची आहे एवढे यावरून स्पष्ट व्हावयास हरकत नाही.

समृद्ध भांडवलशाही राष्ट्रातही समान संधीच्या ध्येयाकडे वाटचाल करताना विविध अडचणी आढळून येतात. 'समान संधीचा आधार' म्हणजे नेमके काय व 'समान संधीचे संपूर्ण अस्तित्व' कशास म्हणावे याच्याही निश्चित अशा व्याख्या आजपर्यंत कोणी करू शकलेले नाही. कदाचित् काही गोष्टी ढोबळपणे धरल्याखेरीज अशा व्याख्या करता येणार नाहीत.

समान संधीच्या काटेकोर मापनात अनेकविध मोठ्या अडचणी आहेत हे लक्षात घेऊनही संधीच्या विषमतेतील अंतर कमी करण्याचे व्यावहारिक उपयुक्त प्रयत्न करता येतात. या प्रयत्नांचे स्वरूपही समृद्ध भांडवलशाही राष्ट्रांत व साम्यवादी राष्ट्रांत वेगळे असते. अमेरिकेसारख्या राष्ट्राचा भर अनुदाने, शिष्यवृत्त्या, कर्जाऊ रकमा, यांसारख्या आर्थिक मदतीच्या प्रवाहावर अधिक असतो. समृद्ध राष्ट्रात हे प्रवाहदेखील इतके जोमदार असू शकतात की त्यांचा काही इष्ट परिणाम दिसल्याखेरीज राहत नाही. साम्यवादी राष्ट्रांत आर्थिक मदतीचा उपयोग केला जात असला तरी मुख्य भर समान संधीच्या दृष्टीने उपयोगी अशी शिक्षणसंस्थांची व प्रवेशपद्धतीची रचना करण्यावर असतो. रशियात आज अस्तित्वात असलेल्या व्यवस्थेतील यादृष्टीची काही वैशिष्ट्ये खालीलप्रमाणे सांगता येतील.

१. प्रत्येक स्तरावर गुणवत्तेप्रमाणे प्रवेश देण्याचा प्रयत्न केला जातो.

२. पालकांचे उत्पन्न कमी असल्यास मुलाच्या शिक्षणावर त्याचा प्रतिकूल परिणाम होऊ नये यासाठी वसतिगृहात्मक विद्यालये (Broading Schools) अस्तित्वात आणली आहेत. अशा विद्यालयांत सरासरी ८०० विद्यार्थी असतात व आज अशी सुमारे ६०० विद्यालये अस्तित्वात आहेत. हळूहळू दुय्यम शिक्षणाच्या शाळांपैकी साठ टक्के शाळा वसतिगृहात्मक पद्धतीच्या शाळा कराव्यात असे रशियाचे धोरण दिसते. या शाळांतून विद्यार्थ्यांना गुणवत्तेप्रमाणे प्रवेश मिळतो. परंतु गरीब कुटुंबातील मुलांना प्रवेशात अग्रक्रम मिळतो. गरजू विद्यार्थ्यांचे जेवण, खाणे, कपडालत्ता, निवास, पुस्तके, इत्यादी सर्व खर्च सरकार करते. इतर विद्यार्थ्यांच्याकडून त्यांच्या पालकांच्या उत्पन्नाच्या प्रमाणात आकार घेण्यात येतो. विद्यार्थ्यांना साधेपणा व स्वावलंबन यांचे शिक्षण दिले जाते.

३. दिवसभराच्या शाळाही रशियात अस्तित्वातआहेत.






अनुक्रमणिका

या शाळेतून विद्यार्थी सकाळी लवकर हजर झाला की तो सकाळी शाळेत शिकतो, दुपारचे जेवण शाळेत घेतो, नंतर दुपारी पुन्हा अध्ययन करून, खेळ आटोपून संध्याकाळी घरी जातो.

४. बुद्धिमान विद्यार्थ्यांच्यासाठी विशेष शाळा चालविण्यात येतात. गुणवत्तेच्या क्रमाने प्रवेश दिला जातो. मुले व मुली दोघांनाही प्रवेश मिळू शकतो. दोन विद्यार्थी समान गुणवत्तेचे असले तरी ग्रामीण विभागातील किंवा कामकरी वर्गातील विद्यार्थ्याला प्रथम संधी देण्यात येते.

५. विद्यापीठाच्या स्तरावर गुणवत्तेप्रमाणे प्रवेशाचे व संधीचे चित्र तसेच पुढे चालू राहते. दुय्यम शिक्षणानंतर जे विविध व्यवसायात शिरतात त्यांनाही संध्याकाळचे वर्ग, टपालाने शिक्षण (कॉरस्पाँडस कोर्सेस) या पद्धतीने उच्च् शिक्षणाचा लाभ घेता येईल अशी तरतूद केलेली आहे.

परंतु असे असले तरी सामाजिक व कौटुंबिक परिस्थितीतील फरकामुळे पडणारा संधीतील फरक रशियालाही पूर्णपणे दूर करता आलेला आहे असे नाही. मुलाचे मुख्य शिक्षण हे त्याच्या वयाच्या पाचव्या वर्षापर्यंतच होत असते या बर्ट्रांड रसेल यांच्या म्हणण्यात खरोखरच काही विशेष अर्थ आहे. त्यादृष्टीने पूर्वप्राथमिक शिक्षणाच्या क्षेत्रातील आजच्या रशियातील समान संधीच्या उणिवा ह्या अंतिम समान संधीच्या दृष्टीने मारक आहेत असेच म्हणावे लागेल. या पातळीवरचे शिक्षण सक्तीचे नाही वा मोफतही नाही. या वयोगटातील बालकांच्या पैकी वीस टक्केच बालके पूर्वप्राथमिक शाळांतून असतात. इतरांच्यावर त्यांच्या कौटुंबिक व सभोवतालच्या सामाजिक परिस्थितीचा जो काही परिणाम होत असेल तेवढेच काय ते त्यांचे शिक्षण. या शिक्षणाची पातळी यामुळे फारच विभिन्न राहिल्यास आश्चर्य वाटावयास नको.

कौटुंबिक व सामाजिक पार्श्वभूमीमुळे निर्माण होणारी विषमता दूर करण्याचे निश्चित असे तंत्र अद्याप उपलब्ध झालेले नाही. शिक्षण हे विसाव्या शतकापर्यंत सर्वच देशांतून काही वर्गांची मिरासदारी होऊन राहिलेले होते. स्त्रीवर्ग त्यापासून वंचित होता. कनिष्ठ वर्ग त्यापासून वंचित होते. सामाजिक पार्श्वभूमीमुळे शिक्षणात फरक पडे, शिक्षणातील फरकामुळे धनार्जनाच्या कुवतीत फरक पडे व सामाजिक श्रेष्ठतेबरोबर आर्थिक वर्चस्वही वरिष्ठ वर्गाच्या हाती येई. सामाजिकदृष्ट्या प्रगत व आर्थिक दृष्ट्या सधन असणाऱ्या या वर्गातील कुटुंबातून येणारी मुले साहजिकच शैक्षणिक संधीच्या दृष्टीने कितीतरी अधिक अनुकुल वातावरणात असतात. पाट्या, पुस्तके, चित्रे, खेळणी यांच्या बाबतीत तर परिस्थिती अनुकूल असतेच, परंतु सर्वात महत्त्वाची अनुकूलता कुटुंबातील इतर मुरलेल्या शैक्षणिक संस्कारांची असते. या अनुकूलतेची उणीव इतर विद्यार्थ्यांना भरून काढणे अतीव दुष्कर असते. ही मुले शिक्षणाच्या वरच्या स्तरावर कमी प्रमाणात जातात. रशियातदेखील, आजवरच्या प्रयत्नानंतरही, कामकरी कुटुंबातील मुले उच्च शिक्षणाकडे कमी प्रमाणात वळतात असे आढळून आले आहे.

या विषयीचे काही अभ्यास झाले आहेत व त्यांचे निष्कर्ष वरील विधानाला पोषक असेच आहेत. परंतु जितक्या मोठ्या प्रमाणावर व जितक्या तपशीलाने हे अभ्यास व्हावयास हवे आहेत तितक्या पद्धतीने हे कार्य झालेले नाही. कनिष्ठ वर्गातील बुद्धिमान मुलांच्या शिक्षणाच्या संबंधात ही गोष्ट प्रकर्षाने लक्षात येते. या बुद्धिमान मुलांना शिक्षण न मिळण्यात एक सामाजिक अन्याय तर आहेच परंतु समाजाचे मोठे नुकसानही आहे. कारण त्यामुळे समाजातील संपूर्ण बुद्धिसामर्थ्याचा नीट विकास होऊन ते समाजाच्या कारणी लागू शकत नाही.

प्रतिकूल कौटुंबिक व सामाजिक परिस्थितीचा परिणाम दूर करावयाचा तर लहानपणापासून चांगल्या वसतिगृहात्मक शाळेत मुलाला घालावे लागेल. तेथील सर्व खर्चाची तरतूद सरकारने करावी लागेल. इतकेच नव्हे तर, कुटुंबाला आर्थिक हातभार लावण्यासाठी मुलाला लवकर शिक्षण सोडण्याची पाळी आली तर, त्याला नोकरी करून मिळू शकले असते इतके वेतन त्याला शिष्यवृत्ती म्हणून देण्याची तरतूद झाली पाहिजे.

या सर्व गोष्टी साध्य करणे किती अवघड आहे हे सहज लक्षात येऊ शकेल. भारतासारख्या दरिद्री देशात तर हे दुर्घट आहेच. पण इतर समृद्ध देशांतही या सामाजिक प्रतिकूलतेचा परिणाम पूर्णपणे दूर करणे शक्य होणार नाही असेच सर्वसाधारण मतआहे. या संदर्भात युनेस्कोच्या प्रकाशनात काढलेले उद्‌गार उद्‌धृत केले की पुरेसे आहे.

'जोपर्यंत कुटुंब हा समाजाचा जिवंत घटक आहे तोपर्यंत कौटुंबिक वातावरणापासून मुलांना पूर्णपणे अलग काढणे व त्या वातावरणाचा त्यांच्यावर परिणाम होऊ न देणे शक्य होणार नाही. दोन मुलांची बुद्धिमत्ता सारखी असली तरी, डॉक्टरचा, शिक्षणाधिकाऱ्याचा मुलगा हा शेतकऱ्याच्या किंवा कामकऱ्याच्या मुलापेक्षा अधिक उच्च शिक्षण घेऊ शकतो व त्यामुळे नंतर समाजात अधिक प्रतिष्ठेचे स्थान मिळवू शकतो हा सर्व देशांचा अनुभव आहे. परंतु या गोष्टीकडे समाजाचे तसे नीट लक्ष जात नाही. हे का होते याचा जर सूक्ष्म विचार झाला तरच त्यावर उपाय सापडण्याची शक्यता आहे. आज सर्व जगात शिक्षण हे समाजाभिमुख झाले पाहिजे, सार्वत्रिक झाले पाहिजे,

त्याचा प्रसार झाला पाहिजे अशा प्रेरणा अढळून येतात. परंतु या गोष्टींची कार्यवाही कशी करावयाची याचा नीट विचार जर झाला नाही तर या प्रेरणा वांझ, निष्फळ ठरल्याखेरीज राहणार नाहीत.'

**शिक्षणाच्या विविध स्तरांवरील विषमता व तिचे निराकरण**

पूर्वप्राथमिक शिक्षणाची तरतूद आपल्या देशात फारच अल्पसंख्य मुलांच्या बाबतीत शक्य झालेली आहे. या वयातील मुलांसाठी आज अस्तित्वात असलेल्या शाळा ह्या मुख्यत्वेकरून शहरात असतात व तेथेही उच्च मध्यम वर्गातील किंवा श्रीमंत वर्गातील मुलेच या शाळांचा लाभ घेतात असे आढळून येते. या शाळांना सामान्यपणे सरकारी अनुदान नसते. असलेच तर अत्यल्प असते. साहजिकच या शाळांतील फी फार असते. गरीब लोकांनाआपल्या मुलांना या शाळांतून पाठवण्याचा विचार करणेदेखील अशक्य असते. सर्व मुलांना या शाळा उपलब्ध होतील असे करावयाचे झाल्यास त्या प्रमाणात अनुदाने उपलब्ध करावी लागतील (किंबहुना, प्राथमिक शिक्षणाप्रमाणे पूर्वप्राथमिकही पूर्णपणे सक्तीचे व मोफत करावे लागेल). परंतु राष्ट्राच्या आजच्या आर्थिक अवस्थेत हे शक्य होणार नाही. (रशियात देखील आज हे केवळ तीस टक्के मुलांच्या बाबतीत साध्य झाले आहे. हे आपण पाहिलेच आहे.).

आजच्या आपल्या व्यवस्थेत असमान संधीचा पाया ज्याप्रमाणे कौटुंबिक व सामाजिक परिस्थितीतच घातला जातो त्याप्रमाणे त्या पायाच्या वरील इमारतीतील विषमतेलाही पूर्वप्राथमिक शिक्षणाच्या स्तरापासूनच सुरुवात होते. या प्रारंभिक अनुकूलतेचे परिणाम दूरगामी व शेवटपर्यंत टिकणारे असे राहतात.

भारतात प्राथमिक शिक्षण हे अर्थातच सार्वत्रिक सक्तीचे व मोफत आहे. येथेही श्रीमंत वर्गाची मुले फी घेणाऱ्या शाळांत जाऊन विशेष चांगले शिक्षण घेऊ शकतात हे या प्रश्नाचे एक अंग होय. या शाळा बंद करणे व सर्वांना सरकारी मोफत शाळांतूनच आपली मुले पाठविण्यास भाग पाडणे ही गोष्ट आपण केली पाहिजे असाही काहींचा आग्रह असतो. यामुळे या शाळांच्या सुधारणेकडे वरिष्ठ वर्गाचे लक्ष जाईल व वरिष्ठ वर्गातील मुलेही इतर वर्गातील मुलांत मिसळल्यामुळे त्या मुलांच्या मनातील वरिष्ठ वर्गीय भावनाही कमी व्हावयास मदत होईल अशी कल्पना या आग्रहामागे असते. ही सूचना अर्थातच आजच्या परिस्थितीत व्यवहार्य म्हणून स्वीकारली जाण्याची शक्यता नाही.

या वरिष्ठ वर्गीय प्राथमिक शाळा सोडल्या तर उरलेल्या विभागात नव्व्याण्णव टक्क्यांहून अधिक मुले शिक्षण घेत असतात. या मुलांच्या शिक्षणाच्या प्रश्नाचा दोन अंगांनी विचार करावा लागतो. १) वयाच्या सहाव्या वर्षी प्रत्येक मुलगा किंवा मुलगी शाळेत भरती होईल आणि वयाची चौदा वर्षे पूर्ण होईपर्यंत ती मध्येच शाळा सोडून बाहेर पडणार नाहीत याची दक्षता घेणे ; व २) प्राथमिक शिक्षणाचा कस वाढविण्याच्या दृष्टीने प्रयत्न करणे.

आज दोन्ही दृष्टींनी पुष्कळच कार्य करावयाचे राहिले आहे. आजही सर्व मुले व मुली प्रवेश घेतातच असे नाही. तो प्रवेश सक्तीचा केला तरी प्रवेश केलेल्यांपैकी पुष्कळच अर्धवट शिक्षण सोडून मध्येच बाहेर पडतात. त्यांच्यावरचे साक्षरतेचे संस्कार हे फारच पुसट असतात. आज जे शिक्षण उपलब्ध आहे त्याचा लाभही सर्वांना सारखा मिळतो असे नाही. त्यात राज्यनिहाय, जिल्हानिहाय, तालुकानिहाय फरक आहेत. नागरी व ग्रामीण विभागात फरक आहे. मुले व मुली, प्रगत जाती व अप्रगत जाती यांना मिळणाऱ्या शिक्षणाच्या संधीत फरक आहे. हा फरक संख्येच्या टक्केवारीत असेल, त्याप्रमाणे शिक्षणाच्या कसातही असू शकेल. सर्व राज्यांतून प्राथमिक शिक्षणाच्या क्षेत्रात तरी समानता निर्माण करण्याचे प्रयत्न पुढील दोन-तीन पंचवार्षिक योजनांच्या काळात होणे आवश्यक आहे.

दुय्यम व उच्च शिक्षणाच्या क्षेत्रात या समान संधीच्या प्रयत्नाचे स्वरूप अधिक मर्यादित व स्पष्ट करता येते. आर्थिक व सामाजिक दृष्ट्या अडचणीत असलेल्या वर्गातून येणाऱ्या विद्यार्थ्यांची योग्य निवड कशी होईल व त्यांना समान संधी कशी मिळेल हे या प्रश्नाचे या पातळीवर मुख्यत्वेकरून स्वरूप राहते. वर्गवार या संधीची विभागणी कशी होते याचाही आपण काहीसा ढोबळ विचार केला असला ती त्याचा जितका तपशीलवार अभ्यास व्हावयास पाहिजे तितका अद्याप भारतात करण्यात आलेला नाही. परंतु जे काही थोडे अभ्यास करण्यात आलेले आहेत त्यांवरून दुय्यम व उच्चशिक्षणातील संधीचा प्रमुख वाटा समाजातील नागरी उच्च मध्यम वर्ग, श्रीमंत वर्ग, अधिकारी वर्ग, उच्च पेशातील वर्ग अशा सुमारे लोकसंख्येतील वरच्या दहा टक्क्यांच्या गटालाच मिळत असला पाहिजे असा अंदाज आहे.

ही विषमता कशी दूर करावी हा आपल्यापुढील खरा बिकट प्रश्न आहे. यातील बिकटपणा अनेक कारणांमुळे निर्माण झालेला आहे. एकतर विशिष्ट शिक्षित लोकांची भिन्न भिन्न आर्थिक क्षेत्रात किती गरज लागेल याचे अनेक अंदाज बांधण्याइतके आपले नियोजन अद्याप प्रगत झालेले नाही. त्यामुळे अमुक दिशेने गेले असता अमुक फळ निश्चितपणे हाती पडेल असे आश्वासन कोणाच्याच मनात राहत नाही. साहजिकच

बाह्यत: जी क्षेत्रे फलदायी व आकर्षक वाटतात त्यांच्याकडे सर्वांची धाव राहते साधनांच्या प्रवेशाअभावी वैफल्याची भावना येते. निवडक प्रवेशाच्या स्तरावर होणाऱ्या विरोधामागे निश्चित काम मिळण्याची शक्यता आहे याची कल्पना जर आपण सत्यार्थाने करू शकलो व प्रत्येक पातळीवर विद्यार्थ्याला तसे मार्गदर्शन करू शकलो तरच हा प्रश्न वैफल्याची भावना निर्माण होऊ न देता सोडविता येईल.

अर्थात त्या मर्यादेतही निवडक प्रवेशाचे तत्त्व विद्यार्थ्यांची कौटुंबिक व सामाजिक पार्श्वभूमी लक्षात घेऊन सामाजिक न्यायाच्या दृष्टीनेच वापरावे लागेल. सरसकट गुणानुक्रमे प्रवेश देऊन चालणार नाही. वसतिगृहात्मक शाळा, दिवसभराच्या शाळा (Long day Schools), शिष्यवृत्त्या, या मार्गांनी पहिल्यापासूनच या वर्गातील मुलांना विकासाची दिशा देण्याचा प्रयत्न झाला पाहिजे. वर्गीकृत जाती-जमातींच्या शिक्षणाविषयीचा जो दृष्टिकोन चौथ्या पंचवार्षिक योजनेच्या आराखड्यात मांडण्यात आलेला आहे त्यावरून या प्रश्नाची जाणीव आज नियोजनकारांना व शिक्षणतज्ज्ञांना बऱ्याचशा प्रमाणात झालेली आहे हे दिसून येते. परंतु शेवटी पुरेसे पैसे व पुरेसे कार्यकर्ते उपलब्ध होण्याच्या प्रश्नाशीच हा प्रश्न येऊन अडतो व शिक्षणातील समान संधीविषयी किती अगत्य आहे यावर अवलंबून राहतो.

हे असले तरी या विषयीच्या चौथ्या पंचवार्षिक योजनेतील कल्पना समजून घेणे उपयोगी होईल. वर्गीकृत जमातींविषयी योजनेचा दृष्टिकोन तेथील शैक्षणिक प्रयत्नांची सांगड तेथील आर्थिक विकासाच्या प्रयत्नाशी घातली पाहिजे असा आहे. हे कसे करावयाचे याचा तपशील मात्र देण्यात आलेला नाही. त्याचप्रमाणे वर्गीकृत जमाती एकत्र समूहाने राहण्यापेक्षा विखुरलेल्या छोट्याछोट्या वाड्यातून राहत असतात आणि यामुळे घराच्या जवळ विद्यालय असणे त्या विभागात कठीण असते. यासाठी शक्य तितक्या प्राथमिक शाळा वस्तीच्या जवळ असाव्यात परंतु माध्यमिक व दुय्यम शिक्षणाच्या शाळा मात्र एखाद्या मध्यवर्ती वस्तीच्या ठिकाणी पुरेशा वसतिगृहाच्या सोयींसह स्थापन करण्यात याव्यात असे सुचविले आहे. तसेच या विभागात काम करणाऱ्या अध्यापकांचे शिक्षण, वसतिगृहांची सोय, शास्त्र व गणित यांच्या अध्ययनाची तरतूद व व्यावसायिक तांत्रिक शिक्षणक्रमाची सोय यावर विशेष भर देण्यात यावा असे सुचवले आहे.

वर्गीकृत जातींच्या संदर्भातही चौथ्या पंचवार्षिक योजनेच्या आराखड्यात केलेल्या सूचनांत आजवरच्या कामाचा आढावा आहे व पुढील कार्याच्या दिशेची सूचना आहे. या वर्गातून शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांचे प्रमाण उत्तरोत्तर वाढत आहे. विद्यार्थ्यांना एस.एस.सी. पर्यंत शिक्षणासाठी राज्यसरकारे आर्थिक मदत देत आहेत. याखेरीज एस.एस.सी. नंतरच्या उच्च शिक्षणासाठी केंद्र सरकार आर्थिक साहाय्य देत आहे. सध्याच्या यंत्रणेत सुधारणा करावयास वाव आहे व ती केली पाहिजे हे योजनेने मान्य केले आहे. त्याखेरीज केवळ सध्याच्या स्वरूपाच्या आर्थिक साहाय्याच्या कार्यक्रमावरच विसंबून न राहता या विद्यार्थ्यांच्या व्यक्तिगत विकासाकडे लक्ष दिले जाण्याची, त्यांच्यासाठी विशेष अध्यापनाची व्यवस्था करण्याची आवश्यकता असते व असे केल्यासच या विद्यार्थ्यांचा विकास नीट होऊ शकेल याचा निर्देश योजनेने केला आहे.

अधिकाधिक आर्थिक साहाय्य अधिकाधिक विद्यार्थ्यांच्या संख्येपर्यंत प्रभावी उपयोगी पद्धतीने पोचविणे हाच वर्गीकृत जाती व जमाती यांच्यापर्यंत शिक्षणाची संधी समान प्रमाणात पोचविण्याचा महत्त्वाचा मार्ग आहे. आर्थिक साहाय्य कितपत उपलब्ध होऊ शकते हे राष्ट्राच्या एकूण आर्थिक परिस्थितीवर व त्याचप्रमाणे राष्ट्राला या गोष्टीची निकड किती वाटते याच्यावर अवलंबून राहील. दुर्दैवाने आजही अशी तीव्रपोटतिडीक या प्रश्नाबाबत राष्ट्राच्या धोरणात निर्माण झालेली आहे असे दिसत नाही.

हा केवळ सरकारी धोरणाचा किंवा यंत्रणेच्या कार्यक्षमतेचा प्रश्न नसून एकूण समाजाच्या सर्वसाधारण वृत्तीचा प्रश्न आहे हेही आपण ओळखले पाहिजे. सरकारी साहाय्याचा व यंत्रणेचा प्रभावी उपयोग व्हावयाचा असेल तर विद्यार्थ्यांकडे आपुलकीने व्यक्तिगत लक्ष देण्याचे काम सरकारी कर्मचाऱ्यांवर सोपवून चालणार नाही. ते काम मिशनरी वृत्तीच्या कार्यकर्त्यांनी व संस्थांनीच अंगावर घेतले पाहिजे. भारतातील मागास प्रदेशात, जातिजमातीत सेवावृत्तीने येऊन राहणारे परदेशातून आलेले लोक आढळतात. परंतु आपल्या लोकांनी, उच्चवर्णीयांनी व उच्चवर्गीयांनी (आणि यात या वर्गीकृत जाती-जमातींच्या बाहेरील सर्व जातींचे, वर्गांचे लोक आले,) केलेले काम सूक्ष्मदर्शक यंत्राखालीच शोधावे लागते ही वस्तुस्थिती ही भारतीय समाजमनाचीच निदर्शक नाही काय?

### निवडक प्रवेशाचे धोरण

अप्रगत देशांत किंवा अर्धप्रगत देशांत शिक्षणाच्या क्षेत्रात संख्या व गुणवत्ता यांच्यामधील संघर्ष वेगवेगळ्या रूपात पुढे येतो. काही देशांत, सार्वत्रिक प्राथमिक शिक्षणावर भर द्यावा

की काही थोड्या लोकांना चांगले दुय्यम व उच्च शिक्षण द्यावे असा प्रश्न निर्माण होतो. वाईट शिक्षकांच्या करवी अनेकांना शिक्षण देत बसावे का चांगल्या शिक्षकांकरवी काही थोड्याच लोकांना परंतु चांगले शिक्षण द्यावे असा प्रश्न होऊ शकतो. पदवीसाठी सकस अभ्यासक्रम ठेवावा की अनेकांना पदवी घेणे सुलभ व्हावे म्हणून तो अभ्यासक्रम पातळ करावा ही गोष्ट विचारात घ्यावी लागते. सर्वसाधारणपणे सर्वत्र असे आढळून येते की राजकीय व सामाजिक दबाव संख्यावाढीच्या दिशेने येत असतात तर आर्थिक विकासासाठी आवश्यक असणारी तंत्रज्ञांची गरज गुणवत्तेचा, शिक्षणाच्या कसाचा आग्रह धरणे कसे अटळ आहे हे ध्यानात आणून देत असते.

गोदिनो या पाश्चिमात्त्य अभ्यासकांनी भारतात त्यांनी केलेल्या निरीक्षणाच्या आधारे काही निष्कर्ष काढले आहेत. भारतातील विद्यापीठे हा अभ्यासाचा विषय म्हणून त्यांनी घेतला होता. निवडक प्रवेशाच्या धोरणाचा मुख्य संबंध उच्च शिक्षणाच्या स्तराशीच येत असल्यामुळे या प्रश्नाच्या विषयी गोदिनो यांनी केलेले विवेचन विषयाच्या जवळजवळ सर्व बाजू विचारात घेणारे झाले आहे. अल्प काळात या प्रश्नाचे मूलगामी स्वरूप त्यांनी इतक्या पूर्णपणे आत्मसात करावे याचे कौतुक वाटल्याखेरीज राहत नाही. एका त्रयस्थ निरीक्षकाचे निरीक्षण या दृष्टीनेही त्याचे महत्त्व आहे. ते लिहितात :

"भारतातील उच्च शिक्षणविषयक प्रयत्नांत दोन विचारप्रवाह आढळून येतात. विद्यार्थ्यांना अधिक संख्येने प्रवेश द्यावा, त्याचा प्रसार करावा व ते समाजापर्यंत नेऊन पोचवावे असा एक विचार प्रवाह आहे. दुसरा प्रवाह अधिक व्यावसायिक शिक्षण घ्यावे, शिक्षणाचा कस वाढवावा आणि काही विशेष क्षेत्रातील विकास व संशोधन यांच्याकडे अधिक लक्ष द्यावे असा आहे.

"आजवर ज्यांना शिक्षणाची संधी मिळाली नाही त्यांना शिक्षण मिळण्याची व्यवस्था झाली पाहिजे ही सर्वांत मोठी मागणी आहे. तिच्यामागे राजकीय सामर्थ्यही आहे. पालक, स्थानिक पुढारी, राज्यस्तरावरील शासकीय अधिकारी, खासगी संस्था, काही शिक्षक वर्ग यांना शिक्षणाचा झपाट्याने प्रसार व्हावयास हवा आहे. प्राथमिक शिक्षणाच्या पातळीवर तर हवाच आहे, परंतु उच्च शिक्षणाच्या पातळीवरही हवा आहे.

"या प्रसाराची दोन अंगे असू शकतात. प्रत्येक विद्यार्थ्याला त्याच्या गुणवत्तेप्रमाणे शिक्षणाची संधी उपलब्ध करून देणे हे एक अंग होय. त्याचप्रमाणे आजपर्यंत या संधीपासून जे वर्ग वंचित राहिले त्या वर्गांना, जातीजमातींना त्यांच्यासाठी प्रवेशात वाटा ठरवून काही किमान संधी निश्चितपणे उपलब्ध करून देणे हे दुसरे अंग होय. या दुसऱ्या विचारसरणीप्रमाणे सर्व नागरिक सारख्याच सुस्थितीत नसताना यासाठी परिस्थितीच्या प्रतिकूलतेचा परिणाम नाहीसा करण्यासाठी अशा वर्गांना विशेष सवलती देणे आवश्यक आहे. सरकारने कायद्याने ठरवून दिलेला प्रवेशातील 'कोटा' हे या सवलतीचे एक स्वरूप राहू शकेल. अशा रचनेत नव्याने राजकीय सामर्थ्य प्राप्त झालेल्या जातीजमातींना काही अधिक सवलती मिळू शकतात.

"महाविद्यालयात प्रवेश घेणाऱ्या अनेक विद्यार्थ्यांच्या दृष्टीने विद्यापीठाची पदवी ही कारकुनाची नोकरी मिळवावयास असणारी संधी या दृष्टीने तिचे महत्त्व असते. केवळ एस.एस.सी. झालेल्या विद्यार्थ्याला इतक्या सुलभपणे ही नोकरी मिळत नाही म्हणूनच पदवीची किंमत. विद्यार्थ्याला वाटत असते तितक्या सुलभपणे ही नोकरी मिळू शकतेच असे नाही, परंतु तसे झाले तरी पदवी नसलेल्या उमेदवारापेक्षा पदवीधराला ती संधी मिळण्याची शक्यता साहजिकच अधिक असते. याखेरीज एस.एस.सी. झाल्यानंतर महाविद्यालयात जाण्याखेरीज दुसरे काही करून हा विद्यार्थी आपला वेळ सत्कारणी लावू शकेल अशी शक्यताही फार कमी असते.

"आज महाविद्यालये अनेक आडवळणाच्या जिल्ह्यांतून व गावांतून निघत आहेत. अर्थातच तेथील शिक्षणाचा दर्जा खालच्या प्रतीचा आहे. परंतु लोकांची आजची निकडीची भूक दर्जाची नाही. आपल्या मुलांना पदव्या मिळाव्यात ही त्यांची इच्छा आहे. विद्यार्थ्यांच्या मनातही कमीत कमी अभ्यास करून इंग्रजीचा कमीत कमी स्पर्श होऊ देऊन पदवीपर्यंत कसे पोचता येईल एवढाच विचार असतो. दर्जेदार शिक्षणासाठी करावे लागणारे प्रयत्न त्यांना टाळावयाचे असतात. महाविद्यालयांच्या संख्येतील वाढ व ग्रामीण भागात महाविद्यालयांची स्थापना ह्या स्वातंत्र्योत्तर काळातील उच्च शिक्षणाच्या क्षेत्रातील महत्त्वाच्या घटना आहेत.

"शिक्षणाचा प्रसार करून विद्यार्थ्यांच्या संख्येत वाढ करण्याच्या ह्या प्रेरणेमुळे निर्माण होणाऱ्या परिणामांचा कोणी बारकाईने विचार करीत नाही. या विचारसरणीचे प्रवर्तक कोणत्या प्रकारचे अभ्यासक्रम असावेत, कोणते शिक्षण दिले जावे याचा सहसा विचार करीत नाहीत. या प्रक्रियेकडे केवळ एक दर्जा खालावण्याची प्रक्रिया म्हणून पाहून चालणार नाही; कारण ज्या भागात या संस्था निघाल्या तेथे त्यापूर्वी शिक्षणाची संधीही नव्हती व त्यामुळे दर्जाचा प्रश्नही नव्हता. तेथे काहीच अस्तित्वात नव्हते. हा सर्व प्रयत्नच मुळापासून नवा आहे. आज दिले जाणारे










शिक्षण आज शिक्षण घेणाऱ्या लोकांच्या गरजेच्या व कुवतीच्या दृष्टीने पुरेसे आहे. आजची गरज ते भागवते व त्याच्या पलीकडे जाण्याचा प्रयत्न करीत नाही. यात सुधारणा करण्याची आवश्यकता असली तरी सुधारणा प्रत्यक्ष गरज व शक्या-शक्यता यांचा विचार करूनच केली पाहिजे. याखेरीज इतर गोष्टींच्या अनुरोधाने विचार करणे निकडीचे नाही व तसा विचार उपयोगी होण्यापेक्षा अनुपकारक होण्याचीच अधिक शक्यता आहे."

शिक्षण महामंडळाने केलेली निवडक प्रवेशाची सूचना व त्या सूचनेच्या विरुद्ध आलेली तीव्र सार्वजनिक प्रतिक्रिया या दोहोंचीही पार्श्वभूमी वर गोदिनो यांनी वर्णन केलेल्या परिस्थितीत आहे. राष्ट्राकडे असलेली साधनसंपत्ती जर काटकसरीने व परिणामकारक रीतीने वापरली जावयास हवी असेल तर निवडक प्रवेशाच्या तत्त्वाचा अंगीकार करण्यावाचून गत्यंतर नाही. यामुळे राष्ट्राच्या भावी काळा-तील प्रशिक्षित मनुष्यबळाच्या गरजेचा विचार करून साधारण तेवढ्या लोकांना शिक्षण मिळाल्यास मनुष्यबळ अपुरे पडून राष्ट्राची हानी होते. अधिक लोकांना मिळाल्यास बेकारीचा धोका निर्माण होतो. मध्यंतरीचा नेमका सुवर्णमध्य समजणे हीदेखील अवघड गोष्ट असते. कारण अंदाज दहा-पंधरा वर्षानंतर निर्माण होणाऱ्या व्यावसायिक गरजांचा घ्यावयाचा असतो. प्रगत राष्ट्रांत असे अंदाज बरेचसे समाधानकारक असे करता येण्याची शक्यता असते. भारतासारख्या देशात असे अंदाज बांधण्याचा प्रयत्न करणे व त्यांच्या आधारावर आपले धोरण ठरवणे म्हणजे काही लोकांना शिक्षणापासून वंचित करणे होय असा विरोधकांचा आक्षेप आहे. परंतु आज ना उद्या आपल्याला या दिशेनेच वाटचाल करणे आवश्यक आहे एवढे विरोधकांनाही मान्य व्हावयास हरकत असू नये.

सरसकट प्रवेश देण्याच्या धोरणामुळे शिक्षणाचा दर्जा टिकवून धरता येत नाही व त्यामुळेही राष्ट्राची हानी होते. यासाठीही निवडक विद्यार्थ्यांना प्रवेश देण्याचे धोरण अंगीकारणे युक्त आहे असाही त्या धोरणाचा पुरस्कार केला जातो. सामाजिक, राजकीय दडपणांच्या प्रभावापुढे हा आग्रह टिकून राहण्यासारखा नाही ही गोष्ट उघड आहे.

'मुक्तद्वार' प्रवेश व निवडक प्रवेश या दोन भूमिकांतील संपूर्ण अंतर तुटणे अशक्य आहे. एकूण विकासाबरोबर एकूण संधीचेच प्रमाण जसजसे वाढत जाईल तसतसेच हे अंतर तुटत जाईल. परंतु निवडक प्रवेशाचा आग्रह नाही ही गोष्टही थोड्या विचारांती लक्षात यावयास हरकत नाही. त्याविषयीची भूमिका थोडक्यात पुढीलप्रमाणे मांडता येईल.

त्याआधी आजचा प्रवेश 'मुक्तद्वार' पद्धतीचा आहे हा समज भ्रामक कसा आहे ते पाहणे इष्ट ठरेल.

१. निवडक प्रवेशाचे तत्त्व लागले नाही म्हणजे सर्वांना शिक्षणाची समान संधी मिळते असे होत नाही. सध्याच्या समाजरचनेत ती संधी आर्थिकदृष्ट्या व सामाजिकदृष्ट्या वर असणाऱ्या वर्गांनाच मिळते. इतर वर्गातील बहुतेक विद्यार्थी अनेक अडचणींनी गांजून शिक्षणाच्या खालच्या इयत्तांच्या पायऱ्यांवरच गळून बाजूला पडतात. ही सध्याची परिस्थितीजन्य 'निवड' ही सर्वांत अन्यायाची व क्रूर आहे.

२. 'मुक्तद्वार प्रवेश' याचा अर्थ विद्यार्थ्याला त्याला हव्या असलेल्या अभ्यासक्रमाला प्रवेश मिळेलच असा आजही होत नाही. मेडिकल, इंजिनीअरिंग, विज्ञानशाखा अशा सर्व ठिकाणी, शिक्षणाचा कितीही प्रसार झाला तरी, प्रयोगशाळांच्या व साधनांच्या प्रमाणात प्रवेश द्यावयाच्या विद्यार्थ्यांची संख्या ही मर्यादितच राहणार. यामुळे 'मुक्तद्वार प्रवेश' याचा अर्थ आर्टस् व कॉमर्स शाखांना प्रवेश एवढाच होतो. या शाखांचे आजचे महत्त्व हे महाविद्यालयीन शिक्षणात दुय्यम व तिय्यम दर्जाचेच राहिले आहे. त्यामुळे विज्ञानशाखेकडे जाण्याविषयी निराश झालेले विद्यार्थी या शाखांकडे वळतात. क्वचित एखादा बुद्धिमान विद्यार्थी विज्ञानशाखेकडे जावयाची शक्यता असता या शाखांकडे वळतो. सामाजिक कारणांमुळे चांगल्या विद्यार्थिनी मात्र अजूनही या शाखांकडे येतात. (आर्टस् शाखेकडे पहिला वर्ग व पहिले क्रमांक अलीकडे बहुधा विद्यार्थिनी पटकवतात हे एक याचे दुसरे गमक मानता येईल.) अशा या अभ्यासक्रमांकडे - की ज्यांविषयी तिकडे वळणाऱ्या विद्यार्थ्यांनाही उत्साह नाही - मुक्तद्वार प्रवेश देऊन आपण काय साधतो?

आजवर उच्च शिक्षणापासून पूर्णपणे वंचित राहिलेले काही वर्ग - मागास जातीजमाती, ग्रामीण जनता, आदिवासी, हरिजन - आता प्रथमच उच्च शिक्षणापर्यंत येऊन पोचत आहेत. निवडकप्रवेशाचे तत्त्व अंमलात आणल्यास आपल्या मुलांना उच्च शिक्षणाच्या क्षेत्रात प्रवेश मिळण्याची संधी अशक्यप्राय होईल असे साहजिकपणेच या वर्गांना वाटते. उच्च शिक्षणाची दारे आपल्याला बंद झाली की आपला सामाजिक व आर्थिक अभ्युदय करून घेण्याचा एकमेव मार्ग आपल्याला बंद होईल अशी त्यांची रास्त भीती आहे. या वर्गाची ही भीती दूर करावयाची तर दोन गोष्टी केल्या पाहिजेत. एकतर सध्याची 'मुक्तद्वार प्रवेश' पद्धती प्रथमदर्शनी दिसावयास मुक्त वाटली तरी प्रत्यक्षात त्या पद्धतीचा फायदा मुख्यत्वेकरून श्रीमंत व वरिष्ठ वर्गांनाच कसा

मिळतो हे त्या वर्गांना सांगितले पाहिजे. मुक्त संधी असली तरी त्या संधीपर्यंत पोचण्याचीच ज्याची परिस्थिती नाही - सामाजिक, आर्थिक - त्याला ती संधी असून नसल्यासारखीच आहे. ही आजच्या परिस्थितीतील कटू वस्तुस्थिती त्या वर्गाच्या नजरेला आणून देणे आवश्यक तर आहेच; परंतु त्याहूनही अधिक महत्त्वाची गोष्ट, त्यांना तशी संधी प्रत्यक्षात घेता येईल अशी विविध अनुकूलता निर्माण करणे ही आहे.

निवडक प्रवेशाचा अर्थ दुहेरी करण्याची गरज आहे. शैक्षणिक सोयी व साधनसंपत्तीच्या उपलब्धतेनुसार विशिष्ट अभ्यासक्रमात मर्यादित संख्येने विद्यार्थ्यांना प्रवेश दिला जाईल, असा एक अर्थ आहे. त्याचा दुसरा अर्थ समाजातील सर्व सामाजिक व आर्थिक थरांतील होतकरू व बुद्धिमान मुलांची निवड करून त्या मुलांना उत्तमातील उत्तम शिक्षण घेता यावे यासाठी सर्व प्रकारची अनुकूलता निर्माण करून देणे हा आहे. शिक्षणातील समान संधीचा खरा अर्थ हा आहे. समान गुणवत्तेच्या मुलांना समान शैक्षणिक संधी मिळण्याच्या आड त्यांची आर्थिक परिस्थिती, त्यांची जात, त्यांचा पेशा वा अन्य गोष्टी आड येणार नाहीत याची खबरदारी समाजाने व शासनाने घेतली पाहिजे. या विधायक अर्थाने समान संधी प्रस्थापित करावयाची झाल्यास 'समान संधीचे तंत्र' या प्रकरणात सुचविलेल्या उपायांनी होतकरू, बुद्धिमान मुलांना आर्थिक, सामाजिक वा अन्य कारणांनी येणारे पंगुत्व दूर केले पाहिजे.

'निवडक प्रवेश' या शब्दप्रयोगाचे हे दोन अर्थ जर एकाच वेळी ध्यानी घेतले तर विद्यार्थ्यांची निवड करून प्रवेश देणे या मार्गाने, 'आहे रें'च्या पथ्यावर पडणाऱ्या आजच्या 'मुक्तद्वार प्रवेशा' पेक्षा, खरी समान संधी प्रस्थापित होणार आहे ही गोष्ट लक्षात येईल.

**समारोप**

आर्थिक विषमतेमुळे निर्माण होणाऱ्या शैक्षणिक संधीच्या विषमतेचे निराकरण करणे तुलनात्मक दृष्ट्या थोडेसे अधिक सोपे असते. विद्यार्थ्यांच्या शिक्षणाच्या मार्गात उभ्या असणाऱ्या विविध आर्थिक अडचणी दूर केल्या की सामान्यपणे या विषमतेमुळे निर्माण होणारे पुष्कळसे दुष्परिणाम टाळता येतात. या ठिकाणी मग केवळ या अडचणी दूर करण्यासाठी लागणारा पुरेसा पैसा राज्यसत्तेकडे उपलब्ध आहे की नाही व असलेल्या पैशाचा उपयोग योग्य धोरणाने व अपव्यय होऊ न देता होत आहे की नाही एवढेच प्रश्न उरतात.

सामाजिक विषमतेमुळे निर्माण होणारी शैक्षणिक संधीची विषमता दूर करणे हे अधिक दुर्घट काम आहे. सर्वच राष्ट्रांतून आलेला व येत असलेला हा अनुभव आहे. जातिसंस्थेसारख्या सामाजिक संस्थांमुळे ज्यावेळी सामाजिक अभिसरणाचे प्रवाह अनेक शतके कुंठित झालेले असतात त्याठिकाणी तर ह्या विषमतेचे परिणाम एखाद्या जुनाट दुर्धर रोगाप्रमाणे समाजाच्या हाडीमासी मुरलेले असतात. सामाजिक अभिसरण वाढवूनही विषमता कमी करण्याचे नैसर्गिक मार्ग मोकळे करून देणे हाच यावरील मुख्य उपाय आहे.

सामाजिक अभिसरणामुळे शैक्षणिक क्षेत्रातील कार्याला गती मिळाली पाहिजे व शिक्षण क्षेत्रातील कार्य सामाजिक अभिसरणाची गती वाढविण्याच्या दृष्टीने पूरक झाले पाहिजे. आज या दृष्टीने काही हालचाल सुरू झालेली आहे. परंतु अनेक शतकांच्या इतिहासाच्या छाया अशा सहजासहजी दूर होत नाहीत. तशी अपेक्षा करणे भोळसट आशावादीपणाचे ठरेल. पूर्वजन्मीची नसली तरी पूर्वइतिहासाच्या सुकृत-दुष्कृतांची फळे समाज-पुरुषालाही चाखावीच लागतात.

समाजाच्या पुनर्रचनेत अनेक प्रश्नांचा गुंता हा या पूर्वसुकृत-दुष्कृतांशी येऊन अडकलेला असतो. हा गुंता आपण अधिक वाढवायचा की कमी करावयाचा एवढाच आपल्यापुरता निर्णय सुजाण व्यक्तींना किंवा संघटनांना घ्यावयाचा असतो. एरवी सारे कर्मगतीप्रमाणे फिरतच असतात. शिक्षण क्षेत्रात 'संख्या की गुणवत्ता' या प्रश्नाच्या चर्चेत आढळून येणारा गुंता हे अशा प्रकारच्या गुंत्याचे एक सुस्पष्ट उदाहरण आहे. इंग्लंडसारख्या राष्ट्रातदेखील या प्रश्नाची निकराची चर्चा अगदी कालपर्यंत चालू होती हे लक्षात घेतले म्हणजे भारतात आपण या चर्चेत आज व्यग्र आहोत याचे आश्चर्य वाटण्याचे कारण नाही.

या चर्चेत सामाजिक संघटनांचे रागलोभ प्रत्यक्ष अप्रत्यक्ष वर उसळून येतात याचेही नवल वाटावयास नको. ते तसे उसळून वर न येतील तरच नवल. वरिष्ठ वर्गाने कनिष्ठ वर्गातील लोकांच्या मनात असलेल्या चिडीच्या भावनेला केवळ आत्मसंरक्षक चिडीच्या भावनेने उत्तर देणे हे शेवटी आत्मसंरक्षणाचेही ठरणार नाही, तर आत्मघाताचे ठरेल. कनिष्ठ वर्गांच्या मनात अशी चीड असावी याचे केवळ दुःख करून भागणार नाही. ती चीड असली तरी सामाजिक अन्यायाच्या विरुद्ध निर्माण झालेली चीड आहे हे वरिष्ठ वर्गाने समजून घेण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

खरे आवाहन व आव्हान यापुढचे आहे. आपल्यावर झालेला अन्याय निमूटपणे सहन करतो तो वर्ग किंवा ती व्यक्ती क्षुद्र कीटक होय. या हतबल सहनशीलतेपेक्षा अन्यायाविरुद्ध उभे

अनुक्रमणिका






राहताना निर्माण होणारा त्वेष हा अनंत पटींनी श्रेष्ठ होय. परंतु यात शौर्य असले तरी ते केवळ स्वार्थाधिष्ठित आहे. यामुळे समाजातील आजचा एक अन्याय दूर होईल व इतर कनिष्ठ वर्गांनाही आपल्यावर झालेल्या अन्यायाविरुद्ध झगडण्याची स्फूर्ति मिळेल हा यापासून होणारा सामाजिक लाभ असे म्हणता येईल. परंतु समाजाचे झपाट्याने परिवर्तन व्हावे अशी इच्छा असेल तर केवळ एवढ्याने भागणार नाही. आम्ही आमच्यावर झालेला अन्याय तर सहन करणार नाहीच, परंतु सामर्थ्याच्या बळावर दुसऱ्यावर अन्याय करणार नाही; इतकेच नव्हे तर, ज्या ज्या ठिकाणी अन्याय घडत असेल तेथें तेथे त्याच्या विरुद्ध उभे राहू अशा क्रांतिकारक वृत्तीच्या कार्यकर्त्यांच्या वर्गाची आज गरज आहे. हा कार्यकर्त्यांचा वर्ग समाजातील सर्व थरांतील सुजाण व्यक्तींचा मिळून असाच तयार होईल.

या वर्गाने शिक्षण क्षेत्रात आपल्यासमोर ठेवावयाचे अंतिम चित्र स्पष्ट आहे. इतर समाजांच्या, राज्यांच्या, राष्ट्रांच्या तुलनेत आपण युद्धकालात किंवा विकासकार्याच्या गतीत उणे ठरणार नाही इतकी गुणवत्तेची जोपासना आपण केलीच पाहिजे. परंतु गुणवत्ता ही काही कोणा वर्गाची मिरासदारी नाही. अशा मिरासदारीला शरीरशास्त्राचा, मानसशास्त्राचा, मानववंशशास्त्राचा काहीही आधार नाही. आज चालत आलेली मिरासदारी ही विशिष्ट सामाजिक इतिहासातून निर्माण झालेली मिरासदारी आहे. सर्वच देशातून अशी मिरासदारी जवळजवळ पन्नास वर्षांपूर्वीपर्यंतच्या काळात अस्तित्वात होती. श्रीमंत वर्ग, उमराव वर्ग, श्वेत-वर्णीय असा वर्गांतील लोकच अधिक शिक्षण घेत व समाजात अधिक महत्त्वाच्या जागा पटकावीत. आज ही मिरासदारी रशिया, इंग्लंड, अमेरिका यासारख्या राष्ट्रांतून पुष्कळशी दूर झालेली आहे. परंतु तरीही तेथे अद्यापीही संपूर्ण समान संधीचे वातावरण अस्तित्वात आलेले आहे असे म्हणता येणार नाही. या राष्ट्रांच्या गेल्या पन्नास वर्षांच्या इतिहासावरून आपल्याला दोन महत्त्वाचे निष्कर्ष काढता येतील. एक निष्कर्ष असा की मूळची विषमता कितीही शतकांची असली तरी चार-पाच दशकांच्या काळात तिचा प्रभावी निरास करता येतो. दुसरा महत्त्वाचा निष्कर्ष हा की राष्ट्राची आर्थिक प्रगती झपाट्याने चालू राहिली तरच कोणालाही मागे न ओढता आजवर मागे राहिलेल्यांना पुढे असलेल्यांच्या बरोबर आणण्याचा यशस्वी प्रयत्न करता येतो.

येथे शिक्षणक्षेत्राचा विकसनशील अर्थव्यवस्थेच्या प्रयत्नाशी मूलगामी संबंध येतो. ही आर्थिक विकासाची गती भारताला साधता आली नाही तर सर्वच चर्चा व्यर्थ आहे. परंतु ती साधता आली व समान संधीच्या दिशेने जागरूक काळजी घेतली गेली, तर पन्नास वर्षांनंतरच्या भारतात समाजाच्या सर्व थरांत शैक्षणिक गुणवत्तेचे प्रमाण सारखेच आढळून येईल यात शंका नाही.

त्याच दिशेने आपल्याला वाटचाल करावयाची आहे.

✠ ✠ ✠

ही मांडणी केल्यानंतर आता जवळजवळ अर्धशतक सरत आले आहे. संख्यात्मक वाढ लक्षणीय झाली परंतु परिस्थितीत गुणात्मक काही फरक पडला का? मला वाटते, 'नाही.' गेल्या चार दशकातील या विषयीचे शासकीय व इतर अहवाल याला साक्ष आहेत.

दोन दशकांपूर्वी रशियात तेथील शिक्षणपद्धतीचे प्रत्यक्ष निरीक्षण करण्याची विशेष संधी मिळाली. पेरिस्त्रायिका व ग्लासनोस्त अजून उगवावयाचे होते. परंतु स्टॅलिनचा पूर्ण निरास करण्यात आला होता. सर्व क्षेत्रांतून, पुतळे, छायाचित्रे, निर्देश आदि सर्वातून. रशियातील पद्धतीप्रमाणे अर्थातच शिक्षण-क्षेत्रातून, पाठपुस्तकातूनही. आपल्यानंतर स्टॅलिनकडे नेतृत्व जाऊ नये असे लेनिनने लिहून ठेवले होते एवढाच निर्देश शालेय पाठ्यपुस्तकात होता.

सर्वकाळ समानतेचा अधिक आग्रह होता. (परंतु तरीही 'The New Class' चे वर्चस्व होते.) काम मिळणे हा प्रत्येकाचा हक्क होता. किमान वेतन सुरक्षित होते. त्याचबरोबर काम करणे हे कर्तव्यही होते. मला अमुक पद्धतीची, अमुक पगाराची, अमुक ठिकाणीच नोकरी हवी, नाहीतर मी बेकार राहीन ही सवडच नव्हती. शिक्षकांचे पंचवार्षिक पुनर्मूल्यांकन केले जात होते. भारतातील प्रश्न वेगळे स्वरूप धारण करतात एवढे यावरून लक्षात यावे.

**- देवदत्त दाभोलकर**




# सत्यशोधक समाजाची १२५ वर्षे

डॉ. बाबा आढाव
(पुरोगामी सक्रिय समाजवादी)

म. जोतिराव फुले यांच्या सहकाऱ्यांनी २४ सप्टेंबर १८७३ रोजी पुण्यातील वेताळ पेठेत सत्यशोधक समाजाची स्थापना केली या घटनेला २४ सप्टेंबर १९९८ रोजी १२५ वर्षे पूर्ण होत आहेत. 'सत्यमेव जयते' हे या समाजाचे ब्रीदवाक्य, भारतीय संविधानानेही त्याचा स्वीकार केलेला आहे. सत्यशोधक समाजाचा १२५ वर्षांचा सांगोपांग इतिहास उपलब्ध नसला तरी अलीकडच्या काळात संशोधनपर बरीच पुस्तके प्रसिद्ध झालेली आहेत. शासकीय पातळीवर अनेक प्रयत्न चालू आहेत. शासकीय पातळीवर महाराष्ट्र शासनाने त्यासाठी एक समिती नियुक्त केली आहे. संस्थात्मक व खाजगी पातळीवरही अनेक प्रयत्न चालू आहेत. म. जोतिराव फुले समता प्रतिष्ठानाने पुरोगामी सत्यशोधक या त्रैमासिक - मुखपत्रातून गेल्या २४-२५ वर्षांत अनेक जुनी व अस्सल कागदपत्रे प्रकाशात आणली आहेत. हे काम अत्यंत तोकडे व अपूर्ण आहे याची आम्हाला जाणीव आहे. विद्येविना मती गेलल्या, निरक्षर असलेल्या, स्त्री शूद्रातिशूद्र वर्गात संशोधनासाठी आवश्यक असणारी कागदपत्रे उपलब्ध तरी कशी होणार? जोती-सावित्रीनी १८४८ साली मुलींसाठी पहिली शाळा सुरू केली. (१८४८ की १८५० असा वाद आहे) त्यानंतर अस्पृश्यांसाठी शाळा सुरू केल्या. प्रौढांसाठी रात्रीच्या शाळा सुरू झाल्या. कंपनी सरकारने १८५४ साली सार्वत्रिक शिक्षणाला सुरुवात केली. परिणामत: बहुजन समाजाच्या हातात लेखणी आल्यानंतर काहीबाही लेखनाला सुरुवात झाली. या समाजाने डोळे उघडले. इतिहासाची पाने तपासायला सुरुवात केली. म. फुल्यांचे शिक्षण मिशनरी शाळेत झाले. 'शूद्राने लिहावे वाचावे' हे 'महापाप' मानले जात होते. फुल्यांनी विद्याबंदीच्या गुलामगिरीचे जोखड फेकून दिले. सावित्रीबाईंना शिकवले. मुलींची शाळा सुरू केली. १ जून १८७३ रोजी फुल्यांनी 'गुलामगिरी' या पुस्तकाला लिहिलेली इंग्रजी प्रस्तावना प्रसिद्ध झालेली आहे. त्या होमरचे इतिहासप्रसिद्ध वाक्य सुरुवातीलाच उद्‌धृत केलेले आहे.

"The days that reduses a man to slavery takes from him the half of his virtus."

या ब्राह्मणी धर्माच्या आडपडद्यात 'गुलामगिरी' सुधारल्या इंग्रजी राज्यांत या पुस्तकाला पुढील अर्पणपत्रिका लिहिली आहे. "युनैटेड स्टेटस् मधील सदाचारी लोकांनी गुलामास दास्यत्वापासून मुक्त करण्याच्या कामात औदार्य, निरपेक्षता, परोपकार बुद्धी दाखविली यास्तव त्यांच्या सन्मानार्थ हे लहानसे पुस्तक त्यास परम प्रीतीने नजर करितो,आणि माझे देश बांधव त्यांचा त्या स्तुत्य कृत्याचा कित्ता, आपले शूद्र बांधवांस ब्राह्मण लोकांच्या दास्यत्वापासून मुक्त कृत्याचा कित्ता, आपले शूद्र बांधवांस लोकांच्या दास्यत्वापासून मुक्त करण्याच्या कामात घेतील, अशी आशा बाळगतो." ग्रंथकर्ता. ही अर्पणपत्रिका पुरेशी स्पष्ट आणि बोलकी आहे. फुले गुलामगिरी प्रसिद्ध करून थांबले नाहीत, तर त्यांनी २४ सप्टेंबर १८७३ रोजी सत्यशोधक समाजाची स्थापना केली. ही बाब अधोरेखित करावीशी वाटते. सत्यशोधक समाजाची स्थापना कशी झाली, त्यापूर्वी मंडळी एकत्र कशी जमत विचारविनिमय कसा करीत, कबीराच्या 'विप्रमतीचें' सामुदायिक वाचन कसे होई याची तुकाराम हनमंत पिंजन यांनी लिहून ठेवलेली आठवण आम्ही प्रसिद्ध केलेली आहे. महात्मा फुले समग्र वाङ्मयात तिचा समावेश झालेला आहे. सत्यशोधक समाजाच्या फक्त पहिल्या तीन वर्षांचेच अहवाल उपलब्ध झाले आहेत.

सत्यशोधक समाजाच्या औपचारिक स्थापनेनंतर रीतसर सभासद नोंदणी, गावोगाव शाखा, ब्राह्मण पुरोहिताशिवाय लग्नविधी विधवा पुर्नविवाह, मुलामुलींना विद्याभ्यासात गोडी लागावी म्हणून प्रोत्साहन, मुलींना खास बक्षिसे, शिष्यवृत्त्या, धर्मभोळ्या चालीरीतींना जाणीवपूर्वक फाटा. वक्तृत्व व निबंधस्पर्धा, शाळा, विद्यार्थी वसतिगृह, शेती व अन्य विषयांवर व्याख्याने, पुस्तिका इ. उपक्रम सुरू झाले. सत्यशोधक चळवळीचा प्रसार सुरू झाला. सत्यशोधक पद्धतीने लावलेले विवाह 'कायदेशीर' आहेत हे सिद्ध करून घेण्यासाठी केवढातरी आटापिटा करावा लागला. याबरोबरीनेच बहुजन समाजाच्या मानसिक गुलामगिरीशीही त्यांना मुकाबला करावा लागला. त्या संघर्षाच्या हकीगती वाचताना आजही वेदना होतात. (भारतातील निरक्षरता नजरेपुढे येते). सत्यशोधक समाजाने ठरवलेले नियमही पातळ करण्याची पाळी सभासदांवर आलेली आहे.






अनुक्रमणिका

सत्यशोधक समाजात फुल्यांनी कोणतेही पदाधिकारीपद स्वीकारलेले दिसत नाही. सावित्रीबाईंचा उल्लेखही देणगीदारांच्या यादीत आहे. मात्र म. फुल्यांच्या निधनानंतर सावित्रीबाईंनी सत्यशोधक समाजाची धुरा सांभाळलेली दिसते. १८८५ साली देशात काँग्रेसची स्थापना झाली. काँग्रेसच्या वार्षिक अधिवेशनाला जोडूनच सामाजिक परिषदेचे अधिवेशन भरवले जाऊ लागले. ब्रिटिशांनी लादलेल्या राजकीय गुलामगिरी बरोबरच परंपरागत सामाजिक गुलामगिरीचा वेध घेण्यास सुरुवात झाली. मात्र १८९५ सालापासून हा उपक्रम काँग्रेसला बंद करावा लागला. न्यायमूर्ति रानड्यांच्या या प्रयत्नांना लोकमान्य टिळकांनीच विरोध केला व सामाजिक परिषदेसाठी काँग्रेसचा मंडप वापरू देण्यास मज्जाव केला. (नंतरच्या काळात १९१७ साली महर्षी विठ्ठल रामजी शिंदे यांनी प्रयत्नपूर्वक राजकीय व सामाजिक प्रश्नांची तुटलेली नाळ जोडलेली दिसते.

मरणापूर्वी म. फुल्यांनी सार्वजनिक सत्यधर्म पुस्तक लिहून पूर्ण केले. (१ माहे एप्रिल १८८९) मात्र ते त्यांच्या मृत्यूनंतरच प्रसिद्ध झाले. १८९१ ते १९०० या दशकात सत्यशोधक समाजातील काही संस्थापक सभासदांनी वेगवेगळ्या वाटांनी प्रवास सुरू केल्याचे दिसते. दरम्यान प्लेगच्या साथीने हाहाकार माजविला. परिणामतः सत्यशोधक समाजाची चळवळ विस्कळीत झाली असल्याचे जाणवते. शहरापेक्षा खेड्यापाड्यातून अधिवेशने, सभा सुरू झाल्याचे व शेतकरी कामगार, अस्पृश्य, स्त्रीवर्गातून चळवळी व विधायक कामे सुरू झालेली दिसतात. १९०१ नंतर म. फुल्यांचे सहकारी विदर्भात गेलेले आढळतात. या चळवळीच्या प्रसारासाठी विविध उपक्रमांचा वापर केला गेला आहे. प्रवचने, पोवाडे, कीर्तन, जलसे, कोर्टकचेऱ्या, छोट्यामोठ्या पुस्तिका इ. मार्गांचा अवलंब केला आहे. दीनबंधू व दिनमित्र या वृत्तपत्रांची सुरुवात झालेली आहे. सत्यशोधक चळवळ खेड्यापाड्यापर्यंत पोचलेली आहे.

याच कालखंडामध्ये मुंबईला १८९३ साली हिंदू-मुस्लिमांचा पहिला मोठा दंगा झाला. लो. टिळकांनी सार्वजनिक गणेशोत्सवाला १८९५ मध्ये सुरुवात केली. राष्ट्रवादी चळवळीला धार्मिक मुलामा देण्यामध्ये ते यशस्वी झाले. मावळत्या शतकातील या धरितांची कृष्ण छाया त्यापुढील विसाव्या शतकामध्ये अधिकच घनदाट झाली. सनातनीचे आव्हान प्रखर होत गेले.

कोल्हापूर संस्थानामध्ये १९०१ साली वेदोक्त प्रकरण घडले. शाहू छत्रपती क्षत्रिय नाहीत, त्यामुळे त्यांना वेदोक्ताचे अधिकार नाहीत. असा पवित्रा राजोपाध्यांनी घेतला. केवळ ब्रह्मवृंदानीच नव्हे तर लो. टिळकांनीही राजोपाध्यांचे समर्थन केले. शाहू छत्रपतींना हा घाव जिव्हारी लागला. प्रश्न अस्मितेचा बनला. उभ्या मराठी मुलखामध्ये त्याचे तीव्र पडसाद उमटले. त्यानंतरची तीनचार दशके वेगवेगळ्या माध्यमातून वेदोक्त धगधगत राहिले. शाहूमहाराजांनी वेदोक्त प्रकरणामध्ये म. फुल्यांची सत्यशोधकी विचारधारा स्वीकारली नाही. वेद म्हणजे भेद आणि पुरोहितशाहीला ठाम विरोध ही फुले यांची मांडणी होती. याउलट शाहू महाराजांना वेद प्रामाण्याची, वेद मान्यतेची आस होती. त्यामुळेच त्यांनी आर्यसमाजाला समर्थन व प्रोत्साहन दिले. क्षात्रजगतगुरू पीठाची स्थापना केली. त्यानंतरच्या काळामध्ये महाराष्ट्राच्या सामाजिक व सांस्कृतिक जीवनावर दूरगामी परिणाम घडविणाऱ्या अनेक धरितांची बीजे वेदोक्त प्रकरणामध्ये आढळतात. एकविसाव्या शतकाच्या उंबरठ्यावर असताना, वेदोक्त प्रकरणाचे मूल्यमापन करताना एक खंत वाटते, की शाहूमहाराजांनी वेद प्रामाण्याला व पुरोहितशाहीला नकार देऊन निखळ सत्यशोधकी विचारांचा स्वीकार व प्रसार केला असता, तर महाराष्ट्राच्या इतिहासाला वेगळे वळण मिळाले असते. (तथापि शाहू महाराजांना तत्कालीन राजकीय व सामाजिक मर्यादांमुळे ही भूमिका घेणे इच्छा असूनही शक्य झालेले नाही. अर्थात, स्वातंत्र्यपूर्व व स्वातंत्र्योत्तर काळामध्येही मराठी नेतृत्व सनातनाच्या आक्रमक भूमिकेपुढे सातत्याने न्यूनगंडाच्या भावनेतूनच वागले आहे असे दिसते.)

वेदोक्त प्रकरणाचा परिणाम सत्यशोधक समाजावरही झाला आणि समाजाच्या थंडावलेल्या कामाला पुनःश्च उजाळा मिळाला. वार्षिक अधिवेशने भरू लागली. गुलामगिरी पुस्तिकेच्या आवृत्त्या लागोपाठ प्रसिद्ध झाल्या. सत्यशोधक समाजाची पुनर्स्थापना झाली. १९१७-१८ च्या सुमारास ब्राह्मणेतर पक्षाची सुरुवात झाली. कमिटी समोर जातवार प्रतिनिधित्वासाठी मागणी निवदेने सादर झाली. १९२० ते ३० या काळात ब्राह्मणेतर चळवळीने रौद्रस्वरूप धारण केले. १९३३ साली सत्यशोधक समाजाचा हीरकमहोत्सव साजरा झाला. त्यानिमित्ताने एक पुस्तक प्रसिद्ध करण्यात आलेले आहे. तत्पूर्वी १९२७ साली चिखलीच्या पंढरीनाथ पाटलांनी लिहिलेले म. फुल्यांचे समग्र चरित्र प्रकाशित झाले. म. गांधींनी फुल्यांच्या कार्याचा वेध घेतला. फुल्यांचा सत्यशोधक व गांधींचा सत्याग्रही हे सूत्र गोवले गेले. १९४८ साली म. गांधींच्या-मुळे महाराष्ट्रात ब्राह्मण-ब्राह्मणेतर वाद पेटला. १९५७ साली संयुक्त महाराष्ट्राच्या आंदोलनाने उच्चांक गाठला. १९६१ साली संयुक्त महाराष्ट्राची स्थापना झाली. राज्य मराठ्यांचे की मराठी भाषिकांचे असा प्रश्न

तरुणभारतकार ग. त्र्यं. माडखोलकर यांनी उपस्थित केला. मुख्यमंत्री यशवंतराव चव्हाणांनी राज्या मराठी भाषिकांचे असे उत्तर दिले. चव्हाण असे म्हणाले नाहीत, "छत्रपती शिवाजी, म. फुले, डॉ. आंबेडकर. म. गांधी इ. च्या विचाराचे." चव्हाणांच्या वैचारिक भूमिकेवर आम्ही यापूर्वी लिहिलेले आहे. त्यांनी सत्यशोधक ब्राह्मणेतर चळवळीचा वारसा जाणीवपूर्वक नाकारलेला आहे. राजारामशास्त्री भागवत, संदेशकार अच्युत बळवंत कोल्हटकर इ. मंडळींनी ब्राह्मणेतरांना उगीच ब्रह्मद्वेष न करण्याबद्दल आवाहन केले आहे. मात्र ब्रह्म, जात, धर्म यांची चिकित्सा करण्याचे टाळले आहे. जातीचा बाप अद्याप सापडलेला नाही. अस्पृश्यता व जातिव्यवस्था आर्यपूर्व होती. असे वारंवार सांगून वास्तव बदलत नाही. राखीव जागांना विरोध करणाऱ्या मंडळींना ब्राह्मणांनी हजारो वर्षे उपभोगलेल्या विशेष अधिकारांचा सोयिस्कर विसर पडतो. 'श्रुती स्मृती' पुराणोक्त मंत्रांचा निरर्थक जप करणाऱ्यांना साधा उल्लेखही खुपतो. या संभावितपणाचा आम्हाला वरचेवर अनुभव येतो. उद्धटपणाचा प्रत्यय येतो.

१९६१ साली श्री. केशवराव विचारे यांनी सत्यशोधक शिक्षण शिबिरांची सुरुवात केली. सत्यशोधक समाजाचा वारसा काही मंडळींनी अंगीकारला. १९७३ साली सत्यशोधक समाजाची शताब्दी साजरी झाली. त्यावेळचे महाराष्ट्र राज्याचे गृहमंत्री बाळासाहेब देसाई यांचे अध्यक्षतेखाली एक समिति स्थापन झाली. मुस्लिम सत्यशोधक मंडळाचे माझे मित्र हमीद दलवाई व मी या समितीत होतो. आम्ही एक जाहीरनामा तयार केला. सत्यशोधक समाजाचा राजकीय पक्ष बनविण्याचा कट म्हणून या प्रयत्नांची वासलात लावली गेली. म. जोतिराव फुले समता प्रतिष्ठानची स्थापना करून आम्ही मंडळींनी आपली वाटचाल सुरू केली. त्या अगोदरच एक गाव, एक पाणवठा मोहीम सुरू झाली होती. १९७२ च्या दुष्काळात महाराष्ट्र दुष्काळाच्या खाईत होरपळून निघाला. खेडोपाड्यांतून पिण्याच्या पाण्याची दैना उडाली. याच काळात आमची भ्रमंती चालू झाली. म. फुल्यांनी आपल्या घरचा आड त्यांच्या हयातीतच खुला केला होता. किमान तेवढेतरी काम व्हावे, या हेतूने ही मोहीम सुरू झाली. या मोहिमेत आलेले अनुभव पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाले आहेत. राजर्षि शाहू महाराज व महर्षि विठ्ठल रामजी शिंदे यांची जन्मशताब्दी १९७४ सालात साजरी झाली. फुल्यांच्या बरोबरच राजर्षि शाहू व महर्षि शिंदे यांनी केलेल्या कार्याची आठवण महाराष्ट्रात करून देण्याचा आम्ही प्रयत्न केला. ५०० वर्षे निजामी राजवटीत राहिलेल्या मराठवाड्यात आम्हाला दलितांच्या भूमीहिनांच्या शेतजमीन चळवळीत सहभागी व्हावे लागले. विचार व कृती यांची सांगड म. फुले व सावित्रीबाई यांनी घालून सार्वजनिक चारित्र्याचा आदर्श नमुना निर्माण केलेला आहे. विद्याबंदी तोडून मुलींची शाळा, भृणहत्या, विधवांच्या आत्महत्या टाळण्यासाठी प्रसूतिगृह व बालसंगोपन गृह, अस्पृश्यता नाकारून एक पाणवठा, समूहभोजन, रात्रीच्या शाळा, केशवपनाविरुद्ध नाभिकांचा संप, विधवापुनर्विवाह, पुरोहिताविना सत्यशोधक पद्धतीने विवाह इ. उपक्रमापासून पाणी अडवा पाणी जिरवा मोहिमेपर्यंत फुल्यांनी रचनात्मक संघर्षाची उभारणी केलेली आहे. आजच्या घटकेला चाललेल्या स्त्रीवादी, दलित, कष्टकरी, शेतकरी, इ. चळवळींना फुल्यांचे नाव घ्यावे लागते. राजकीय पातळीवर आता फुले, आंबेडकर, शाहू-पेरियारांची नावे उत्तर प्रदेशातव बिहारात दुमदुमत आहेत.

फुल्यांनी पुरोहितशाहीला नकार दिला. आम्ही भारतीय संविधानातील सेक्युलर भूमिकेचा आग्रह धरला. इंडियन सेक्युलर सोसायटीची या कामात मोलाची मदत झाली. धर्म निरपेक्षता? धर्मातीतता? की सर्वधर्म समभाव? हा चर्चेचा घोळ सतत चालू आहे. सार्वजनिक विहिरीवर का पाणी भरता येऊ नये? धर्माची आडकाठी असेल तर ज्याच्या त्याचा धर्म घरीच असू देत ही मांडणी आक्रमकपणे करता येई, मात्र शासनकर्ते 'दलितांना लांब पडू नये' या सबबीखाली स्वतंत्र विहीर मंजूर करीत. काही मंडळींना पाण्यापेक्षा भाकरीचा प्रश्न महत्त्वाचा वाटे. तर सनातनी मंडळींना धार्मिक चिकित्सा खपत नसे. त्यांना यात ब्राह्मण-ब्राह्मणेतर वादाचा वास येई. काही दलित नेत्यांना पाणवठा मोहिमेची प्रसिद्धी खुपे.

मराठवाड्यातील दलित युवक आघाडीने या कामात पुढाकार घेऊन पाणवठ्याबरोबरच जमिनीचे लढे उभारले. पंतप्रधान इंदिरा गांधींनी लादलेल्या आणिबाणीतही ही मंडळी डगमगली नाहीत. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी म. फुल्यांना गुरूस्थानी मानलेले. त्यामुळे पाणवठा मोहिमेला संघटित स्वरूप आले. 'धर्मातीत' विचार गावोगाव पोचवता आला. विषमतेविरुद्ध समतेचे मूल्य रुजविण्याचे काम सोपे झाले. विषमता निर्मूलन शिबिरांची सुरुवात झाली. आदिवासी, दलित, भूमीहीन, देवदासी, भटके विमुक्त शाळेच्या बाहेरचा युवकवर्ग, विद्यार्थीवर्ग, इ. घटकातील परिवर्तनवादी संघटनांचे व्यासपीठ तयार झाले.

पाणवठा मोहिमेत अनेक प्रश्नांना सामोरे जावे लागले. महाराष्ट्र-कर्नाटक राज्यांच्या सरहद्दीवरील जोगतिणी-देवदासींची समस्या पुढे आली. देवदासी पुनर्वसनाची चळवळ

अनुक्रमणिका






उभी राहिली. सौदत्तीच्या डोंगरावर यल्लमादेवीच्या समोर निदर्शने झाली. दोन्ही राज्यांना काही भूमिका घ्याव्या लागल्या. पुनर्वसन योजना आखाव्या लागल्या. देवदासी हा स्त्रीवादी चळवळीत कळीचा प्रश्न बनला. भटके-विमुक्तांचे प्रश्न जनतेच्या समोर आले. 'स्वातंत्र्याचे झाले काय? आमच्या हाती आलेच नाय.' या घोषणेनं मर्मभेद केला.

पंढरपूरची शासकीय पूजा, वेदोनारायणांचा शासकीय सत्कार, साखर कामगार संघटनेच्या वतीने चाललेला गंगागीर महाराज सप्ताह, पंढरपूरचा विश्वशांती यज्ञ, युवक क्रांती दलाने शंकराचार्यांना विचारलेले जाहीर सवाल, पाठ्यपुस्तकातील अंधश्रद्धा व धार्मिक संस्कार, मुस्लिम समाजातील बहुपत्नीत्व, जैन समाजातील दिक्षाविधी, महानुभव पंथातील स्त्री-साध्वीचे प्रश्न, आळंदीच्या पालखी सोहळ्यातील अस्पृश्यता, अंगमेहनती कष्टकऱ्यांचे प्रश्न, नवऱ्यानं टाकून दिलेल्या स्त्रियांचे प्रश्न, आदिवासींचा जंगलजमीन लढा इ. चळवळींनी महाराष्ट्राचे वातावरण ढवळून निघाले.

मराठवाडा विद्यापीठाच्या नामांतराचा प्रश्न धसाला लागला. विधानसभेत प्रस्ताव होऊनही त्याची अंमलबजावणी होईना. त्यासाठी लाँगमार्च निघाले. आणीबाणीच्या काळात भारतीय संविधानात समाजवाद व धर्मनिरपेक्षता (सेक्युलर) ही विशेषणे समाविष्ट करण्यात आली. समतेचा मनोमन स्वीकार केल्याशिवाय समाजवाद कसा स्थापन होणार? भारतीय जनमानस तर जन्माधिष्ठित विषमतेच्या मुशीत तयार झालेले आहे. जातिव्यवस्थेचा हमला भेदाभेदाच्या विषमतेच्या पायावर उभा आहे. जातींच्या उतरंडीविरुद्ध भरपूर बोलल्े जाते. पण मंडल आयोगाच्या शिफारशीनंतर काही मंडळींनी रान उठविण्याचे प्रयत्न केले. जात व जातीयवादाच्या विरुद्ध बोलणारी मंडळी जातिव्यवस्थेचा पाया कायम ठेवतात. विषमता, कुळकल्पना, शुद्धाशुद्धता, अस्पृश्यता इ. अंधश्रद्धा जोपासीत असतात. उच्चनीचता, श्रेष्ठ-कनिष्ठता, पवित्र-अपवित्रता हे ब्राह्मण्य आहे. त्याला धार्मिक तत्त्वज्ञानातून भरभक्कम पाठबळ मिळालेले आहे. सत्यशोधक चळवळीने धर्मचिकित्सा केली. जातिव्यवस्थेचा पाया खोदला. स्त्रियांच्या हक्काचा पुकार केला, श्रमाला प्रतिष्ठा दिली. शोषणाचे विविध प्रकार व प्रघात उजेडात आणले.

१२५ वर्षानंतरही जात म्हणजे नेमके काय? हे सांगता येत नाही. केवळ श्रमविभागणी नसून ती श्रमिकांची जन्मावर आधारित विभागणी आहे हे स्पष्ट झाले. आशियन उत्पादनव्यवस्था (Asian mode of production) असे वर्णन कार्ल मार्क्स यांनी केले. ही विभागणी फार विलक्षण आहे. ती चढती-उतरती मांडणी आहे. जन्माने कोणीतरी कोणापेक्षा श्रेष्ठ आहे वा कनिष्ठ आहे. त्यामुळेच सफाईकामगार म्हणून नोकरी असली तरी झाडलोट व संडास सफाईच्या काम वाटपात जात आडवी येते. सत्यशोधक चळवळीने मूल्यांचा आग्रह धरलेला आहे. लोकशाही, स्वातंत्र्य, समता, बंधुता, विवेकनिष्ठा, श्रमप्रतिष्ठा, धर्मातीतता इ. मूल्ये मनोमन मान्य केली आहेत. जोतिरावांनी यातील प्रत्येक संकल्पनेवर ऊहापोह केलेला आहे. आईबापाकडून धर्म मिळण्याऐवजी वयात आल्यानंतर हवा तो, विचारांना पटेल तो धर्म स्वीकारून वेगवेगळ्या धर्मांच्या मंडळींचे एकत्र कुटुंब फुल्यांनी वर्णिले आहे, अपेक्षिले आहे.

सत्यशोधक समाजाला फुल्यांचे विचार पूर्णपणे पेललेले नाहीत हे उघड आहे. परंतु त्यांच्या क्रांतिकारक मांडणीमुळे येथल्या ब्राह्मणी व्यवस्थेला प्रचंड हादरे बसले. त्यातून अनेक वैचारिक स्रोत निर्माण झाले. गेल्या पंचवीस-तीस वर्षात सत्यशोधक ब्राह्मणेतर, दलित-स्त्रीवादी चळवळीवर बरेच वाङ्मय प्रसिद्ध झाले आहे. एकटे फुलेच नव्हेत तर त्यांच्या अनेक सहकाऱ्यांची जीवनचरित्रे व कार्य प्रकाशात आले आहे. मात्र एवढ्यावर समाधान मानून भागणार नाही. महाराष्ट्र राज्याच्या प्रत्येक जिल्ह्यातील चळवळींच्या इतिहासाचे संशोधन, कागदपत्रांची जमवाजमव, संकलन व्हायला हवंय. महाराष्ट्रातील विद्यापीठांची संख्या डझनाच्या घरात असेल. या विद्यापीठाच्या समाजशास्त्र विभागावर याची जबाबदारी सोपवली जावी. मराठवाड्यात प. महाराष्ट्रात असे काही प्रयत्न सुरू असल्याचे समजते. या कामांना गती यायला हवी.

नागपूरला बहुजन संघर्ष समितीच्या वतीने सत्यशोधक चळवळीचे काम चालले आहे. त्यांनी अखिल भारतीय सत्यशोधक समाजाची अधिवेशने घडवून आणली. बहुजनसंघर्ष हे पाक्षिक गेली १० वर्षे सातत्याने प्रकाशित होत आहे. साताऱ्याहून भटक्याविमुक्तांचे 'बंद दरवाजा' हे साप्ताहिक सुरू आहे. अशा काही नियतकालिकांची यादी करता येईल.

विषमतेशी संघर्ष व समतेची स्थापना, क्रूरतेऐवजी कणव, शोषणाऐवजी सहकार्य, एकमेका साहाय्य करू अवघे धरू सुपंथ हे ब्रीदवाक्य ध्यानी घेऊन वाटचाल करावी लागणार आहे. सत्यशोधक चळवळीचे वर्णन डॉ. गेल ऑमवेट यांनी cultural Revolt 'सांस्कृतिक बंड' असे केले आहे.सामाजिक परिवर्तन क्रांतिशिवाय होणार नाही. परंतु आधी राजकीय मग सामाजिक, आधी आर्थिक मग आपोआप सामाजिक हे वायदे

अनुक्रमणिका

बाजार सतत सुरू आहेत.

शोषण फक्त आर्थिकच असते हा सिद्धांत आता निकालात निघाला आहे. शोषणाचे बहुविध आयाम आहेत त्या प्रत्येक आघाडीवर लढावेच लागेल.

सद्य:स्थिती मात्र सब गोलंकार-गोलमाल झाली आहे. आर्थिक विषमता वाढली आहे. भांडवलशाहीचे जागतिकीकरण व बाजारी अर्थव्यवस्थेमुळे जीवघेणी स्पर्धा वाढली आहे. शेटजी-भटजी-लाटजी प्रवृत्ती प्रबळ होत आहेत. अशा या काळात सत्यशोधक समाज स्थापनेला १२५ वर्षे पूर्ण होताहेत. आमच्या मते स्त्रीशूद्रातिशूद्र वर्गाची फळी उभी राहायला हवी. त्यासाठी सांस्कृतिक पातळीवर सत्यशोधक चळवळ चालायला हवी. आम्ही अंगमेहनती कष्टकरी वर्गाचे आंदोलन, सत्यशोधक चळवळीच्या विचार शिदोरीच्या आधारे चालवीत आहोत. आमच्या प्रमाणेच अनेक मंडळी कार्यरत आहेत. विषमता निर्मूलन समितीच्या व्यासपीठावर पुनःश्च एकत्र येण्याची गरज आहे. १९७२-७३ ते १९९७-९८ या काळात सेक्युलर चळवळीने जबर मार खाल्ला आहे. शहाबानो प्रकरणामुळे मुस्लिम सत्यशोधक मंडळाला अडचणींना तोंड द्यावे लागत आहे. कारवायांमुळे राज्यकर्तेही बिचकतात. प्रसंगी त्यांची पुच्छप्रगती सुरू होते. शासनाच्या वतीने धार्मिक कर्मकांडे घडू नयेत. असे असतानाही शासकीय पूजाविधींचा घाट घातला जातो. प्रत्येक सरकारी समारंभात पुरोहितास बोलावून पूजाविधी केले जातात. सहकारी साखर कारखान्याचा बॉयलर प्रदीपन समारंभ मंत्रघोषात होऊ लागलाय. विद्याखाते सरकारी अभ्यासक्रमात जाणीवपूर्वक परंपराजतन यावर आम्ही यापूर्वी लिहिले आहे. सत्यशोधक चळवळीची विद्यमान संदर्भात फेर मांडणी होण्याची गरज आहे.

✠ ✠ ✠

## शूद्र-राज्याचे स्वागत

### विवेकानंदांची भविष्यवाणी (१८९६)

मानवी समाजावर क्रमाने चार वर्णांचे शासन चालते. हे चार वर्ण म्हणजे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र हे होत. प्रत्येक वर्णाच्या शासनात काही गुण असतात आणि काही दोष असतात. जेव्हा ब्राह्मणांचे राज्य असते तेव्हा वंशपरंपरेवर आधारलेला घोर संकुचितपणा दृष्टीस पडतो; ब्राह्मणांचे व त्यांच्या वंशजांचे अधिकार पूर्णपणे सुरक्षित राखले जातात. फक्त त्यांनाच ज्ञान संपादन करता येते. ज्ञानविज्ञानाच्या सर्व शाखांची पायाभरणी याच काळात होत असते, हे या काळाचे वैभव होय.

क्षत्रियांची राजवट ही जुलुम - जबरदस्तीची आणि निष्ठुरतेची असते. परंतु ते संकुचित स्वभावाचे नसतात; आणि त्यांच्या राजवटीत कला आणि सामाजिक संस्कृती या गोष्टींचा उत्कर्ष होतो. त्यानंतर येते वैश्यांची राजवट, तिच्या ठायी असते, प्रजाजनांना शांतपणे चिरडून टाकण्याचे व त्यांचे रक्तशोषण करण्याचे सामर्थ्य! - त्यामुळे ती भयंकर असते. तिच्यापासून फायदा हा की, वैश्य हा सर्वत्र जात असल्याने पूर्वीच्या दोन राजवटीत संकलित झालेल्या कल्पनांचा व विचारांचा प्रसार करण्याचे कार्य ती राजवट चांगल्या रीतीने करते. वैश्य हे क्षत्रियांहूनही कमी संकुचित स्वभावाचे असतात, परंतु त्यांच्या राजवटीत संस्कृतीच्या अधोगतीस प्रारंभ होतो.

सरतेशेवटी शूद्रांची राजवट येईल. भौतिक सुख-विलासांचा प्रसार हा या राजवटीपासून फायदा होईल. संस्कृतीची अवनती हा (कदाचित) तिच्यापासून तोटा होईल. सर्वसाधारण शिक्षणाचा फार प्रचंड प्रमाणात सर्वत्र फैलाव होईल हे खरं, तथापि असाधारण प्रतिभावंतांची संख्या कमीकमीच होऊ लागेल.

तथापि पहिल्या तिघांची पाळी आता संपली आहे. आता शेवटच्यांची म्हणजे शूद्रांची पाळी आली आहे. - त्यांची राजवट येईलच. - तिला कोणी थोपवू शकणार नाही. ...या राजवटीमुळे या विषम झगड्यात गरिबाला चांगली संधी मिळेल. समाजवाद ही परिपूर्ण वा निर्दोष अशी शासनपद्धती आहे म्हणून मी समाजवादी आहे असे मुळीच नव्हे, तर दगडापेक्षा वीट मऊ या दृष्टीनेच मी समाजवादी आहे. इतर सर्व शासनपद्धतीचे प्रयोग झालेले असून प्रयोगांती त्या त्या शासनपद्धती सदोष असल्याचे आढळून आले आहे. आता या पद्धतीचा प्रयोग करून पाहिला जाईल.

पण या नव्या शासनपद्धतीमुळे जोखडाची खांदेपालट होईल, इतकेच! - ब्राह्मणकाळातील ज्ञानविज्ञान, क्षत्रिय-काळातील संस्कृती, वैश्यकाळातील प्रसारक प्रवृत्ती आणि शूद्रकाळातील समतेचा आदर्श ही सगळी ज्या राज्यात शाबूत आहेत, परंतु त्या त्या राजवटीतले दोष ज्यात नाहीत असे एखादे राज्य जर निर्माण करता आले तर ते आदर्श राज्य ठरेल. परंतु हे शक्य आहे काय?

[कालनिर्णय सांस्कृतिक दिवाळी २००५ यातील डॉ. दत्तप्रसाद दाभोळकर यांच्या 'विवेकानंदांच्या शब्दांत' या लेखातून साभार (पृ. २१४).]

✠ ✠

उत्तिष्ठत। जाग्रत।
प्राप्य वरान् निबोधत।

अनुक्रमणिका






# ॲकला चलो रे

## महादेव रामचंद्र कांबळे

(सेवानिवृत्त तळमळीचे कार्यकर्ते)

(श्री. कांबळे यांचा आणि माझा एक दशकाहून अधिक काळ परिचय आहे. त्यांची मते, मांडणी रुचो न रुचो ज्या सातत्याने ते आपली भूमिका स्वतःची पदरमोड करून निवृत्तिनंतरच्या गेल्या सुमारे दोन दशकाच्या कालखंडात प्रचार करत आले आहेत त्याने मी विस्मित होतो. एक कार्यकर्ताही कोणत्याही पक्षाचे, गटाचे सहाय्य नसताना कार्य करू शकतो याचे हे उदाहरण अशा अन्य कार्यकर्त्यांनाही प्रेरणादायक व आश्वासक वाटेल.

माझ्या लक्षात आलेली त्यांच्या भूमिकेची मांडणी खालीलप्रमाणे आहे.

(i) हा 'नाही रे' आणि 'आहे रे' यांच्यामधील झगडा आहे. आणि त्यासाठी सर्व 'नाही रे'नी एकजूट केली पाहिजे.

(ii) यासाठी सर्वांनाच अशा एकजुटीच्या आड येणारे पूर्वग्रह बाजूला ठेवावे लागतील.

(iii) 'बाबासाहेब आमची आई, गांधीजी आमची माई, सावरकर आमची ताई' ही कांबळे यांची भूमिका. ही योग्य की अयोग्य हा भाग वेगळा. कदाचित् सगळयांचाच वेगवेगळ्या कारणांसाठी विरोध असेल परंतु ती मांडण्याचे धैर्य त्यांच्यात आहे हे महत्त्वाचे.

(iv) ज्यांना आपण 'आहे रे' समजतो त्या गटातही 'नाही रे' लोक आहेत व ज्यांना आपण 'नाही रे' समजतो त्यांच्यामध्येही 'आहे रे' लोक आहेत.

(v) 'नाही रे' नी सर्व गटातील 'आहे रे' ना नाकारून आपली सत्याग्रही एकजूट केली पाहिजे.

यासाठी त्यांच्याशी संपर्क साधावयाचा असल्यास पत्ता - भ्रमणध्वनी :

पोस्ट बॉक्स नं. ११९२८

पोस्ट ऑफिस : आझाद नगर, मुंबई ५३

मोबाईल : ९८२१४४९१०७'

या वयात अतिशय कष्टाने अवघड आर्थिक परिस्थितीत त्यांचे काम चालू आहे. यासाठी टपाल वा अन्य खर्चाचा भार त्यांच्यावर पडणार नाही याची दक्षता घ्यावी.)

प्रा. देवदत्त दाभोलकर यांच्याशी प्रचलित सद्य:स्थिती विषयी विचारविमर्श करीत असताना त्यांनी मला आजतागायत जीवनातील पन्नास वर्षांच्या 'एकाकी' वाटचालीची आणि सद्य:स्थितीसंबंधीचे माझे विचार लिहिण्यासंबंधीची सूचना केली. अशी सूचना यापूर्वी विद्यमान नियोजन आयोगाचे सदस्य ज्येष्ठ अर्थतज्ज्ञ डॉ. भालचंद्र मुणगेकर यांनी देखील केलेली आहे. माझे अनेक मित्र व हितचिंतक माझ्या व्यक्तिगत जीवनाविषयी लेखन करून आजच्या युवा पिढीला अचूक मार्गदर्शन करावं अशी प्रेमळ सूचना वेळोवेळी करतच असतात.

**आत्मकथन की आत्मरूदन?**

माझे सन्मित्र, स्नेही आणि हितचिंतक मला माझ्या व्यक्तिगत जीवनाविषयी लेखन करण्याचा वेळोवेळी आग्रह करीत असले तरी, माझ्या व्यक्तिगत जीवनाविषयी आत्मकथन करण्यास माझी सद्सद्विवेकबुद्धी मला अनुमती प्रदान करीत नाही.

थोर महात्मे होऊन गेले |
चरित्र त्यांचे पहा जरा ||

थोरामोठ्यांच्या चरित्रांचं आपण वाचन आणि परिशीलन करीत असतो, तेव्हा त्यांनी त्यांच्या जीवनात सहन केलेल्या अनेक अडचणी, दुर्धर प्रसंग, दुःख, वेदना आणि यातना यांच्यापुढं आपली दुःखं कःपदार्थ असल्याचं दिसून येत असतं. आपल्या नित्याच्या जीवनात अनेक लहानमोठे चढउतार होतच असतात. येईल त्या प्रसंगांना धैर्यानं तोंड देणं, कसलीही प्रतिकूल परिस्थिती उद्भवली तरी प्रसंगानुसार मुकाबला करून चिवटपणे झुंज देणं, हे तर आपलं कर्तव्यच असतं. आणि म्हणून आत्मकथनाचं 'रडगाणं' गाण्यास माझं मन कदापीही तयार होत नाही.

माझ्या व्यक्तिगत कहाणीपेक्षा, या देशातील समस्त 'नाही रे' वाल्यांच्या वेदना माझ्या लेखणीद्वारे व्यक्त करीत आहे. 'नाही रे' वाल्यांची कहाणी हीच माझी कहाणी आहे. 'नाही रे' वाल्यांना मिळणारा 'न्याय' हाच मला मिळणारा 'न्याय' आहे. 'नाही रे'वाल्यांना मिळणारं समाधान, हेच माझं समाधान आहे. या देशातील समस्त 'नाही रे' वाल्यांचं होणारं शोषण, पिळवणूक,







अनुक्रमणिका

अन्याय आणि अत्याचार याच माझ्या व्यथा, वेदना आणि यातना आहेत. 'नाही रे'वाल्यांना सामाजिक न्याय प्राप्त करून देण्यासाठी आहे रे - नाही रे अटीतटीचा संघर्ष हा अनिवार्य आणि अटळ आहे. या संघर्षात मला माझं बलिदान द्यावं लागलं तरी माझी पूर्ण तयारी आहे.

**'सत्यशोधक' पण 'सत्ताशोधक' नाही!**

विद्यार्थीदशेपासून ज्योतिबा फुले यांच्या सत्यशोधक चळवळीशी माझा संबंध आलेला आहे. फुले - शाहू - आंबेडकर चळवळीचे तत्त्वज्ञान माझ्या व्यक्तिगत जीवनात प्रत्यक्ष कृतीत उतरविण्याचे शर्थीचे प्रयत्न केले आहे. अजूनही प्रयत्नांची पराकष्टा सातत्याने करीतच आहे. अ.भा. सत्यशोधक विद्यार्थी संघाचे संस्थापक अध्यक्ष दिवंगत केशवराव विचारे गुरूजी यांच्या बौद्धिक वर्गात माझं प्रशिक्षण झालेलं आहे. माझे अनेक सत्यशोधक सहकारी बंधू काळाच्या पडद्याआड गेले आहेत. अजूनही काही हाताच्या बोटावर मोजणाइतके हयात आहेत. ते सर्वजण वयोवृद्ध, प्रदीर्घ अनुभवी आणि बुजुर्ग आहेत. सध्या माझं वय देखील ७४ वर्षे आहे. माझ्या जीवनाची संध्याकाळ सुरू आहे. माझं नेत्रदान आणि देहदान केलेलं आहे. मृत्यूचं सहर्ष स्वागत करण्यास सदैव सिद्ध आहे.

मी हाडाचा सत्यशोधक आहे. मात्र सत्ताशोधक मुळीच नाही. सत्तेसाठी दाही दिशा फिरण्याचा प्रयत्न यापूर्वी कधीही केला नाही. इथून पुढे तर असा प्रयत्न करण्याचा प्रश्नच उद्‌भवत नाही. याचा अर्थ सक्रिय राजकारणापासून अलिप्त आहे असा मुळीच नाही. सक्रिय राजकारणाचे आम्ही सूक्ष्म अभ्यासक आहोत. सामाजिक व राजकीय प्रश्नांच्या मुळाशी जाऊन, सत्य वस्तुस्थितीचं अतिसूक्ष्म निरीक्षण करून साधक-बाधक सखोल आणि सविस्तर विचार करून निर्णय घेत असतो. विद्यमान कुठल्याही राजकीय पक्षांशी अगर गटा-तटांशी माझी अजिबात बांधिलकी नाही. माझी बांधिलकी फक्त माझ्या राष्ट्राशी आणि राष्ट्रातील सर्वसामान्य जनतेशी आणि विशेष करून 'नाही रे' वाल्यांशी आहे. 'नाही रे' वाल्यांना सामाजिक न्याय देण्याच्या प्रश्नावर कुणाशी कसलीही तडजोड करणार नाही. सत्ताधारी आणि सत्ताकांक्षी सर्वच राजकीय पक्षांतील तथाकथित नेत्यांच्या गोष्टीवेल्हाळ थापेबाजीवर माझा थोडादेखील विश्वास नाही. वाचाळवीरां-पेक्षा प्रत्यक्ष कृतिशील कार्यक्रमांवरच माझं सक्रीय सहकार्य आणि योगदान प्रदान करीन. व्यक्तिगत लाभ, मोह आणि प्रलोभनांच्या जाळ्यात स्वतःला कधीही गुंतवून घेणार नाही.

**मज युद्ध नको, बुद्धच हवा!**

जागतिक शांतता आणि भ्रातृभाव प्रस्थापित करण्यासाठी आम्हाला जगात युद्ध नको, बुद्धच हवा आहे. भगवान बुद्धाची 'अहिंसा' याच तत्त्वावर आमचा दृढ विश्वास आहे. आम्ही स्वतः होऊन कुणावर आक्रमण करण्याच्या विचारधारेत सहभागी कधीही होणार नाही; मात्र सार्वभौम प्रजासत्ताक भारतावर बाह्य शत्रूचं आक्रमण झाल्यास, आम्हाला प्रिय असलेलं अहिंसेचं तत्त्व शीतपेटीत अगदी सुरक्षित ठेऊन, एका हातात धम्मपद आणि दुसऱ्या हातात क्षेपणास्त्र आणि अणुबॉंब घेऊन आम्ही आमच्या राष्ट्राचं प्राणपणानं रक्षण करू. जो स्वतःचं किंवा देशाचं रक्षण करण्यास सर्व समर्थ असतो, तोच अहिंसा-तत्त्वाचा पुरस्कार करू शकतो.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी १४ ऑक्टोबर १९५६ रोजी बुद्ध धम्माची दिक्षा दिल्यानं आम्ही आमच्या मूळ बुद्ध धम्माचाच स्वीकार केला आहे. बुद्ध धम्माचा उत्कर्ष त्या इतिहासापासून आम्ही योग्य तो बोध घेतलेला आहे. पारंपरिक बुद्ध धम्माचा आम्ही स्वीकार केला नसून, डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी लिहिलेल्या बुद्ध आणि त्याचा धम्म या ग्रंथातील मार्गदर्शक सूत्रानुसार आम्ही आमची वाटचाल करीत आहोत.

'बहुजन सुखाय, बुहजन हिताय' हेच आमचं ब्रीद आहे. अन्याय, अत्याचार, शोषण आणि पिळवणुकीविरुद्ध संघर्ष करणं हेच आमचं कार्य आहे. शिका! संघटित व्हा! आणि संघर्ष करा! हाच आमचा मंत्र आहे.

**निद्रिस्त ज्वालामुखी जागृत झाला!**

निसर्गाचा समतोल ढळला की नद्यांना महापूर आणि प्रलय येऊन सर्वत्र हाहाकार उडत असतो. महासागरामध्ये त्सुनामी लाटांच्या उंचच उंच भिंती उभ्या राहतात आणि क्षणार्धात होत्याचं नव्हतं होत असतं. भूगर्भातील प्रचंड खळबळीनं भूकंप होऊन, डोंगरदऱ्या आणि उत्तुंग पहाड कोसळत असतात, शहरातील पक्क्या इमारती जमीनदोस्त होत असतात. निद्रिस्त ज्वालामुखी जागृत झाला की आसमंतातील सारा प्रदेश जाळून बेचिराख करीत असतो. निसर्गाची ही किमया ध्यानी घेता सर्वसामान्य जनतेच्या धुमसणाऱ्या असंतोषातून उद्रेक निर्माण होऊन जगात अनेक क्रांत्या घडवून जुलमी राजवटी उलथून पडलेल्या आहेत.

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर अठ्ठावन्न वर्षे झाली; परंतु स्वातंत्र्याची खरीखुरी फळे या देशातील सर्वसामान्य जनतेला अद्यापही चाखावयास मिळाली नाहीत. 'नाही रे'वाले सामाजिक न्यायापासून अजूनही वंचितच राहिले आहेत. सत्ताधारी आणि

अनुक्रमणिका

सत्ताकांक्षी सर्वच राजकीय पक्षांतील मोक्याच्या जागावर आहे रे वाले ठाण मांडून बसलेले आहेत. नाही रे वाल्यांना सामाजिक न्याय प्राप्त करून देण्यात प्रशासनाच्या झारीतील शुक्राचार्य आड येत असतात. केंद्र आणि महाराष्ट्र शासनाच्या अनेक लोकोपयोगी योजनांचा लाभ खऱ्याखुऱ्या लाभार्थींना मिळतच नाही. आदिवासी बंधूंसाठी असलेल्या योजना, बिगर आदिवासी व्यक्ती व संघटना मधल्यामधेच हडप करीत आहेत. या स्वातंत्र्यानं आम्हाला काय दिलं? असाच प्रश्न आज सर्व तळागाळातील सर्वसामान्य जनतेसमोर उभा आहे.

भारत हा शेतीप्रधान देश आहे. या देशातील ८०% लोक शेतीवर अवलंबून आहेत. साऱ्या जगाचा अन्नदाता आणि पोशिंदा आज सत्ताधारी आणि सत्ताकांक्षी सर्वच राजकीय पक्षांच्या नाकर्तेपणामुळे उपाशीपोटी जीवन जगत आहे. नैराश्य आणि वैफल्यानं आपल्या जीवनाचा शेवट करून घेत आहेत. शेतकऱ्यांच्या आत्महत्येचं प्रमाण वाढत असलेलं पाहून सर्वच राजकीय पक्षांचं धाबं दणाणलं आहे. लाजेखातर सर्वच राजकीय पक्षनेते नक्राश्रू ढाळत आहेत. परंतु कुणाच्याही डोळ्यांत ना आसू ना माया.

सार्वत्रिक निवडणुकीत राजकीय पक्षांचे रंग बदलले तरी मूळचा ढाचा हा कायमच असतो. सत्तेचे वारे वाहील त्या दिशेने 'आहे रे' वाल्यातील आयाराम-गयाराम आपल्या पक्षाची पाटी आणि रंग बदलत असतात. अशी आहे आपली लोकशाही! सत्ताधारी आणि सत्ताकांक्षी राजकीय पक्ष सत्ता एके सत्ता या एककलमी कार्यक्रमासाठी मनी, मसल आणि माफियांचा पुरेपूर वापर करून सार्वभौम प्रजासत्ताक भारताला विनाशाच्या खाईकडे घेऊन चालले आहेत. खाजगीकरण, उदारीकरण आणि जागतिकीकरण या खाऊजा धोरणानं आपण पुनःश्च एकवेळ बहुराष्ट्रीय कंपन्यांच्या आर्थिक गुलामगिरीत खितपत पडणार आहोत.

### उत्पादन वाढीतूनच उत्कर्ष

आपल्या देशाला राजकीय आणीबाणीची अजिबात गरज नाही. हा प्रयोग यापूर्वी अयशस्वी झालेला आहे; परंतु आपल्या विकसनशील देशाला आर्थिक शिस्तीची आज नितांत गरज आहे. उत्पादन वाढीतून उत्कर्ष हाच आपला विकासाचा मंत्र आणि तंत्र असला पाहिजे. आम्ही आमच्या बालवयात डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी स्थापन केलेल्या स्वतंत्र मजूर पक्षाच्या अनेक सभा आणि चळवळी पाहिल्या आहेत. आमचं त्यावेळचं पोरसवदा वय त्या ऐतिहासिक घटनांचं आकलन करण्याइतकं नव्हतं; परंतु आमच्या बालवयात जे संस्कार मनावर बिंबले गेले आहेत त्या संस्कारातून आजच्या अवनत स्थितीचा अर्थ आणि अन्वयार्थ लावण्याचा प्रयत्न करतो तेव्हा सारी रहस्ये उलगडत जातात. महाराष्ट्राचे माजी मुख्यमंत्री दिवंगत वसंतदादा पाटील महाराष्ट्र प्रदेश काँग्रेस कमिटीचे अध्यक्ष होते त्यावेळी महाराष्ट्राचे कार्लमार्क्स ज्येष्ठ काँग्रेस नेते आणि विचारवंत यशवंतराव मोहिते टिळकभवनमध्ये कार्यकर्त्यांचा अभ्यासवर्ग घेत असत. या अभ्यासवर्गाच्या कामगार आघाडीचे संस्थापक अध्यक्ष दिवंगत दत्ता सामंत, मराठा महासंघाचे संस्थापक आणि माथाडी कामगारांचे नेते दिवंगत अण्णासाहेब पाटील, स्वतंत्र मजूर पक्षाचे पुरस्कृत आमदार पद भऊषविलेले दिवंगत डॉ. वामन शंकर मठकर या दिग्गजांबरोर आम्ही देखील महाराष्ट्र आणि देशाच्या स्थितीचा अभ्यास करीत होतो. आम्ही आजन्म विद्यार्थी आहोत. लालनिशाण पक्षाचे अध्वर्यु डॉ. दत्ता देशमुख यांच्याही अभ्यासवर्गाला आम्ही उपस्थित राहत होतो. लोणावळा येथे सातत्याने चालणाऱ्या कामगार प्रशिक्षण वर्गाला आम्ही सतत उपस्थित राहत होतो. थोरामोठ्यांचे मार्गदर्शन, आमचा अभ्यास आणि प्रदीर्घ चिंतनानं आजच्या कामगार चळवळीकडे पाहू जाता आमचं मन दुःखी आणि कष्टी होत आहे. आजच्या कामगार संघटना विविध राजकीय पक्षांच्या बटीक बनल्या आहेत. सार्वजनिक उद्योग डबघाईस आणण्यात विकाऊ आणि लाचार कामगार पुढाऱ्यांचा देखील वाटा आहे. जपान मधील कामगार दंडावर काळ्या फिती लावून आपला निषेध व्यक्त करतो; परंतु उत्पादनात खीळ पाडत नाही. म्हणून अमेरिकेने अणुबाँबचा वर्षाव करून देखील बेचिराख झालेला जपान आज उत्पादन वाढीत सतत अग्रेसर राहून, अमेरिकेशी स्पर्धा करण्यास सज्ज झालेला आहे. प्रचलित राजकीय पक्षांचं जोखड फेकून देण्याचं धारिष्ट्य आमच्या देशातील कामगार संघटना दाखवण्यास तयार आहेत काय? प्रचलित कामगार संघटना चुकीच्या धोरणामुळे देशातील आणि विदेशातील भांडवलदारांना सार्वजनिक क्षेत्रातील उद्योग गुंडाळण्यास फार मोठी मदत झालेली आहे. आणि आंतरराष्ट्रीय क्षेत्रातील भांडवलदारांनी खाऊजा धोरण आपल्या देशावर लादलेलं आहे. राज्य आणि केंद्र सरकारमधील मातब्बर मंत्रीच खाजगीकरणाचे पाठीराखे आहेत. कुंपणच शेत खात आहे.

### जागतिक बँकेलाच कर्ज देण्यास आम्ही समर्थ आहोत!

'तुज आहे तुजपाशी परि जागा तू चुकलाशी' अशीच स्थिती आपल्या देशातील राज्यकर्त्यांची झालेली आहे. जागतिक बँक आणि आंतरराष्ट्रीय नाणेनिधीचा दबाव येत असल्यानं, आपल्या देशातील राज्यकर्त्यांनी 'खाऊजा' धोरणाचा स्वीकार केला आहे. वस्तुस्थिती अशी आहे की, आपल्या देशात गडगंज

संपत्ती अशी आहे की आपणच जागतिक बँकेला कर्ज देऊ शकतो. फक्त राज्यकर्त्यांनी दडलेल्या संपत्तीचा शोध घेऊन घटनात्मक आणि सनदशीर मार्गाने देशाचा खजिना समृद्ध केला पाहिजे. त्यासाठी प्रबळ राजकीय इच्छाशक्तीची गरज आहे. राज्यकर्त्यांनी राज्यकर्त्यासारखंच वागलं पाहिजे.

थोर समाज क्रांतीकारक प्रबोधनकार सिताराम ठाकरे यांनी दूरदृष्टिकोनातून या देशातील देवळांच्या संपत्तीसंबंधी आपले अमूल्य विचार राष्ट्राला दिले आहेत. परंतु आपणाला त्यांच्या मार्गदर्शक तत्त्वांचा विसर पडलेला आहे.

आज आपला देश स्वतंत्र झाला आहे. आपणाला लुटमार करण्याची काहीही गरज नाही. खास अध्यादेश जारी करून देशातील सर्व देवालये आणि प्रार्थनास्थळांतील अतिरिक्त संपत्ती घटनात्मक मार्गानं कुठंही कायदा आणि सुव्यवस्थेचा प्रश्न निर्माण न करता त्याचप्रमाणे या देशातील आम जनतेला विश्वासात घेऊन सरकारी खजिना समृद्धशाली केला पाहिजे. आपली शासनप्रणाली धर्मनिरपेक्षतेची आहे. प्रचलित सर्व धर्मांमध्ये समभाव आणि आदर असलाच पाहिजे. कुणाच्याही श्रद्धा दुखवण्याचा प्रश्नच उद्भवत नाही. संबंधित मंदिरे आणि प्रार्थना स्थळातील चल, अचल आणि मिळकत व्यवस्थापनासाठी आणि पूजाअर्चा विधीसाठी येणारा खर्च, पुजारी आणि पुरोहितांचे मानधन, सेवकांचा पगार इत्यादी सर्व खर्च जाता शेष रक्कम सरकारी खजिन्यात जमा करता येणे शक्य आहे. फक्त हे धाडसी पाऊल उचलण्यासाठी राजकीय इच्छाशक्ती राज्यकर्त्यांमध्ये असली पाहिजे. मग ते राज्यकर्ते कोणत्याही राजकीय पक्षाचे असोत. राष्ट्राच्या सर्वांगीण विकासासाठी हा निर्णय सर्वांना विश्वासात घेऊनच घेतला पाहिजे.

**समांतर अर्थव्यवस्थेचं आव्हान स्वीकारा**

दहशतवाद आणि आतंकवादापासून देशाला धोका आहे. हा धोका सतत वाढत चालला आहे. दहशतवाद आणि आतंकवाद निपटून काढण्यासाठी केंद्र आणि राज्यशासन शर्थीचे प्रयत्न करीत आहेत. या देशातील आम जनता केंद्र आणि राज्य शासनाच्या मागे खंबीरपणे उभी आहे. दहशतवाद आणि आतंकवाद हा देशासमोरचा बाह्य धोका आहे. काळ्या पैशाची समांतर अर्थव्यवस्था हा देशातील अंतर्गत धोका आहे. काळ्या पैशाची समांतर अर्थव्यवस्था खणून काढण्यासाठी अत्यंत निष्ठुर आणि कठोरपणे निर्णायक पाऊले उचलली पाहिजेत. देशाला स्वातंत्र्य मिळण्यासाठी अनेक स्वातंत्र्यसैनिकांनी आपल्या प्राणांचे बलिदान देऊन हौतात्म्य पत्करलं आहे. देशात सुराज्य निर्माण करण्यासाठी आपल्या बहुमोल प्राणांचं बलिदान द्यावं लागणार असेल तर आपण आनंदानं हसत हसत मृत्यूला सामोरे जाऊया!

**आदर्श राष्ट्रपती आणि पंतप्रधान दोघेही चिरायु होवोत!**

राष्ट्रपती ए.पी.जे. अब्दुल कलाम आणि पंतप्रधान डॉ. मनमोहन सिंग या दोघांचेही महान व्यक्तिमत्त्व आज आपल्या देशाला लाभले आहे. त्यांचा आम देशवासियांना सार्थ अभिमानच वाटतो. या देशातील सर्वसामान्य जनतेची लय मागणी नाही. देशातील दडून राहिलेल्या गडगंज संपत्तीचा शोध घेऊन; आणि काळ्या पैशाची समांतर अर्थव्यवस्था कठोरपणे मोडीत काढण्यासाठी राष्ट्रपती ए.पी.जे. अब्दुल कलाम आणि पंतप्रधान अर्थशास्त्रज्ञ डॉ. मनमोहन सिंग यांनी भारतीय संविधानानुसार घटनात्मक सनदशीर मार्गानं प्रयत्न करावा, असं अत्यंत कळकळीचं विनम्र आवाहन आहे. देशाच्या व्यापक हितासाठी अत्यंत कठोर आणि निष्ठूरपणे निर्णायक पाऊले टाकली तरच शेतकऱ्यांच्या वाढत्या आत्महत्या पूर्णपणे थांबतील आणि काश्मीरपासून कन्याकुमारीपर्यंत देशात सर्वत्र महामांगल्य निर्माण होईल असा दृढ विश्वास वाटतो.

❖ ❖ ❖

**ॲकला चलो रे**

जा एकटा पुढे तू<br>
कोणी जरी न साथी<br>
ना घेतला कुणीही<br>
सस्नेह हात हाती<br>
नाही दिली जिवाची<br>
कोणी जिवास साद<br>
घुमवीत जा तरी तू<br>
अपुलेच आर्तनाद<br>
हा मार्ग कंटकांचा<br>
रक्ताळ पाय झाले<br>
सारे सखे जिवाचे<br>
मागेच ते गळाले<br>
ना आसरा कुठेही<br>
ही बंद सर्व दारे<br>
जा एकटा तरी तू<br>
जाई पुढे सदा रे

**- रवीन्द्रनाथ**

(भावानुवाद : देवदत्त दाभोलकर)






अनुक्रमणिका

## आदिवासी विकासाला जीवन वाहिलेले युग्म
## विजय साठे, इंदवी तुळपुळे
# संघर्षाची न संपणारी वाट
### निवेदन : संध्या नरे - पवार

'बाई मीटिंगमध्ये आहेत, भेटणार नाहीत,' निरोप घेऊन आलेला कर्मचारी बेफिकीरपणे सांगतो.

'पण बाईंना भेटण्यासाठीच आदिवासी एवढ्या लांबनं आले आहेत. आदिवासी बायांना तहसीलदार बाईंना आपली दुःखं सांगायची आहेत. बाई भेटेपर्यंत आम्ही इथेच बसून राहणार.' कर्मचाऱ्याला ठामपणे उत्तर देण्यात आलं. निरोप घेऊन कर्मचारी निघून गेला आणि आपलं गाऱ्हाणं घेऊन आलेले आदिवासी तहसील कार्यालयासमोरच्या मोकळ्या जागेत बसले. तहसीलदारबाईंचा पुन्हा निरोप येईपर्यंत श्रमिक मुक्ती संघटना झिंदाबादच्या घोषणा देत सभेला सुरुवात करण्यात आली.

कर्मचारी पुन्हा निरोप घेऊन आला. चार-पाच जणांनीच आत चला, असं त्यानं सांगितलं. 'आमच्या शिष्टमंडळात दहा-बारा जण असतील,' पुन्हा ठामपणे उत्तर देण्यात आलं. कर्मचारी पुन्हा आत गेला.

'तुम्ही कोणी दगड वगैरे आणलेत का रे?' आदिवासी नसलेल्या प्रमुख कार्यकर्त्याने आपल्या संघटनेच्या आदिवासी कार्यकर्त्यांना विचारलं. सभेतनं नाही असा आवाज आला. 'पण तरीही हे लोक आपल्याला आत सोडत नाहीत.' प्रमुख कार्यकर्त्याने सांगितलं.

'आम्ही आमचं दुःख मांडायला आलोय. तुमचं राज्य आहे, तुम्हाला ते ऐकायला हवं. आदिवासी मोर्चा काढणार म्हटल्यावर पोलिस सांगतात, शांततेचा भंग करू नका. आम्ही काय शांततेचा भंग करणार? आम्ही फारफार तर घोषणा देणार, धरणं धरणार आणि निघून जाणार. पोलिसांनी सांगितलं म्हणून आपण मूक मोर्चा काढला. पण आता आमचं गाऱ्हाणं ऐकायलाही वेळ नाही? पुराने आदिवासींचं शेत उद्ध्वस्त झालंय. पीक बुडालंय, बांध फुटलेत, शेतातली माती वाहून गेलीय. शेतात मोठमोठे दगड येऊन बसलेत. त्यांना आम्ही सांगतो, तुम्ही या, बघा. तर सर्व्हे करायलाही कोणाला वेळ नाही.' आता ती बोलत असते. धारदार आवाजातलं तिचं भाषण आजूबाजूचे पोलिसही लक्ष देऊन ऐकत असतात.

कर्मचारी पुन्हा निरोप घेऊन येतो. दहा-बारा जणांच्या शिष्टमंडळाला तहसीलदारबाईंनी मान्यता दिलेली असते. भाषण करणाऱ्या तिच्या नेतृत्वाखाली आदिवासींचं शिष्टमंडळ आत जातं. तहसील कार्यालयात गेटबाहेरची सभेची भाषा उपयोगाची नसते, इथे प्रशासकीय भाषेत बोलावं लागतं. डोंगरात राहणाऱ्या आदिवासीला नेमकी हीच भाषा येत नाही. आज एकविसाव्या शतकातही आदिवासींच्या होणाऱ्या शोषणाचं हे एक महत्त्वाचं कारण आहे. अर्थात इथं हा प्रश्न नसतो, कारण संघटनेचं नेतृत्व प्रशासनाला हव्या त्या भाषेत आदिवासींची बाजू मांडत असतं. सोबत अर्जांची फाइलही असतेच. तहसीलदार सुनंदा भोसले यांच्यासमोर प्रत्येक मुद्दा मांडला जातो.

ठाणे जिल्ह्यातील आदिवासींचा मुख्य प्रश्न म्हणजे ज्या जमिनी ते पिढ्यान्‌पिढ्या कसत आहेत, त्या जमिनींवर मालक म्हणून त्यांची नावं नाहीत. जमिनीचे मालक वनखाते आहे. साहजिकच पुरासारख्या आपत्तीत या आदिवासींना नुकसानभरपाई दिली जात नाही, ती मिळायला हवी.

अनेक आदिवासी पिढ्यान्‌पिढ्या दुसऱ्याच्या नावावर असलेल्या जमिनीत कूळ म्हणून शेत पिकवत आहेत. कायद्यानुसार ही जमीन आदिवासींच्या ताब्यात आहे. पण नुकसानभरपाई मात्र कागदोपत्री मालक म्हणून ज्यांची नावं आहेत, त्यांना मिळत आहे. आदिवासींना नाही.

पुरामुळे आदिवासींचं यावर्षीचं पीक वाहून गेलंय. त्याला रोजगाराची गरज आहे. त्यामुळे मुरबाड तालुक्यात रोजगार हमी योजनेची कामं काढणं अत्यावश्यक आहे. अन्यथा रोजगारासाठी आदिवासींना दुसऱ्या तालुक्यात, शहरात जावं लागेल. हे स्थलांतर रोखायला हवं.

तहसील कार्यालयात ही अशी चर्चा असते. तर तहसील कार्यालयाबाहेर सभा आधीप्रमाणेच सुरू असते. कार्यालयातली चर्चा इंदवी तुळपुळे करत असतात, तर सभेतलं भाषण विजय साठे करत असतात. दोन्ही आघाड्यांवर आंदोलन सुरू असतं. किंबहुना एखादं आंदोलन करायचं असेल तर किती पातळ्यांवर लढावं लागतं याचं हे उत्तम उदाहरण आहे. ३० सप्टेंबरला नाग्या महादू कातकरी या स्वातंत्र्यसैनिकाच्या स्मृतिदिनानिमित्त आयोजित करण्यात आलेला हा मोर्चा-मेळावा म्हणजे संघटनेच्या आजवरच्या अनेक आंदोलनांपैकी एक आंदोलन



अनुक्रमणिका

असतं. संघटनेच्या आजवरच्या वाटचालीतलं पायाखालची वाट कापणारं आणखी एक पुढचं पाऊल असतं. आदिवासींच्या जंगल-जमीन हक्काची, शोषणविरोधी लढ्याची ही वाट आजही एवढी बिकट आहे की, आणखी अशी किती पावलं टाकावी लागतील? किती चालावं लागेल या वाटेला, संघर्षाला खरंच काही अंत आहे का? हे असे सगळे प्रश्न एकाच उत्तरापाशी येऊन थांबतात, 'माहीत नाही.'

पण विजय साठे आणि इंदवी तुळपुळे यांना एक गोष्ट निश्चित माहीत आहे, जोवर पायात चालण्याचं बळ आहे, मनातला निग्रह कायम आहे तोवर न संपणाऱ्या वाटेची दहशत कशाला बाळगायची? म्हणूनच इंदवी तुळपुळे सहजपणे सांगतात, समाजावर उपकार म्हणून आम्ही हे काम करत नाही आहोत, आम्हाला वाटतं म्हणून करतो. एखादं काम ज्यावेळी असं आतून आपलं वाटत असतं त्यावेळी तिथे लौकिक यशापयशाची मोजमापं लावली जात नाहीत, म्हणूनच अशा मोजमापांमध्ये न अडकता विजय साठे आणि इंदवी तुळपुळे हे जोडपं १९८०-८१ पासून गेली २५ वर्षं ठाणे जिल्ह्यातल्या मुरबाड तालुका परिसरातल्या आदिवासींमध्ये काम करत आहेत.

१९८०-८१ मध्ये विजय साठे आणि इंदवी तुळपुळे हे दोघेही एकाच गटात; पण स्वतंत्रपणे मुरबाड तालुक्यात काम करत होते पण १९८५ मध्ये लग्न केल्यानंतर मात्र त्यांचं एकत्रित काम सुरू झालं. श्रमिक मुक्ती संघटना आणि त्यांचा संसार एकत्रच. एकमेकांच्या सोबतीने, एकमेकांसह सुरू झाला. मुरबाडमधलं त्यांचं घर हेच संघटनेचं कार्यालय आहे किंवा संघटनेच्या कार्यालयामध्ये असलेल्या या घरात कायद्याची पुस्तकं आणि नाना अर्जांच्या फायली याच गोष्टी ठळकपणे नजरेत भरतात. दैनंदिन गरजेच्या आवश्यक वस्तूंखेरीज या घरात आणखी काही नाही. संघटना चालवताना करावा लागणारा पै न् पै चा हिशोब घराच्या मांडणीतही दिसतो. अर्थात्, माणसांचा पसारा जमवणाऱ्या कार्यकर्त्यांच्या घराला वस्तूंचा पसारा जमवण्याचा मोह नसतोच.

इंदवी तुळपुळे सांगतात, 'सुरुवातीला एका खोलीच्या घरात आम्ही कम्यून पद्धतीने राहायचो. म्हणजे कार्यकर्तेही तिथेच राहायचे, झोपायचे. सगळ्यांचं जेवण एकत्रच व्हायचं.' कार्यकर्त्यांसोबतचं हे जगणं श्रमिक मुक्ती संघटनेत आजही कायम आहे.

आज सामाजिक चळवळींमध्ये पंचतारांकित, हायफाय स्वयंसेवी संस्थांचं लोण पसरलेलं आहे. फॉरिन फंडिंग मिळवायचं आणि शहरातल्या आलिशान, वातानुकुलीत ऑफिसमध्ये बसून कुपोषण, बालकामगार, रोजगाराचा हक्क या प्रश्नांवर काम करायचं. काम खरं तर चर्चात्मक पातळीवरचं, आहवाल बनवण्याचं. या अशा कामात रस्त्यावरच्या प्रत्यक्ष संघर्षाला स्थान नसतं. याउलट २५ वर्षांच्या सामाजिक कार्यानंतरही इंदवी आणि विजय यांनी रस्त्यावरचा संघर्ष सोडलेला नाही. आजही २६ जुलैच्या पुरामुळे शेतं उद्ध्वस्त झालेल्या आदिवासींचा प्रश्न घेऊन ते तहसील कार्यालयावर मोर्चाची धडक मारतात.

२५ वर्षं तेच ते काम करत राहणं, हे अपयश नाही? खोचकपणे हा प्रश्न विचारला जाऊ शकतो किंवा न सुटणारे प्रश्न घेऊन लढत बसण्यापेक्षा दुसरी जबाबदारी स्वीकारून स्वतःचा विकास साधणं अधिक योग्य आहे, असा मानभावी सल्ला दिला जाऊ शकतो. पण हाती घेतलेलं काम चिकाटीने करत राहणं, त्यातल्या त्याच त्याच प्रश्नांना न थकता वेगवेगळे पर्याय शोधत राहणं, या साऱ्यासाठी विलक्षण चिकाटीची गरज असते आणि त्याहूनही अधिक आपल्या कामावर निष्ठा लागते.

या चिकाटीचं, निष्ठेचं पाठबळ असल्यामुळेच विजय साठे सहजतेने सांगतात, 'सामाजिक कार्याच्या या नवीन फ्रेममध्ये आम्ही अगदी अंडरडेव्हलप्ड आहोत हो!' चित्रलेखाशी बोलताना सुरुवाती-पासून शेवटपर्यंत त्यांचा हाच सहजसूर कायम असतो. सुरुवातीचे विद्यार्थी दशेतले भारावलेले दिवस असोत किंवा नंतरचे प्रौढ वयातले संघर्षाचे टप्पे असोत, बडेजावी अभिनिवेश कुठेच डोकावत नाही.

१९७९-८० मध्ये मुंबईच्या निर्मला निकेतन कॉलेज ऑफ सोशल सायन्सेसमधल्या ७-८ विद्यार्थ्यांचा गट कॉलेजच्या फिल्ड वर्कसाठी ठाणे जिल्ह्यातल्या मुरबाड तालुक्यात जात होता. एका बाजूने नाशिक जिल्ह्याला, एका बाजूने पुणे जिल्ह्याला जोडलेल्या या तालुक्यात ठाकर आदिवासींची संख्या अधिक आहे. शहरातले हे तरुण विद्यार्थी ज्यावेळी आदिवासींच्या या जगात डोकावत होते, त्यावेळी तिथे होतं ते फक्त दारिद्र्य आणि त्या दारिद्र्यासोबत असणारी वेठबिगारी, गुलामी! शहरातल्या धडपड्या, आदर्शवादी तारुण्याला या दारिद्र्याने आवाहन केलं नसतं तरच नवल!

'सोमवार ते गुरुवार कॉलेज करायचं, गुरुवारी निघायचं. रेल्वेनं कल्याणला उतरून मुरबाड तालुक्यात जाणारी कुठचीही एस.टी. पकडायची. त्या एस.टी.चा जो शेवटचा स्टॉप असेल त्या गावात उतरायचं. शुक्रवार-शनिवार-रविवार त्या गावाच्या परिसरात फिरायचं. लोकांना भेटायचं. त्यांच्याशी बोलायचं, असा आमचा कार्यक्रम असायचा. यात मिळेल तिथं








राहायचं, मिळेल ते खायचं हा भाग ओघाने आलाच. वर्षभर आमचा हा उपक्रम सुरू होता. समाजशास्त्राची पदवी घेतल्यानंतर आम्हाला ग्रामीण भागात काम करायचं होतं. त्यामुळे हा प्रदेश कसा आहे? लोक कसे आहेत? हे समजून घेण्याचा आमचा हा प्रयत्न होता,' विजय साठे सांगत होते.

'आमचा हा एक अनौपचारिक अभ्यासगट होता. काम कसं उभं करायचं? प्रश्नांची उकल कशी करायची? या प्रश्नांची उत्तरं शोधणाऱ्या चर्चा व्हायच्याच. त्यातूनच एकमेकांचं मूल्यांकनही व्हायचं, एकमेकाला धारेवर धरलं जायचं. यात आपसूकच निरनिराळ्या विचारधारांची चर्चा व्हायची. मार्क्सवादापासून गांधीवादापर्यंत, माओपासून प्लाब्दोनेरुदापर्यंत सगळ्याचा खल व्हायचा. कळत-नकळत यातनं आमची तयारी होत होती. विचारांमध्ये स्पष्टता येत होती.' विजय साठे बोलत होते त्यावेळी परिवर्तनासाठी, व्यवस्थाबदलासाठी धडपडणारी तरुणाई डोळ्यासमोर येत होती.

'आपण काहीतरी करणार आहोत आणि मग लोकांचं आयुष्य बदलणार आहे, हा भाबडेपणा त्याही वयात होता. हेल्प देम टू हेल्प देमसेल्व्हज् हे आमच्या कामाचं सूत्र आम्ही ठरवलं होतं. स्वविकास साधण्याचं काम करण्यासाठी लोकांना मदत करणं, ही आमची भूमिका तेव्हाही होती आणि आताही आहे,' विजय साठे यांनी सांगितलं.

विचारामध्ये ही अशी स्पष्टता असल्यानेच काय करायचं? याच्या बरोबरीनेच आपण काय करायचं नाही, याचंही भान या तरुणांना होतं. आजची एकविसाव्या शतकातली इंटरनेट पिढी पक्षीय सत्ताकारणात गुंतत असताना, धार्मिक राजकारणाच्या रंगात रंगत असताना या तरुणांनी मात्र निर्णय घेतला होता - कोणत्याच राजकीय पक्षाचा झेंडा जवळ करायचा नाही. धर्माच्या पगड्याखाली जायचं नाही.

'मी स्वत: कोणताच धर्म मानत नव्हतो. किंबहुना आम्ही सगळेच मानवधर्म मानत होतो. एका माणसाने दुसऱ्या माणसाशी वागण्याची जी काही मूल्यं असतात, ती मानत होतो.' विजय साठे यांनी आपल्या जगण्याचा गाभाच उलगडून समोर ठेवला.

एका माणसाने दुसऱ्या माणसाशी वागण्याची मूल्यं! ही मूल्यंच पाळली जात नाहीत आणि माणसाकडूनच माणसाच्या शोषणाला सुरुवात होते. इथनंच मग शोषणविरोधी लढाही सुरू होतो. या मानवी मूल्यांवर नितांत विश्वास असल्याने वकिलीची सनद घेऊनही ॲड. विजय साठे प्रत्यक्ष वकिलीचा व्यवसाय करू शकले नाहीत.

मात्र या वकिली ज्ञानाचा उपयोग पुढे आदिवासींच्या लढ्यांसाठी झाला. वननिकेतनतर्फे घेण्यात येणाऱ्या लीगल एड कॅंपसाठी झाला. अगदी आजही वेगवेगळ्या संस्था-संघटनांनी आयोजित केलेल्या कायदेविषयक प्रशिक्षण शिबिरांमध्ये विजय साठे मार्गदर्शन करत असतात.

निर्मला निकेतन कॉलेजचे विद्यार्थी ज्यावेळी मुरबाड परिसरात फिल्ड वर्कसाठी जात होते, त्यावेळी या भागात एक प्रकल्प सुरू करण्याचा निर्णय कॉलेजतर्फे घेण्यात आला आणि १९८१ मध्ये वननिकेतन हा प्रकल्प सुरू करण्यात आला. विजय साठे, इंदवी तुळपुळे, राजू भिसे, भीमराव धनसावंत, मोहन राठोड, सनत सिन्हा, उर्मी जुवेकर, बबन घरत, किशोर देशपांडे हे विद्यार्थी यात सहभागी झाले. इतर उपक्रमांबरोबरच आदिवासींना त्यांच्या कायदेशीर हक्क-अधिकारांबाबत जागरूक करणं यावर वननिकेतनने अधिक भर दिला. त्यासाठी कायदा प्रशिक्षण शिबिराचं माध्यम वापरण्यात आलं. आदिवासी जीवनावर वरवरची मलमपट्टी करण्यापेक्षा त्यांच्या दु:खाच्या मुळालाच हात घालण्याचा निर्णय घेतला. पुढची वाट संघर्षाची असणार हे इथेच स्पष्ट झालं. शिवाय कायदा या गोष्टीत इतकी ताकद आहे, की त्यात आरोग्य, शिक्षण यासारखे सगळे विषय येतातच.

वाडीवाडीवर लोकांना कायद्याचं प्रशिक्षण देत असतानाच त्यांचे इतर प्रश्नही सामोरे येत होते. उदा. आदिवासी डॉक्टरकडे गेले की, तपासण्यासाठी डॉक्टर त्यांना हातच लावत नसे. मुलाला तपासायचं असेल तर आईलाच सांगायचं की, त्याचं पोट दाबून बघ, कडक लागतंय का? कान ओढ, दुखतोय का बघ अशा पद्धतीनं लांबवरनंच तपासणी व्हायची. पाटलाच्या घरी मजुरीला जाणाऱ्या आदिवासीला फक्त मजुरीच कमी मिळायची नाही, तर त्याला पाटलाच्या ओसरीवर बसण्याची परवागनी नसायची. आदिवासींच्या जगण्यावर हा असा सोशल स्टिग्मा असायचा.' विजय साठे सांगत होते.

प्रशिक्षणाचा हा कार्यक्रम सुरू असतानाच प्रत्यक्ष संघर्ष करावा लागेल, अशी तक्रार संघटनेकडे आली. घसई गावच्या अनंत मोरे या सावकाराकडून आदिवासीनं २०० रुपये कर्ज घेतलं होतं. आदिवासींच्या मते त्यानं ते फेडलं होतं. पण सावकाराच्या मते फेडलं नव्हतं. सावकाराने आदिवासीला घरच उचलून नेण्याची धमकी दिली. आदिवासीला वाटलं, हा घर कसं उचलून नेणार? पण रात्री सावकाराची माणसं आली, त्यांनी आदिवासीचं सगळं घर फोडलं, तोडलं, आणि घराची लाकडंच एकत्र करून नेली. आदिवासीनं संघटनेकडे तक्रार आणली आणि संघटनेने पोलिसांकडे चोरीची केस दाखल करायचा निर्णय घेतला.

'खरंतर आम्हीही त्या काळात खूप गोष्टी नव्यानं शिकत






होतो. पोलिस स्टेशनला जाऊन एफआयआर नोंदवायचा, आपण तक्रार दिल्यावर पोलिस ती लिहून घेणार हे प्राथमिक काम आम्हाला सहजसोपं वाटलं. मी स्वत: काही कार्यकर्त्यांसोबत पोलिस स्टेशनला गेले.' इंदवी सांगत होत्या.

पोलिस स्टेशनला गेल्यावर काय झालं? तर पोलिसांनी सांगितलं, 'हे खरं आहे का? असं आम्ही आरोपीला विचारून चौकशी करू. मग बघू.' खरं तर तक्रारदाराने तक्रार नोंदवल्यावर पोलिसांनी ती लिहून घ्यायची आणि मग आरोपीची चौकशी करायची. ही नेहमीची पद्धत. कोणतीही तक्रार आली की ती नोंदवायला हवी, हा कायदा आहे. पण इथे पोलिस सांगत होते की, आम्ही आधी आरोपीला विचारतो.

'साहजिकच होतं. आजूबाजूच्या गावांमध्ये सावकाराचा दबदबा होता. त्याच्याकडे रायफल होती. आवाज काढतो म्हणून तो प्रसिद्ध होता.' असं सांगत इंदवी पुढं म्हणाल्या, 'पण त्याक्षणी नेमकं काय करावं ते आम्हाला कळेना. शेवटी आम्ही आमचा नेहमीचा उपाय वापरला. तुम्ही तक्रार घेत नाही ना, मग आम्ही तुमच्या वरिष्ठांना कळवतो. ही मात्रा मात्र लागू पडली. पोलिसांनी सावकाराला नॉमिनल अटक केली, लगेच जामिनावर सोडलं. पुढेही तो निर्दोष सुटला. पण तरी संघटनेनं सावकारावर केस केली ही बातमी चारी बाजूला आगीसारखी पसरली.'

यानंतर संघर्ष संघटनेच्या दाराशीच आला. त्या काळात आदिवासी भागातली प्रमुख समस्या होती ती वेठबिगारीची! १००-२०० रुपयांच्या कर्जासाठी आदिवासी बायको-पोरांसह संपूर्ण आयुष्य सावकाराच्या घरात-शेतात जेवणावारी राबयचा. गुलामीच होती ती. आदिवासींमध्ये काम करायचं असेल तर संघटनेला या सगळ्याला तोंड द्यावंच लागणार होतं.

हाडी गावाच्या गुलाबराव देशमुख या सावकारा-कडचे तीन वेठबिगार संघटनेने पहिल्यांदा सोडवले. इथे सावकाराने मात्र संघटनेच्या माणसांचे हात-पाय तोडण्याच्या, त्यांना गावात पाय ठेवू न देण्याच्या धमक्या द्यायला सुरुवात केली. आता यावर संघटना काय करणार? या प्रश्नाच्या उत्तरावरच या भागात संघटना कशी उभी राहणार? हे ठरणार होते.

इंदवी सांगतात, 'उत्तर म्हणून आम्ही सावकाराच्या घरासमोर सभा घेण्याचं ठरवलं. तुझ्या दारात येतो, कर काय करायचं ते. असा आमचा पवित्रा होता. आजूबाजूच्या सगळ्या गावाचे कार्यकर्ते घेऊन आम्ही सावकाराच्या घरात गेलो. इकडे सावकारानेही संघटना माझ्यावर हल्ला करेल, असा अर्ज पोलिसात करून पोलिस संरक्षण मागवलं होतं. आम्ही पोचलो तेव्हा दोन पोलिस सावकाराच्या दारात होते. आमच्या दृष्टीने ही चांगली गोष्ट होती. कारण मारण्याची धमकी सावकाराने दिली होती. त्यामुळे आता आमचंच संरक्षण करण्याची जबाबदारी पोलिसांवर होती. आमची सभा सुरळीत पार पडली.

वेठबिगारीची ही प्रथा नेमकी कशी होती, हेही विजय आणि इंदवी यांनी बोलता-बोलता सांगितलं. हे वेठबिगार लगीनगडी म्हणून सावकाराकडे राबायचे. लग्नासाठी आदिवासी २००-५०० रुपयांचं कर्ज काढायचा. हे कर्ज फेडण्यासाठी मग नवीन जोडपं सावकाराकडे राबणार. जेवण हीच मजुरी असल्याने रोकड पैसे मिळवून कर्जाची परतफेड करणे शक्य नसे. यातच कधी आजारपणासाठी पैसे घेतले की पुन्हा कर्ज वाढे. मुलं झाल्यावर तीही राबत. ८-९ वर्षाच्या मुलांकडे गुरं राखण्याचं काम असे. ही मुलं मोठी झाली, की पुन्हा त्यांचं लग्न... पुन्हा कर्ज... पुन्हा त्या नव्या जोडप्याचं राबणं... वेठबिगारीची साखळी सुरूच राही आणि जमीनदारांची शेतंही हिरवीगार होत.

'वेठबिगार पुरुषाला वर्षाला एक घोंगडी, दोन चड्ड्या, एक बनियन, आणि एक पायताण आणि बाईला दोन लुगडी दिली जात.' विजय साठेंनी सांगितलं. 'बाईला पायताण दिलं जात नसे.' इंदवी यांनी माहिती दिली. 'जेवण म्हणून नाचणीच्या भाकऱ्या आणि सुकटीचं बरबाट (पातळ कालवण) दिलं जाई. त्यात सुकट शोधावी लागे.' इंदवी हसत म्हणाल्या.

या वेठबिगारांमध्ये सगळ्यात लक्षात राहिलेलं उदाहरण दारक्या गोपाल फसाळे या आदिवासीचं आहे, असं विजय साठेंनी सांगितलं. काय झालं होतं नेमकं? तर २० रुपये कर्जासाठी दारक्याने ५० वर्षं वेठबिगारी केली. आपल्या संपूर्ण कुटुंबासह वयाच्या ९-१० वर्षापासून सावळाराम टेंबे या सावकाराकडे राबणारे दारक्या, संघटनेने मुक्तता केली तेव्हा ६०-६५ वर्षांचे होते. ही १९८८-८९ मधली गोष्ट आहे. या एका सावकाराकडून संघटनेने १७ गडी सोडवले.

या काळात ठाणे जिल्ह्यात आदिवासींमध्ये काम करणाऱ्या बहुतेक संघटना वेठबिगारांच्या प्रश्नाविरुद्ध लढत होत्या वर्तमानपत्रातनंही या लढ्याला प्रसिद्धी मिळत होती. त्यामुळे नंतरच्या काळात बहुतेक सावकार-जमीनदारांनी स्वत:हून आपल्याकडच्या वेठबिगार गड्यांची मुक्तता केली. शेकड्याने गडी सोडण्यात आले.

वेठबिगारीबरोबरच इतरही तक्रारी होत्याच. प्रशासकीय पातळीवरचा भ्रष्टाचार, त्याने वेढलेलं आदिवासींचं जगणं आणि त्या विरोधातला संघटनेचा संघर्ष हा नित्यक्रमच बनला.

हा सगळा १९८५ पर्यंतचा टप्पा आहे. केवळ संस्थात्मक काम करून चालणार नाही, तर त्याला आंदोलनात्मक कामांची




अनुक्रमणिका

जोड हवी, याची जाणीव कार्यकर्त्यांना होती. तर त्याचवेळी तुम्ही आंदोलनात्मक काम करणार असाल, तर वननिकेतनला कॉलेजचं कायमचं आर्थिक पाठबळ मिळणार नाही. अशी भूमिका कॉलेजने घेतली. यातनंच श्रमिक मुक्ती संघटना आकाराला आली आणि विजय साठे - इंदवी तुळपुळे यांचं काम स्वतंत्रपणे सुरू झालं. सुरुवातीचे काही विद्यार्थी मित्र वेगळ्या वाटेने गेले. तर आदिवासींमधनं नवीन कार्यकर्ते संघटनेला येऊन मिळाले. आंदोलनं अधिक तीव्र झाली.

याच काळात संघटनेने जबाबदार प्रशासनाची मागणी करत तहसीलदार कार्यालयाला वेढा घातला. लोकांचे शेकडो प्रश्न महसूल, तहसील, वन आणि पोलिस खात्याकडे पडून होते. या पत्रांना साधी पोच द्यायची तसदीही कोणी घेत नव्हतं. रेशनकार्ड हवं यासाठी साधा अर्ज करायला आदिवासींना शंभर रुपये मोजावे लागतात. २०-३० किमी.चा प्रवास करून तालुक्याला - मुरबाडला जायचं. एस.टी.च्या तिकीटाला पैसे द्यायचे. कोणाकडून तरी अर्ज लिहून घेण्यासाठी १०-२० रुपये द्यायचे. अर्ज लिहून तो नेमका कुठे द्यायचा? हे शिपायाने सांगण्यासाठी त्याच्या हातावर ५-१० रुपये टेकवायचे, मग परतीच्या प्रवासाचा खर्च. एवढ्या त्रासाने केलेल्या अर्जाचं पुढे काहीच होत नाही. संघटनेचेही असे तब्बल १५०० अर्ज वेगवेगळ्या खात्यांकडे पडून होते. म्हणून आम्ही तहसील कार्यालयाबाहेरच धरणं धरलं. अर्जांचं काय झालं ते सांगा, अर्जाप्रमाणे काम होणार नसेल तर नाही म्हणून सांगा. पण उत्तर द्या, अशी आमची मागणी होती. शेवटी आपल्याकडचे १५० अर्ज गहाळ झाल्याची यादी तहसील कार्यालयाने दिली. यावर अशा पद्धतीने शासनाचं काम सुरू आहे अशी तक्रार मंत्रालयाकडे आम्ही केली. अर्थात, त्याचं पुढे काहीच झालं नाही, पण आमचं समाधान झालं.' इंदवी सांगत होत्या.

आज माहितीच्या अधिकाराचा कायदा संमत झाला आहे. पण त्यामागे विजय साठे - इंदवी तुळपुळे यांच्यासारख्या अनेक कार्यकर्त्यांचे श्रम आहेत.

अर्थात ही आंदोलनं वाचताना जितकी साधी-सरळ वाटतात तशी ती नाहीत. अगदी तहसील कार्यालयासमोर धरणं धरण्याच्या या आंदोलनातही पोलिसांची नजर चुकवून काही महिला कार्यकर्त्या आत गेल्या आणि त्यांनी प्रांत अधिकारी गाडगीळ यांना घेराव घातला. काम करत नसाल तर खुर्ची खाली करा, असं सांगितलं. त्यावेळी पोलिसांनी केलेल्या लाठीमारात महिला जखमी झाल्या. यातल्या ३ महिलांना खूप जखम झाल्याने संघटनेने त्यांच्या नावाने पोलिसात तक्रार नोंदवली. पोलिसांनीही नेमक्या त्याच तीन महिलांवर सरकारी कामात अडथळा आणल्याचा आरोप करत गुन्हा दाखल केला. इंदवी म्हणाल्या, 'आम्ही महिलांच्या नावाने केस केल्यानेच पोलिसांना नावं कळली. एरवी कळली नसती. या केससाठी पुढे संघटनेला १२ वर्षं कोर्टात खेटा घालाव्या लागल्या. आम्ही चुकत-चुकतच शिकत होतो.'

नंतरच्या काळात वेगवेगळ्या आरोपांखाली केसेस दाखल होणं, ही संघटनेच्या कार्यकर्त्यांसाठी नेहमीची बाब झाली. खुद्द विजय साठे आणि इंदवी तुळपुळे यांच्यावरही वेगवेगळ्या केसेस दाखल आहेत. यासंदर्भात बोलताना विजय साठे म्हणाले, 'हा कार्यकर्त्यांचे मानसिक धैर्य खच्ची करण्याचा प्रकार आहे. जो कार्यकर्ता या दमनव्यवस्थेबरोबर खातोपितो-जगतो तो त्या व्यवस्थेला मान्य असतो. पण ज्या कार्यकर्त्यांच्या तत्त्वात हे बसत नाही त्याच्या मागे कोर्ट केसेसचा ससेमिरा लावून त्याला हैराण केलं जातं.

मुंबईजवळ असलेल्या ठाणे जिल्ह्यातल्या जमिनीवर आज अनेकांचा डोळा आहे. असे हितसंबंध असलेल्यांची हातमिळवणी होते. समोर एकटा आदिवासी उभा असतो. पण तो हुसकला जात नाही कारण सोबत संघटना असते. एकीकडे हा सततचा संघर्ष तर दुसरीकडे एकूणच सभोवतालच्या सगळ्या वातावरणात झपाट्याने बदल होत असताना स्वतःच्या तत्त्वांना चिकटून राहणं हास्यास्पद ठरवलं जात आहे. एस.टी.साठी रांगेत उभ्या असलेल्या इंदवींना गावात त्यांच्याच समोर लहानाचा मोठा झालेला एखादा तरुण ऐकवतो, 'गाडी का घेत नाही? तुम्हा लोकांना काय कमी आहे?' तर आपल्या कार्यकर्त्यांचा हात धरून विजय साठे चालत असताना मागनं जाणारा कोणी शेरा मारतो, 'हे लोक असेच मरणार!' (विजय साठेंची दृष्टी कमी झालेली असल्याने त्यांना चालताना कोणाची तरी सोबत लागते.)

या सगळ्याचा त्रास होत नाही का? याचं उत्तर देताना इंदवी म्हणाल्या, 'लोकांना असं वाटणं स्वाभाविक आहे. कारण इतर संस्था-संघटना ते आलिशान जगतानाच पाहतात. आमच्याच लोकांची ही करणी आहे. याचं वाईट वाटतं. गाड्या, मोबाईल, लॅपटॉप, विमानप्रवास हा असा सजवलेला केक परदेशी संस्था देत असताना त्याला कोण किती काळ नाही म्हणणार? स्वतःचं स्वातंत्र्य गहाण टाकून अनेक संस्था-संघटना तो स्वीकारतात आणि मग लोकांचे तर कार्यकर्त्यांबद्दलचे मतही बदलते.'

विजय साठे या संदर्भात आणखी एक महत्त्वाचा मुद्दा मांडतात, लोकांनीही आज भ्रष्टाचार स्वीकारलेला आहे. तुम्हीही







अनुक्रमणिका

वितरण यांच्या संतुलनाचा यक्षप्रश्न कसा सोडवावयाचा याचे उत्तरही आजवर कोणी देऊ शकत नाही. राजकीय निर्धाराच्या अभावामुळे हे घडले. मग हा निर्धार आजचे सरकार अचानक कसा दाखवू शकेल? आणि दाखवला तर त्याला कोसळायला कितीसा अवधी लागेल? परकीय लष्करी आक्रमण झाले तर भावनात्मक आवाहन प्रभावी होऊ शकते. मंदिर-मशीद प्रश्नावर इतर सर्व विसरून लोक लढावयास, सोसावयास तयार होतात. आर्थिक प्रश्नाचे सामान्य जनतेला ना सोयर, ना सुतक. आपला रोजगार, आपले वेतनमान, भाववाढ एवढ्याच गोष्टी सामान्य जनतेला समजत असत. जसे रुग्णाला ताप समजतो, आपले डोकं, पोट दुखते हे कळते. परंतु त्याची कारणे त्याला माहीत नसतात. [मग तो वेडेचार करतो किंवा विविध अंधश्रद्धांतून अनेक प्रकार करतो.]

अर्थमंत्री झाल्यानंतर साहजिकच त्या स्थानाच्या अनेकविध मर्यादा त्या व्यक्तीवर येतात. हे अटळही आहे. त्यामुळेच मननोहन सिंग यांनी २० मे १९८६ रोजी केलेल्या भाषणातील उद्गार यादृष्टीने उद्बोधक आहेत. (उद्घाटनाचे भाषण : 'Preparing India for the year 2000', इंडियन असोसिएशन ऑफ सोशल सायन्स इन्स्टिट्यूशन्स यांच्या विद्यमाने आयोजिलेले आंतरशास्त्रीय चर्चासत्र, नवी दिल्ली २०-२२ मे, १९८६, IASSI Quarterly Newsletter, खंड ५, अंक १) या भाषणात ते सांगतात : It must be our aim to creat by the year 2000 the conditions for self-sustaining growth inter-nally and the development of techonology. The long term goal should be to make India a modern, techonologically progressive eco-nomy and a more just society, with an expanding capacity to provide basic material and cultural requisites of all people." [ऐकल्यानंतर 'Amen' म्हणण्याचा मोह होतो की नाही? ही प्रार्थना तर आजवर सर्वांनी केली आहे.]

परंतु मनमोहन सिंग आणखीही काही सांगतात :

"The achievement of near full employment and the satisfaction of basic human needs, including universalisation of elementary education and reasonable health care facilities for all, would make heavy demands on the resources of the public sector. In order to sustain the large investments required for fulfilling the developmental objectives, the government would have to take major initiatives to improve the buoyancy and the elasticity of the tax system and in containing non-productive expenditure. Simultaneously, the internal resource generating capacity of public enterprises will need to be greatly improved. Priority attention will have to be given to improving the efficiency and the productivity of public sector enterprises. Simultaneously, fiscal and other policies will need to create a climate conductive to savings and their utilisation in high priority sectors. Effective control of inflation and curb on generation of black money would constitute important elements of such a strategy." [Manmohan Singh had set for himself a very tall order indeed.]

त्याच भाषणात मनमोहन सिंग यानंतर शेवटी सांगतात : "There are clearly new options and opportunities which, if sizwd, can hasten the process of strucyural change."

याचा तपशील ठरवणे आणि तो कार्यवाहीत आणणे हेच खरे आव्हान आहे. हे आव्हान केवळ मनमोहन सिंग यांच्यासमोरच आहे, किंवा शासनापुढे आहे वा अमूर्त संकल्पनेच्या आपल्या सर्व राष्ट्रासमोर आहे असेच मात्र नाही. ते तुम्हाआम्हा सर्वांसमोर, सामूहिक व व्यक्तिगतरित्या, आपापल्या क्षेत्रातील कामाच्या संदर्भात व भारताचा एक नागरिक म्हणून सर्वसामान्य संदर्भातही आपल्यासमोर उभे आहे.

या आव्हानाला प्रतिसाद कसा देणार?

## ६
## प्रतिसाद

### १. राजकीय निर्धार

तीन आर्थिक महासत्ता, अमेरिकेची लष्करी अतिसत्ता, संयुक्त राष्ट्र संघटनेची (UNO) निर्णयानुसार लष्करी कार्यवाही करण्याची क्षमता, जागतिक बँक व आंतरराष्ट्रीय नाणेनिधी यांचे सौम्य भाषेतील परंतु कठोर आग्रह या सर्वांशी स्वाभिमान राखून मुकाबला करावयाचा असेल तर निदान भावनात्मकदृष्ट्या एक

एकात्म, एकसंध राष्ट्र अशी भारताची प्रतिमा जगासमोर उभी राहिली पाहिजे. (जशी आज चीनची आहे.) अंतर्गत विचार केला तरी आर्थिक आरिष्टातून बाहेर पडण्याकरिता ज्या कठोर आर्थिक शिस्तीची अंमलबजावणी करावी लागेल त्यासाठी लागणारा राजकीय निर्धार सर्वपक्षीय सहमतीच्या आधारावरच प्रकट होऊ शकेल. यासाठी राजकीय संरचनेत बदल करावा लागेल. राजकीय अस्पृश्यतेच्या पलीकडे जावे लागेल. राष्ट्रीय सरकारात सर्वांचा समावेश ('भाजपा'सह) किंवा निदान ज्या किमान कार्यक्रमाबाबत एकमत होऊ शकेल (लोकसंख्या नियंत्रण, प्राथमिक शिक्षणाचे सार्वत्रीकरण, प्रत्येक खेड्याला पाण्याचा पुरवठा, स्वावलंबी रोजगाराचा विकास आदि) अशा कार्यक्रमाला सर्वांचा पाठिंबा व जोपर्यंत असे कार्यक्रम पार पाडले जात आहेत तोपर्यंत सरकारला अन्य कोणत्याही कारणाने धोका निर्माण होणार नाही अशी दक्षता घेणे हे सर्वांनी आजचे राष्ट्रीय कर्तव्य म्हणून मान्य करावे लागेल.

भारत-पाकिस्तान, भारत-चीन युद्धाच्यावेळी काही काळ आपण अशी एकात्मता प्रकट करू शकलो. हा युद्ध कालखंडही तसा अल्पच होता. स्वातंत्र्य संपादनाच्या आधीच्या दीर्घ ऐतिहासिक कालखंडात ही एकात्मता भारताने कधीच प्रकट केली नव्हती, हे दारूण सत्यही आपण विसरता कामा नये. आर्थिक आरिष्टाच्या पाठोपाठ चोरपावलांनी किंवा स्फोटकनिनादांनी राजकीय आरिष्टही येत असते, याचे भान आपल्याला राहील काय?

या दृष्टीने 'भाजपा'ची भूमिका या कालखंडात महत्त्वाची, किंबहुना निर्णायकही ठरेल अशी शक्यता आहे. पक्षोपक्षांची रस्सीखेच असेच केंद्रातील राजकारणाचे स्वरूप राहिल्यास 'भाजपा'ला आपले वजन हवे तसे हवे त्या पारड्यात टाकून सत्तेचा समतोल उलटापालटा करून टाकता येईल. राष्ट्रहिताचा दूरगामी विचार करून 'भाजपा'चे नेते हा मोह टाळतील अशी आशा करावयास जागा आहे.

'भाजपा'ची याहून मोठी कसोटी उत्तर प्रदेशात लागणार आहे. या निवडणुकीत मुसलमानांची मतपेटी 'भाजपा'ने नाकारली आहे. परंतु हिंदू मतपेटी हेच आपले सामर्थ्यसर्वस्व राहावे असे धोरण 'भाजपा' चालविणार असेल तर ते राष्ट्राला व अंतिमतः 'भाजपा'ला ही घातक ठरल्याखेरीज राहणार नाही. आपल्या राज्यकारभाराने 'भाजपा' मुसलमानांच्या मनात त्यांच्या न्याय्य हक्कांना कोणतीही बाधा नाही, असा विश्वास निर्माण करू शकला तर ते त्यांचे सर्वात मोठे यश असेल. मंदिर-मशीद प्रश्नाची सामंजस्याने सोडवणूक ही अर्थातच त्यातील आद्य कसोटी होईल. या कसोटीस 'भाजपा' उतरला नाही तर ते केवळ 'भाजपा'च्याच दृष्टीने नव्हे तर राष्ट्राच्या दृष्टीनेही दुर्दैवाचे ठरेल.

### २. उच्चतंत्र स्वीकार - सामाजिक न्यायासाठी

उच्चतंत्र विरुद्ध सामाजिक न्याय (बेकारीमुळे निर्माण होणाऱ्या समस्येमुळे) असी मांडणी बहुशः करण्यात येते. कामगार संघटना मजबूत व आक्रमक असल्या तर उच्च तंत्राचा स्वीकार अडविताही येतो. ही समस्या सोडविण्याचे तडजोडीचे मार्ग संभवू शकतात. त्यांचा शोध कामगार संघटनांच्या समंजसपणावर व आजच्या कामगारांच्या उचित अपेक्षा पूर्ण करण्याची प्रतिपक्षाची सिद्धता यावर अवलंबून असतो.

परंतु सामाजिक न्यायासाठीच उच्च तंत्राचा काही किमान स्वीकार आवश्यक आहे, ही मांडणी आपल्याकडे आग्रहाने करताना कोणी दिसत नाही. खेड्यातील दप्तर संगणकावर आणले तर सामान्य शेतकरी तलाठी आदींच्या जंजाळातून मुक्त होईल की नाही? बँकांत संगणकाचा सरसहा वापर सुरू झाला तर त्यांची कार्यक्षमता वाढेल.

परिणामी अर्थव्यवहार विकसित होतील, संपन्नता येईल, नवे रोजगार निर्माण होतील हे खरे आहे की नाही? दूरदर्शनचा वापर उपभोगवादी जाहिरातींसाठी करण्याऐवजी जनशिक्षणासाठी प्रभावी पद्धतीने करता येईल की नाही? (रामायण, महाभारत मालिकांच्या दूरदर्शन जाहिरातकालाचा विचार करावा. खर्च कोण कसा करणार? खर्च केला नाही तर, जनशिक्षणाच्या अभावी निर्माण होणाऱ्या सामाजिक परिव्ययाचा विचार केला तर हा प्रश्नही भेडसावणार नाही.)

'गांधी वुईथ सॅटेलाईट'ची संकल्पना ॲलव्हिन टॉफलरने आपल्या 'थर्ड वेव्ह' या ग्रंथात मांडली आहे. उपग्रह हे उच्च तंत्राचे उच्चतम प्रतीक आहे. दळणवळण आणि माहिती संकलन व माहिती प्रसारण या तंत्रात जी प्रगती झालेली आहे त्यामुळे आज संपूर्ण जगच एक खेडेगाववजा घटक झाले आहे (global village). 'माणसाने अधिपती (master) बनावे, यंत्र बनू नये' एवढाच महात्मा गांधींचा इशारा होता. तपशील आपण भरावयाचा आहे.

### ३. समाजवादाचे काय?

'लोकशाही समाजवाद' हे पुस्तक मी तीस वर्षांपूर्वी लिहिले. त्या पुस्तकाचा प्रारंभ मी 'समाजवाद हा आजचा युगधर्म आहे,' या वाक्याने केला होता. आज अनेकांना याचे हसू येईल. मला मात्र आजही त्यात फरक करावा असे वाटत नाही. हा केवळ अज्ञानी आडमुठेपणा असू शकेल काय? माझ्या मनाशीच मला या प्रश्नाचे उत्तर शोधावे असे वाटते.





आज कोणते संदर्भ बदलले हे जितके महत्त्वाचे आहे तितकेच कोणते संदर्भ बदललेले नाहीत हेही महत्त्वाचे आहे. जगात दारिद्री राष्ट्रे अस्तित्वात आहेत हा संदर्भ बदलला काय? जगातील दोन-तृतियांश लोकसंख्या या राष्ट्रांत राहते हा संदर्भ बदलला काय? केवळ आर्थिक प्रगतीने माणूस सुखी होणार नाही, व्यक्तिस्वातंत्र्यावर आधारित रसरशीत लोकशाहीचे अस्तित्व त्यासाठी आवश्यक आहे, हा संदर्भ बदलला काय? हे आणि असे संदर्भ जर बदलले नसतील तर 'लोकशाही समाजवाद' तरी हे संदर्भ बदलू शकतो काय एवढाच प्रश्न शिल्लक राहतो. दारिद्र्यापासून मुक्ती व लोकशाहीची उभारणी हीच लोकशाही समाजवादाची मूलभूत प्रतिज्ञा आहे, हे जर खरे असेल तर माझ्या पहिल्या वाक्याला मी एवढीच पुस्ती जोडेन : 'लोकशाही समाजवाद हा आजचा युगधर्म आहे व सदैव राहावयास हवा.' त्या त्या कालखंडात जे वारे वाहत असतात ते नेहमी युगधर्माचेच असतात असे नव्हे. अनेक वेळा त्या प्रभावी, प्रभंजक परंतु केवळ वावटळीच असतात, याचे भान समाजधुरीणांनी ठेवणे आवश्यक आहे. त्यामुळे अंतिम ध्येय लक्षात ठेवून त्यांना आपल्या शिडांची दिशा बदलावी लागते; काही वेळा ती आवरून गुंडाळी करूनही ठेवावी लागतात. भारतीय समाजवादाची शोकांतिका काही प्रयोग फसले असे नाही तर आपण तारू हाकारण्याचा कधी निर्धाराने प्रयत्नच केला नाही. केवळ भावना पुरेशी होईल व 'कोलंबसाचे गर्वगीत' आपण जोशाने गात राहिलो तर ते आपोआप नवक्षितिजाचा किनारा गाठील, या मध्यमवर्गीय स्वप्नरंजनात आपण समाधान मानत राहिलो. असे झाले नसते तर, भांडवलशाहीच्या विरुद्धचे आक्षेप दूर झाले नसताना व साम्यवाद झपाट्याने पराभूत होत असताना आता यापुढे मार्ग कोणता अशा विवंचनेत जग पडलेच नसते. भारतीय समाजवादी क्रांतीचा आदर्श जगापुढे उभा राहिला असता. कारण अनिर्बंध भांडवलशाही व हुकुमशाही साम्यवाद हे दोन मार्ग टाळूनच लोकशाही समाजवाद भारतात आपले मार्गक्रमण करणार होता.

असा मार्ग शोधताना काही व्यावहारिक तडजोडी कराव्या लागतात. तशी सवलत सर्व विचारवंत नेत्यांनी आपल्या अनुयायांना दिलेली आहे. अगदी मार्क्सने देखील. "मार्क्स हा समीक्षक किंवा टीकाकार होता. समाजवादी समाजाच्या स्वरूपरचनेविषयी त्याने विचार केला नाही. भविष्यातील प्रश्न त्या त्या वेळी पाहून घेतले जातील अशी त्याची दृष्टी होती. भविष्याविषयी रचनात्मक विचार करणे हे त्याला स्वप्नरंजन वाटे आणि तो त्याची निर्भत्सना करी. त्यामुळेच समाजवादी अर्थव्यवस्थेसंबंधी मार्क्सच्या लेखनात एक शब्दही आढळत नाही." असे उद्‌गार आपल्या नव्या आर्थिक धोरणाचे समर्थन करताना लेनिनने काढले. (मानवेंद्रनाथ रॉय, नवमानवतावाद अनु. गोवर्धन पारीख, प्राज्ञ पाठशाळा, प्राज्ञमाला क्र. १).

मार्क्स, गांधी, आंबेडकर ही भारतातील (विशेषतः महाराष्ट्रातील) समाजपरिवर्तनाच्या क्षेत्रात काम करणाऱ्या कृतिशीलांची प्रेरणास्थाने आहेत. गांधीजींनी ही सवलत आपल्या अनुयायांना दिलेली होती. 'गांधी-वाद' नावाचा काही 'वाद' बनवू नका आणि माझ्या दोन मतात जर तुम्हाला फरक आढळला तर माझे नंतरचे मत हे अधिक परिपक्व आहे असे समजा, असे त्यांचे सांगणे असे. ('And if you are certain that I have retained my sanity in the meanwhile' असे पूरकही त्यांनी आपल्या विधानाला जोडले होते व ते केवळ विनयात्मक शैलीचा एक आविष्कार म्हणून न करता मनापासून केले होते असे मानावयास हरकत नाही.) बाबासाहेब आंबेडकरांनी ज्या भूमिका मांडल्या त्या त्यांच्या शिष्यांनी, अनुयायांनी तपासून पहाव्यात व शिष्याने गुरूविषयी योग्य आदर राखून गुरूचा वैचारिक क्षेत्रात प्रतिवाद केला तरी तो गुरूचा गौरवच आहे असे आंबेडकर यांचे सांगणे होते.

स्वतंत्र विचार करण्याच्या आपल्या उत्तरदायित्वापासून यामुळे तिघांपैकी कोणीही आपल्याला संरक्षण देऊ इच्छित नाही. गांधीजींनी कनवाळूपणे एक मंतरलेला ताईत मात्र आपल्या हातात दिला होता.

'मी एक मंतरलेला ताईत तुला देतो. ज्या ज्या वेळा हे करू की ते करू अशी शंका तुझ्या मनात निर्माण होईल त्या त्या वेळी तू आजवर कधी पाहिलेल्या अत्यंत दीन दरिद्री माणसाचे चित्र नजरेसमोर आण, आणि स्वतःला असा प्रश्न विचार की, मी जे करीन ते या माणसाला उपयोगी होईल की नाही आणि त्या प्रश्नाचे उत्तर जर होकारार्थी आले तर तो मार्ग योग्य आहे असे तू समज.'

हा सनातन आणि तरीही अद्यतन संदर्भ आहे. आणि हा ताईत आपण हरवून आता जवळजवळ चार दशकांचा काळ उलटून गेला आहे.

अर्थशास्त्राच्या अभ्यासकांना आल्फ्रेड मार्शल यांनी स्वतःविषयी सांगितलेल्या एका गोष्टीची आठवण होईल. मार्शल सांगतात :

"एके दिवशी बाजारात फिरत असता एका अत्यंत दीन दरिद्री माणसाचे चित्र मला आढळले. मी ते विकत आणले आणि माझ्या अभ्यासिकेत लावले. ज्या ज्या वेळी अर्थशास्त्राच्या अभ्यासाचा मला कंटाळा येई त्या त्या वेळी मी त्या चित्राकडे पाही आणि स्वतःला म्हणे, 'तुझा अभ्यास या माणसाला उपयोगी पडू शकेल या श्रद्धेने तू तो चालू ठेवलाच पाहिजे.' आणि मी परत

अनुक्रमणिका

अभ्यासाकडे वळत असे." (A.C. Pigou, MEMORIALS OF ALFRED MARSHELL.)

अशी असंख्य हालती बोलती चित्रे पहावयास भारतात नुसती खिडकीतून बाहेर नजर टाकली तरी पुरेसे आहे.

### ४. जनतेचा सहभाग

हा ताईत जर आपण हरवला नसता तर आर्थिक विकासासाठी जो जनतेचा सहभाग आवश्यक आहे असे आपण मानतो तो उत्साहाने उपलब्ध करून घेण्यात आपण अपयशी झालो नसतो. 'सहभागी व्हा' असे आपण सतत सांगत राहिलो. परंतु 'अरे कशासाठी?' या त्यांच्या मूक प्रश्नाला आपल्याकडे उत्तर नव्हते. अनेक गोष्टी इतक्या स्पष्ट आहेत की, त्यांचा अधिक खुलासा करण्याची आवश्यकता असू शकते असेच आपण मानले नाही. 'साक्षर व्हा' - 'कशासाठी?' साक्षरतेचा प्रसार झाला की उत्पादनात वाढ होते असे जागतिक बँकेचे अभ्यासक सांगतात म्हणून? की जागतिक बँक त्यासाठी काही खर्चाची तुम्हाला अट घालते म्हणून? ती बँक तरी जनतेपर्यंत आपण काही पोचविण्याचा प्रयत्न केला या भ्रामक समाधानासाठी सांगते की, प्रत्यक्षात खरोखरच 'ग म भ न' चा आणि उत्पादनाचा काही संबंध आहे? माझ्या खेड्यात शिक्षणाच्या कोणत्या तरी स्तरावर तो दिसते का? निदान साक्षरतेच्या व प्राथमिक शिक्षणाच्या तरी? अशी मूक प्रश्नमाला कुटुंबनियोजन कार्यक्रमाविषयीही निर्माण होऊ शकेल. या प्रश्नांची पाळेमुळे केवळ आर्थिक नसतात तर समाजाला सर्व अंगाशी स्पर्श करणारी असतात, गर्भाचे लिंग समजणे आज शक्य आहे; अनेक कारणांनी लोकांना, स्त्रियांनादेखील, मुलगी होणे नकोसे वाटते. त्या कारणांच्या पाळामुळांना हात घातला नाही तर स्त्रियांचे प्रमाणच भावी पिढ्यांत कमी होईल व लोकसंख्येच्या वाढीला आळा बसेल. हे इष्ट की अनिष्ट? या मार्गाने हा आळा बसणे अनिष्ट आहे असेच सर्व सुजाण लोकांचे मत असेल. परंतु हे अनिष्ट टाळावयाचे असेल तर केवळ प्रचाराने ते टळणार नाही हे स्पष्ट असावयास हरकत नाही.

ज्या गोष्टीत लोकांचे हित स्पष्टपणे साठवलेले आहे त्या गोष्टी घडविण्याविषयी योग्य ती संघटनात्मक रचना केली की लोकांच्या कर्तृत्वाचा प्रवाह त्या दिशेने सहज वाहू लागतो. स्वयंसेवी संघटना त्या कामासाठी पुढे येतात. 'ग्राहक पंचायत' हा असाच महाराष्ट्रात एकदीड दशकापूर्वी एक प्रभावी प्रवाह राहिला. 'पाणी पंचायत' हा एक दुसरा प्रवाह. 'ग्राम पंचायत' हा तिसरा. 'प्रयोग परिवार' हा चौथा. महिलांना उद्योगासाठी अल्प भांडवल व्यक्तिगत हमीवर, बँकांच्या अडचणीत न आणता, आवर्ती ठेव म्हणून उपलब्ध करून देण्याचा युवा प्रबोधिनीचा प्रयत्न हा पाचवा. असे इतरही सांगता येतील. हे प्रवाह कसे सुरू होतात, कधी व का कुंठित होतात, ते प्रभावीपणे प्रवाही होण्यासाठी काय करावे लागेल यासारखे प्रश्न अर्थशास्त्राच्या महाराष्ट्रातील आजच्या अध्ययनात, अध्यापनात व संशोधनात आपण विचारात घेत नाही. जनतेच्या प्रश्नांशी बुद्धिजीवी वर्ग संपर्क साधून आहे असे आपण मग कसे म्हणू शकतो?

या ठिकाणी मला एक आठवण होते एका लोकविलक्षण मोर्चाची. लोकविलक्षण यासाठी म्हणावयाचे की, असा मोर्चा अन्यत्र कुठेही (महाराष्ट्रात, भारतात वा जगात) व आजवर अन्य कधीही निघाल्याचे मला माहीत नाही. दुष्काळग्रस्त भागातील लोक शिवाजी विद्यापीठावर मोर्चा घेऊन आले होते. 'आमच्या प्रश्नांचा अभ्यास करा, अन्यथा आमच्या अभ्यासासाठी तुमचे ग्रंथालय खुले करा, अशी त्यांची मागणी होती.

प्रथमदर्शनी हे आपल्याला विचित्र वाटते. परंतु तथाकथित विद्वत्तेच्या दुर्बोधीकरणाचा बुरखा दूर करण्यासाठी असेच व्हावे लागते. नर्मदा प्रकल्पाचे विरोधक तरी तुमच्याकडील सर्व माहिती अभ्यासासाठी आम्हाला उपलब्ध करून द्या असेच मागत होते व मागत आहेत की नाही?

जनतेच्या सहभागाचे काही पैलू हे असे आहेत. काही समस्यांविषयी व त्या समस्यांच्या उत्तरांविषयीची सहमतीही या वातावरणनिर्मितीसाठी सर्वात पोषक ठरेल. ते उत्तरदायित्व राजकीय नेत्यांचे व राजकीय पक्षांचे आहे. परंतु केवळ त्यांचेच आहे असे नव्हे. हा केवळ दुसऱ्यावर दोषारोप करून आपण नामानिराळे होण्याचा प्रयत्न होऊ नये. 'तुम्ही एक बोट दुसऱ्याकडे दाखवित असताना, तीन बोटे तुमच्याकडे बोट दाखवित असतात' या कडव्याची येथे आठवण होते. ती तीन बोटे, दुसऱ्याकडे एक बोट दाखवताना, आत दुमडलेली आपलीच बोटे असतात. आपले अंतर्मन आपल्यालाही नकळत आपला निर्णय देत असते.

### ५. आपल्या हातातील पर्याय

मनमोहन सिंग यांच्या यापूर्वी निर्देश केलेल्या चर्चासत्र उद्घाटनाच्या भाषणात ते शेवटी म्हणाले होते:

"Social science research can con-tribute a great deal to our understanding of the dynamics of social change and in helping to evolve an integrated policy framework for dealing with the problems of poverty, ignorance and disease."

आपल्या भाषणात मनमोहन सिंग यांनी केलेले हे आवाहन (किंवा सौम्य शब्दांत दिलेले आव्हान) अर्थातच अर्थशास्त्रज्ञांनाही लागू आहे. त्याचप्रमाणे एकूण बुद्धिजीवी वर्गालाही साक्षेपी अभ्यासाच्या आवश्यकतेचे त्यात सूचक आहे.

हे अभ्यास आंतरशास्त्रीय (Inter-disci-plinary) पद्धतीने व्हावे लागतील. तुटवडा समस्यांचा नाही; अभ्यासकांचा व योग्य अभ्यासाचा आहे. खाली केलेले निर्देश केवळ उदाहरण म्हणून केलेले आहेत. माझ्या व्यक्तिगत माहितीप्रमाणे आर्थिक-सामाजिक परिवर्तनाचे हे पर्याय आता महाराष्ट्रात सिद्ध झालेले आहेत. इतरांच्या अनुभवातून अन्यही काही सुचू शकतील. येथे केलेल्या विधानांविषयीही मतभेद होऊ शकतील. अधिक वादविवाद प्रतिवाद यासाठी केलेली मांडणी या दृष्टीने त्यांच्याकडे पाहिले गेले तरी ते माझ्या दृष्टीने पुरेसे आहे.

अगदी आपल्या महाराष्ट्रात असे आर्थिक व सामाजिक-शैक्षणिक काही प्रयोग सांगता येतील. एकेका व्यक्तीच्या नेतृत्वगुणावर व स्वार्थत्यागावर जर ते विसंबून असतील तर त्यांचे यश सार्वत्रिक करणे दुष्कर असते हे उघड आहे. परंतु अनेकदा ते तसे नसते. हे शोधून काढण्याच्या दृष्टीनेही हे अभ्यास व्हावयास हवेत. काही सामाजिक - शैक्षणिक प्रयोगांचा आर्थिक समस्येशी काय संबंध आहे असाही प्रश्न मनात उभा राहणे शक्य आहे. परंतु थोड्या विचारांती या शंकेचे निरसन आपोआप होऊ शकेलअसे वाटते.

महाराष्ट्रातील असे प्रयोग कोणते? काहीचा निर्देश यापूर्वीच आला आहे.

१. विलासराव साळुंखे यांचा 'पाणी पंचायत'चा प्रयोग. सर्वोच्च स्तरापर्यंत मान्यता मिळूनही तो सार्वत्रिक का होऊ शकत नाही? कोणते राजकीय, सामाजिक, आर्थिक हितसंबंध आड येतात?

२. अण्णासाहेब हजारे यांचा नवग्रामनिर्मितीचा राळेगाव शिंदीचा प्रयोग. हा सार्वत्रिक होऊ शकेल का? कसा, किंवा का नाही?

३. आसपासच्या परिसरात परिवर्तनाचे प्रभावी काम करण्याचा म. वि. कौंडिण्य यांच्या संगमनेर महाविद्यालयातील प्रयोग. अन्य महाविद्यालयात असे कार्य होऊ शकेल काय? कसे, किंवा का नाही?

४. अंधश्रद्धा निर्मूलनाचे नरेंद्र दाभोलकर यांचे आंदोलन. याचा आणि आर्थिक परिवर्तनाचा संबंध येतो का? कसा? समाजपरिवर्तनाच्या या प्रयत्नांसाठी विद्यार्थी, शिक्षक, प्राध्यापक, शिक्षणसंस्था यांची शक्ती वापरता येईल?

५. अच्युतराव आपटे यांनी चालवलेले विद्यार्थी वसतिगृहांचे कार्य. स्वच्छ, शिस्तबद्ध, स्वस्त व विद्यार्थ्यांचे अभ्यासेतर विकासाविषयीही प्रयत्नशील हेही सार्वत्रिक का होत नाही?

६. शि. श्री. काळे यांच्या युवाप्रबोधिनीचे कार्य. ग्रामीण महिलांना अर्थार्जनाची संधी उपलब्ध करून देण्यासाठी चाललेले प्रयोगशील प्रयत्न.

७. श्रीपाद दाभोलकर यांचा 'प्रयोग परिवार' प्रयत्न. तीन दशकांच्या प्रयोगानंतर आता तो समाजापुढे आला आहे व जाणकारांत मान्यताही पावलेला आहे. आपल्याजवळील १० गुंठे जागेत ५ माणसांच्या घराला एक वर्षासाठी लागणाऱ्या सर्व वस्तू (धान्य, भाजी, जेवण, चारा, खत, अंडी, दूध, पाणी, घर, कपडे, फळे, मसाला, लाकूड इत्यादी) घेता येतात व यासाठी लागणारे पाणी, सांडपाणी व वरखर्चाच्या पाण्यातून गावपातळीवर (पावसाच्या पाण्यातूनच) सहज राखता येते, हा त्यांचा दावा (पृ. ५७) कितपत युक्त आहे? (केल्याने होत आहे रे, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे. मे १९९१, पृ. ६६) तो खरा असल्यास किमान जीवनमानाचे, पर्यावरण संरक्षणाचे, स्वस्थ-समाधानी जीवनाचे, अनेक आज अशक्यप्राय वाटणारे प्रश्न सुटण्याच्या दृष्टीने मार्गी लागू शकतील की नाही?

८. आपल्याकडे महत्त्वाच्या प्रश्नांची साधी किंवा कडवी साक्षेपी चर्चाही होत नाही असा सततचा अनुभव आहे. (रामजन्मभूमी-बाबरी मशीद वाद हा भावनात्मक क्षेत्रातील अपवाद). आर्थिक विकासाच्या संदर्भात महाराष्ट्रात नर्मदा प्रकल्पाविषयी झालेले आंदोलन व चर्चा हे एकमेव अपवादात्मक प्रभावी उदाहरण. 'माते नर्मदे'ने (दत्तप्रसाद दाभोलकर, राजहंस प्रकाशन, पुणे, ऑगस्ट १९९०) शोधक पत्रकारितेच्या आक्रमक आवेशात एक भूमिका मांडली. अशा मांडणीत सामान्य माणसाला रस वाटेल अशी रंजकता असते परंतु अभ्यासकाला आवश्यक अशी तटस्थता नसते. 'नर्मदा : माता की बटीक' हे (वसंत पळशीकर, परिसर प्रकाशन, पुणे डिसेंबर १९९०) 'माते नर्मदे'ला उत्तर म्हणून लिहिले गेले. परंतु ते तात्त्विक स्तरावरून व्यावहारिक स्तरावर उतरलेच नाही. या माझ्या विधानांचेही हिरिरीने समर्थन किंवा प्रतिवाद करावा इतका रस किती जणांना आहे?

९. विकासनीतीचाच प्रश्न :

ही एक मूलभूत समस्या आहे. साम्यवाद, समाजवाद, भांडवलशाही या चर्चांच्याही पलीकडे जाऊ पाहणारी ही चर्चा आहे. टॉलस्टॉय, थोरो, गांधीजी, विनोबा, केन्स, झिलिच आदींनी या चर्चेचे सूतोवाच करूनही पुष्कळच काळ लोटला आहे. परंतु आजही ती निर्णायक अवस्थेला आलेली नाही व कधी येईलअसे




दिसत नाही. कारण, येथे मूळ प्रश्न प्रत्येकाच्या जीवनविषयक तत्त्वज्ञानाचा व आपल्या तात्त्विक विचाराशी तो व्यक्तिगत जीवनात कितपत सुसंगत राहतो याचा आहे. हे तत्त्वज्ञान आकलन होणाऱ्या व्यक्ती थोड्या असतात व त्याच्याशी सुसंगत असा आपला जीवनक्रम ठेवणाऱ्या तर विरळाच असतात. त्यांच्याशी चर्चा करावयास आलेल्या साम्यवादी लोकांना गांधीजी सांगत : "तुम्ही जर साम्यवादी असाल, तर स्वतःच्या जीवनात ताबडतोब साम्यवादाच्या आचरणाला सुरुवात करा." (गांधीजींचा हा आग्रह अयुक्त होता असे मला वाटते; साम्यवादाचा आग्रह अर्थव्यवस्थेच्या परिवर्तनातून होणाऱ्या समाजपरिवर्तनातून व्यक्तिपरिवर्तन असा असतो.) ही गांधीजींची अपेक्षा नव्या विकासनीतीच्या प्रवक्त्यांच्याबाबत मात्र अटळ आहे. (यामुळेच 'आपण सर्व सुखसोयी उपभोगणार व इतरांना मात्र गरजा मर्यादित ठेवा असा आग्रह धरणार,' हा आक्षेप या तत्त्वज्ञानाच्या व्यावहारिक मर्यादा दाखवून देतो व म्हणूनच महत्त्वाचा आहे.) 'ज्यांना ही चर्चा करण्यात हौस आहे त्यांनी ती करावी व ज्यांना तसे आपले साधुशील जीवन घडवावयाचे असेल त्यांनी तसे घडवावेही. आमच्या मनात त्यांच्याविषयी नितांत आदर राहील, परंतु संपूर्ण राष्ट्ररचना त्या संकल्पनेवर आधारित अशी करता येणार नाही,' असेच विकासक्रम आखणाऱ्यांचे व तो पार पाडणाऱ्यांचे याविषयीचे म्हणणे असेल. आय. जी. पटेल यांनी भारतीय औद्योगिक विकास बँकेच्या रजत महोत्सवी भाषणामध्ये (१९९०) शेवटी सूचकपणे हे म्हटलेही आहे. या प्रश्नाच्या चर्चेत जगातील सर्व मान्यवर अर्थशास्त्रज्ञांना मनापासून रस राहिलेला आहे. कारण, मानवी जीवनाचीच ती मूलभूत समस्या आहे याचे अवधान मात्र आपण ठेवलेच पाहिजे.

या यादीत आणखीही भर घालता येईल. तसे करण्याची आवश्यकता नाही.

भारत दुर्दैवीच असेल तर पुढील पाच वर्षांच्या काळात अनेक पंतप्रधान आणि त्यांच्याबरोबर नियोजन मंडळाचे उपाध्यक्षही येत राहतील आणि जात राहतील. पंजाब, काश्मीर, आसाम, तामीळनाडू यातील दहशतवादाच्या समस्या तशाच राहतील किंवा नवनवीन जागतिक तंत्रांनी अधिकच बिकट होत जातील. एखाद्या विपरित कृतीने उत्तर प्रदेश व पर्यायाने भारतही त्याच खाईत लोटला जाईल. निर्धाराची पाऊले टाळणे अशक्य झाल्यामुळे आर्थिक अरिष्टही तसेच वाढत राहील.

राष्ट्र पूर्णपणे कोसळल्यानंतरच नवनिर्मितीच्या निर्धाराने उभे राहू शकते असाही जगाच्या इतिहासाचा एक भयानक दिलासा देणारा निष्कर्ष आहे. परंतु कधी कधी त्याआधीच गोर्बाचेव्हना सुचले त्याप्रमाणे आपापल्या संदर्भातील नवपरिवर्तनाचे शहाणपण नेत्यांना सुचते व आपले स्थान धोक्यात आणूनही ते योग्य ती पाऊले उचलू शकतात. नवयुगातला सॉक्रेटीस साखाराव्हसारखा विचारवंत आपले सर्वस्व पणाला लावून काळोख्या कालखंडातही आपली ज्योत तेवत ठेवू शकतो. ही आपली आशास्थाने व प्रेरणास्थाने असावयास हरकत नाही.

माझे व्याख्यान येथे संपले.

परंतु प्रतिपादनाचा सूर नीट थांबवायचा असेल तर मला एका आश्वासनाचा व आवाहनाचा उच्चार केला पाहिजे. 'Programme ASSET" असे माझे या कार्यक्रमाचे अभिधान आहे. (ASSET हे Action for Simultaneous Social and Educational Transformation या शीर्षकाचे संक्षिप्त रूप आहे.) शिक्षक-प्राध्यापकांनी समाजप्रबोधन, पुरोगामी कायद्याचे प्रत्यक्ष समाजजीवनात परिपालन, व समाजपरिवर्तना-साठी संशोधन या स्वरूपाच्या कार्यात सहभागी व्हावे अशी यामागील संकल्पना आहे. केवळ दुःखनिवारणाचे विमोचन (relief) पद्धतीचे कामही महत्त्वाचे असले तरी त्याचा यात समावेश नाही. परिवर्तनासाठी संशोधन व प्रयोग ही मुख्य प्रेरणा असली पाहिजे. ध्येयवादी शिक्षक-प्राध्यापकांची स्वतःची शक्ती ज्या ठिकाणी अपुरी पडेल त्या ठिकाणी पूरक आर्थिक साहाय्याचीही तरतूद आहे. याविषयीची विशेष माहिती 'मैत्रीच्या पलीकडे' (Beyond Friendship) या षण्मासिकाच्या मार्च १९८६, सप्टेंबर १९८८ व सप्टेंबर १९९० च्या अंकात आली आहे. (प्रकाशक : विद्यार्थी सहाय्यक समिती, फर्ग्युसन कॉलेज रोड, पुणे - ५. ) या संदर्भात कोणी माझ्याशी संपर्क साधल्यास मला आनंदच होईल.

✠ ✠ ✠

**१९९१ मधील हे आवाहन आजही २००६ मध्ये कायम आहे.**

**- देवदत्त दाभोलकर**

That man cannot serve both God and Mammon at the same time is the highest economic truth that I know.

**- Gandhiji**

सुप्रसिद्ध अर्थतज्ज्ञ

# डॉ. विजय केळकर यांची आर्थिक सुधारणांची 'विजयी' सप्तसूत्री

निवेदन : डॉ. चंद्रहास देशपांडे

नुकतेच इ.स. २००६ सुरू झाले आहे. राजकीय, सामाजिक, आर्थिक व इतर क्षेत्रांत या वर्षी कोणत्या घटना घडतील, यांचे प्रथमिक अंदाज सर्वत्र बांधले जात आहेत. आर्थिक क्षेत्रापुरते बोलायचे झाल्यास आगामी वर्ष हे गतवर्षीइतकेच उत्साहवर्धक व आर्थिक वृद्धीला जालना देणारे ठरेल, अशी अपेक्षा बुहुतांशी व्यक्त केली जात आहे. सद्यःस्थिती तरी खूप समाधानकारक आहे : भाववाढ (तेलाच्या किमती वाढत असूनही) आटोक्यात आहे. राष्ट्रीय उत्पन्नाची वाढ ७.५ ते ८ % अपेक्षित असून औद्योगिक उत्पादन वेगाने वाढत आहे. निर्यातवाढ तेजीत आहेच; आयातवाढ तुलनेने खूपच अधिक असली तरी त्यातील भांडवली वस्तूंची आयात सातत्याने वाढत असल्यामुळे देशांतर्गत गुंतवणुकीसाठी ती पोषकच आहे; भांडवली बाजारातील तेजी, वाढती विदेशी गुंतवणूक यालाही सकारात्मक बाबींची जोड आहेच. मात्र, सरकारची वित्तीय स्थिती (नेहमीप्रमाणेच) चिंताजनक आहे व पायाभूत सुविधांची कमतरता दिवसेंदिवस अधिकच ग्रासत आहे.

आर्थिक स्थिती प्रगतिपथावर असताना आर्थिक धोरणांची कोंडी मात्र कायम आहे. एका बाजूला पंतप्रधान डॉ. मनमोहन सिंग, डॉ. अहलुवालिया, चिदंबरम् व इतर मंत्री सुधारणांचा कार्यक्रम (Economic Reform Programme) आपापल्या परीने पुढे रेटत असले तरी, प्रत्येक महत्त्वाच्या निर्णयप्रक्रियेत 'डाव्या' पक्षांचा अडथळा, ही आता नित्याचीच बाब होऊन बसली आहे. मग तो कामगार कायद्यातील बदलांचा प्रश्न असो, निर्गुंतवणुकीचा असो वा विम्यापासून विमानतळापर्यंतच्या खासगीक्षेत्राच्या सहभागाचा असो...

एक सर्वसमावेशक, दूरगामी आर्थिक धोरणाची दिशा व त्यादिशेने मार्गक्रमण करण्याचा कृति-आराखडा, याची आज नितांत आवश्यकता आहे. अशी दीर्घकालीन उपाययोजना आवश्यक आहे की, जी आर्थिक, औद्योगिक भरभराटीला प्रोत्साहन देईलच, पण समाजातल्या तळा-गाळाच्या असंख्य लोकांना आर्थिक स्थैर्य देईल व दारिद्र्य-निर्मूलनावर काही ठोस उपाय सुचवील. डॉ. विजय केळकर यांनी असाच एक कृति-आराखडा मांडला आहे. ज्याची गंभीर व साधकबाधक चर्चा होणे जरूरीचे (झाले) आहे.

**डॉ. केळकर यांची तात्त्विक भूमिका :**

MEDC च्या डॉ. धनंजयराव गाडगीळ स्मृती व्याख्यान-मालेचे पुष्प डॉ. केळकर यांनी नुकतेच गुंफले. त्यांच्या व्याख्यानाचा विषय होता, 'भारताचे आर्थिक भवितव्य : सरकारी भांडवल-शाहीच्या पलीकडे जाताना' (India's Economic Future : Moving Beyond State Capitalism). डॉ. केळकरांचे या अत्यंत गहन विषयावरील विवेचम मार्मिक तर आहेच, पण त्याचा आवाकाही मोठा आहे व सध्याच्या प्रमुख आर्थिक समस्यांवर व्यवहार्य उपाय त्यात सुचविण्यात आले आहेत.

ठोस उपाययोजना सुचविण्याच्या आधी, डॉ. केळकर आपली तात्त्विक भूमिका पुरेशी सुस्पष्ट करतात. त्यांचे सर्वात महत्त्वाचे प्रतिपादन असे की, जागतिक अर्थकारण व भारतीय अर्थव्यवस्थेचा (व अर्थनीतीचा) आजवरचा प्रवास या दोहोंचे भान ठेवताना, भारतीय अर्थव्यवस्थेचे एका 'प्रगत बाजारपेठीय अर्थव्यवस्थेत' (Advanced Market Economy) रूपांतर होणे हे नुसते निकडीचे नसून तातडीने होण्याची गरज आहे.

त्यांच्या मते , आज जरी सर्वत्र उत्साही वातावरण असले व देश एका सुवर्णयुगाच्या उंबरठ्यावर उभा असल्याचे भासत असले तरी हे आर्थिक सुवर्णयुग 'आपलेच' आणि 'आपोआप' होईल असे अजिबात नाही.

उलट, असे उज्ज्वल भवितव्य ही फक्त एक शक्यता(च) आहे; त्याचे रूपांतर वस्तुस्थितीत करायला आधुनिक भांडवल-शाहीकडे वेगाने नेणारी धोरणे अंगीकारणे जरूरीचे आहे. जर आपण आजपर्यंत (हेतुपुरस्सर) अमलात आणलेल्या 'लोकानुनय' अथवा 'सकृद्दर्शनी लोकप्रिय' (populist) धोरणाचाच मार्ग चोखाळला तर आपल्या देशाच्या प्रगतीला खीळ बसेल व आर्थिक वाढ खुंटलेल्या अवस्थेतच देश (पुन्हा) जाईल व राहील . 'लोकानुनय व 'सरकारी भांडवलशाही' याचे एक अतूट नातेच असते, असे डॉ. केळकर आग्रहाने मांडतात व असेही ठासून सांगतात की, लोकानुनय प्रथमत:



अनुक्रमणिका

लोकप्रिय वाटला तरी त्याची जबरदस्त वित्तीय किंमत (fiscal cost) देशाला द्यावी लागते व आपण ती अनेक वेळा 'भाववाढ', 'संसाधनांचा आकार्यक्षम वापर' या स्वरूपात दिलेलीही आहे. हे सर्व जर पुढच्या प्रवासात टाळायचे असेल तर बाजारपेठीय अर्थव्यवस्थेला पोषक अशा संस्थात्मक सुधारणा (उदा. सरकारी उपक्रमांचे खासगीकरण) त्वरित करणे आवश्यक आहे.

आर्थिक सुधारणांचा आजवरचा 'अजेंडा' डॉ. केळकरांच्या मते प्रामुख्याने सरकारी नियंत्रणे बाजूला सारून देण्याचा होता. तो जरी महत्त्वाचा असला तरी अर्थव्यवस्थेची भावी दिशा कायम असावी याचा एक सकारात्मक व रचनात्मक (positive and constructive) अजेंडाही मांडायला हवा. अनेक आर्थिक मापदंड व मानके (models) आज उपलब्ध असली तरी आपल्याला, आपल्या देशास योग्य असाच एक आराखडा करायचा आहे. ज्यात आर्थिक वृद्धी ही सर्वसमावेशक (inclusive) असेल, ज्यात कार्यक्षमतेला अनन्यसाधारण महत्त्व असेल, ज्यात उत्पन्नाच्या सुयोग्य वितरणाला (equity) स्थान असेल. लोकशाही अवस्थेतल्या अशा 'भांडवलशाही'कडे डॉ. केळकर अंगुलीनिर्देश करतात.

हे सर्वश्रुत आहे की, पुढील दोन दशके भारताच्या लोकसंख्येला एक 'वरदान' मिळणार आहे, ते म्हणजे एकूण लोकसंख्येतील 'उत्पादक' लोकसंख्येचा (Productive population) वाढता वाटा. डॉ. केळकर सांगतात की, आज आपण जे आर्थिक निर्णय घेऊ, जे दूरगामी धोरण आखू यावर भावी पिढ्यांची आर्थिक प्रगती अवलंबून राहील व म्हणूनच पुरेशा शहाणपणातून व वास्तवाचे भान ठेवूनच ते निर्णय घेतले पाहिजेत. तसे केल्यानेच दारिद्र्यातून कायम-स्वरूपी मुक्ती मिळू शकेल, भावी पिढ्यांना आर्थिक सुबत्तेत राहता येईल व जागतिक अर्थकारण आणि राजकारण या दोन्हीत भारताचा खराखुरा बुलंद आवाज गर्जत राहील... डॉ. केळकरांच्या चित्रात कोणत्याही अंधानुकरणाला स्थान नाही व प्रगत देशांनीही केलेल्या घोडचुका टाळून कसे पुढे जाता येईल, याचे प्रामुख्याने दिग्दर्शन आहे.

गेल्या सुमारे ५० वर्षांच्या आर्थिक इतिहासाचा मागोवा घेताना डॉ. केळकर 'उत्पादकता' व 'अधिकाधिक भांडवलनिर्मिती' यावर प्रामुख्याने लक्ष केंद्रित करतात. यासाठी ते 'दर-मजुरी उत्पादन वाढ' (Growth of output per worker) असा एक नाविन्यपूर्ण निकष आपल्या आर्थिक वृद्धीच्या प्रगतीला लावतात. त्यावरून त्यांचे अनुमान असे की, ही दर-मजुरी उत्पन्नवाढ जी १९५१-१९६५ याकाळात २.०२ टक्के होती, ती १९६५-१९७७ या वर्षांत नाट्यपूर्ण रीतीने घटून ०.५८ टक्केच राहिली व त्यानंतरच्या (गेल्या २५) वर्षांत ती तीन टक्क्यांपेक्षा अधिक राहिली आहे. थोडक्यात, जसजसे उदारीकरणा-कडे आपले धोरण झुकू लागले (१९८० नंतर) तशी या घटकाची वाढ अधिक वेगाने होत राहिली. आज आपल्याला अगदी अलीकडच्या काळातील (१९९१-२००५) उदारीकरणाचा बराच लाभ झालेला आढळतो व त्यावर आधारित अशी सप्तसूत्री डॉ. केळकर मांडतात.

डॉ. केळकरांच्या विचारातून, प्रगत अर्थव्यवस्थेकडे नेणारे सात स्तंभ पुढीलप्रमणे : १) देशांतर्गत एकसंध बाजारपेठ, ज्यात वस्तू व सेवा, कामगार व भांडवल, सर्वांनाच अनिर्बंध फिरण्याची मुभा असेल. २) खुली अर्थव्यवस्था व खुले भांडवल खाते, ज्याच्या सुयोग्य व्यवस्थापनाने आपल्याला जागतिकीकरणाचे फायदे उपभोगता येतील. ३) कॉर्पोरेट गव्हर्नन्स - ज्याद्वारे आज भांडवली बाजारात उभारला जाणारा प्रचंड निधी अत्यंत पारदर्शक पद्धतीने हाताळला जाऊ शकेल. ४) स्पर्धा - स्पर्धा महत्त्वाची आहेच, पण तदनुषंगिक नियमन-संस्था, सार्वजनिक उद्योग व बँकांचे खाजगी-करण यावर तिची भिस्तआहे. ५) सार्वजनिक वस्तूंचे उत्पादन - डॉ.केळकरांना शिक्षणासारख्या यंत्रणेत आमूलाग्र बदल अपेक्षित आहे. ६) सर्वात गरीब अशा १० ते १५ टक्के लोकांकडे उत्पन्नाचे परिणामकारक हस्तांतर आणि ७) शहरी अर्थव्यवस्थेचा पुनर्विचार.

डॉ. केळकर यांच्यादृष्टीने एकसंध, एकराष्ट्रीय बाजारपेठ ही एक महत्त्वाची वीण आहे. ती अस्तित्वात आल्यास आंतरराज्य आर्थिक विषमता कमी होण्यास मदत होईल. हे साकारण्यासाठी अशा एका कर-रचनेचा अवंलब करायला लागेल ज्यायोगे आंतर-राज्य व्यापार सुलभ होईलच, पण स्थानिक स्वराज्य संस्थांना उत्पन्नाचे स्रोतही उपलब्ध होतील. अशा कर-रचनेचा पाया म्हणजे (डॉ.केळकर यांनीच 'करसमिती'द्वारे २००४ साली सुचविलेला), वस्तू आणि सेवा कर (GST, or Goods and Services Tax). हा कर, देशांतर्गत वस्तूंचे उत्पादन, त्यांची Movement व त्यांचा उपभोग या बाबतीत तटस्थ असेल आणि या कररचनेची तार्किक परिणती म्हणजे फक्त तीनच कर अस्तित्वात असतील. आय-कर, GST व मालमत्ता कर; वेगवेगळे आंतर-राज्य प्रवेशकर, स्टँप ड्यूटी, विक्रीकर यांना स्थानच नसेल, केंद्रीय GST आणि State GST यात सुसूत्रता असेल. डॉ. केळकरांच्या मते GST चा पुढचा टप्पा म्हणजे मूल्यवर्धित कराचे 'एक राष्ट्रीय करा'त रूपांतर व कर-उत्पन्नाचे वित्तीय आयोगाद्वारे आंतर-राज्य







अनुक्रमणिका

वितरण. 'खर्चाची' स्वायत्तता अधिक महत्त्वाची आहे. ज्यायोगे राज्य-सरकारांचे खर्च विधायक / रचनात्मक कार्यक्रमांपुरतेच मर्यादित राखता येतील.

खुल्या अर्थव्यवस्थेचा पुनरुच्चार - आपल्या देशात अनेकांचा असा दृढ (गैर) समज (झालेला) आहे की भांडवली खाते खुले करणे हे विकासविरोधी व भीतीदायक पाऊल आहे. डॉ. केळकरांचा प्रमुख मुद्दा असा की भारताची आज अनेक प्रकारच्या सेवांमध्ये इतर देशांशी देवाण-घेवाण आहे. गेल्या १२-१३ वर्षांत भांडवली खात्यात वेगाने वाढ झाली आहे, ज्यावरून असा निष्कर्ष निघतो की, भांडवलाच्या Movement साठी काही मार्ग खुले झालेलेच आहेत! भांडवली खात्यावरची नियंत्रणे नित्यनेमाने गैरलागू ठरत आहेत, कारण त्यात फक्त व्यवहार-मूल्य वाढते. भ्रष्टाचार बोकाळतो व सरकारी 'व्यवस्थे'ला एक विनाकारण महत्त्व मिळते. डॉ. केळकरांच्या मते जुनी, बंदिस्त अर्थव्यवस्था व अर्थनीती त्यागून आपण खुल्या अर्थशास्त्राचा वापर केला पाहिजे. भांडवली खात्यावर रुपया जर परिवर्तनीय झाला तर आंतरराष्ट्रीय वित्तीय क्षेत्रातील स्पर्धेचे फायदे आपल्याला मिळतील. आज ते मिळू शकत नाहीत. कारण आज भारतीय कंपन्यांना फक्त भारतीय वित्त-संस्थांशीच व्यवहार करण्याची परवानगी आहे. हे बंधन उठविले तर भारतीय वित्तीय क्षेत्र अधिक सुदृढ व सक्षम होईल.

दूरसंचार क्षेत्राचा विस्तृत आढावा घेऊन डॉ. केळकर उद्योजकातील स्पर्धेचा सकारात्मक परिणाम ग्राहकांवर कसा झाला हे मांडतात व दूरसंचार हे माध्यम देशाच्या कानाकोपऱ्यात, खोलवर कसे पोचू लागले आहे, हे अधोरेखित करतात. (हीच यंत्रणा जर फक्त सार्वजनिक उद्योगांवर अवलंबून राहिली असती तर दूरसंचाराचे फायदे सर्वदूर पसरलेच नसते). संस्था जर निरोगी असेल, तर ते बऱ्याचशा दुखण्यांवर रामबाण औषध ठरते. उदा. गेली १०-१५ वर्षे भारतीय उद्योगव्यवस्था देशांतर्गत व जागतिक स्पर्धेशी मुकाबला करतच अधिक कार्यक्षम बनत आहे.

डॉ. केळकर, स्पर्धा व खाजगीकरण, यातील परस्परसंबंध स्पष्ट करताना सांगतात की, हितसंबंधांतील संघर्षामुळे अनेक सार्वजनिक उद्योगांचे दोन्ही बाजूंनी फावते. त्या उपक्रमांचे CEO हे मंत्री असतात व मंत्रीमंडळाच्या बैठकीत निर्णयप्रक्रियेतही त्यांचा सहभाग असतो. असे अद्वितीय स्वातंत्र्य खाजगी उद्योजकाला नसते! यात समानता यायलाच खाजगीकरण अत्यावश्यक आहे, असे केळकर सुचवतात. आज जर 'इंडियन एअरलाइन्स' व 'एअर इंडिया' दोहोंचे खाजगीकरण केले तर उड्डयन मंत्र्यांचे एकमेव ध्येय हे, स्पर्धात्मकतेला उत्तेजन देऊन ग्राहकांना विमान-सेवा रास्त दरात पुरविण्यासाठी मदत करणे हेच राहील. खाजगीकरणाद्वारे, सरकार व लोकांचे हितसंबंध कसे सांधता येतील, विमानसेवा असो, पेट्रोलियम वा रेल्वे असो, स्पर्धेनेही सर्व क्षेत्रे ढवळून निघतील व त्याचे लाभ सामान्य लोकांना दर्जेदार सेवा व वाजवी दर, या दोन स्वरूपात मिळू शकतील, हा डॉ. केळकर यांच्या युक्तिवादाचा आशय आहे.

मुंबई, बंगलोर या प्रमुख शहरांतही पायाभूत सोयींची काय दुर्दशा झाली आहे, हे अधिक विस्ताराने सांगण्याची गरज नाही. त्याचाच उल्लेख करून डॉ. केळकर असे प्रतिपादन करतात की, 'नागरी पायाभूत सुविधां'च्या सुयोग्य नियोजनाच्या विचारालाही आपणअजून सुरुवात केली नाही. नागरी पायाभूत सोयी-सुविधांचा प्रश्नही डॉ. केळकरांच्या मते उपभोक्त्यांनी आवश्यक/वास्तव किंमत देण्याबद्दलचा आहे. आज अर्थातच योग्य सांघिक व्यवस्थापन, महापौरांची ताकद अशा बऱ्याच बाबींचा पुनर्विचार होण्याची आवश्यकता डॉ. केळकर मांडतात. येथे, ते दिल्लीचे मॉडेल राबवावे असेही नमूद करतात. दिल्ली हे राज्यही असल्यामुळे केंद्र सरकारच्या निधीचे हस्तांतर दिल्लीला प्रत्यक्ष स्वरूपात मिळते. इतर कोणत्याही शहराचे हे भाग्य नाही. दिल्ली 'शहरा'च्या वा 'राज्या'च्या समस्या वेगळ्या नसल्यामुळे दिल्लीच्या मुख्यमंत्री या(च) दिल्लीच्या महापौर असतात व त्यांचे राजकीय भवितव्य दिल्लीत काय होते यावरच अलवलंबून असते.

तात्त्विक दृष्टीने पाहता, सरकार हे जरी कर-उत्पन्नातून सार्वजनिक वस्तू/सेवा पुरविण्याचे माध्यम असले तरी, भारताच्या बाबतीत ते कसे अपुरे, अकार्यक्षम आहे, याचा इतिहास पुरेसा बोलका आहे. डॉ. केळकर यावर एक तोडगा सुचवितात. अशा गोष्टींचा पुरवठा कंत्राटी तत्त्वावर करावा व जे परिणाम प्रत्यक्ष दिसतील तेथे(च) किंमत द्यावी. 'प्राथमिक शिक्षण' या अत्यावश्यक सेवेचे कसे वाभाडे निघाले आहेत याचे विश्लेषण करून ते शिष्यवृत्तीच्या व व्हाऊचर्सच्या माध्यमांद्वारे सरकारी खर्चाचा मार्ग सांगतात. शाळांमध्ये स्पर्धात्मकता येईल व एक पारदर्शक अशी शैक्षणिक रचना निर्माण होऊन सरकारवरील वित्तीय बोजा बऱ्याच प्रमाणात कमी होईल व सरकारचे लक्ष कायदा व सुव्यवस्था, पोलिस अशा मूलभूत समस्यांकडे वळविता येईल अशी ग्वाही ते देतात.

दारिद्र्यनिर्मूलनाच्या समस्येवर सर्वात प्रभावी उपाय म्हणजे 'राष्टीय उत्पन्नवाढीचा उच्चतम दर' असे डॉ. केळकरांचे मत असले तरी या राष्ट्रीय उत्पन्नाचा १%वाटा सर्वात गरीब अशा

१०% लोकांमध्ये हस्तांतरित व्हावा, असे ते आग्रहपूर्वक सांगतात. खरे आव्हान आहे, ते या धोरणाच्या अंमलबजावणीचे व 'गरीब कोण' या प्रश्नाच्या योग्य उत्तराचे. आजवर बऱ्याचशा उपक्रमांचे लाभार्थी मध्यमवर्गच बनले आहेत. (उदा. एलपीजी वा केरोसीन अनुदाने, खतांवरील अनुदाने, रेशनिंग, मोफत वीज, अल्पबचत योजना इ. सर्व स्तुत्य उपक्रमांचे लाभार्थी आपणच आहोत.) या कोणत्याही उपक्रमांना त्यांच्या मांडणीत बिलकुल स्थान नाही, हे कटू सत्य! रोजगार हमीच्या धोरणाबद्दल ते आशावादी असले तरी, त्याची परिणाम-कारकता ग्रामीण विभागांतच साधली जाईल असे त्यांना वाटते.

आजच्या घडीला, औद्योगिक क्षेत्र हे देशाच्या आर्थिक वाटचालीत केंद्रीय झाले आहे. आज कॉर्पोरेट गव्हर्नन्सचे प्रमुख आव्हान कंपन्यांच्या बोर्डातील लोकांचे वैयक्तिक फायदे टाळण्याचे व पारदर्शकता आणण्याचे आहे. त्यासाठी योग्य कायदे, नियमन व पर्यवेक्षण आवश्यक आहे. डॉ. केळकर कॉर्पोरेट गव्हर्नन्सचे विस्तृत विश्लेषण करताना म्हणतात की, जेव्हा एखाद्या वैयक्तिक गुंतवणूकदाराचा आवाज व मत दोन्ही उपलब्ध असते, तेव्हाच त्याची गुंतवणूक शेअरबाजारासाठी अधिक आकर्षित होऊ शकेल व त्या द्वारे(च) अशा बाजारपेठेत अधिक भांडवल निर्माण होईल व अनेक प्रकल्पांना निधी उपलब्ध होईल. बाजारपेठीय शिस्त, स्पर्धा व पराकोटीची एकात्मता यातूनच खराखुरा कॉर्पोरेट गव्हर्नन्स साकार होईल, असे डॉ. केळकर पटवून देतात.

डॉ. केळकर यांच्याच मते वरील सर्व 'अजेंडा' हासिल होऊ शकेल. ते असा दाखला देतात की, आयात शुल्कांतील लक्षणीय घट, कर-सवलती या सुधारणाही राजकीयदृष्ट्या नाजूक व वादग्रस्तच होत्या. पण तरीही आपण त्या अमलात आणल्या. त्याचप्रमाणे वरील सप्तसूत्री वास्तवात येऊ शकेल. मात्र ते सोपे वा सुलभ आहे असा दावा त्यांचा नसून, हा कृती-आराखडा प्रत्यक्षात कसा उतरवायचा यावर त्यांचा भर आहे. सारांशाने, डॉ. केळकर असे प्रतिपादन करतात की : १. सरकारधार्जिण्या समाजवादाचे कोणालाही मुळीच आकर्षण नसले तरी समग्र स्वरूपातील पर्यायी अर्थनीती अजून दूरच राहिली आहे. २. यासाठीच सरकार या संस्थेचा पुनर्विचार अत्यावश्यक आहे व सरकारी भांडवल-शाहीतून प्रगत बाजारपेठीय अर्थव्यवस्थेकडे संक्रमण गरजेचे आहे.

डॉ. केळकरांनी एक 'पर्यायी आर्थिक धोरणा'चाच आराखडा मांडला आहे. सर्वात महत्त्वाची गोष्ट अशी की, 'गरिबी निवारण', 'सार्वजनिक वस्तूंचे/सेवांचे सुयोग्य वितरण व नियोजन' आणि दुसऱ्या बाजूला 'खुले भांडवली खाते' यांची सांगड घालता येते, हा त्यांचा संदेश. आपल्या वैचारिक विश्वात भांडवलशाही हा शब्दही इतका निषिद्ध ठरविण्यात आला आहे की, तो शब्दकोशातूनही लुप्त होतो की काय अशी भीती उदारमतवाद्यांना वाटत होती. डॉ. केळकर यांनी अशाच एका प्रगत, बाजारपेठीय अर्थव्यवस्थेकडे नेण्याचा मार्ग मांडून या मार्गक्रमणात गरिबांना वाऱ्यावर न सोडता, त्यांना आर्थिक स्थैर्य कसे लाभेल याचाही मंत्र सांगितला आहे.

काही प्रश्न मात्र उपस्थित होतात. उदा 'ग्रामीण' व 'शहरी' लोकसंख्या, तसेच 'कृषी' व 'कृषीतर' उत्पन्नातील भेद, अधिक स्पष्ट व्हायला हवेत. तसेच गरिबी-निवारणाच्या उपाययोजनांचा वित्तीय बोजा केंद्र व राज्य सरकारांवर कसा व किती काल पडेल, याचाही अधिक सखोल विचार व्हायला हवा. डॉ. केळकर यांनी अर्थ-व्यवस्थेची भावी दिशा दाखवताना, ती गाठण्याचा मार्गही सांगितला व त्यावरील 'वाहने' कोणती असावीत याचाही अत्यंत समर्पक व तार्किक विचार प्रभावीपणे मांडला आहे. अधिक चर्चा, वाद-विवाद व रचनात्मक दृष्टिकोन यांच्या माध्यमातून या विचारांचे स्वागतच व्हायला हवे.

('लोकसत्ता' च्या सौजन्याने)

✠ ✠ ✠

कधीतरी भविष्यकाळात  
अर्थशास्त्र  
मानवी जीवनरथाचे  
सूत्रधार चक्रधर  
असण्याऐवजी  
मानवाच्या  
सुखीसमृद्ध जीवनाच्या  
रथयात्रेतील केवळ एक  
सहप्रवासी होईल  
अशा दिवसाची  
मी वाट पाहत आहे.

**- विश्वविख्यात अर्थशास्त्रज्ञ केन्स**

अनुक्रमणिका

# जागतिक अर्थव्यवस्था व अर्थकारण

वि. श्री. दामले
अध्यक्ष, युनायटेड वेस्टर्न बँक (निवृत्त)

गेल्या काही दशकात जागतिक अर्थव्यवस्था आणि अर्थकारण यामधे आमूलाग्र बदल झालेले आहेत. कोणत्याही आर्थिक तत्त्वाला अगर व्यवस्थेला त्यांची दखल घेतल्या शिवाय पुढे जाता येणार नाही. भांडवलशाही, साम्यवाद, समाजवाद वगैरे तत्त्वांचे काटेकोरपणे पालन करून कोणत्याच देशाला म्हणजे पर्यायाने मानवाला प्रगती साधता येणार नाही. हे जे बदल झाले आहेत त्यांचे चांगले आणि वाईट असे दोन्ही परिणाम घडले आहेत आणि यापुढेही घडत राहतील. १९ व्या शतकाच्या अखेरीअखेरीस जी आर्थिक प्रगती साधण्याची प्रक्रिया सुरू झाली त्यावेळी निसर्गतःच भांडवलशाही उदयास येणे स्वाभाविक होते. याचे मुख्य कारण असे की, मानवी स्वभाव, गुणधर्म, मानवी मनाची बल आणि कमकुवत स्थाने वगैरेंच्या संदर्भात ही अर्थव्यवस्था अस्तित्वात येऊ लागली. नंतर भांडवलशाहीचे दुष्परिणाम लक्षात येऊ लागल्यावर साम्यवाद, समाजवाद वगैरे तत्त्वांनी आर्थिक व्यवस्था व्यापण्यास सुरुवात केली. यामुळे अनिर्बंध भांडवलशाहीला खीळ बसली आणि सार्वजनिक आर्थिक क्षेत्रे निर्माण झाली. गेल्या काही दशकात जागतिकीकरणाच्या प्रक्रियेच्या प्रसारामुळे पूर्वीची सर्व तत्त्वे आणि धोरणे बाजूला पडू लागली. कोणते तत्त्व अगर धोरण बरोबर अगर चूक याची चर्चा करण्याचा माझा मानस नाही. परंतु हे सर्व झालेले बदल लक्षात घेतल्याशिवाय काही आर्थिक धोरणे ठरविणे अगर चळवळी उभारणे अयोग्य होईल असे मला वाटते.

भारताचा विचार केला तर स्वातंत्र्यपूर्व काळात साम्राज्यवादी भांडवलशाही अस्तित्वात होती. हा साम्राज्यवाद एका देशाने भारतावर लादलेला होता. त्या देशात भांडवलशाही असल्याने भारतातही भांडवली पद्धतीची अर्थव्यवस्था निर्माण होऊ लागली. स्वातंत्र्यानंतर तत्कालीन सत्ताधीशांच्या मतानुसार समाजवादावर आधारलेली मिश्र अर्थव्यवस्था सुरू झाली. या व्यवस्थेत आपला खूपच आर्थिक विकास झाला हे कोणालाही मान्य होईल. हा विकास मुख्यत्वेकरून सार्वजनिक क्षेत्रात झाला असला तरीदेखील खाजगी क्षेत्रालाही विकासात वाव ठेवला होता. या क्षेत्रानेदेखील प्रगती केली. ही परिस्थिती जवळजवळ सन १९७० पर्यंत अस्तित्वात होती. त्यानंतर मात्र जागतिकीकरणाचा झंझावात सुरू झाला आणि परिणामतः ही समाजवादाच्या आश्रयाने उभारलेली मिश्र अर्थव्यवस्था जवळजवळ नष्ट होऊन ती फक्त नावापुरतीच शिल्लक राहिली. जाहीररित्या समाजवादाची संगत सोडली गेल्याचे मान्य केले नाही तरी प्रत्यक्ष व्यवहारात तिचे अस्तित्व जवळजवळ संपुष्टात आले. जागतिकीकरणाच्या तत्त्वाच्या पुरस्कारामागे कोणाचा आणि काय स्वार्थ दडला आहे वगैरे गोष्टींचा ऊहापोह तपशीलवारपणे यापूर्वी अनेकांनी केला आहे. या प्रक्रियेबाबत टोकाची मते असून काही अर्थतज्ज्ञ व विचारवंतांना हे वरदान वाटते तर काहींना तो शाप वाटतो.

आर्थिक व इतर समस्यांबाबत आदर्शवाद जोपासून त्याची चर्चा आणि चिंतन करण्यामुळे जरी मानसिक समाधान मिळाले किंवा एखादे नवीन तत्त्वज्ञान निर्माण झाले तरी प्रत्यक्ष व्यवहारात त्याचा उपयोग होऊ शकेल असे वाटत नाही. कदाचित आणखी काही वर्षांनी अशा तत्त्वाचा प्रभाव निर्माण होऊ शकेल. परंतु प्रत्येकवेळी आणि प्रत्येक प्रश्नाबाबत फक्त आदर्शवादाच्या अनुषंगानेच चिंतन आणि कृती करण्याने सध्याची विपरित परिस्थिती अधिक बिघडत जाऊ शकेल असे मला प्रामाणिकपणे वाटते. तात्त्विकदृष्ट्या व्यवहारवाद क्षुल्लक मानला गेला तरीदेखील त्याचा आश्रय घेऊन आपला देश प्रगती करू शकेल.

भारताच्या आजच्या म्हणजे जागतिकीकरणाची प्रक्रिया सुरू झाल्यानंतरच्या आर्थिक परिस्थितीचा विचार केला असता खालील बाबी नजरेत ठळकपणे भरतात.

१. जागतिकीकरणाने आपले पाय सर्व जगावर घट्टपणे रोवले आहेत. दिनप्रतिदिन ही प्रक्रिया अधिक सामर्थ्यशाली होत असून ती आता सध्यातरी दगडावरची रेघ होऊ पाहत आहे.

२. या प्रक्रियेचा जन्म जरी केवळ विकसित देशांना अविकसित आणि विकसनशील देशांचे अविरत शोषण करता यावे याकरिता झाला असला तरी आता दहा वर्षांच्या कालावधीनंतर देखील तिच्या भयानक रूपाचे सम्यक ज्ञान शोषित देशांना झालेले नाही. किंबहुना यातील बऱ्याच देशांना तर ही प्रक्रिया कल्याणप्रद आहे असेच वाटू लागले आहे.

३. जागतिकीकरणाची प्रक्रिया जागतिक व्यापार-

अनुक्रमणिका

संघटना (WTO) करारांतर्गत झाली असली तरी या करारावर जगातील जवळजवळ सर्वच देशांनी सह्या केल्या असल्यामुळे तो त्यांचेवर बंधनकारक झालेला आहे. ह्या करारावर भारत धरून अनेक देशांनी त्यातील अटी आणि त्याचे होणारे परिणाम ह्यांचा अभ्यास न करता अमेरिका व इतर विकसित देशांच्या दबाव तंत्राला बळी पडून सह्या केलेल्या आहेत हे आता त्यांना उघडपणे दिसू लागले आहे. या करारांतर्गत दर दोन वर्षांनी ज्या मंत्रीस्तरीय परिषदा होतात त्यामध्ये अमेरिका व इतर देश आपले लष्करी आणि आर्थिक सामर्थ्य पणाला लावून त्यांना अनुकूल असलेले बदल करू पाहतात, तर त्यांना प्रतिकूल असलेल्या बाबी कोणतीही लज्जा न बाळगता फेटाळून लावतात. या सर्व गोष्टी आता स्पष्टपणे प्रत्येक परिषदेचेवेळी दिसत आहेत. साम्राज्यवादाचे जुने 'फोडा आणि झोडा' हे धोरण या परिषदांमध्ये प्रगत देश वापरून अतिमागास, मागास, विकसनशील वगैरे कल्पना मांडून देशादेशांमध्ये फूट पाडीत राहतात. ह्या सर्वांचे हितसंबंध वेगवेगळे असून त्यांनी एकत्र येणे त्यांच्या हिताचे नाही असे आवर्जून सांगितले जात आहे. दुर्दैवाने या नीतीला यश येते आहे असे दिसून येऊ लागले आहे. थोडक्यात असे म्हणता येईल, की साम्राज्यवादाचे जुने लष्करी स्वरूप बदलून आता आर्थिक साम्राज्यवाद जागतिकीकरणाच्या अंगाने स्थिर होत आहे.

४.आपल्या देशाचा विचार केला असता असे स्पष्ट दिसते, की आपली अर्थव्यवस्था आता जवळजवळ पूर्णपणे जागतिकीकरणाची संकल्पना आणि जागतिक व्यापार संघटना यांच्या दुष्टचक्रात अडकली आहे. दुर्दैवाने सध्याचे आणि यापूर्वीचे अशी दोन्ही सरकारे जागतिकीकरणाचा पुरस्कार करणारी आहेत. उदारीकरण, मुक्त अर्थव्यवस्था, मुक्त व्यापार, मुक्त स्पर्धा अशी नवनवीन संकल्पनांनी आपल्या देशातील बहुतेक सर्व (म्हणजे राजकीय हितसंबंध परस्परविरोधी असलेले देखील) राजकीय पक्ष आणि आघाड्या भारून गेलेल्या दिसतात. त्यांचेकडून आता या प्रक्रियेला विरोध होण्याची सुतराम शक्यता दिसत नाही. भारतातील सर्व भाषांमधील आणि विशेषत: इंग्रजी भाषेतील प्रसारमाध्यमे (नियतकालिके, दैनिके, इलेक्ट्रॉनिक माध्यमे वगैरे सर्व धरून) जागतिकीकरणाचा मोठ्या हिरिरीने पुरस्कार करीत असून त्यांचा जनमनावर प्रभाव पडत आहे. या प्रक्रियेचे जे भयानक प्रतिकूल परिणाम होत आहेत त्यांना नगण्य प्रसिद्धी दिली जात असून त्यांचेकडे जनतेचे पूर्ण दुर्लक्ष व्हावे असा यामागे हेतू असावा असे दिसते. भारतातील उद्योगपती, उच्च मध्यम वर्ग, सरकारी आणि खाजगी नोकरशाही वगैरे घटक जागतिकीकरणाचे त्यांचे वैयक्तिक स्वार्थापोटी स्वागत करीत आहेत. मात्र सामान्यजनांना तीव्र जीवनसंघर्षाला तोंड द्यावे लागत असून ते हतबल होत चाललेले आहेत. गरिबी, शिक्षणाच्या सोयीचा अभाव, अनारोग्य, वाढती बेकारी अशासारख्या संकटांना तोंड द्यावे लागत असल्याने त्यांना आर्थिक समस्या, धोरणे वगैरेंबाबत विचार करण्यास देखील फुरसत मिळत नसून ते भांबावून गेले आहेत. याउलट उद्योगपती, व्यापारी, उच्च मध्यमवर्ग आणि जागतिकी-करणाच्या प्रक्रियेमुळे निर्माण झालेला नवश्रीमंत व उच्च जीवनमान असलेला वर्ग या प्रक्रियेचा समर्थक बनला आहे. मुक्ततेच्या संकल्पनांनी भारलेल्या तज्ज्ञ आणि विचारवंतांची संख्या वाढत आहे. मात्र या प्रक्रियेच्या विरोधात असलेले विचारवंत अभ्यासाअभावी आणि जुन्या विचारांची जळमटे दूर करण्याची असमर्थता यामुळे कोणतेही मार्गदर्शन करण्याची क्षमता गमावून बसले आहेत. श्रीमंत आणि नवश्रीमंत वर्ग चंगळवादाचे प्रतीक बनत असून 'मागणी तसा पुरवठा' या भांडवलशाहीतील आर्थिक तत्त्वाच्या आश्रयाने या वर्गाला लागणाऱ्या वस्तू आणि सेवा यांचे उत्पादन प्रचंड प्रमाणावर वाढत आहे. त्यांच्या पाश्चात्य जीवनाच्या अंधानुकरणामुळे आहार, पोशाख, सांस्कृतिक जीवन वगैरें-बाबतच्या सवयी बदलत आहेत. इतकेच नव्हे तर त्या तशा बदलाव्यात असा जाणीवपूर्वक प्रयत्न बहुराष्ट्रीय कंपन्या करीत आहेत. देशाच्या संपत्तीचा आणि उत्पादनाचा अवास्तव मोठा हिस्सा या वर्गाच्या उपभोगाकरिता वापरला जात आहे. देशांतर्गत उत्पादनाचे (GDP) जर तपशीलाने विश्लेषण केले तर असे स्पष्ट दिसून येईल, की जो काही विकास होतआहे तो हा वर्ग वापरीत असलेल्या वस्तू आणि सेवा यांच्यापुरताच मर्यादित आहे. साहजिकच सामान्य आणि बहुसंख्य जनतेपासून विकास जास्तीत जास्त दूर जात आहे. श्रीमंत व नवश्रीमंत यांचा देशात एक स्वतंत्र भाग (INDIA) निर्माण होत आहे. या वर्गातील मुलांचेदेखील एक वेगळे जग निर्माण होत आहे. कालांतराने त्यांच्या सामान्यांच्या समस्यांसंबंधीच्या संवेदनाही नष्ट होतील असे भय वाटते. उद्योग-पतींच्या पूर्वीच्या पिढीतील लोकांच्या या संवेदना जागृत होत्या आणि ते सामाजिक बांधिलकी आणि जबाबदाऱ्या मानीत असत. तसेच त्या दिशेने प्रत्यक्ष कार्यही त्यांच्या पिढीत होत होते. मात्र त्यांच्याच सध्याच्या पिढ्यांना ही बांधिलकी आणि जबाबदारी बिलकूल मान्य नाही. मी याबाबत काहींच्या मुलाखती घेतल्या असता ही गोष्ट मला स्पष्टपणे दिसून आली. उत्तम व्यवस्थापन (Good Gover-nance) या नवीन संकल्पनेमध्ये सामाजिक मूल्ये आणि जबाबदाऱ्या यांना कोणतेही स्थान दिले गेलेले नाही. केवळ नफा, कमीतकमी






उत्पादन खर्च व कमाल उत्पादन क्षमता यांनाच केंद्रस्थान दिले गेले आहे. कठोर शब्द वापरावयाचे झाले तर असे म्हणता येईल, की हा वर्ग आता 'निवासी अभारतीय' (Resident Non-Indians) झाला आहे. जगप्रसिद्ध आणि नोबेल पारितोषिक विजेते भारतीय अर्थतज्ज्ञ श्री. अमर्त्य सेन यांनी नुकतेच असे स्पष्ट म्हटले आहे, की 'जो विकास आणि प्रगती होत आहे ती रोजगार वाढीविना होत आहे (Jobless Growth). त्याचप्रमाणे जागतिकीकरणाच्या प्रक्रियेमुळे आर्थिक विषमता अधिकच वाढत असून तिची फळे समाजातील काही विशिष्ट अल्पसंख्य वर्गापुरतीच मर्यादित राहत आहेत. संपत्तीचे केंद्रीकरण होत आहे. 'भारताचा विचार करता असे स्पष्ट दिसते, की आदिवासी, भूमीहीन शेतमजूर, लहान शेतकरी, ग्रामीण भागातील इतर आर्थिकदृष्ट्या दुर्बल वगैरे वर्गात मोडणाऱ्या जनतेची ग्रामीण जनता, शहरातील बेकार वगैरेंची परिस्थितीदेखील फारशी वेगळी नाही. शेतकऱ्यांच्या आत्महत्या आता रोज घडणाऱ्या घटना होऊ पाहात आहेत. आता त्यांचे महत्त्व केवळ संख्याशास्त्रापुरते राहील असे दिसते. या घटना का घडतात, त्यावर काही उपाय करता येईल का या प्रश्नांकडे पूर्णपणे दुर्लक्ष होत आहे. आदिवासी विस्थापित होत आहेत. आता तर शहरातील लोकही विस्थापित होत आहेत. मोठमोठे औद्योगिक प्रकल्प, धरणे, रस्ते वगैरे अनेक योजना आखल्या व राबविल्या जात आहेत आणि त्यातून निर्माण होणाऱ्या विस्थापितांकडे पूर्णपणे दुर्लक्ष केले जात आहे. आज कर्जबाजारी शेतकरी आत्महत्या करीत आहेत. यानंतर बेकार औद्योगिक कामगार, सुशिक्षित बेकार वगैरे वर्गातील लोकही हा मार्ग अवलंबतील अशी भीती वाटते.

५. शहरीकरणाचा वेग सातत्याने वाढत आहे. या प्रक्रियेची दोन कारणे असतात. एक म्हणजे ओढले जाणे (Pull) व दुसरे म्हणजे ढकलले जाणे (Push). ही दोन्ही कारणे सध्या कार्यरत आहेत. प्रादेशिक असमतोल वाढणे आणि उद्योगधंद्यांचे केंद्रीकरण होणे यामुळे 'ढकलणे' ही प्रक्रिया वेग धरत आहे.

६. देशाच्या अंतर्गत उत्पादनातील (GDP) शेतीचा हिस्सा झपाट्याने घसरत आहे. तसेच वस्तूंच्या उत्पादनाचे प्रमाणही घटत आहे. याउलट सेवाउद्योगाचे प्रमाण सतत वाढत आहे. भारतासारख्या पूर्णपणे विकसित न झालेल्या देशांचे बाबतीत या परिस्थितीचा विपरित परिणाम होऊ शकेल अशी शक्यता वाटते. याशिवाय या GDP चे श्रीमंत, मध्यम आणि गरीब लोक वापरत असलेल्या वस्तू व सेवा असे पृथःकरण करून हा विकास कितपत खरा आणि देशहिताचा आहे हेही पाहिले जाणे आवश्यक आहे.

७. विकास होणे ही देशाची निकडीची गरज आहे आणि त्याकरिता काही काळ आणि वर्गांना त्याची किंमत मोजावीच लागेल हे मान्य करणे जरूर आहे. तरीदेखील त्याचे होणारे दुष्परिणाम किमान पातळीवर ठेवणे आवश्यक आहे. व्यापक समाजहिताकरिता वैयक्तिक हिताचा बळी द्यावा लागत असला तरीदेखील सामाजिक न्याय आणि समानता या तत्त्वांचा विसर पडता उपयोगी नाही. परंतु तसा तो सध्या पडत आहे असे स्पष्टपणे जाणवते.

८. सध्या थेट परकीय गुंतवणुकीचे नगारे मोठ्या प्रमाणावर वाजवले जात आहेत. यामध्ये हे गृहीत धरले जात आहे, की ही गुंतवणूक आपल्या देशाच्या विकासाला मोठी चालना देईल आणि अशी गुंतवणूक करण्याची आर्थिक क्षमता आपल्या देशात नाही. हे गृहीत तत्त्व पुन्हा एकदा नीट तपासून पाहिले पाहिजे. अशा गुंतवणुकीला प्रोत्साहन देताना आपल्या देशाच्या अर्थव्यवस्थेवर परकीयांची घट्ट पकड बसत नाही ना याकडे कटाक्षाने लक्ष दिले पाहिजे. भारतात बचतीचा दर खूपच म्हणजे २९% असताना आपल्या देशाची गुंतवणूक क्षमता पुरेशी नाही हे तत्त्वदेखील डोळसपणे तपासून पाहिले पाहिजे. तसेच आपल्या परकीय चलनाच्या साठ्यांत फार मोठी वाढ होऊनदेखील तिचा विकासा-करिता काहीही उपयोग होताना दिसत नाही. FDI मधील वाढीने ही गंगाजळी वाढेल खरी, परंतु ती नुसतीच पडून राहील. इतर क्षेत्रांप्रमाणेच बँकिंग क्षेत्रातही क्रांतिकारक बदल होऊ लागले आहेत. पूर्वीची सामाजिक बँकिंग (सोशल बँकिंग) ची कल्पना पूर्णपणे बाजूला सारण्यात आली आहे. यामुळे ग्रामीण भागाचा होऊ शकणारा विस्तार, लघुउद्योगधंदे यांना मिळणारा पतपुरवठा, स्वयंरोजगार, समाजातील दुर्लक्षित क्षेत्रे वगैरेंकडे दिले जाणारे विशेष लक्ष या सर्व गोष्टी पूर्णपणे दुर्लक्षित केल्या जात आहेत. पूर्वी उद्योगधंद्यांना दीर्घमुदतीचा पतपुरवठा करणारी यंत्रणा जवळजवळ ठप्प झालेली आहे. आय.डी.बी.आय., आय.सी.-आय.सी.आय., यु.टी.आय. अशासारख्या ज्या संस्था याकरिता विशेषत्वाने स्थापन केल्या गेल्या होत्या त्यांचे आता बँकांमध्ये परिवर्तन केले जात असून अल्पमुदतीच्या पुरवठ्यावर लक्ष केंद्रित केले जात आहे. बॅसल २ च्या अंतर्गत असलेली मार्गदर्शक तत्त्वे वास्तविक पाहता आंतरराष्ट्रीय व्यवहार करणाऱ्या आर्थिक संस्थांच्या दृष्टीने तयार केली गेली आहेत. भारतात मात्र ती लहानमोठ्या अशा सर्व (सहकारी धरून) बँकिंग आणि वित्तीय संस्थांना लागू केली जात असून त्यामुळे लहान व

अनुक्रमणिका

मध्यम आकाराच्या वित्तीय संस्था अडचणीत आणल्या जात आहेत. असे आता स्पष्ट दिसू लागले आहे, की यामागील उद्देश या संस्थांचे सामिलीकरण, विलिनीकरण वगैरे करून केवळ मोठ्या संस्थाच अस्तित्वात ठेवण्याचा प्रयत्न चालू आहे. यामुळे माणूस पुन्हा एकदा वित्तीय व्यवस्थेपासून बाहेर फेकला जाऊन त्याची अवस्था अधिकच केविलवाणी होईल.

९. उद्योगांसंबंधी जी लघु व मध्यम उद्योगांना काही क्षेत्रे राखीव ठेवणे, क्षेत्रीय असमतोल नष्ट होण्याकरिता उद्योगांचे विकेंद्रीकरण करणे वगैरे धोरणे होती ती आता पूर्णपणे रद्द केली गेली आहेत. वास्तविक पाहता लघु व मध्यम उद्योग यामध्ये अधिक रोजगारी निर्माण होते. तसेच या क्षेत्रात यापूर्वी भारताच्या एकूण निर्यातीच्या ३५% इतका हिस्सा होता ही बाब दुर्लक्षित केली जात आहे.

वरील सर्व परिस्थितीचा विचार केला जाण्याची अत्यंत आवश्यकता आहे. केवळ तात्त्विक चिंतनाने या समस्यांवर उपाय सापडणार नाही. त्याकरिता व्यवहार-वादाचीच कास धरावी लागेल असे माझे मत आहे. माझ्या दृष्टीने खालील काही उपायांचा विचार केला जाऊ शकेल.

१. ज्याप्रमाणे कोणत्याही प्रकल्पास मंजुरी देण्यापूर्वी प्रदूषणाबाबतचा अभ्यास करण्याकरिता वेगळी संस्था अगर खाते निर्माण केले गेले आहे त्या धर्तीवर सदर प्रकल्पामुळे विस्थापित होणाऱ्या लोकांच्या समस्या व त्यांची सोडवणूक याचा अभ्यास करण्याकरिता स्वतंत्र यंत्रणा उभी केली जावी. तसेच या लोकांचे प्रश्न सोडविण्याकरिता येणारा सर्व खर्च प्रकल्पाकडून वसूल केला जावा. हा प्रकल्प सार्वजनिक अगर खाजगी अशा कोणत्याही क्षेत्रातील असला तरी ही जबाबदारी त्या प्रकल्पावरच टाकावी. या यंत्रणेचे ना हरकत पत्र मिळाल्या नंतरच कोणत्याही प्रकल्पास मंजुरी दिली जावी.

२. सरकारी यंत्रणा ही भ्रष्टाचाराने निकामी झाली असल्यामुळे अशासकीय संस्थांना प्रोत्साहन देऊन त्यांचे जाळे उभारले जावे. या संस्थांनी स्वतंत्र अभ्यास गट स्थापून समाजाचे प्रबोधन करून पुनर्वसन, नुकसान भरपाई वगैरे-बाबत योजना तयार कराव्यात. याकरिता होणाऱ्या सर्व खर्चाचे अनुदान सरकारने त्यांना द्यावे आणि तिचे वाटप करण्याची जबाबदारी त्यांचेवर टाकावी. अर्थात सरकारमध्ये असलेले अकार्यक्षमम वगैरे दोष या संस्थात कालांतराने येऊ शकतील. परंतु सध्या तरी प्रयोगादाखल ही योजना राबविता येईल.

३. लोकसंख्या वाढीवर नियंत्रण हा प्रश्न आणि त्यासंबंधी योजना पूर्णपणे पक्षातीत आणि धर्मातीत ठेवाव्यात. तसेच सर्व आर्थिक धोरणे 'समन्वय आणि व्यापक मान्यता' या तत्त्वावर आधिष्ठित ठेवावीत.

४. वाढती बेकारी रोखण्याकरिता रोजगार वाढीच्या काही योजना जाणीवपूर्वक तयार करून त्यांची अंमलबजावणी कठोरपणे करावी. याकरिता उद्योग, सेवाक्षेत्रे वगैरेंवर नियंत्रण ठेवून कामगार हिताकडे दुर्लक्ष होणार नाही याकरिता परिणामकारक कायदे करून त्यांची कडक अंमलबजावणी करावी.

५. थेट परकीय गुंतवणूक, परकीय चलनसाठ्यातील वाढ, चलनाचे पूर्ण (महसुली आणि भांडवली) परिवर्तन वगैरेंबाबत कोणताही पूर्वग्रहदूषित दृष्टिकोन न ठेवता त्याची आवश्यकता, होणारे परिणाम आणि प्रमाण पुन्हा एकदा तपासून पाहावेत.

६.आपल्या देशाची अर्थव्यवस्था निर्यात केंद्रीभूत ठेवून कितपत योग्य होईल हेही तपासण्याची जरूरी आहे. केवळ निर्यातीत मोठी वाढ व्हावयास पाहिजे, भारताचा आंतरराष्ट्रीय व्यापारातील हिस्सा वाढला पाहिजे वगैरे धोरणे अंधपणाने स्वीकारली जाऊ नयेत. त्यांचा व्यावहारिक कसोटीवर अभ्यास करून निर्णय घ्यावेत.

७. सामाजिक आणि आर्थिक असमानता आणि विषमता सातत्याने वाढत आहे. सामाजिक व आर्थिक दरी रुंदावत आहे. समाजाच्या काही भागाचाच फक्त उत्कर्ष होत असून सर्व आर्थिक ध्येयधोरणे त्यांच्याभोवती फिरत आहेत असे दिसते. या वर्गाच्या उत्पन्नात सातत्याने आणि कमालीची वाढ होत असून सामाजिक आणि आर्थिक दरी अनुलंघनीय होत आहे. या प्रक्रियेमुळे वस्तूंचे उत्पादन आणि सेवा या दोन्ही क्षेत्रात मोठे बदल होत असून या विभागाच्या सोयी सुविधांकरिता आवश्यक असलेले उत्पादन वाढत आहे. केवळ GDP मधील वाढ हा निकष न ठेवता सामाजिक विकासात वाढ होत आहे का याचा विचार केला पाहिजे. या दृष्टीने सध्याच्या संकल्पनांवर आधारित असलेल्या विकासदराचे पुनर्मूल्यन करून खरा विकास समजेल अशी आकडेवारी तयार केली जावी.

✠ ✠ ✠

**शुभ - मंगल ?**

**सावधान !!!**



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका




# नवमध्यमवर्गाला वेसण!

भारताची अर्थव्यवस्था बडे भांडवलदार आणि जमीनदारांनीच वेठीला धरली आहे, असे नाही तर ती नवमध्यम वर्गानेही आपल्या मुठीत ठेवायची धडपड चालवली आहे. हा वर्ग सध्या चंगळवादाच्या मोहात अडकला आहे. अचानक आलेल्या श्रीमंतीमुळे एक प्रकारची आर्थिक अरेरावी त्याच्या वागणुकीत आढळते आहे. मुंबईच्या आजच्या अवस्थेला सरकार, सरकारी यंत्रणा, नोकरशाहीची बेपर्वाई याबरोबरच या नव्या नवमध्यम आणि उच्च मध्यम वर्गाच्या अति लोभी महत्त्वाकांक्षेलाही जबाबदार धरले पाहिजे. मुंबईत १२ लाखांवर खासगी वाहने आहेत. मुंबईची लोकसंख्या १ कोटी २० लाखांच्या घरात आहे. पाच माणसांचे एक कुटुंब गृहीत धरल्यास एका कुटुंबामागे सरासरी दोन-अडीच वाहने हे प्रमाण पडते. प्रत्यक्षात झोपडपट्टीत राहणाऱ्यांकडे साधी सायकल असायचीही मारामार असते. मोडक्या चाळीत भाड्याने राहणाऱ्यांकडे रोज वा लोकलने ऑफिस गाठण्याएवढेच पैसे असतात. पण वाहन असत नाही. यापैकी कित्येकांना 'मल्टिप्लेक्स' ची क्रांती परवडणारी नसते. त्यांच्या दृष्टीने 'मल्टिप्लेक्स' मध्ये जाऊन चित्रपट पाहणे ही देखील अतिरेकी चैन होय. मात्र तरीही 'मल्टिप्लेक्स'च काय, मुंबईत असंख्य बार संध्याकाळनंतर तुडुंब भरलेले आढळतात. बारबाला आता तिथे काम करत नसल्या तरी तिथल्या गर्दीत खंड पडलेला नाही. या गोष्टींना चटावलेला जो वर्ग आहे, तो प्रामुख्याने उच्च मध्यमवर्ग आणि नवमध्यम वर्गाचा आहे. याच वर्गाला केंद्रीय अर्थमंत्री पी. चिदंबरम यांनी इशारा दिला आहे. तो त्यांनी पहिल्यांदाच दिला आहे, असे नाही. चिदंबरम यांनी आता दिलेल्या इशाऱ्यात नवमध्यम वा अन्य कोणत्याही वर्गाचा उल्लेख केला नसला, तरी त्यांच्या डोळ्यासमोर पैसा मिळवायच्या बाबतीत सढळ असणारे नवमध्यम आणि नवश्रीमंतांचे हे वर्ग असावेत. अलीकडच्या काळात ज्यांनी फ्लॅट खरेदीवर ३० लाख रुपये किंवा त्यापेक्षा जास्त रक्कम खर्च केली आहे त्यांनी, तसेच 'क्रेडिट कार्डा'च्या माध्यमातून २ लाख किंवा त्यापेक्षा जास्त रक्कम खर्च केली असेल त्यांनी, आणि 'म्युच्युअल फंडात' ज्यांनी २ लाख रुपये किंवा त्यापेक्षा जास्त रक्कम गुंतवली असेल त्यांनी आपली विवरणपत्रे लवकर भरावा, अन्यथा या मंडळींचा शोध घेऊन त्यांच्याविरूद्ध योग्य ती कारवाई करावी लागेल, असे चिदंबरम यांनी म्हटले आहे. हा वर्ग ६ लाख ६० हजारांच्या घरात असल्याचे त्यांचे म्हणणे आहे. म्युच्युअल फंडात दोन लाखांवर रक्कम गुंतवणारा गरीब नाही, असे त्यांचे ठाम मत आहे. आजकाल 'मॉल्स'मध्ये खरेदी करणारा वर्ग हाही याच गटात मोडणारा आहे. त्याची खरेदीची हौस एवढी बेभान असते, की तिथे मिळणारी वस्तू आपल्याला खरोखरच आवश्यक आहे किंवा नाही, याचीही फिकीर त्याला नसते. हाच वर्ग जमीनजुमल्यातील गुंतवणुकीत अधिक रस दाखवतो. नवमध्यम वर्ग आणि उच्चमध्यम वर्ग सध्या 'फार्म हाऊस' संस्कृतीकडे वळला आहे. ही संस्कृती करचुकवेगिरीच्या पोटी जन्माला आली आहे. चिदंबरम यांनी म्हटले आहे, की प्राप्तिकर विभागाकडे १७ लाख ५२ हजार व्यवहारांची अशी माहिती जमा झाली आहे की, ज्यांची किंमत साडेतेरा लाख कोटी रुपयांच्या घरात आहे. म्हणजेच प्रत्येक व्यवहार हा २ कोटी ८२ लाख रुपयांच्या आसपास झाला आहे. एक वर्ग असाही आहे, की जो एका रात्रीच्या जेवणात कित्येक हजार रुपये उधळून आणि वर तीन आकडी 'टिप' देऊन आपल्या श्रीमंतीचे प्रदर्शन मांडत असतो. या वर्गाला दारिद्र्याचे काय चटके असतात, याची जाणीव नसते. विदर्भ-मराठवाड्यात मृत्यूला जवळ करणाऱ्या शेतकऱ्याचे प्रश्न नेमके काय आहेत, याची माहिती घ्यायची तसदी तो घेत नाही. मात्र, त्याला तुम्ही कर भरलात का, विवरणपत्र सादर केले का, असे विचारले तर तो त्याला आपला अपमान वाटतो. चिदंबरम यांनी सलग दोन वर्षे कर चुकवेगिरी करणाऱ्यांना जसा इशारा दिला तसाच हाही असेल तर मग आपल्या अर्थव्यवस्थेला वळण लावायची भाषा त्यांनी उच्चारणे योग्य होणार नाही. त्यांचा हा इशारा 'नेमेचि येतो मग पावसाळा' या धर्तीचा असावा असे वाटत नाही. चिदंबरम यांनी या उधळ्या वर्गाची आकडेवारी नेमकी दिली आहे, याचा अर्थ त्यांच्याकडे अशा सर्वच प्रकरणांची व्यवस्थित नोंद असली पाहिजे. हाच वर्ग नेमका राजकारण्यांच्या खिशात असतो आणि याची त्या दोघांना यत्किंचितही लाज वाटत नाही. आम्ही कष्ट करतो आणि पैसे मिळवतो, असे सांगणारा जो एक वेगळा वर्ग आहे, तो

अनुक्रमणिका






कोणकोणत्या मार्गाने पैसा गोळा करत असतो याचीही माहिती मग अर्थखात्याकडे जमा असायला हवी. बऱ्याच अंशी अशा वर्गाची मिळकत ही 'अन्य' गोष्टींच्या मार्गाने उभी राहते. जो कुणी त्याच्या सापळ्यात सापडतो, तोही त्याच मार्गांनी पैसा मिळवायचा प्रयत्न करू लागतो आणि हे दुष्टचक्र चालूच राहते. यात सामान्य आणि साधारण मध्यम वर्ग मात्र भरडला जातो. त्याला वेगळे मार्ग नसतात किंवा ते असले तरी त्या वाटेने जाण्याइतपत तो निर्ढावलेला नसतो. आणि या पापभीरू वर्गाला मात्र कुणी त्राता असत नाही. 'म्युच्युअल फंडा'त दोन लाख रुपये गुंतवणारा सेवानिवृत्त आणि तिथे तेवढाच पैसा गुंतवणारा नवश्रीमंत यांना एकाच मापाने मोजून चालणार नाही, हे चिदंबरम् यांना कळते. सेवानिवृत्त नोकरदार आणि सेवानिवृत्त बडा अधिकारी यांच्यात नेमका फरक काय तेही चिदंबरम यांना ठाऊक आहे. काहीजण त्या अधिकारपदावर असतानाच त्या पदाचा लाभ घेऊन जमिनी गोळा करतात आणि आपल्या पुढच्या सात-आठ पिढ्यांची श्रीमंती लोळण्याची कायमची व्यवस्था करतात. त्यां[illegible]घराच्या कोणत्या भिंतीत वा जमिनीत किती पैसा आहे तेही चिदंबरम यांच्या अर्थखात्याला माहीत असायला हरकत नाही. हा एक वर्ग नुसता नवश्रीमंत नव्हे तर नवसंस्थानिक म्हणूनच ओळखला जातो आहे. मुंबईत मलबार हिलवर राहणाऱ्यांना संपूर्ण देशात सोडाच, महाराष्ट्रात, फार काय दादरच्या पलीकडे काय चालले आहे, याच्याशी यत्किंचितही घेणेदेणे असत नाही. त्यांच्यापैकी कुणाकडे वैचारिक कुवत किंवा विवेक नसतो, असे नाही. पण त्याला एवढ्या किरकोळ गोष्टींचा विचार करण्याइतकी फुरसत असत नाही. पैशाचे राजकारण झाले की राजकारणातून पैसा उभा करू आणि मग त्या पैशाचा वापर राजकारणात पाऊल रोवून उभे राहण्यासाठी करू, हा त्यांना जमणारा एकमेव व्यवहार असतो. ही मंडळी मग कुणातरी अन्य राजकारण्याबरोबर भांडवलदारी गुंतवणुकीच्या रस्त्याने जातात आणि त्यातून नवनव्या मालमत्तेच्या वाटा तयार होतात. या नवश्रीमंत आणि नवराजकारणी अशा वर्गाचीही मग भाषा सुरू होते, ती गोरगरिबांच्या कळवळ्याची. प्रत्यक्षात त्यांच्या ठायी तो चुकूनसुद्धा असत नाही. पूर्वी त्याच्या तोंडची भाषा ही समाजवादाची होती, आता ती खुल्या आर्थिक धोरणाचे गोडवे गाण्याची आहे. बहुराष्ट्रीय कंपन्या या आपल्याच वळचणीला पडीक आहेत, असा त्याचा समज असतो. याही वर्गापलीकडे असणारा एक वर्ग वेतनदार नवश्रीमंतांचा आहे. त्याला त्याच्या खानदानात कुणी मिळवले नसेल एवढे वेतन वयाच्या तिशीच्या आतच मिळू लागते. त्याच्या दृष्टीने आणखी काही वर्षांतच आकाशही ठेंगणे होईल, असा भास त्याला त्याच वयात होऊ लागतो. त्यामुळे त्याचे स्वतःच्या कोणत्याच खर्चावर नियंत्रण असत नाही. हा वर्ग उधळेगिरीच्या मार्गाने जातो आणि आपण मिळवत असलेल्या पैशाचा वाटेल तसा विनियोग करायचा अधिकार आपल्याला जन्मसिद्ध आहे, अशी त्याची भावना बनते आणि मग त्याची ही चंगळशाही सुरू होते. त्याला ताळ्यावर आणायची इच्छा चिदंबरम यांना झाली असेल तर तिचे स्वागतच व्हायला हवे.

[लोकसत्ता (६ जुलै २००६) च्या सौजन्याने.]

✠ ✠ ✠

**विकास प्रतिमानांचे**
**प्राणतत्त्व**

लंडनवर अखंड वर्षभर दर रात्री
जर्मन विमाने बॉम्बचा वर्षाव करत होती.
लंडन एक दिवसही
मनात खचले नाही.
London could take it.

स्टॅलिनग्राडला नाझी जर्मन सेनेचा
वर्षभर क्रूर आक्रमक वेढा होता.
अखेर नाझींनाच माघार घ्यावी लागली.
Stalingrad चीही हिम्मत होती.
Stalingrad could take it.

Mumbai is taking it.
India is taking it.
हम सब एक होकर
कामयाब होके ही रहेंगे !

ही वीरवृत्ती व अशी एकता
कोणत्याही राष्ट्रीय विकास प्रतिमानांच्या
अटळ अटी असतात.

**- देवदत्त दाभोलकर**
**(१४ जुलै २००६)**

मैं कल एक अचरज देखकर आया हूँ। एक एकड़ भूस्वामित्व वाला बनासी नाम का माली खुशहाली की जिंदगी जी रहा है।" संयोगवाला वह वृद्ध उस माली से पुराना परिचित था। उस वृद्ध ने मुझसे कहा, "नानाजी। आप शहरी लोग हम ग्रामीणों की हालत समझ नहीं सकते। उस माली के पिता ने अपनी ससुराल से पक्के कुंए सहित वह जमीन पाई थी। वह माली सिंचाई की सुविधा पाकर खुशहाल हो रहा है। यदि हमें भी सिंचाई साधन मिलें तो हम भी उसी प्रकार से खुशहाली की जिंदगी प्राप्त कर सकते हैं।" उस वृद्ध ने मुझे ग्रामोदय का मार्ग दिखाया और मैं ग्रामवासियों के लिए सिंचाई के साधन खोजने में जुट गया।

हर गांव में एकाद बड़े जमींदार को छोड़कर सभी किसानों के पास बहुत छोटे-छोटे खेत होते हैं। ये छोटे किसान स्वयं अपने खेतों की सिंचाई का प्रबंध नहीं कर सकते। गांव के सभी ग्रामवासी सामूहिक प्रयास करें तभी सबके खेत की सिंचाई संभव हो सकती है। लेकिन गांवो में मुकदमेबाजी और पार्टीबाजी के कारण सामूहिक प्रयास संभव नहीं होता।

फलस्वरूप, सरकार के द्वारा चलाई गई "राजीव गांधी जलप्रबंधन योजना" जैसी उपयोगी योजनाएं व्यवहारिक धरातल पर कार्यान्वित नहीं होती। ग्रामवासी इस योजना से परिचित नहीं थे। दीनदयाल शोध संस्थान ने इस योजना का सदुपयोग करने का निश्चय किया। गांव-गांव में ग्रामवासियों की बैठकें की, उन्हें यह योजना समझाई। ग्रामवासियों को मिलकर काम करने के लिए राजी किया। प्रयासों के सुफल प्राप्त हुए और परिणाम स्वरूप, ऐसे गांव में भी जहां पीने का पानी भी उपलब्ध नहीं था, वहां भी सबके खेतों की सिंचाई का प्रबंध संभव हुआ। निराशाग्रस्त ग्रामवासियों के जीवन में सिंचाई के प्रबंध के कारण खुशहाली के दिन दिखाई पड़ने लगे। वर्षा के भरोसे जहां एक भी फसल ठीक से उगाना अनिश्चित था, वहां सिंचाई के प्रबंध के कारण सभी किसान आराम से दो फसलें उगाने लगे। सभी ग्रामवासियों द्वारा मिलकर काम करने का लाभ लोगों को दिखाई पड़ने लगा।

हर गांव के ग्रामवासियों के मुकदमें कचहरियों में चल रहे थे। आपसी अनबन से सबका मिलकर काम करना कठिन हो रहा था। दीनदयाल शोध संस्थान के समाजशिल्पी दम्पतियों ने गांव के बुजुर्गों द्वारा ग्रामवासियों को समझाया कि मुकदमों में लगे रहने से जीवन में तरक्की करना संभव नहीं होगा। अतः आपस में मिल बैठकर आपसी विवादों को सुलझा लें। एक बार जब सभी विवाद सुलझा लिए जाएंगे, तब उन सिंचाई परियोजनाओं पर मिलकर काम करना संभव हो सकेगा, जिसे सभी ग्रामवासियों को लाभ होगा।

गांव के लोगों को बुजुर्गों की सलाह जंच गई। गांवों में होड़ लग गई कि हम अपने गांव को विवादमुक्त गांव बनाएंगे। परिणामस्वरूप, अभी तक चित्रकूट के चारों ओर के ८० गांव विवादमुक्त हो रहे हैं। गांव के लोगों ने सर्वसम्मति से तय किया है कि हम अपना विवाद लेकर अब कचहरी में नहीं जाएंगे, आपस में ही मिल बैठकर सुलझा लेंगे। गांवो में फैली मुकदमेबाजी की सालों से चली आ रही महामारी से मुक्ति पाने का मार्ग सुलभ हो गया है। सन् २०१० तक चित्रकूट के चारों ओर के ५०० गांव इसी रूप में विकसित होंगे, यह विश्वास निर्माण हुआ है।

स्नेहांकित
**नाना देशमुख**
दिनांक: २८-०७-२००५



**अखिल भारतीय कांग्रेस कमेटी**
२४ अकबर रोड, नयी दिल्ली ११००११

**दिग्विजय सिंह**
महासचिव

२९ जून २००६

प्रिय श्री. डिके,

आपका पत्र मिला। इसके लिये मैं आपका आभारी हूँ।

किसान की कृषि भूमि की होल्डिंग कम होती जा रही है, ऐसे समय में श्री दाभोलकरजी की १० गुंठा खेती का प्रयोग और महत्त्वपूर्ण हो जाता है। मुझे इस बात का दुख है कि दाभोलकरजी के जीवन काल में मैं इसका प्रयोग मध्य प्रदेश में नहीं कर पाया। इन्होंने इस क्षेत्र में जो काम किया है उसे बढ़ाना हमारी प्राथमिकता है, और मैं अपनी ओर से अपने आपको प्रयोग परिवार के साथ जोड़ना चाहता हूँ।

शुभकामनाओं सहित,

आपका
**दिग्विजय सिंह**

रजिस्टर.क्र. ११६९७/५७

## या अंकात समावेश -

- सुबोध वागळे
- विनायकराव कुलकर्णी
- य०भा० दामले, ए० रमणम्मा
- प्र०चिं० शेजवलकर
- अरुण डिके, भावना आपटे, सुनीला सामंत
- राम मनोहर लोहिया
- वसंत पळशीकर
- देवदत्त दाभोलकर
- बाबा आढाव
- म०रा० कांबळे
- विजय साठे, इंदवी तुळपुळे
- विजय केळकर
- वि०श्री० दामले
- संदीपन बडगिरे
- ए०पी०जे० अब्दुल कलाम
- मेधा पाटकर
- नानाजी देशमुख
- वसंत पेठे

यांच्यापैकी कोणाशीही संपर्क साधण्यात अडचण असल्यास प्रा० देवदत्त दाभोलकर यांच्याशी संपर्क साधावा.

### 'प्रयास' विषयी

प्रयास ही नोंदणीकृत संस्था असून गेल्या दहा वर्षांपासून ऊर्जा, शिक्षण व पालकत्व आणि आरोग्य अशा क्षेत्रांमध्ये कार्यरत आहे. व्यावसायिक ज्ञान व कौशल्ये यांच्या आधारे गावपातळीवरील संघटना - संस्थांना पाठबळ पुरवणे असे या कामाचे स्वरूप आहे. गेल्या चार वर्षांपासून संस्थेने ग्रामीण भागातील संसाधने आणि उपजीविकेचा प्रश्न (Resources and livelihood) या विषयावर अभ्यास, कार्यकर्त्यांचे प्रशिक्षण, शेतीमधील प्रात्यक्षिक काम सुरू केले आहे.

'ग्रामीण उपजीविका' या विषयाचा विचार करताना शासकीय धोरणे आणि योजना यांचा विचार करणे अपरिहार्य ठरते, या विचाराने गेल्या दीड वर्षापासून महाराष्ट्र राज्याच्या 'रोजगार हमी योजने'वर संस्थेने काम सुरू केले आहे. अनुभवी कार्यकर्ते आणि अभ्यासक यांच्या सहयोगाने रोहयोच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी लोकशिक्षण व धोरणवकिलीचे प्रयत्न असे या कामाचे स्वरूप आहे. गेल्या दीड वर्षात प्रयासने 'रोजगार हमी योजने'वर अभ्याससाहित्य तयार केलेले आहे.

पत्ता :

'प्रयास' सर्व्हे नं. १३३, विवेकानंद सोसायटी, वारजे, पुणे ४११०५२.

हे मासिक घ.वा. जोशी यांनी अक्षरसाहित्य, ३५, गुरुकृपा सो., शाहूनगर, गोडोली, सातारा ४१५००१ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.



अनुक्रमणिका